श्री

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

# मुसलमानी रियासत

## भाग दुसरा

मोगल बादशाही [ १५२६–१८०३ ]

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.

प्रकाशक

महादेव आणि कंपनी, पुणें शहर

आवृत्ति तिसरी

किंमत ३॥ रुपये

# प्रस्तावना

## ( तृतीयावृत्तीची )

——:०.——

पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत या नवीन आवृत्तिसंबंधानें खुलासा करण्यात आला आहे तो वाचकानीं लक्षांत आणावा. साधन—ग्रंथाची अभ्यासकांच्या सोयीची यादी सुद्धां पहिल्या भागाचे आरंभी दिली आहे. पूर्वीची आवृत्ती स. १९१० साली निघाली, तेव्हांपासून नवीन संशोधनानें जी माहिती बाहेर आली, तिचा समावेश शक्य तितका करून हें पुस्तक सामान्य वाचकांच्या व विद्यार्थ्यांच्या सोयीचें केलें आहे. पूर्वीची ९०० पानाची आवृत्ति वापरण्यास बोजड वाटल्यामुळें, हल्ली तिचे दोन भाग पाडिले आहेत. पहिला भाग कांहीं महिन्यापूर्वी प्रसिद्ध झाला, त्या पुढचा हा दुसरा भाग आतां वाचकाचे हाती देण्यास मला संतोष वाटतो. ही माझी अल्प सेवा सर्वांनी गोड करून घ्यावी अशी विनंति आहे.

कामशेत, जि. पुणे,
ता. १५ ऑगस्ट, स० १९२८ } **गोविंद सखाराम सरदेसाई.**

# अनुक्रमणिका

# चुकांची दुरुस्ती



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ५ | प्रकरण २१ वें | प्रकरण २० वें |
| ८८ | ८ | (पृ. १६८ टीप पहा) | (पृ. १६८ भा. १ चें पहा.) |
| १६१ | १० | १५५५ | १५८५ |
| २१२ | १६ | शहाजहानच्या वेळेस | जहांगीरच्या वेळेस |
| २१४ | ३ | १६१२ | १६०९ |
| | | शहाजहान १९ वर्षांचा | शहाजहान १७ वर्षांचा |
| २७३ | २८ | भा. ३ पृ. ६९० | भा. ५ पृ. ३९० |
| २९८ | १३ | स. १६६३ | स. १६८३ |
| ३०१ | २५ | कामें करितात | कामें करीनात |
| ३०५ | ३ | ही ओळ ४ थ्या ओळीच्या पुढें वाचावी. | |
| ३७० | २५ | चाळीस बैल | ४० मैल |
| ४२२ | ९ | शहाजादा | बादशहा |

---

* गोवध मनाईचा वृत्तान्त पृ. ४३१ वर पाहवा

## वंशावळ मोगल बादशहांची ( तपशीलवार )

[ बाबर हा आईकडून मोगल व बापाकडून तुर्क हें यांत स्पष्ट होईल. ]



**१ बाबर** (पृ. ५५)

=१ महाम बेगम — =२ गुलरूख बेगम — =३ दीलदार बेगम

**२ हुमायून** (पृ. ८६) — कामरान — अस्करी — हिंदाल — गुलबदन बेगम

=१ हमीदाबेगम — =२ महाबेगम

**३ अकबर** (पृ. ८५) — महंमद हकीम

=१ जोधाबाई — =२ सलीमाबेगम — =३ दौलतशाद

**४ जहांगीर** (पृ. १५३) — मुराद — दानियाल

=१मानबाई — =२ जोधबाई — =३ ख्वाजाहसनची मुलगी — =४ राठोडबाई

खुस्रू — **५ खुर्रम् ऊ० शहाजहान** (पृ. २१४) — पर्वीझ — शहर्यार

= अर्जुमंदबानू ऊ० मुम्ताजमहल =८ मुलगे व ६ मुली

जहानआरा — दारा — शुजा — रौशनआरा — **६ औरंगजेब** — मुराद — गौहरआरा

=१ दिलरास बानू — =२ नबाबबाई — =३ उदेपुरी

झेबुन्निसा — झीनतुन्निसा — झुब्दतुन्निसा — अजीम — अकबर — ७ मुअज्जम **बहादूरशहा** — कामबक्ष

- ६ **औरंगजेब** (पृ २७६)
  - ७ **बहादूरशहा**
    - ८ मोइझुद्दीन **जहांदरशहा**
      - मुलगी
      - राबी बेगम
      - १२ अजीजुद्दीन ऊ **आलमगीर** दुसरा
      - इज्जुद्दीन
      - अज्जुद्दीन याची मुलगी लग्न अब्दाली
    - अजीमुश्शान
      - महंमद करीम
      - ९ **फर्रुखसेयर**
        - फर्खुंदासियार जहांगीरशहा
        - जहान मुरादशहा
        - बादशहा बेगम ऊ० मलिका अज्जमानी मृ १७८८
      - हुमायूनबख्त
    - रफीउश्शान
      - इब्राहीम बादशहा अल्पकाल
      - रफीउद्दौला ऊ शहाजहानसानी १७५९
      - रफीउद्दराजत बादशहा अल्पकाल
    - खुजिस्ताअख्तर ऊ जहानशहा
      - १० रोशन-अख्तर ऊ **महंमदशहा** सन १७१९-४८
        - =१ मलिका अज्जमानी फर्रुखसेयरची मु
        - =२ उधमबाई
          - चंदाजमानी ल तयमूरशहा अब्दाली
          - ११ **अहंमदशहा**
  - अजीम
    - अलातबार
    - बेदरबख्त
      - बेदारदील
  - अकबर
    - महंमदअश्गार
    - नेकूसियार बादशहा अल्पकाल


१२ आलमगीर दुसरा
१३ मींर्झा अली गौहर ऊ० शहाआलम [ १४-६-१७२८—१८-११-१८०६ ]
मीर्झा जवानबख्त मृ. १-६-१७८८
१४ अबुलनसर मूइझुद्दीन अकबर मृ. ३०-९-१८३७
मीर्झाजहांगीर
१५ अबुल मुज्फर सिराजुद्दीन महंमद बहादूरशाहा दुसरा मृ. ७-११-१८६२ रंगून येथें
सुलेमान शेखो
मुज्फरबख्त स. १७८९-९१ त पुण्यास होता.
दाराबख्त मृ. १८४९
फक्रुद्दीन मृ. १०-७-१८५६
जवानबख्त
मीर्झा खुरेश
( हे दोघे स. १८५७ च्या बंडांत मारले. )

## मोगलांचे पूर्वज [ मूळ वस्ती मोंगोलिया ]

**चंगीझखान पासून बाबर**

( बाबरनामा, बीव्हरिज, भाग १ पृ १९, लंडन १९२२ )

**चंगीझखान ( ११६३-१२२७ ),** पहा पृ. १

|
झगताईखान
|
मुआतूखान
|
यिसून्तवाखान
|
बराकखान
|
दावाखान
|
ऐसान-बूगाखान
|
तुघ्लुक-तिमूरखान
|
खिजर-ख्वाजाखान
|
मुहम्मदखान
|
शेरअली-औख्तान
|
वैसखान
|
यूनसखान
|
**कुतलघनिगारखानम्**
( बाबराची आई )

# मुसलमानी रियासत

## भाग दुसरा

### मोगल वंश

### १५२६-१८०३.

## प्रकरण २१ वें

### जहीरुद्दीन महंमद बाबर

### इ. स. १५२६-१५३०.

१ पूर्ववृत्त, ( ज. १४८३ ). २. मध्यआशियातील नशिबाचे खेळ.
३ पानिपतची लढाई व हिंदुस्थान काबीज. ४ शिक्रीची लढाई, राणा संगाचा पाडाव.
५ इतर शत्रूंचा पाडाव व मृत्यु ६. बाबराची योग्यता.
७. बाबराचें आत्मचरित्र.

१ **पूर्ववृत्त,** ( स. १४८३–९४ ).—जहीरुद्दीन महंमद बाबर हा बापाकडून तयमूरलंगी तुर्क व आईकडून चंगीझखानी मोगल होय चंगीझखानाची वंशावळ अशीः—



झगताईखानाच्या वंशांतील यूनसखानाची एक मुलगी ती बाबराची आई. म्हणून बाबर हा आईकडून मोगल होता. मोगलांनीं मध्य आशियांत येऊन तेथें स. १३५० च्या सुमारास मुसलमानी धर्म स्वीकारिला. तयमूरचा पांचवा पूर्वज झगताईखानाजवळ वजीर होता. झगताईखानावरून पुढें मोगल घराण्यास ' झगताई' असें नांव मिळून, त्याचाच अपभ्रंश ' चकते ' किंवा ' चकत्यांची पातशाही ' असे शब्दप्रयोग अठराव्या-शतकांत मराठी लेखक वापरीत. झगताईपासून ११ वा पुरुष यूनसखान.

बाबराचा आजा अबूसईद मीर्झा हा तयमूरनें जिंकलेल्या विस्तृत राज्याचा मालक झाला. त्यास अकरा मुलगे होते. त्या सर्वांनीं त्याच्या मरणानंतर तें राज्य वांटून घेतलें. चवथा उमरशेख मीर्झा हा बाबराचा बाप होय. उमरशेख याजला प्रथम काबूलचें राज्य मिळालें होतें, परंतु तें त्याजकडून जाऊन सिरदर्या नदीच्या उगमा-जवळील फरघाना प्रांत त्यास मिळाला. उमरशेख मीर्झा हा विद्वान् असून कवींचा आश्रयदाता व महत्त्वाकांक्षी होता. तसाच तो उदार, शूर व न्यायदक्षही होता असें बाबरानें लिहिलें आहे.

फेब्रुवारी ता. १४, स. १४८३ रोजीं बाबराचा जन्म झाला. तयमूरलंगापासून त्याचा वंशावतार दाखविणारी वंशावळ शेवटीं दिली आहे. तयमूरलंग स. १४०५ त वारला, त्या वेळीं त्याचें राज्य जरी अफाट होतें, तरी त्याची व्यवस्थित जुळवाजुळव झालेली नव्हती. म्हणून लगेच त्याचे तुकडे होऊन त्याच्या वंशजांच्या हातांत मध्य-आशियांतला ऑक्सस् ऊर्फ अमूदर्या व जक्झार्टस् ऊर्फ सिरदर्या ह्या दोन नद्यांचा मधला प्रदेश तेवढा राहिला. तयमूरचा वंशविस्तार मोठा असून, प्रत्येक वंश जाच्या हातीं कांहींना कांहीं कारभार होता. बाबराचा चुलता सुलतान अहंमद मीर्झा हा समर्कंद येथें राज्य करीत असे. पूर्वेस हिसार येथें त्याचा दुसरा चुलता महंमद ह्याचें राज्य होतें. तिसरा चुलता उलूघबेग ह्याच्या ताब्यांत काबूल व गज्नी हे प्रांत होते. आणि बाबराचा बाप उमरशेख मीर्झा ह्याचा अंमल फरघाना प्रांतावर होता. हा प्रांत सिरदर्या नदीच्या उगमाशीं असून त्यास हल्लीं खोकंद असें म्हणतात. कवि व विद्वान यांचें आगर अशी या फरघाना प्रांताची ख्याति होती. त्याची राजधानी अंदिजान शहर असून, आक्शी म्हणून दुसरें एक मजबूद शहर त्या प्रांतांत होतें. हा सर्व प्रदेश डोंगराळ असून बराच वर्फाच्छादित असतो. बाबराचा बाप उमरशेख मीर्झा हा आक्शी येथें ता. ९ जून, १४९४ रोजीं डोंगरावरून खालीं घसरून मरण पावला. ' जून १४९४ त मला फरघाना प्रांताचें राज्य प्राप्त झालें, ' हें बाबराच्या आत्मचरित्रां-तलें पहिलें वाक्य आहे.

वर सांगितलेल्या तयमूरच्या वंशजाच्या राज्यापलीकडे, पूर्वेस व उत्तरेस, चंगीझखानाचे मोगल वंशज आपला आनुवंशिक लुटीचा धंदा करून राहत होते त्यांत यूनसखान म्हणून एक बराच प्रसिद्ध पुरुष होता बाबराचा आजा सुलतान अबू सईदमीर्झा ह्यानें यूनसखानास पुष्कळ साह्य केल्यामुळें, त्याने आपल्या तीन मुली मेहर निगार, कुन्लघ निगार, व खूब निगार, अबू सईद मीर्झाच्या तिघा मुलास दिल्या, त्यांतील कुन्लक निगार खानम ही बाबराची आई होय. यूनसखानाची बायको इसान–दौलत बेगम ही बाबराची आजी पुढें बहुतेक त्याजपाशींच राहत असे. बाबर जन्मला, तेव्हा त्याच्या नामकरण समारंभास सत्तर वर्षांचा वृद्ध यूनसखान मुद्दाम अदिजान येथे आला होता जहीरुद्दीन महंमद हें त्याचे आरबी नाव ठेवण्यात आलें. पण यूनसखानास तें परकी नाव चांगलेंसें उच्चारिता येईना, म्हणून त्यानें 'बाबर' हें दुसरे नाव स्वत त्यास दिलें, त्याच नावानें तो पुढें प्रसिद्धीस आला बाबराचा अभ्यास लहानपणीं चांगलाच झाला असला पाहिजे कारण बाप वारल्यावर त्याजवर ज्या आपत्ति कोसळल्या, त्यामुळे विद्या शिकण्यास त्यास फुरसत मिळणे शक्य नव्हतें हें त्याचे लहानपणचें शिक्षण त्याची आई व आजी ह्यानीं केलें. ह्या बायांच्या ठिकाणी मोगलाचे कित्येक अस्सल गुण कायम होते, आणि अनेक संकटें आली असताही ह्या बायानीं त्यास कधीं सोडिलें नाही. आजी दौलतबेगमची योग्यता फार मोठी होती 'तिचें शहाणपण व अक्कल कोणासही येणार नाहीं ती मोठी धोरणी असून, पुढें काय प्रकार घडणार तें तीं सहज ताडी तिच्या सांगीवरून मी अनेक मोठमोठीं कामे हातीं घेतलीं. एकदा तिच्या नवऱ्याला व तिला शत्रूनी पकडिले, आणि तिला एका सरदाराच्या हवालीं केलें पुढें तो सरदार तिच्याकडे आल्याबरोबर, तिनें खोलीचे दार लावून घेतले, आणि आपल्या बायामंडळीकरवीं त्याचा खून करविला. हें पाहून तिचा शत्रु शेख जमाल ह्यास संताप आला तेव्हा तिनें जबाब दिला, कीं 'मी यूनसखानाची बायको असता, शेख जमालनें मला दुसऱ्यालाच देऊन टाकिलें, म्हणून मीं त्याचा प्राण घेतला. मर्जी असेल तर त्याबद्दल माझा जीव घ्या, मी तयार आहें.' हा रोखठोक जबाब ऐकून जमालखानानें तिला नवऱ्याकडे पोचविलें. ह्या गोष्टीवरून तिचें प्रखरपाणी व्यक्त होतें. ह्या निर्धारी बाईचाच बाबरास हरएक अडचणीत विशेष उपयोग झाला

सन १४९४ च्या जून महिन्यात अदिजानच्या किल्ल्यावर राज्याची मालकी बाबराच्या अंगावर येऊन पडली त्याबरोबर अनेक शत्रूनीं चहूंकडून अंदिजानवर चाल केली, त्यात त्याचा चुलता समरकंदचा सुलतान अहमद हा मुख्य होता. अदिजानवर

येण्यास मध्यें एक लहानशी नदी लागते, तिजवरील पुलावरून अहंमदचे लोक येत असतां, पूल कोसळून बरेच लोक मेले. तेव्हां हा अपशकून समजून अहंमद मीर्झा परत गेला. शिवाय चार वर्षांपूर्वी ह्याच ठिकाणीं बाबराच्या बापानें अहंमदाच्या फौजेचा पराजय केला होता. ह्याच संधीस कांहीं एका भयंकर सांथीनें अहंमदाचे पुष्कळ घोडे मेले. अशा अडचणींत बाबराशीं सलोखा करून अहंमद मीर्झा परत गेला; आणि तेवढ्यापुरता बाबराचा बचाव झाला. तथापि बाबराच्या मनांत आपण समर्कंद जिंकून तयमूरच्या सिंहासनावर बसावें असें फार होतें. हा नाद त्यानें पंचवीस वर्षे एकसारखा चालविला होता. तीनदां समर्कंद राजधानी त्याच्या हातांत पडली, पण तीनदांही ती हातची गेली. त्यामुळें उद्विग्न होऊन शेवटीं त्यानें आपला मोर्चा हिंदुस्थानाकडे फिरविला. ह्या पंचवीस वर्षांच्या युद्धप्रसंगांत व अडचणींत जो अमोलिक अनुभव त्यास मिळाला, त्याच्या योगानें हिंदुस्थानांत नवीन राज्य कमावण्याची योग्यता त्याच्या अंगीं उत्पन्न झाली.

**२. मध्यआशियांतले नशिबाचे खेळ,** ( १४९४–१५१९ ).—मध्य-आशियांतील बाबराच्या झटापटी कल्पित कादंबरीलाही शोभण्यासारख्या आहेत. समर्कंद, बुखारा, बाल्क हीं शहरें सिकंदर बादशहाच्या वेळेपासून प्रसिद्धीस येऊन हजारों वर्षांच्या घडामोडींत संपन्न व सुंदर झालीं होतीं. तेथें अनेक विद्याकला उत्कर्ष पावल्या होत्या. अमूदर्या व सिरदर्या ह्या दोन नद्यांच्या मधील प्रांत अत्यंत सुपीक व रमणीय आहे. त्यांच्या मुळाशी वर फरघाना प्रांत आहे, त्यास एखाद्या उत्कृष्ट बागाची उपमा देतां येईल. ' द्राक्षें, डाळिंबें, खरबुजें, इत्यादि फळें अंदिजान व आक्शी येथें होतात तशीं दुसऱ्या कोठें होत नाहींत, ' असें बाबर म्हणतो. आक्शीच्या खरबुजांचें वर्णन तर पदोपदीं आढळतें. आपल्या नातेवाइकांचीं व तत्कालीन अनेक पुरुषांचीं वर्णनें बाबरानें आपल्या आत्मचरित्रांत दिलीं आहेत. त्याचे बरेच नातेवाईक व स्नेही त्याच्या अगदीं भजनीं असत. लहानपणापासून दुसऱ्याचें चित्त आपणाकडे आकर्षून घेण्याची कला बाबरास चांगली साधलेली होती. तथापि ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं अगदीं भरंवशाच्या लोकांनीं त्यांस सोडून दिल्याचे प्रसंग कांहीं थोडेथोडके आले नाहींत. पुष्कळदां असा प्रकार घडावा, कीं आतां पुढें बाबरास कांहीं एक आशा उरलेली नाहीं, सर्वांनीं त्यास सोडून द्यावें. तथापि त्याचा स्वतःचा धीर कधीं खचला नाहीं. आपण आपला भाग्योदय काढणार, ही त्याची निष्ठा अक्षय होती. ह्या निष्ठेच्या जोरावरच त्याचे बेत सिद्धीस गेले.

समर्कंद येथे अहंमद मीर्झा राज्य करीत होता, तो मरण पावला, व बाबराचा दुसरा चुलता महंमद मीर्झा ह्यास तें राज्य मिळालें पण तोही स १४९५ त मरण पावल्यावर अनेक असामी समर्कंदवर चालून गेले, त्यात बाबरही गेला नोव्हेंबर स १४९७ त समर्कंद त्याच्या हातात आलें तयमूरच्या राजधानीत त्यास राज्याभिषेक झाला, आणि त्या ठिकाणीं आपला नीट बंदोबस्त करण्याच्या उद्योगास तो लागला त्या वेळीं त्यानें आपल्या सरदारास व फौजेस समर्कंद शहरात लूट करूं दिली नाहीं, म्हणून नाखूष होऊन एकामागून एक त्याचे लोक त्यास सोडून गेले अशा अडचणीत तो स्वत अतिशय आजारी पडला. चार दिवसपर्यंत बोलणे सुद्धा बंद होतें ही बातमी अदिजान येथे पोचून त्या शहरावर शत्रु चाल करून आले, तेव्हा अदिजानच्या बचावास त्वरा करून यावें, अशी निकडीची पत्रें बाबरास येऊन, थोडा बरा झाल्यावर तो लगेच समर्कंद सोडून निघाला त्याबरोबर इकडे त्याचा चुलतभाऊ सुलतान अली ह्याने समर्कंद काबीज केलें, आणि तिकडे त्याचा भाऊ जहागीर मीर्झा ह्यानें विश्वासघात करून लष्करास वश करून घेऊन अदिजान घेतलें समर्कंद शहर चागलें ताब्यात आलें नव्हतें तरी वडिलोपार्जित फरघाना प्रातावर त्याची विशेष प्रीति असल्यामुळें, तो एकदम आपल्या भावाची खोड मोडण्यास निघाला रस्त्यात त्यास अशी बातमी लागली, कीं आपण मेलो अशी गप उठवून जहागीर मीर्झानें फरघाना प्रातांचें राज्य बळकाविलें साराश, समर्कंदच्या नादात, अदिजानही जाऊन बाबरास वनवास पत्करावा लागला समर्कंद येथे त्याचा मुक्काम फक्त शभर दिवस होता चागले चागले सर्व लोक त्यास सोडून गेले फार तर शेदोनशे टाकाऊ लोक त्याजपाशीं राहिले ‘ आता मात्र माझा धीर अगदीं खचला. माझी चोहोकडून निराशा झाली, आणि मी एकसारखा रडूं लागलों, ’ असें त्यानें आत्मचरित्रात लिहिलें आहे खोकद येथे त्याची आई व आजी त्यास येऊन भेटल्या तेव्हा नवीन हुरूप येऊन तो पुढील उद्योगास लागला रानातील नवीन लोकाच्या टोळ्या त्याच्या मदतीस आल्या, आणि लवकरच आक्शी व अदिजान ही दोनही शहरें त्याच्या हस्तगत झालीं, ( जून, स. १४९९ ) इतक्यात पुनरपि युद्धप्रसंग सुरू होऊन त्याचा भाऊ जहागीर ह्यास आक्शीचें ठिकाण देणें बाबरास भाग पडले, ( स १५०० ). याप्रमाणें त्यानें भावाशीं गोडी केली. दोघानीं मिळून समर्कंद जिकावें आणि मग फरघाना प्रात जहागिरास द्यावा अशी त्याची कबुलात झाली. समर्कंद जिंकण्याची बाबरास फार उत्कठा लागली होती, इतक्यात तेथून त्यास

बोलावणेंही आलें. स. १५०० च्या जून महिन्यांत बाबर पुनः समर्कंदवर निघाला, आणि एके दिवशीं रात्रीं अनायासें बाबराचा शहरांत प्रवेश झाला. त्याबरोबर लोकांत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. त्याची आई व आजी त्यास येऊन भेटल्या. बाबरास अजून पुष्कळ बंदोबस्त करावयाचा होता. उझबेक मोगलांचा सरदार महंमद शयबानीखान समर्कंद काबीज करण्यास टपला होता. चंगीझखानाचा नातू शयबान म्हणून होता, त्याचा हा वंशज असल्यामुळें, त्यानें शयबानीखान असें नांव घेतलें. त्याजबरोबर बाबराची लढाई होऊन त्याचा पुनरपि पराजय झाला. त्याचे सर्व लोक पळून गेले आणि दहा पंधरा लोकांनिशीं घोड्यासकट कोहिक नदींतून पोहून तो परत समर्कंद येथें आला. शयबानीनें त्यास वेढा घातला, त्या वेढ्यांतून एके दिवशीं मध्यरात्रीं आपल्या आईआजींसह तो जीव घेऊन पळून गेला. त्या रात्रीच्या त्यांच्या हालांचें चित्तवेधक वर्णन त्यानें दिलें आहे. बरेच दिवस तो डोंगरांतून भटकत होता, त्या वेळीं एक फार वृद्ध बाई त्यास भेटली. तिनें तयमूरलंगाच्या स्वारीच्या गोष्टी लहानपणीं ऐकिलेल्या होत्या, त्या बाबरास सांगून त्यास हिंदुस्थानावर स्वारी करण्याची भर दिली. पुढें कांहीं दिवस तो आपल्या मामाच्या आश्रमास तास्कंद येथें गेला. इकडे शयबानीखानानें आपलें राज्य पुष्कळ वाढविलें. त्यानें तास्कंदही काबीज केलें, तेव्हां स. १५०३ त आक्शी येथें पराभव होऊन, बाबर आपल्या भावासह पळून काबुलाकडे आला. तो लिहितोः—

'अशा अनिश्चित स्थितीनें मी अगदीं कंटाळून गेलों. घर नाहीं, दार नाहीं, अशा स्थितींत जगावें तरी कशाला ! मी मनांत म्हटलें, असल्या हालअपेष्टेंत व विपत्तींत दिवस कंठण्यापेक्षां कोठें तरी एकांतांत जाऊन बसणें बरें. तेथें मला कोणी ओळखणार नाहीं व विचारणारही नाहीं. अशा अपमानांत लोकांस तोंड दाखविण्यापेक्षां मनुष्याचें दर्शन नाहीं अशा ठिकाणीं जिकडे पाय नेतील तिकडे पळून जावें. एकदां मनांत वाटे चीन देशांत जावें. लहानपणापासून चीन देश पाहण्याची मला उत्कट इच्छा होती. पण मी राजा पडलों ना, राज्य सोडून जायचें कसें ! शिवाय माझा गोतवळा व लवाजमा कोठें टाकून द्यायचा ! आतां राज्य तर गेलें. तेव्हां एक अडचण दूर झाली. आईची व्यवस्था लागली आहे. तेव्हां आतां वाटेल तिकडे जाण्यास मला कसची आडकाठी !'

काबूल येथें बाबराचा चुलता उलूघबेग राज्य करीत होता, तो सन १५०१ त मरण पावला. त्याच्या अल्पवयी मुलाकडे कारभार आल्यामुळें वजीर सर्व अधिकार

बळकावून बसला होता. हा वजीर लोकास अप्रिय होऊन मारला गेला. अशा घालमेलींत बाबरानें जाऊन काबूलचे राज्य हरण केले. नतर थोड्याच दिवसानीं त्याने कदाहार शहर घेतलें, ( स १५०४ ). ह्या वेळेपासून त्याच्या विचारास व उद्योगास निराळी दिशा लागली समर्कदहून काबूल व काबूलहून दिल्ली, असा पूर्वापारचा मार्ग चालत आलेला होता. बाबराने बरेच लोक जमा केले. स १५०४ च्या ऑक्टोबर महिन्यात काबूल त्याच्या हातात आले तेथे नवीन बागा वगैरे करून त्यानें आपली राहण्याची व्यवस्था केली पुष्कळ नवीन फळाची त्याने लागवड केली. त्या वेळी काबूलचा वसूल सुमारें पाच लक्ष रुपये होता काबूल प्रात सृष्टिसौंदर्यासंबधाने उत्कृष्ट होता तथापि तेथे धान्यसामुग्रीचे सदा दुर्भिक्ष असे. तेव्हा कोठें तरी हात मारून बाहेरून सपत्ति आणण्याशिवाय गत्यंतर नव्हतें अर्थात् त्याची दृष्टि हिंदुस्थानाकडे वळली त्याने सिंधुनदीपर्यंत एक स्वारी केली आणि चार महिन्यात गज्नी काबीज करून परत आला, ( स १५०५, जानेवारी--मे ) ह्याच सुमारास त्याची आई व आजी वारल्या. काबूल येथे बाबराचा चागला जम बसला, तथापि समर्कद काबीज करण्याची त्याची हुरहूर बंद पडली नाही. पुन एकवार त्या बाजूने प्रयत्न करण्याचा विचार करून, तो हिरात येथे गेला, ( स १५०५ ). हिरात प्रात त्या वेळी चागला समृद्ध व विद्याकलानीं नावाजलेला होता तेथील त्या वेळच्या अनेक विद्वान् व नामाकित पुरुषाची यादी बाबरानें दिली आहे हिरात येथें त्याचे चुलतभाऊ होते, त्याजपाशी त्याने वीस दिवस मोठ्या आनदात व चैनींत घालविले. ह्याप्रमाणें तिकडच्या प्राताची माहिती आरंभीं मिळवून व फौजेची वगैरे व्यवस्था करून, बाबर काबुलास परत आला इतक्यात शयबानीखानानें हिरात काबीज केल्याची बातमी आली अर्थात् तयमूरच्या विस्तृत वंशातला बाबर एवढा एकच गृहस्थ राज्यपदावर राहिला, आणि त्याचाही अत शयबानीखान लवकरच करणार अशी भीति वाटू लागली, तेव्हा बाबर आपले राज्य मजबूद करण्याच्या उद्योगास लागला ह्याच वेळीं त्यास मद्यप्राशनाचा विशेष नाद लागून तो चैनी बनला. स १५०८ पासून १५१९ पर्यंतचा काळ त्याचे आत्मचरित्रात गळला असल्यानें त्यात कोणते विशेष प्रसग घडले हें सागता येत नाहीं तथापि स १५१०त त्याने एकाएकीं समर्कदवर स्वारी केली त्यापूर्वीच इराणचा शहा इस्मईल सूफी ह्याजबरोबरच्या लढाईत शयबानीखान मारला गेला होता त्याचे ऊझबेग सरदार बाबराशी लढण्यास आले, त्याचा त्याने पराभव केला, आणि शहा इस्मईल

सूफीच्या मदतीनें तिसऱ्यांदां समर्कंदचें तख्त मिळविलें, ( स. १५११ ऑक्टोबर ). त्याबरोबर एकदम सर्व मध्यआशियाचा तो बादशहा झाला. त्यानें काबूलचें राज्य भाऊ नासिर यास दिलें, आणि आपण समर्कंदासच राहण्याचा निश्चय केला. परंतु हा त्याचा विजय फार वेळ टिकला नाहीं. इराणच्या शहास खूष करण्याकरितां बाबरानें शिया पंथाचा स्वीकार केला; त्यामुळें सर्व सुनी लोकांस वाईट वाटून ते त्यास सोडून गेले. पुनरपि ऊझबेग लोकांनीं त्याचा पराजय केला; म्हणून त्यास समर्कंद सोडून जावें लागलें. कित्येक दिवस तसाच तो रानावनांत भटकत राहिला; आणि सन १५१४त काबुलांत गेला, तो पुनरपि कधीं परत वळला नाहीं. ऊझबेग मोगलांनीं समर्कंदचें राज्य घेतलें. बाबर तुर्क होता, आणि तो मोगलांचा अत्यंत द्वेष करी.

आजपर्यंत वीस वर्षें काबुलास बाबराचा अंमल होता, तितक्या अवकाशात हिंदुस्थानाविषयीं त्यास बरेच वेळां लोभ सुटला. शिवाय आपली महत्त्वाकांक्षा पुरी करून घेण्यास त्यास उत्तरेकडे व पश्चिमेकडे मुळींच मार्ग उरला नव्हता. म्हणून तयमूरप्रमाणें राज्यवृद्धि केल्याची कीर्ति मिळविणें असेल, तर हिंदुस्थान देशच जिंकून घेतला पाहिजे, अशी त्याची खात्री झाली. लोदी घराण्याचे अमलाखालीं हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत कांहीं त्राण उरलें नव्हतें. सर्वत्र घालमेली सुरू असून दिल्लीच्या सार्वभौमाचा ताबा प्रत्यक्ष शहराबाहेर फारसा उरला नव्हता. तेव्हां असला धनसंपन्न देश आपल्या हाताखालीं सहज घालतां येईल असें बाबरास वाटलें. वास्तविक म्हटलें तर वरील उद्देश पार पाडण्यास बाबरासारख्या शूर व चतुर पुरुषास इतका विलंब लागला हेंच आश्चर्य आहे. म्हणून यापुढें त्यानें आपली दृष्टि हिंदुस्थानाकडे वळविली. १५१९ त त्यानें हिंदुस्थानावर स्वारी करून, बरीच लूट काबुलास नेली. सात वर्षांत त्यानें पांच स्वाऱ्या केल्या. पांचव्या स्वारींत त्यास हिंदुस्थानचें राज्य प्राप्त झालें. ह्या स्वाऱ्यांत त्यानें तोफांचा उपयोग केला. हिंदुस्थानांत पहिला तोफांचा उपयोग हाच होय.

**३. पानिपतची लढाई व हिंदुस्थान काबीज**, ( एप्रिल २१, स. १५२६ ).—सन १५१९ त बाबरानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. पंजाबांत येऊन त्यानें इब्राहीम लोदी यास निरोप पाठविला, कीं ' पंजाब प्रांत तयमूरच्या वंशजांकडे चालत आला आहे, तो आपण परत द्यावा, नाहीं तर लढाईस सिद्ध व्हावें. ' ह्या वेळीं चिनाब नदीपर्यंत जाऊन बाबर काबुलास परत गेला. त्याच वर्षी त्यानें हिंदुस्थानावर दुसरी स्वारी केली. परंतु काशगरच्या राजानें बदक्शान प्रांतावर स्वारी

केल्याचे ऐकून तो तसाच परत गेला. सन १५२० त सियालकोटपर्यंत तो आला असता, पुनरपि पहिल्याप्रमाणे त्यास परत जावे लागले. पंजावचा सुभेदार दौलतखान लोदी स्वतत्र कारभार करू लागला होता, त्यानें दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध लढण्यास सन १५२४ त बाबराची मदत मागितली बाबरास हेंच पाहिजे होतें. तो तत्काळ हिंदुस्थानात आला व इब्राहीमखानाच्या फौजेबरोबर लढून त्याने पंजाब प्रात घेतला हिंदुस्थानांतील अव्यवस्था ऐकून, तेथील राज्य काबीज करण्याची बाबरास अतिशय उत्कठा लागली त्याची तयारी उत्कृष्ट असून इब्राहीम लोदी त्याच्याशी टक्कर देण्यास समर्थ नव्हता दौलतखान लोदीस बाबराची ही मनीषा आवडली नाही. आपणास बाजूस सारून हाच हिंदुस्थानचें राज्य गट्ट करणार, हें पाहून दौलतखान बाबरास सोडून डोंगरी मुलखात पळाला. अर्थात् दौलतखान बिथरल्याने बाबराचे बेत जरा थड पडले तथापि पंजाबात अलाउद्दीन लोदीस बंदोबस्तास ठेवून आणि ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं बसवून बाबर काबुलास परत गेला.

हा अलाउद्दीन लोदी इब्राहीम लोदीचा भाऊ असून रुसून बाबराकडे मदत मागण्यास गेला त्याबरोबर बाबरानें आपली फौज हिंदुस्थानात पाठविली आरभी अलाउद्दिनास जय मिळाला, परंतु पुढें बेसावध राहिल्यानें दिल्लीनजीक इब्राहीमच्या फौजेनें त्याचा चागलाच पराजय केला, म्हणून तो पंजाबात पळून गेला हें बाबरास कळताच तो स्वत: विशेष तयारीनिशीं अलाउद्दीनच्या मदतीस आला ही बाबराची पाचवी व शेवटची स्वारी होय, ( नोव्हेंबर १५२५ ) दौलतखान व त्याचा मुलगा गाझीखान याचा तळ रावी नदीच्या काठीं होता. बाबर येतो हें वर्तमान ऐकताच ते दोघेही पळून गेले. दौलतखानाचा पाठलाग करून बाबरानें त्यास घेरिलें पुढें तें ठिकाण घेतल्यावर बाबराचे शिपाई लूटालूट करूं लागले असता तो स्वत तेथे गेला, दौलतखानाच्या कुटुंबातील एका बाईस सोडवून त्याने सुरक्षित स्थळीं पाठविले, आणि गाजीखानाने स्थापिलेल्या एका उत्तम पुस्तकालयाचा बचाव केला. दौलतखान बाबरास शरण आला, तथापि तो लवकरच मरण पावला.

पंजाबात असा प्रकार चालू असता, दिल्ली शहरात चाललेले घोटाळे बाबरास कळत होते. दरबारच्या अनेक वजनदार लोकानीं बाबरास अभिनंदनपूर्वक पुढें येण्याची विनंति केली बाबर त्वरा करून दिल्लीवर चालून गेला. इब्राहीम लोदी एक लक्ष फौज घेऊन त्याजशी लढण्यास बाहेर पडला बाबराजवळ सारी त्याच्या पंचमाश फौज होती, तरी त्याचा प्रत्येक इसम लढाईत कसलेला असून, ‘मारीन किंवा

मेरन ' अशा हिंमतीनें समरांगणावर आलेला होता. त्याचा मुलगा हुमायूनही आपल्या फौजेनिशीं हजर होता. त्याचा तरी लढण्याचा हा पहिलाच प्रसंग होय. इब्राहीमची फौज पानिपतच्या प्राचीन रणभूमीवर जमा झाली. बाबरानें आपल्या तोफांचे सातशें गाडे कातड्याच्या दोरड्यांनीं ओळीनें जखडून, त्यांच्या मागें आपली फौज उभी केली. ह्यामुळें शत्रूंच्या स्वारांचें कांहीं चाललें नाहीं. खरें म्हटलें म्हणजे बाबराची फौज फार थकून आलेली होती. लोदीपाशीं शंभर हत्ती होते, त्यांची भीति बाबराच्या फौजेस फारच वाटत होती. कारण लढाईंत हत्तींचा उपयोग त्यांनीं पूर्वी कधींच पाहिला नव्हता. तथापि लढाईची शिस्त बाबराकडे उत्तम असून, लोदीकडे सर्व अव्यवस्था होती. स. १५२६, ता. २१ एप्रिल रोजीं लढाईस सुरुवात झाली. बाबराची नेहमींची लढण्याची युक्ति येथेंही उपयोगी पडली. त्याची मुख्य भिस्त तोफखान्यावर असून मुस्ताफा व उस्ताद अली हे दोन इसम त्याचे हाताखालीं तोफखान्याचे कामांत निष्णात होते. त्यांनींच आरंभापासून अखेरपर्यंत बाबराची कामगिरी उत्कृष्ट बजावली. गाड्यांच्या आश्रयामागें आपल्या फौजेचें अर्धचंद्राकृति वर्तुळ करून त्याच्या दोनही टोकांनीं हळूहळू पुढें सरून शत्रूच्या फौजेस घेरावयाचें. अशा रीतीनें इब्राहीमच्या फौजेस बाबरानें घेरिलें. इकडे त्याच्या तोफखान्यानें शत्रूंची दाणादाण उडवून दिली. ह्याप्रमाणें दोनप्रहरपर्यंत तुंबळ संग्राम होऊन लोदीचे पंधरा हजार लोक पडले. स्वतः इब्राहीम लढाईंत मारला जाऊन त्याचें शीर बाबराकडे पाठविण्यांत आलें. लगेच बाबरानें हुमायून ह्यास आग्रा काबीज करण्यास पाठवून दुसरी एक तुकडी दिल्लीवर पाठविली, आणि दोनही शहरें काबीज केलीं. शुक्रवार ता. २७ एप्रील रोजीं दिल्लीच्या मशिदींत बाबराच्या नांवानें खुत्बा वाचण्यांत आला. इकडे त्याच्या लोकांनीं अपरंपार लूट मिळवून आणिली. दिल्लींत शिरल्याबरोबर त्यानें खजिना उघडून त्यांतील द्रव्य व जमलेली लूट आपल्या लोकांस वांटून दिली. ह्या प्रसंगा त्यानें केलेली उधळपट्टी अवर्णनीय आहे. आपल्याबरोबरच्या प्रत्येक सरदारास तीस पासून पंन्नास हजार रुपये व शिपायास थोडें बहुत द्रव्य त्यानें दिलें; एवढेंच नव्हे, तर काबुलांतील प्रत्येक इसमास त्यानें कांहींना कांहीं बक्षीस पाठवून दिलें. एकट्या हुमायुनास तीन लक्ष रुपये रोख व न मोजलेले पुष्कळसें जवाहीर मिळालें. तयमूरप्रमाणें हिंदुस्थान सोडून परत जाण्याचा बाबराचा विचार असता, तर ही उधळपट्टी शोभली असती. पण पहिल्यापासूनच येथें कायम राहण्याचा त्याचा इरादा असूनही, त्यानें ह्या महान् विजयाच्या स्मरणार्थ सर्वांस बक्षिसें देऊन खूष केलें. ह्यावरून ' कलंदर , म्हणजे ' उधळ्या फकीर ' हें नांव बाबरास मिळालें.

बाबराच्या सरदाराच्या मनात काबुलास परत जावयाचें होतें पण त्याने त्यास निक्षून सागितलें, कीं ' ज्यास परत जाणे असेल त्याने खुशाल जावें मी येथेच राहणार ' लोकानीं परत जाण्याचा फारच आग्रह धरिला, तेव्हा त्याने सर्व सरदाराची सभा बोलावून त्यास, आजपर्यंत आपण कसकशी संकटें सोसली, व त्या सर्वांचें निरसन होऊन आज आपणास केवढे फल प्राप्त झालें आहे, हे त्यानें समजून सागितलें ' प्रचंड फौजाचा पाडाव होऊन, हिंदुस्थानचें राज्य आपल्या हस्तगत झाले आहे ह्याप्रमाणे आपल्या सर्व इच्छा पूर्ण होऊन, हातात आलेले फळ फेकून देणे व भागुबाईसारखे पळून जाणे आपल्यासारख्या मर्दास शोभतें काय ? माझ्याशी सगत ठेवण्याची ज्याची इच्छा असेल, त्यानीं इत पर परत जाण्याचे नाव सुद्धा काढूं नये, ज्याला जाणे असेल त्याने खुशाल निघून जावे. ' हे माझें निर्धाराचें बोलणें ऐकिल्यावर पुढें ब्र काढण्याची कोणासही छाती झाली नाहीं हा त्याचा कठोर निश्चय त्याच्या शूर बाण्यास उत्कृष्ट शोभतो शिवाय तो तयमूरलंगासारखाच लूट करून निघून जाईल, म्हणून जो लोकास भ्रम होता, तोही नाहींसा होऊन, जे लोक अर्धवट कचरत होते, त्यानीं एकदम बाबरास मिळून आपला पुढील मार्ग कायमचा ठरवून टाकिला

पूर्वीच्या राजघराण्याच्या पक्षाचे अनेक अफगाण सरदार वगैरे बंडें करीत, त्याजबरोबर बाबरास झगडावें लागलें. ह्यामुळें पुढें अनेक युद्धप्रसग घडून आले इब्राहीम लोदीच्या आईनें एकवार त्याजवर विषप्रयोग करविला. बाबरानें थोडेसे विषयुक्त अन्नही खाल्लें, पण तें लागलेंच कळून आल्यामुळें त्याचा जीव बचावला हिदुस्थानातील अफगाण अमलदारास बाबराचे येथें राहणें आवडले नाहीं त्यांनी त्याचा पिच्छा पुरविला. शिवाय बाबर एकामागून एक प्रात जिंकीत चालला, तेव्हा अफगाणाचा पुरा बदोबस्त होण्यापूर्वीच त्यास प्रथम रजपुताशीं झगडावें लागले

**४. शिक्रीची लढाई, राणासंगाचा पाडाव,** ( १६ मार्च, १५२८ ) – रजपुताच्या सर्व राज्यात ह्या वेळेस मेवाडचे राज्य फार बलिष्ठ होतें चितोडगडावर राणा सगराजित राज्य करीत होता चितोडच्या घराण्यात आजपर्यंत जे नामाकित राजे होऊन गेले, त्यात सगराण्याची गणना आहे. बाबराप्रमाणेच सगराणा हा लहानपणापासून हालअपेष्टेंत वाढला असल्यामुळे, राजाच्या अगीं अवश्य लागणारे अनेक गुण त्याच्या ठिकाणीं वसत होते शौर्यानें व पराक्रमानें त्याने आपल्या नावाचा दरारा दूरपर्यंत बसवून, आपल्या राज्याची हद्द पुष्कळ वाढविली होती. दिल्लीचा सुलतान इब्राहीम

लोदी ह्याचा संगराण्यानें अनेक वेळां पराभव केला होता. बाबरासारखा पराक्रमी पुरुष ह्याच संधीस त्याचा प्रतिस्पर्धी झाला नसता, तर ह्या संगाच्या हातून चितोडगड ही हिंदुस्थानची सार्वभौम राजधानी होण्याचा समय आला होता. भिलसा व चंदेरीपर्यंत माळव्याचा पूर्वभाग संगाच्या ताब्यांत होता. हिंदुस्थानांत येण्यापूर्वी बाबराचा व संगराण्याचा पत्रव्यवहार होऊन बाबरास मदत करण्याचें संगानें कबूल केलें होतें. जेणेंकरून दिल्लीच्या मुसलमानी सत्तेचा पाडाव होईल, तें करण्यास संगराणा झटत होता; आणि बाबर हा तय्मूरप्रमाणें स्वारी करून परत जाईल असें त्यास वाटत होतें म्हणून संगानें बाबरास मदत करण्याचें वचन दिलें परंतु बाबरानें हिंदुस्थानचें बादशाही पद स्वीकारून येथेंच राहण्याचा निश्चय केला, तेव्हां आपल्या शेजारीं असला बलिष्ट शत्रु राहूं देणें संगराण्यास बरें वाटलें नाहीं. बाबराच्या सत्तेस शाश्वती आली नाहीं, तोंच त्याचा पाडाव करावा ह्या उद्देशानें, संगानें आसपासच्या हिंदु राजांस मदतीस बोलावून युद्धाची जंगी तयारी केली. मारवाड व अंबरचे राजे त्यास भजत होते, इतकेंच नाहीं, तर ग्वाल्हेर, अजमीर, शिक्री, रायसेन, काल्पी, चंदेरी, बुंदी, गांग्रौन, रामपुरा, व आबू इत्यादि ठिकाणचे लहान मोठे राव, त्याच्या हाताखालीं राहून, त्यास मदत करण्यास तयार होते. त्याच्या शरिरावर मूर्तिमंत वीर्याची साक्ष भरपूर दिसत होती. भावाशीं लढून त्याचा एक डोळा गेला होता. दिल्लीच्या लोदी सुलतानाशीं लढतांना त्याचा एक हात तुटला असून, दुसऱ्या एका लढाईत त्यास गोळी लागून तो एका पायानें पंगु झाला होता. त्याच्या शरिरावर तलवारभाल्यांच्या जखमांच्या ऐशीं खुणा दिसत होत्या. प्रत्यक्ष बाबराचे उद्गार असे आहेत. ' संग राण्याचा जो एवढा लौकिक झाला आहे, तो त्यानें केवळ स्वपराक्रमानें मिळविला आहे. ' सर्व रजपूत वीर या समयीं आपलें नांव राखण्याकरितां संगाच्या छावणींत एकत्र झाले. सर्वांच्या समोर उभें राहून संगराण्यानें त्यांजला उद्देशून प्रस्तुत आलेल्या संकटाविषयीं वीरश्रीयुक्त भाषण केलें. क्षात्रधर्मास अनुसरून व वाडवडिलांचे पराक्रम आठवून प्रत्येकानें ह्या प्रसंगीं वर्तावें, असा त्यांस त्यानें उपदेश केला. मुसलमानांचा पाडाव करण्याचा प्रसंग हाच आहे. ही संधि एकवार साधली, म्हणजे त्यांस आपलें डोकें फिरून वर काढितां येणार नाहीं, आणि सर्व देशभर हिंदुपत पादशाहीचा ध्वज फडकत राहील, अशा सर्व गोष्टी त्यानें त्यांस उत्तम प्रकारें समजावून दिल्या. हें भाषण संपल्यावर सर्वांनीं उत्तरादाखल त्याचा मोठा जयजयकार केला. संगराण्याकडूनच युद्धाचा उपक्रम झाला. मेवाड व दिल्ली ह्या राज्यांची हद्द बियाना

नदी होती, ती ओलांडून रजपूत फौज दिल्लीकडे आली. तेव्हा बाबरास मोठी धास्ती पडली. ह्या पूर्वी त्याचे सामने मुसलमानाशी झाले होते. पण रजपुताशी लढण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग रजपुताचें रणशौर्य तो ऐकून होता म्हणून एवढ्या मोठ्या जमावाशीं सामना करण्याजोगे त्याचे सामर्थ्य नव्हतें तथापि स्वस्थ बसून उपयोगी नाहीं अशा समजुतीनें, कशीबशी तयारी करून तो सगाबरोबर लढण्यास निघाला. त्याचे पंधराशें मुसलमान पुढें गेले होते, त्याची रजपुतानीं कत्तल उडविली. आग्र्यापासून दहा कोशावर शिक्री म्हणून एक ठिकाण आहे, तेथून दहा मैलावर कण्वा येथे बाबरानें आपल्या फौजेचा तळ दिला, आणि आपली लढाईची सर्व व्यवस्था ठरविली. पानिपतच्या सारखे त्यानें आपल्या तोफखान्याचे गाडे साखळीनें एकत्र बांधून त्याच्या आश्रयाने मागें राहून लढण्याची योजना ठरविली. दर दोन गाड्यामध्यें पाच पावलें अतर होते गाडे नव्हते तेथे खदकानीं मजबुदी केली ह्या तयारींत पंचवीस दिवस गेले, आणि ती पाहून त्याच्या लोकास बराच धीर आला.

बाबरानें आपल्या छावणींतून रजपूत फौजेवर लहान लहान टोळ्या पाठविल्या. पण त्या सर्व पराभव पावून परत येऊ लागल्या. तेव्हा त्याची पाचावर धारण बसली. त्याच्या बाजूचे मोठमोठे योद्धे कचरू लागले. काबुलाहून आलेल्या एका ज्योतिषाने येऊन ‘ तुझा पराजय होणार, ’ असें त्यास सागितले तेव्हा पश्चात्ताप पावून तो ईश्वराची करुणा भाकू लागला आपण असें घोर पातक तरी काय केलें आहे, व त्याचें क्षालन कसे करावें, ह्याचा तो मनात विचार करूं लागला त्याला दारू पिण्याचा नाद फार असे. कुराणात दारू पिण्याची सक्त मनाई आहे हेंच आपलें घोर पातक असे समजून त्यानें इत पर दारू प्यावयाची नाहीं असा उघडपणें निर्धार केला. दारू पिण्याचीं सर्व पात्रें त्यानें फोडून टाकिली, व जवळ असलेली दारू ओतून देऊन त्या ठिकाणी ह्या गोष्टीच्या स्मरणार्थ एक भिक्षागृह स्थापन केले. त्याचप्रमाणें सर्व मुसलमानाकडून शिक्क्याचा कर म्हणून एक कर घेण्यात येत असे, तो त्याने माफ केला इतकें झाल्यावर आपल्या लोकाशीं उत्तेजनपर व जोरदार असे त्याने भाषण केलें. ‘ भाई शिपाई हो ! आजपर्यंत तुम्हीं केवढा सन्मान मिळविला, अनेक प्रसंगीं कसे विजय सपादन केले ! काफर लोकास भिऊन आपण पळालों, तर ते लोक आपणास काय म्हणतील ! न पळालों तरी आपण शत्रूंच्या हातून सुटत नाहीं. मनुष्य जन्मास आला कीं त्यास मरण हें आहेच, आणि एक दिवस हें दु खमय जग सोडून आपणा

सर्वांस गेलेंच पाहिजे. तर मग अब्रू घालवून जिवंत राहण्यापेक्षां कीर्ति करून मरणें काय वाईट ! धर्माकरितां जीव देण्याची पाळी आली तर तेंही एक पुण्यच आहे. तर मग जिवांत जीव आहे तोंपर्यंत लढाईतून अपयश घेऊन परत फिरावयाचें नाहीं, अशी एकदिलानें शपथ घेऊं या.' त्याबरोबर सर्वांनीं एकदम कुराणावर हात ठेवून शपथ घेतली. असे सर्व प्रकार त्यानें आपल्या लोकांस उत्तम रीतीनें समजावून दिल्यावर, त्यांनीं जयघोष करून बाबराच्या म्हणण्यास रुकार दिला. दोहों बाजूंची पूर्ण तयारी झाली. पण हीं सैन्यें कांहीं दिवस समोरासमोर छावणी देऊन स्वस्थ बसलीं; त्यामुळें बाबरास फायदा झाला. संग राण्यानें आरंभींच एकदम हल्ला केला असता, तर मुसलमानांची दाणादाण उडाली असती. बाबरास वेळ मिळून त्याला सर्व तयारी नीट करतां आली. मुसलमान आपण होऊन पुढें येतील, ह्या आशेवर संगराणा स्वस्थ बसला. जसजसे दिवस जात चालले, तसतसा तो बेफिकीर राहूं लागला. शिवाय उभयतांचा स्नेह जुळावा म्हणून आंतून तहाची वाटाघाटही चालू होती.

अखेरीस शनिवार तारीख १६ मार्च, सन १५२८ रोजीं सकाळीं साडेनऊ वाजतां मुसलमानांवर रजपुतांनीं हल्ला केला. युद्ध मोठ्या निकराचें झालें. मुसलमानांच्या तोफांपुढें रजपूत लोक पटापट मरूं लागले. चार दोन तास चांगली जोराची चकमक उडाल्यावर बाबरानें आपली नेहमींची शत्रूस घेरून घेण्याची युक्ति अंमलांत आणिली. अगोदरच त्यानें आपली फौज चंद्रकोरीप्रमाणें उभी करून रजपूत सैन्य लढाईच्या भरांत अगदीं अंगावर येतांच, एकदम दोनही कोरींनीं पुढें सरून त्याजवर झडप घातली, तेव्हां ते कोंडले गेले: आणि लगेच बाबराच्या तोफखान्यानें त्यांचा फन्ना उडविला. संध्याकाळ होतांच एकदम गोंधळ उडाला, आणि भयंकर कत्तल सुरू झाली. रजपूत लोकांस पुढें जाणें दुर्घट झालें, तेव्हां ते मागें वळून मुसलमानांच्या अंगावर घुसून पळूं लागले. लगेच बाबरानें त्यांचा पाठलाग केला. येणेंकरून त्यास जय मिळाला. अगणित लोक रणांगणीं पतन पावले.

संग राण्यास जखमा लागून त्याचे मोठमोठे पराक्रमी साथीदार मारले गेले. याप्रमाणें चोहोंकडून संग राण्याची फार नुकसानी व नाश होऊन, वरतीं पराजयाचें अपयश घेऊन त्यास माघारें परतावें लागलें. तो मेवाडच्या डोंगरांत पळून गेला. मुसलमानांवर जय मिळविल्याशिवाय चितोड राजधानींत प्रवेश करावयाचा नाहीं, असा त्यानें निश्चय केला. पण हा निश्चय तडीस जाण्यापूर्वींच तो अरण्यवासांत मरण पावला,

(स. १५३०) लढाई कण्वा येथे झाली तरी शिक्रीच्या नजीक असल्यामुळे तीस फतेपुर शिक्रीची लढाई असे म्हणतात. लढाईत मुसलमानानी वीरश्रीनें उन्मत्त होऊन रणागणात सापडलेल्या रजपुताची शिरें कापून त्याचे ढीग रचिले. या जयाचे द्योतक असें ‘ गाजी ’ हें नाव बाबराने आपणाला घेतलें आरबी भाषेंत ‘ गाजी ’ शब्दाचा अर्थ काफराचें पारिपत्य करणारा ’ असा आहे हें नाव मोगलवंशी बादशहाच्या सनदात, शिक्क्यावर व नाण्यावर अखेरपर्यंत वापरण्यात येत असे.

ह्या लढाईच्या वर्णनावरून मागील भागात रजपुताच्या पाडावाची जी मीमासा केली आहे तिच्यातील बऱ्याच मुद्याची सत्यता कळून येते हरएक बाबतींत रजपुताचा पक्ष प्रबल होता तथापि प्रत्यक्ष लढाईची शिस्त म्हणजे समरागणावरील फौजाच्या हालचाली ठरविण्याचे सेनानायकाचे कसब, एवढ्या एका बाबतीत सगराण्याहून बाबर फारच वरचढ होता. सुमारें एक महिनाभर सगराणा शत्रूच्या हल्ल्याची वाट पाहत स्वस्थ बसला हें ठीक झाले नाहीं

ह्या लढाईनंतर मेवाडच्या राण्यानीं मोगल बादशहाविरुद्ध उघडपणे केव्हाही शस्त्र उचलले नाहीं एका वर्षात पानिपत व शिक्री येथे दोन प्रचड विजय मिळवून, अफगाण व रजपूत या दोनही शत्रूंचा पाडाव केल्याने बाबराचा जम हिंदुस्थानात चागला बसला

**५. इतर शत्रूंचा पाडाव व मृत्यु, (१५३०).**—सगराण्याचा पाडाव झाल्यावर रजपुतात त्राण उरलें नाहीं बाबरानें ठिकठिकाणीं आपली ठाणीं बसवून बंदोबस्त केला, आणि जे लोक स्वदेशी जाण्यास इच्छीत होते, त्याची एक टोळी करून त्यास हुमायूनच्या हाताखाली देऊन काबुलास पाठविले. बदक्शानच्या मुख्यावरही त्यानें हुमायूनचीच नेमणूक करून त्यास तेथे राहण्यास सागितले इत पर काबूल वगैरे सिंधूच्या पलीकडील प्रात मोगल राज्याचा एक सुभा झाला, हें पुढें लक्षात ठेविलें पाहिजे.

शिक्रीच्या लढाईनंतर बाबरानें आपला वेळ राज्याची व्यवस्था करण्यात घालविला तरी सभोवारच्या प्रातात युद्धप्रसंग बंद पडले नव्हते. माळवा व बुंदेलखड ह्याच्या सरहद्दीवर चंदेरी नावाचा किल्ला आहे, तो मेदिनीराय नामक एका रजपूत सरदाराच्या ताब्यात होता. मेदिनीराय हा संगराण्याचा मित्र होता. तो बाबरास शरण गेला नाहीं, म्हणून बाबरानें चदेरीवर स्वारी केली, (२०-१-१५२८) ह्या प्रसगीं रजपूत लोक मोठ्या शौर्यानें लढले, आणि मुसलमानापुढे आपला निभाव लागत

नाहीं असें पाहून, बायकामुलांची कत्तल करून रणांगणांत घुसले. ते पतन पावल्यावर किल्ला बाबराच्या हातीं आला. त्या वेळीं थोडे रजपूत लोक मेदिनीरायच्या वाड्यांत जमा झाले; एक मनुष्य आडवी तरवार धरून उभा राहिला, आणि इतरांनीं धावून येऊन, त्या तरवारीवर आपला शिरच्छेद करून घेतला. अशा प्रकारें जिवाची पर्वा न बाळगितां, आपल्याच हातानें ह्या लोकांनीं आपला अंत करून घेतला, हें पाहून बाबरास विलक्षण आश्चर्य वाटलें.

रजपुतांचा पाडाव झाला तरी बाबरास स्वस्थपणा मिळाला नाहीं. अफगाण लोक ठिकठिकाणीं जमाव करून होते, त्यांस हा मोगलांचा अंमल नको होता. आज तीनशें वर्षें अफगाणांनीं मोगलांचें कांहीं एक चालूं दिलें नव्हतें. बाबरास दिल्लीचें तख्त मिळालें, तत्राप त्यास आपण हुसकून देऊं, अशी अफगाणांस आशा वाटत होती. इब्राहीम लोदीचा भाऊ महंमूद बहार प्रांत काबीज करून बाबराशीं लढण्याकरितां काशीपर्यंत चालून आला. जोनपुरसुद्धां त्याच्या ताब्यांत गेलें. ही बातमी स. १५२९ च्या जानेवारींत धोलपुर येथें बाबरास कळल्याबरोबर, लगेच आग्र्यास जाऊन त्यानें अफगाणांवर स्वारी केली. गंगेच्या उजव्या कांठानें स्वतः बाबर व डाव्या कांठानें त्याचा मुलगा अस्करी असे, अलाहबाद, चुनार, बनारस, गाजीपुर वरून बक्सार पर्यंत गेले. त्याबरोबर अफगाण फौजा पळून गेल्या आणि त्यांचे बरेच सरदार बाबरास शरण आले. महंमूद लोदी बंगाल्यांत जाऊन तेथचा सुलतान नसरतशहा ह्यास मिळाला. पुढें ह्या दोघांनीं फौजा जमवून बाबराशीं सामना करण्याची तयारी केली. तेव्हां त्यांजवर चाल करून बंगाल काबीज करणें बाबरास भाग पडलें. गोग्रा व भागीरथी ह्या नद्यांच्या संगमावर हा युद्ध प्रसंग झाला. बाबराच्या तोफखान्यानें उत्कृष्ट काम केलें. त्याचा तोफखान्यावरील सरदार उस्ताद अली हा पुष्कळ वर्षें बाबराजवळ राहून चांगला कसलेला व वाकबगार होता. स. १५२९ च्या मे महिन्यांत सर्व फौजेनें भागीरथी ओलांडून गोग्रेच्या कांठीं तळ दिला. पुढें लगेच गोग्रा ओलांडून बाबर व अस्करी ह्यांनीं बंगालच्या फौजेची दाणादाण उडवून दिली; तेव्हां नसरतशहानें शरण येऊन बाबराशीं तह केला. हीच बाबराच्या आयुष्यांतील शेवटची मोहीम होय.

**मृत्यु,** ( ता. २६. १२. १५३० ).—हिंदुस्थानांत आल्यापासून बाबरास वरचेवर ताप येऊं लागला; आणि त्याची प्रकृति हळू हळू क्षीण झाली. त्याच्या आजपर्यंतच्या वनवासांनीं त्याची शरीरकाठी अगदींच हलकी झाली होती. त्याचा वेळ

एकसारखा बहुतेक प्रवासात जाई. मार्च १५२९ त तो लिहितो, ' मी गंगा नदींतून पलीकडे पोहून गेलों, त्या वेळीं मीं हात मोजले, ते तेहतीस भरले थोडा दम घेऊन, मी लगेच पोहत अलीकडे आलों. समर्कंदपासून इकडे जेवढी म्हणुन नदी मला लागली, त्या प्रत्येकींतून मी पोहून गेलों आहें. फक्त गंगा नदी राहिली होती, ती ह्या वेळीं संपविली. ' कित्येक सबंध दिवसरात्र त्याचे घोड्यावर जात. पुष्कळदा दररोज ऐशीं मैल मजल तो घोड्यावर करी.

स. १५२९ च्या डिसेबर महिन्यात आग्रा येथील बागात बाबरानें एक मोठा खाना लोकांस दिला त्या वेळीं समर्कंदपासून बंगालपर्यंतचे अनेक मोठमोठे सरदार हजर होते, त्यांची नावनिशी दिलेली आहे. अनेकानी त्यास नजराणे आणिले, त्याचा स्वीकार करून, व मोठमोठ्या देणग्या देऊन, सर्वांचा त्यानें परामर्ष घेतला. त्याची जन्मभुमि अदिजान येथील अनेक लोक अगदीं लहानपणापासून हरएक सकटात त्यास चिकटून राहिले होते, त्या सर्वास उत्तम प्रकारचीं बक्षिसें देऊन मोठ्या गर्हिवराने त्याच्या उपकाराचें त्यानें प्रसिद्धपणें स्मरण केलें. ह्या प्रसंगीं कुस्त्या, हत्तींच्या टकरा व निरनिराळ्या प्रकारचे खेळ पाहुण्याच्या करमणुकीसाठीं ठेविले होते. भोजनप्रसंगीं हिंदुस्थानातील गारुडी व जादुगार खेळ करीत होते. ते पाहून बाबर व त्याचे पाहुणे फार खूष झाले. असले खेळ पूर्वी बाबराने कधीं पाहिले नव्हते. हा सर्व प्रकार आग्रा येथे घडला. दोन चार वर्षांचे अवधींत आग्रा शहराचें स्वरूप अगदीं पालटून गेलें वाडे, बागा, विहिरी वगैरेंनीं शहरास नवीन शोभा आली.

समर्कंदचें राज्य काबीज करण्याच्या हेतूनें हुमायून मध्यआशियात राहिला होता, पण तो हेतु सिद्धीस जाण्याचा संभव राहिला नाहीं, म्हणून एकदम बदकशान सोडून हुमायूनं बापास भेटण्याकरिता उतावळीनें आग्ऱ्यास आला. त्याजबदलची खबर त्याने आगाऊ दिली नव्हती. ' हुमायूनच्या आईशीं मी बोलत बसलों असता, एकदम हुमायून येऊन दाखल झाला. त्याबरोबर आम्हा उभयतास जो आनंद झाला, त्याचें वर्णन करिता येत नाहीं. त्याच्या येण्याबद्दल मीं अनेक मेजवान्या दिल्या आणि हुमायुनास फारच आदर व ममता दाखविली. हुमायूनचें संभाषण अतिशय मधुर व मोहक होतें. उत्कृष्ट गृहस्थास योग्य असेंच त्याचें वर्तन नेहमीं असे. ' बाबराची हुमायूनवर प्रीति किती होती हें त्याच्या मरणसमयीं निदर्शनास आलें.

हुमायून इकडे आल्यावर काही महिन्यानीं मुरादाबादचे दक्षिणेस संभळ येथें तो एकाएकीं आजारीं होऊन त्यास होडींतून आग्ऱ्यास आणिलें. तेव्हा त्याचें दुखणें विकोपास

जाणार असा सुमार दिसूं लागला. औषधानें कांहीं गुण यावयाचा नाहीं असें वैद्यांनीं सांगितलें, तेव्हां बाबरास अत्यंत दुःख झालें. शेवटीं आपल्या समजुतीप्रमाणें मनांत आलेला एक उपचार त्यानें करून पाहिला. आपलें आयुष्य दुसऱ्यास अर्पण करितां येतें, अशा समजुतीनें बाबरानें सर्वां समक्ष, हुमायूनच्या बिच्छान्याजवळ ईश्वराची करुणा भाकून निर्धारपूर्वक आपलें आयुष्य आपल्या मुलास दिल्याचा संकल्प केला, आणि तीन वेळां तो मुलाच्या बिछान्याभोंवतीं फिरला. क्षणभर ध्यान लावून बसल्यावर त्यास स्फूर्ति झाली, कीं आपली विनंति परमेश्वराकडे रुजू झाली; आणि तो ' फत्ते फत्ते ' म्हणून ओरडला. त्या वेळेपासून हुयायुनास आराम पडून बाबर क्षीण होत चालला. हिंदुस्थानांत त्यास अतोनात श्रम पडल्यामुळें अलीकडे त्याची प्रकृति अगोदरच ढांसळली होती. अखेरीस सन १५३० तारीख २६ डिसेंबर रोजीं आग्रा येथें बाबर मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय अठ्ठेचाळीस वर्षांचें होतें.

**६. बाबराची योग्यता.**—बाबर हा हिंदुस्थान व आशिया ह्यांस जोडणाऱ्या सांखळींतील मध्यवर्ती दुवा होय. चंगीझखान व तयमूरलंग ह्यांजपासून मोगल व तुर्क जातींचें मिश्रण बाबराच्या ठिकाणीं उतरल्यामुळें, मोगलांचा कणखरपणा व तुर्कांचें साहस या गुणांनीं हिंदूंच्या बेफिकिरीस जिंकिलें. हिंदुस्थानाशीं त्याचा संबंध शेवटच्या बारा वर्षांतच कायतो जडला. त्यापूर्वीचें त्याचें सर्व आयुष्य मध्य–आशियांत खर्च झालें. बारा वर्षांचा असतां बाप वारला, तेव्हांपासून मरेपर्यंत बाबरानें एकंदर छत्तीस वर्षें राज्य केलें. मध्यें अनेक प्रसंगीं त्याचें राज्य गेलें होतें. त्याची हिंदुस्थानांतील कारकीर्द जरी अगदीं थोडी आहे, तरी त्याच्या एकंदर चरित्रापासून नानातऱ्हेचा बोध घेण्याजोगा आहे. हा स्वतः विद्वान् व रसिक असून, त्यानें आपलें आत्मचरित्र इत्थंभूत लिहून ठेविलें आहे, तें अत्यंत रसभरित व प्रत्येकानें वाचण्यालायक आहे. बाबराची खरी योग्यता ह्या चरित्रापासून कळून येते.

बाबराची आई ही यूनस्खानाची मुलगी. बहुतेक स्वाऱ्यांत व युद्धांत ती त्याजबरोबर असे. ' त्याच्या आईची आईही धूर्त व दृढनिश्चयी बायको होती. तिच्याइतकें ' शहाणपण व अक्कल दुसऱ्या बायकांत क्वचित् सांपडेल '. लहान वयांत असतां बाबरानें राज्यप्राप्तीसाठीं जे प्रयत्न केले, त्यांत ह्या दोन स्त्रियांच्या उपदेशाप्रमाणें बाबर नेहमीं चालत असे. महत्पदास चढण्यास मातेच्या बोधाची थोरवी विशेष गणिली आहे. शिवाजीचा उदय होण्यास कारण जिजाबाई होय, त्याचप्रमाणें बाबराच्या अंगीं सद्गुणारोप होण्यास वरील दोघी स्त्रिया कारण झाल्या.

हिंदुस्थानांत स्वस्थता झाल्यावर काबुलातून आपला जनानखाना व नातेवाईक मंडळी बाबरानें आग्र्यास आणिली. जनानखान्यात त्याच्या नात्याच्या शहाण्णव बायका आल्या बाबरास पुष्कळ बायका होत्या, पण त्याची मुख्य राणी महामबेगम हुमायूनची आई हिजवर त्याचें प्रेम विशेष होतें. हुमायूनास तीन बहिणी होत्या, आणि त्याचे दुसरे भाऊ भिन्न राण्याच्या पोटीं जन्मास आले होते. हिंदालची आई दील्दार बेगम, आणि कामरान व अस्करी याची आई गुलरूख बेगम. आग्रा येथें दर शुक्रवारीं सर्व नातेवाइकाकडे व बाया मंडळीकडे जाऊन बाबर त्यास भेटत असे.

मागें सागितलेला उलुघ्बेग ह्यास त्याचा मुलगा अब्दुल्लतीफ् मीर्झा ह्यानें ठार मारून समर्कंदचें राज्य बळकाविले पण त्यास तें फार दिवस उपभोगिता आलें नाहीं. त्याच्यामागून बाबराचा आजा अबू सईद् मीर्झा तख्तावर बसला. त्यानंतर त्याचा वडील मुलगा अहंमद मीर्झा याच्याकडे तें आलें.अहंमद मीर्झा सन १४९४त वारल्यावर त्याचा धाकटा भाऊ महंमद मीर्झा समर्कंदचा बादशहा झाला महंमद मीर्झाच्या मागून बायसंकर मीर्झा* तख्ताबर असता बाबरानें समर्कंदवर स्वारी केली त्या वेळीं राज्यपदाची घालमेल किती वरचेवर होत असे, हें ह्या यादीवरून उघड होतें. प्रत्यक्ष बाबराच्या पाच बहिणींतून दोघीस शत्रूंनीं पकडून आपल्या जनानखान्यात ठेविलें. बाबरानें आपल्या चरित्रात आपल्या सोबत्याचें वर्णन दिले आहे. एक सोबती साधा भोळा होता. मद्यपानाचे प्रसंगीं नाच करण्यात तो फार प्रवीण असे. दुसरा होता तो चागला धर्मनिष्ठ व सदाचरणी होता. त्याचें चातुर्य व बुद्धि हीं विशेष तारीफ करण्याजोगीं होतीं. मीर अली दुस्त म्हणून तिसरा एक सोबती होता, तो आमच्या आजीबाईचा नातेवाईक असल्यामुळें त्याजवर मीं पुष्कळ मेहेरबानी केली, परंतु त्यानें माझें काडीचेंही काम बजाविलें नाहीं. अमीर उमरबेग म्हणून माझा दुसरा एक स्नेही शूर, साधा व प्रामाणिक होता. त्याचा मुलगा हल्लीं मजजवळ आहे. परंतु तो अत्यंत आळशी व मूर्ख आहे. असल्या बापाच्या पोटीं असा मुलगा व्हावा ! अली शेरबेग नांवाचा एक गृहस्थ विद्वान् असून उत्तम कवनें करी. बुद्धिमान व कल्पक मनुष्यास उत्तेजन देणारा ह्याच्यासारखा

* मीर्झा शब्द फारशी आहे. तो फक्त राजघराण्यातील पुरुषास ‘ राजपुत्र ’ ह्या अर्थी लावितात. ते तख्तावर आल्यावर पाठीमागे सुलतान हा शब्द लावूं लागले, उ० सुलतान महंमद मीर्झा. त्याच अर्थी ‘ अमीर ’ शब्द आरबी व ‘ खान ’ शब्द तुर्की आहे. खानाहून जरा खालचा तो ‘ बेग ’ होय. अकबराचा पालनकर्ता बहरामखान ह्यास प्रथम बहराम बेग असें म्हणत.

दुसरा मनुष्य इतिहासांत आढळत नाहीं. गवय्ये, चित्रकार व कवी नेहमीं त्याच्या आश्रयास येऊन राहत. त्याला बायकोमुळें नव्हतीं. वृद्धापकाळ झाल्यावर ऐहिक पसारा सोडून, तो विद्येचें अध्ययन करीत एकांतवासांत राहिला.' अशा प्रकारचे बाबराचे सोबती होते. रोमचा प्रसिद्ध बादशहा मार्कस ऑरोलियस ह्यानें ज्याप्रमाणें जवळच्या मंडळीविषयीं आपला अभिप्राय लिहून ठेविला, त्याचप्रमाणें बाबरानेंही लिहून ठेविला आहे. विस्तारभयास्तव येथें ज्यास्त हकीकत देतां येत नाहीं.

बाबरानें सृष्टींतील प्रत्यक्ष घडामोडींच्या अत्यंत उपयुक्त शाळेंत आपलें युद्धकलाप्रावीण्य मिळविलें. असें शिक्षण अगदीं तरतरीत असावयाचें हें सांगणें नकोच. एके प्रसंगीं त्याच्या लोकांनीं त्याच्या परवानगीशिवाय लूट केली. 'माझ्या लष्करांतील शिस्त इतकी कडक होती, कीं ती सर्व लूट मीं परत देवविली. दुसऱ्या दिवशीं पहिला पहारा संपण्याचे अगोदर लुटींपैकीं एक सुतळीचा तोडा किंवा सुईचा तुकडाही परत देण्याचा राहिला नव्हता.' पूर्वीं लढाईच्या प्रसंगीं निरनिराळ्या टोळ्या मर्जीस येईल त्याप्रमाणें हल्ला करीत, अगर वेगवेगळ्या लढत. सर्वांनीं एकमतानें व शिस्तवार लढण्याची पद्धत बाबरानें घातली. त्याचा उपयोग कसा झाला हें त्याच्या युद्ध प्रसंगांत दिसून आलेंच आहे. समर्कंद शहर बाबराच्या अत्यंत आवडीचें होतें. तीन वेळां तें त्याच्या हातांत आलें व तीन वेळां गेलें. त्याची रचना मोठी मोहक असून तेथें राहणें बाबरास फार आवडत असे. तेथचे रस्ते फरसबंदीनें बांधून काढिलेले होते. बुखाऱ्याचें मद्य व समर्कंदचीं खरबुजें हीं बाबरास फार आवडत. तो अनेक ठिकाणीं फिरला, परंतु समर्कंदचीं खरबुजें कधीं विसरला नाहीं. समर्कंदांतच बाबरानें कविता करण्याचा अभ्यास केला. त्या वेळीं चांगली पाठशक्ति असणें हें विद्वत्तेचें मोठें लक्षण समजलें जात असे. हिलाली कवि तीस चाळीस हजार कविता बिनचूक तोंडपाठ म्हणे. आम्हां हिंदु लोकांस ह्या पाठशक्तीचें विशेष माहात्म्य वाटणारें नाहीं. बाबरानें एक नवीन लिपी काढून ती प्रसिद्ध केली, त्याच तुर्क लिपींत तो आपल्या कविता व इतर ग्रंथ लिही. त्या लिपीस बाबरी लिपी असें त्यानें नांव दिलें. कविता करण्यांत तो फार कुशल व तरबेज होता. त्याचा मुलगा हुमायून काबुलास राज्य करीत असतां त्यानें कांहीं कवनें करून बापास दाखविलीं. 'तुला दोन ओळी सुद्धां चांगल्या लिहितां येत नाहींत,' म्हणून बाबरानें त्याची फार निर्भर्त्सना केली.

बाबराचा शकुनांवर विशेष भरंवसा होता. एकदां एखाद्या दिवशीं लढाईंत पराजय झाला, म्हणजे त्या वारीं तो पुनः कधीं लढाई करीत नसे. शिवाय कोणत्याही कृत्यास

ह्यात घालताना तो अगोदर मुहूर्त पाहत असे. एकदा बाबरावर असा बिकट प्रसंग आला, की फक्त दोन साथीदारासह पळून जीव बचावण्याची त्यास पाळी आली. शत्रूं-पैकीं दोन असामी त्याच्या पाठीवर होते ह्या संकटातून तो कसा सुटला, हें लिहिलेले नाहीं. खुस्रू शहानें समर्कंद घेऊन बाबरास हाकून लाविलें, तेव्हा इराणातील लोकानीं त्यास मदत केली. त्याच्याच मदतीनें त्याने काबूलचें राज्य कमाविलें हे इराणी लोक शिया पंथाचे असल्यामुळें समर्कंदकडील सुनी मुसलमानास बाबराचें करणे आवडले नाही पण समर्कंद शहर स्वाधीन करून घेण्यास लागणारी सैन्याची मदत इराणी लोकाकडून त्यास न मिळाल्यामुळें, त्यास आपला मोर्चा हिंदुस्थानाकडे फिरवावा लागला. त्याचा हाडवैरी शयबानीखान ह्याचा नाश मात्र इराणी लोकाच्या मदतीनें झाला शयबानीच्या शरीराचे तुकडे करून ते आसपासच्या राजाकडे पाठविण्यात आले. त्याच्या डोक्यात पेंढा भरून तें कान्स्टाटिनोपलच्या तुर्क बादशहाकडे पाठविण्यात आले त्याच्या कपाळाची कवची सोन्यानें मढवून इराणच्या शहानें मद्यप्राशनाच्या उपयोगीं आणिली. त्या वेळचे दुसरे प्रसिद्ध शहर हिरात तेंही बाबराकडे आलें. चगीझखानाच्या वेळेस हिरातची लोकसंख्या पुष्कळ लाख होती चंगीझनें त्या शहरास वेढा घालून लाखों लोक ठार मारिले पुढें तें ओसाड पडलें. ओक्ताईखानाने सन १२३५ त तें फिरून बाधिलें बाबराच्या वेळेस तें चागले भरभराटींत होते ' हिरात शहरात अनेक विद्वान् गृहस्थ आहेत, त्याच्या बरोबरीचे विद्वान् पृथ्वीच्या पाठीवर दुसरे नाहींत मुलाना अब्दुर्रहमान् जामी हा थोर व विद्वान् साधु पुरुष येथे राहतो. ह्या थोर पुरुषाचे गुणवर्णन करण्याचें माझ्या अगीं सामर्थ्य नाहीं.' सन १५०७ त हिरात शहरात जे नामान्कित कवि व कारागीर होते, त्याचें वर्णन पाश्चात्य विद्वान् व्हांबेरी ह्याने दिलें असून, त्याने त्याची केलेली तारीफ आपणास खरी सुद्धां वाटणार नाही

सकटात असताही बाबरानें कविता रचण्याचा नाद सोडिला नाहीं. ' मी दररोज सरासरीनें बावन कविता रचीत असें ' लष्करातील लोकांची काळजी तो स्वतःच्या शरीरापेक्षा जास्त घेई. एकदा हिंवाळ्यात काबुलास जात असता वादळ होऊन अतिशय बर्फ पडला. ' मी त्या बर्फात लहानशा सत्रंजीइतका मोठा व छातीइतका खोल खळगा खणून त्यांत बसलो. जवळच्या एका धर्मशाळेंत जाण्याचा कित्येकानीं मला आग्रह केला. परंतु माझ्या शिपाई लोकास तसेंच थडीवाऱ्यात सोडून, एकट्यानें निवाऱ्याच्या जागेंत जाणें ही अत्यंत बेइमानाची व शरमेची गोष्ट आहे, असे सागून

मी जाग्यावरून हाललों नाहीं.’ नेपोलियन व शिवाजी ह्यांच्या अशाच अनेक आख्यायिका उपलब्ध आहेत. सर्व असामी सारखे लेखणें हें थोरपणाचें चिन्ह असून, महत्पदास चढणाऱ्या पुरुषाच्या अंगीं तर तें अवश्य असलें पाहिजे.

बाबराच्या अंगीं एक मोठा दुर्गुण होता, तो मद्यपानाचा नाद हा होय. या कामीं लहानपणीं त्याला कांहीं तरी भीड होती, पण अधिकार हातांत आल्यावर मंडळी जमवून तो खूब मद्यप्राशन करूं लागला. आत्मचरित्रांत अशा प्रत्येक प्रसंगाची हकीकत तो मोठ्या कौतुकानें वर्णन करितो. हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांत बाबराचें मद्यप्राशन फारच वाढलें, व तो पक्का दारूबाज बनला. जरा कांहीं सुंदर देखावा दिसला, शेतें चांगलीं पिकल्याची बातमी आली, अथवा असेंच कांहीं यत्किंचित कारण झालें, कीं दिवसभर मद्यप्राशनाचा तडाखा चाले. सकाळीं तेंच, दुपारीं तेंच, रात्रीं तेंच. अशांत त्याचीं पांच सात वर्षें गेलीं. शिवाय तो भांग घेत असे. काबुलांत असतां तो हरहंमेष शिकारीस जाई. ह्या वेळीं मद्यप्राशन विशेष चाले. ह्या त्याच्या नादामुळें त्याचें एखादें काम फसलें, असें मात्र कधींही झालें नाहीं; किंवा मद्यप्राशनाची दुसऱ्यावर त्यानें बळजबरी केली नाहीं. फत्तेपूर शिक्रीच्या लढाईंत त्यानें शपथ घेऊन मद्यप्राशन सोडून दिलें. पण तोही त्याचा निश्चय फार दिवस टिकला नाहीं. पुनरपि त्याचा नाद पूर्वींप्रमाणेंच अखेरपर्यंत चालू राहिला. ( Rushbrooke Williams. )

सृष्टिसौंदर्य अवलोकन करण्याची बाबरास अत्यंत आवड असे. काबूलकडील प्रदेश सृष्टिसौंदर्यानें अतिशय संपन्न आहेत. नाना प्रकारचीं फुलें, फळें व हरएक प्रकारचीं शोभिवंत झाडें तिकडे होतात. अशा सृष्टिवैभवाच्या अवलोकनापासून संतोष पावण्याची शक्ति बाबराचे अंगीं होती हें विशेष आहे. काबूल शहराबाहेर एका सुंदर टेंकडीवर त्यानें आपल्या करमणुकीसाठीं एक जलमंदिर बांधून, सभोंवार अर्घवान फुलांचे व सुंदर फळांचे बागबगीचे करून, ती जागा फार सुशोभित केली होती. काबूलनजीक एका टेकडीच्या पायथ्याशीं झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याच्या कांठीं आपलें दफन करावें असें त्यानें ठरविलें होतें. कारण, मरणानंतरही सृष्टिसौंदर्यसंपन्न प्रदेशांत आपलें शरीर पडावें अशी त्याची उत्कट इच्छा होती. तदनुरूप बाबर व त्याचीं बायकामुलें ह्यांचा दफनविधि करण्यांत आला. शहाजहान बादशहानें सन १६४० त त्या जागेवर एक लहानशी टुमदार कबर बांधिली. अद्यापि त्या रमणीय स्थळीं काबूलचे लोक हवा खाण्यास व नवस करण्यास जातात.

सामान्यतः बाबराचा स्वभाव परोपकारी व गोड होता, तथापि अनेक प्रसंगीं त्याच्या

अगचे तुर्क स्वभावाचें क्रूर पाणी बाहेर दिसल्याशिवाय राहत नसे अफगाण सरहद्दीवर त्याने एकदा बंडवाल्याची क्रूरपणानें कत्तल केली. तीन हजार लोक कापून काढिले. पुढारी लोकाचीं शिरें कापून काबुलास पाठविलीं, आणि बंडाच्या जागीं एक शिराचा प्रचंड मनोरा रचिला. त्याजवर हिंदुस्थानात विषयप्रयोग झाला, तेव्हा असेंच क्रूर व भयंकर वर्तन त्यानें केलें मुलाशीं मात्र त्याचे आचरण अतिशय ममतेचे असे एका अर्थी त्यानें त्याचे फाजील लाड केले असेच म्हणण्यास हरकत नाही. हुमायूनच्या पुढील दुर्दशेचे कारण काहीं अशीं हें ममतेचे वर्तनच होय.

बाबरास हिंदुस्थानात एवढा विजय प्राप्त होण्याचें अंतस्थ कारण असें आहे, कीं त्याने आपल्या फौजेस उच्च प्रतीचें लष्करी शिक्षण देऊन तींत उत्तम शिस्त व टापटीप ठेविली होती. धनुष्यबाण, भाले, खजीर, गदा व काही बंदुका, अशीं हत्यारें त्याच्या लोकापाशीं असत. तोफखाना त्या वेळेस फार अवजड होता. उस्ताद अली-कुली ह्या नावाचा त्याचा तोफखान्याचा कामदार होता. ‘ गंगेवरील पूल चालला असता उस्ताद कुलीनें तोफेचा मारा चागला केला. पहिल्या दिवशीं त्याने आठ वेळ तोफ सोडिली, दुसरे दिवशीं व पुढें दररोज तो दिवसातून सोळा गोळे सोडीत असे.’

बाबरानें हिंदुस्थानात बादशाही अंमल स्थापन केला, पण त्यास हा देश एकंदरींत आवडला असे त्याच्या लेखावरून दिसत नाही. ‘ हिंदुस्थानात उपभोगाच्या वस्तु मुळींच नाहींत, लोक देखणे नाहीत, त्याना बुद्धि नाहीं, त्याची ग्राहकता अगदींच कोती आहे, त्याच्या रीतिभाती सभ्यपणाच्या नाहीत. अगीं दया किंवा बंधुप्रेम नाहीं; कलाकौशल्याचीं कामें करण्याची त्यांना अक्कल नाही, कारागिरीविषयी त्यास काहींच माहिती नाहीं, घोडे चागले नाहींत; मास चागले नाही, द्राक्षें, खरबूज, बर्फ, थड पाणी, चागलें अन्न किवा यःकश्चित् मेणबत्तीचा दिवा ह्यापैकीं काहींच ह्या देशात नांहीं. हिंदुस्थानचा मुख्य गुण काय तो हा, कीं देश मोठा असून सोन्याचांदीनें भरलेला आहे.’ हें बाबराचें वर्णन वस्तुस्थितीशीं ताडून पाहिलें असता विचित्र दिसतें. हें वाचताना एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, हें वर्णन बहुधा येथील मुसलमानासंबंधाचें हिंदूसाठीं लिहिलेले असावे. काबूल, हिरात, समर्कंद, येथील मुसलमानांच्या वैभवांत मुरलेल्या बाबरास हिंदुस्थानांतील अफगाण मुसलमान आळशी, मिजासखोर व अशिक्षित वाटले ह्यांत नवल नाही. वरील उताऱ्याच्या खालींच अफगाण लोकांविषयीं त्यानें तिरस्कारबुद्धि व्यक्त केली आहे. अफगाणाशीं बाबराचें वांकडे होतें, ह्या गोष्टी ध्यानात ठेविल्या म्हणजे वरील वर्णनाची यथार्थता जुळते. बाबराचें सर्व आयुष्य

धामधुमींत व युद्धप्रसंगांत गेलें होतें. ' वयाच्या अकराव्या वर्षापासून माझे रमजानचे लागोपाठ दोन सण एका जागेंत गेल्याचें मला स्मरत नाहीं. ' बाबराचीं कांहीं पत्रें उपलब्ध आहेत. एकांत त्यानें मुलाच्या गैरवर्तणुकीबद्दल कडक मजकूर लिहिला आहे; दुसरें एक त्यानें आपल्या काबूलच्या एका स्नेह्यास लिहिलें असून, त्यात आपल्या जन्मभूमीचें दर्शन घेण्याची उत्कट इच्छा प्रदर्शित केली आहे.

ह्या एकंदर वर्णनावरून बाबर हा मर्दगडी व मोठा उमदा गृहस्थ होता ह्यांत संशय नाहीं. थोरपणास उचित असे बहुतेक गुण त्याच्या अंगीं होते. धूर्तता, विद्वत्ता, मेहेनतीची आवड, महत्त्वाकांक्षा, औदार्य इत्यादि नानाविध गुणांनीं तो युक्त होता. त्याच्या नशिबांतच भाग्योदय लिहिलेला होता. बाबराच्या आत्मचरित्राचा तर्जुमा करणारा मि. अर्स्किन् म्हणतो, ' आशियांतील सामान्य राजपुरुषांहून बाबर अगदीं भिन्न होता, हाच त्याचा लक्षांत ठेवण्याजोगा विशेष गुण आहे. मानवी प्राण्यांत नैसर्गिक म्हणून जें काय असावयाचें तें त्याच्यांत होतें. तो चलाख, ममताळु व साधा असून, मोठा अधिकार हातीं आल्यावरही हे त्याचे गुण कमी झाले नाहींत. इतर राजांसारखा तो डामडौली, थाटमाटाच्या नियमांनीं जखडलेला व दिखाऊ चांगुलपणा धारण करणारा असा नव्हता. कल्पकता व बहुगुणसंपन्नता ह्यांत त्याची बरोबरी करणारे थोडेच राजपुरुष सांपडतील. अकबरानें दूरवर दृष्टि देऊन उदार राज्यपद्धति घालून दिली, ह्यामुळें अकबरास पहिला मान मिळतो; कापट्यनीतींत औरंगजेबाची कीर्ति विशेष आहे; चंगीझखान व तयमूरलंग ह्यांनीं बाबराच्या शेंकडोंपट मुलूख जिंकिला, म्हणून त्यांचीं नांवें स्मरणीय झालीं आहेत, परंतु मनाची तरतरी, विपत्ति येवो वा भाग्योदय प्राप्त होवो, दोनही स्थितींत मनाचें धैर्य ढळूं न देतां आनंदी व शांतवृत्ति धारण करणें; तसेंच राजपुरुषाच्या अंगीं सहसा न आढळणारा मनमिळाऊपणा, धैर्य, विद्याभिरुचि, आणि, तिजमध्यें मिळालेली सिद्धि, इत्यादि गुणांमध्यें बाबराच्या वर बसवितां येईल असा दुसरा बादशहा आह्मांस आढळत नाहीं. '

बाबर दोन नियमांचा उल्लेख वारंवार करितो. ते दोन नियम डोळ्यांपुढें ठेवून तो वागत असे. ' विजय संपादावे व राज्यवृद्धि करावी, असा माझा मूळपासून हेतु असल्यामुळें, एकदोनदां पराभव झाला, म्हणून मी धीर सोडून स्वस्थ बसत नसें. ' आणि दुसरा, मृत्यूनंतर कीर्तीस डाग लागेल, असें वर्तन शहाण्या मनुष्यानें कधींही करूं नये. ' हे दोनही नियम प्रत्येकानें लक्षांत ठेवण्याजोगे आहत. तत्कालीन परिस्थिति व कालाचें महदंतर ह्यांच्या योगानें होणारे फेरफार सोडून दिले असतां, रणधुरंधर,

मुत्सदी, व विद्यासपन्न अशा बाबराची तुलना जूलियस सीझरबरोबर करण्यास काहीं अडचण नाहीं. उलट सीझरपेक्षा ज्यास्त अभिमान बाळगण्याजोगी बाबराची योग्यता आहे. त्यानें हिंदुस्थान देशात मोगल बादशाहीची स्थापना केली. एकदर चरित्रक्रमावरून पाहता सर्व मोगल बादशहामध्यें बाबर हा नि संशय विशेष सन्माननीय आहे.

आमच्या महाराष्ट्रेतिहासात बाबराची तुलना बऱ्याच अशीं शिवाजीशीं करिता येण्यासारखी आहे. दोघासही आरंभापासून अनेक अडचणी व संकटें आलीं. शत्रूंच्या कचाट्यात सापडण्याचे प्रसग व त्यातून युक्तीनें मुटका करून घेणें या दोनही, गोष्टीचे अनुभव उभयतास आले मातृभक्ति व मातेच्या उपदेशानुसार वर्तन, आपणास रात्रंदिवस मदत करणाऱ्या शिपाई लोकाचा परामर्ष स्वत च्या जीवापेक्षा जास्त घेणें, आणि लढाईत आणीबाणीच्या प्रसंगी जोरदार संभाषणाने लोकाच्या अंगी वीरश्री उत्पन्न करून विजय सपादणे, इत्यादि गोष्टीत या दोन भिन्नकालीन पुरुषाचे निकट साम्य आहे. हिंदुस्थानात आल्यावर बाबर फार दिवस वाचला नाही, म्हणून व्यवस्थित राज्यकारभार करण्यात त्याचे कौशल्य शिवाजीप्रमाणे प्रगट झाले नाहीं. तसेंच स्वराष्ट व स्वधर्म ह्यास ऊर्जितावस्था आणण्याम शिवाजीनें जिवापाड मेहनत केली, पण तसे प्रयत्न करण्यास बाबरास सवड नव्हती सामान्य रीत्या नवीन राज्य स्थापन करण्याच्या कामी लागणारे अवश्य गुण दोघामध्यें भरपूर होते कोलबसाने अमेरिका खंडाचा शोध लाविला त्यापूर्वी दोन वर्षे, व वास्को ड गामा हिंदुस्थानांत आला त्यापूर्वी सुमारें चार वर्षे, बावर फरघाना येथे तख्तावर बसला स्पेन देशात फर्डिनंड व इझाबेला, आणि इंग्लडात सातवा व आठवा हेन्री आणि हिंदुस्थानात आल्बुकर्क व विजयनगरचा कृष्णदेवराय हे बाबराचे समकालीन होते.

मि. ॲन्ड्रयू म्हणतो, ' मोगल असून दयावत, मुसलमान असून परधर्मीयाशी ममतेनें वागणारा, शूर, उदार, गरिबाचा कनवाळू, मातृभक्त पुत्र, अपत्यस्नेहयुक्त पिता, असा बाबर बादशहा, पूर्व व पाश्चात्य देशात थोरपणाला अवश्य मानिलेल्या सर्व गुणानीं संपन्न होता. ' एकदरींत बाबरासारखा वनवासात वाढलेला व विपत्तींत मुरलेला पुरुष मोगल बादशाहीची टोलेजंग इमारत सुरू करण्यास सर्वथैव लायक होता.

बाबराच्या वेळेपासून हिंदुस्थानांत नवीन मन्वंतर सुरू झालें. झोटिंग पादशाही, जुलूम व धामधूम ह्यांचा बऱ्याच अंशीं अंत होऊन एकतत्री राज्यकारभार सुरू झाला. प्रजेच्या संबंधानें आपलें कर्तव्य काय आहे, हें राज्यकर्ते ध्यानांत बाळगूं लागले. रयतेवर धर्माच्या बाबतींत जुलूम करण्यास आपणास अधिकार नाहीं असे ते समजूं लागले.

अर्थात् अनेक प्रकारचा बोध घेण्याजोग्या राजनीतींतील गोष्टींचा खल करण्याची इतिहासकारास पुढें सोय झाली. असा फरक एकदम होण्याचें कारण थोडेंसें गूढ, म्हणजे अफगाण व मोगल ह्या दोन जातींतला अंतस्थ भेद हें होय. हा भेद पुढील इतिहासाची गुरुकिल्ली आहे. मोगल हे नांवाचे मुसलमान होते. प्रसंग पडेल त्याप्रमाणें ते शिया किंवा सुनी पंथ स्वीकारीत. अफगाण लोकांचा ते द्वेष करीत. अर्थात् हिंदु लोकांशीं स्नेह करून सुनी अफगाणांचा पाडाव करणें ते आपलें काम समजूं लागले. लष्करी जोरावर देश आपल्या ताब्यांत ठेवण्यापलीकडे अफगणांचें लक्ष जात नसे. अफगाण लोक हे धर्माच्या बाबतींत दुराग्रही व बहुतेक सुनी पंथाचे असून, हिंदुलोक व हिंदुधर्म ह्यांचा अतिशय द्वेष करीत असत. त्यांच्या अनेक पोटजाती होत्या. त्या एकमेकांशीं शत्रुत्वानें वागत. म्हणून त्यांचा पाडाव करणें सुलभ जाई. आजपर्यंत जे मुसलमान सुलतान झाले, त्यांचीं घराणीं वरचेवर पादाक्रान्त होत गेलीं ह्याचें अंतस्थ कारण हें आहे. तसेंच अकबराच्या राज्यकारभाराचें धोरणही ह्या कारणानेंच ठरलें गेलें.

बाबराच्या राज्याचा विस्तार पश्चिमेस मध्यआशियांतील अमूदर्या नदीपासून पूर्वेस आसामपर्यंत, आणि उत्तरेस सियालकोटपासून दक्षिणेस रतनभोरपर्यंत असून, राज्याचा वसूल सुमारें साडेसहा कोटि रुपये होता, ( Talbot's Memoirs of Babar ).

**७. बाबराचें आत्मचरित्र.**—बाबराच्या हातून मोगल बादशाही स्थापन झाली, म्हणून इतिहासांत त्याचें नांव चिरस्मरणीय झालें आहे, खरें, पण त्याच्या आत्मचरित्रामुळें त्याचें नांव वाङ्मयाच्या इतिहासांतही अजरामर झालें आहे. तो सुसंस्कृत होता. अनेकांच्या गुणदोषांवर त्यानें मार्मिक टीका केली आहे. त्यानें आपले लेख व कविता अनेक संकटांच्या प्रसंगांत व युद्धांच्या धांदलींत लिहिलेल्या आहेत, त्याच्या लेखांत मार्मिकपणा व सौरस्य ओतप्रोत भरलेलें आहे; केवळ युद्धांच्या व मोहिमांच्या शुष्क व नीरस हकीकतींनीं त्याचें आत्मचरित्र भरलेलें नाहीं. संसाराच्या अनेक प्रसंगांत पूर्णपणें कसलेला एखादा विद्वान व बहुश्रुत गृहस्थ ज्या प्रकारची टीका करील, तशीच बाबराची टीकासरणी आहे. बीव्हरिज् म्हणतो, ' जगांतील कित्येक अप्रतिम लेखांत ह्या आत्मचरित्राची गणती होईल. गिबन, न्यूटन, रूसो इत्यादिकांचीं आत्मचरित्रें जशीं मनोरम आहेत, त्यांच्याच तोडीचें बाबराचें हें चरित्र आहे. आशियाखंडांतील वाङ्मयांत तर तें एकच्या एकच. पुढच्या भागांहून पहिले पहिले भाग चांगले झाले आहेत. ते पुनः पुनः वाचून मागाहून दुरुस्त केलेले असावेसे दिसतात. कित्येक ठिकाणीं कंटाळवाणा भाग आहे.

नाहीं असें नाहीं, पण मधूनमधून चटकदार टीका असल्यामुळें, त्यात एक प्रकारची बहार उत्पन्न झाली आहे. निर्भीड, प्रेमाळु, उत्साही, धैर्यनिश्चयादि गुणानीं परिपूर्ण, नेहमी आशेवर जगणारा व उल्लासी, असा बाबराचा स्वभाव त्यात पावलोपावलीं दृष्टीस पडतो, आणि त्याजविषयीं मनाची आदरबुद्धि वाढत जाते. स्वत च्या दुर्गुणावर पाघरूण घालण्याचा त्यानें प्रयत्न केलेला नाहीं, म्हणून सत्याचें मूर्तिमंत चित्र मनात उभें राहतें ह्या कारणास्तव बाबराच्या आत्मचरित्रास अपूर्व मान मिळणें योग्य आहे. तो लिहितो —

' मला शरण आला म्हणजे शत्रूला सुद्धा मी आपल्या कुंटुंबातल्या माणसाप्रमाणे वागवितों......ह्या माझ्या लिहिण्यात स्वत ची प्रौढी मिरविण्याचा माझा उद्देश नाहीं. जे खरे खरें आहे तेवढेंच मी लिहितों. त्यात मी आपली प्रौढी मिरवावी अशी माझी बिलकुल इच्छा नाही ज्या गोष्टी घडल्या त्या मीं लिहिल्या आहेत. आजपावेतों एवढ्या लिहिण्यात एक अक्षर सुद्धा सत्य सोडून मी लिहिलेलें नाहीं बाप असो कीं भाऊ असो, कोणाची भीड न धरिता, जे खरें तेंच मीं लिहिलें आहे स्नेही असो कीं शत्रु असो, प्रत्ये-काचे गुणावगुण अगदी अत्यत निष्पक्षपातानें मी लिहिले आहेत, म्हणून माझ्या स्पष्ट लिहिण्याचा वाचकानी रोष मानूं नये.' मध्य-आशियातील तत्कालीन राहणी, रीतीभाती, अदाधुंदी, राजकीय उलाढाली इत्यादिकाविषयीं बरीच माहिती बाबराच्या पुस्तकात आहे. लोक किती विश्वासघातकी होते, कोणाचा काहीं निरोप आला तरी त्याजवर भरंवसा न ठेविता, त्याविषयीं कशी खबरदारी ठेवावी लागे, अन्नाच्या द्वारा विषप्रयोग होण्याची भीति असल्यामुळे, आगाऊ अन्न चाखण्याचा बंदोबस्त किती करावा लागे, इत्यादि अनेक गोष्टी त्यावरून कळतात बाबराचे आत्मचरित्र दिनचर्येच्या रूपाचे आहे. त्याची सुरुवात जून स. १४९४ त झाली. त्यात मध्यंतरीं दोन तीन ठिकाणी खळ पडलेला आहे विशेषत १५०८ पासून १५१९ पावेतों बारा वर्षांचा वृत्तान्त बिलकुल नाही. पुढें पुन सुरुवात करिताना ह्या खळ पडण्याचें कारणही दाखविलेले नाही. हें चरित्र तुर्की भाषेंत लिहिलेले असून तें बोधप्रद व चटकदार आहे. बाबराचा चुलत भाऊ मीर्झा हैदर म्हणून होता, त्याच्या हातची ह्या आत्मच-रित्राची एक प्रत, बाबराच्या मृत्यूनंतर दहाच वर्षांनीं लिहिलेली, उपलब्ध झाली. दुसरी एक प्रत हुमायूनच्या हातची, स. १५५३ त लिहिलेली सापडली, तींत हुमा-यूनचा असा शेरा आहे, कीं ' ही प्रत बाबरानें स्वतः लिहिलेल्या प्रतीवरून मी उतरून घेतली आहे. ' पुस्तकात हुमायूनवर कित्येक ठिकाणीं जोराचा ताशेरा झाडलेला आहे,

ते भाग हुमायूननें आपल्या प्रतींत गाळले नाहींत, ह्यावरून हुमायूनची प्रत भरंवसे-लायक समजण्यास हरकत नाहीं. वरील दोनही प्रतींचा सर्वस्वी मेळ आहे. अकबरानें ह्या आत्मचरित्राचा तर्जुमा प्रथम फारशीं भाषेंत करविला, ( स. १५९० ). पुढें स. १८२६ त वुल्यम अर्स्किननें त्याचें इंग्रजींत सुंदर भाषांतर केलें. पुढें फ्रेंच व इतर भाषांतही त्याचे तर्जुमे झाले. मोगल बादशाही नाहींशी झाली, मध्य-आशियांत सुद्धां मोगलांचें नांव ऐकूं येत नाहीं; तेथील तुर्क लोक रशियाच्या ताब्यांत गेले आहेत. सारांश, बाबराचा वंश नष्ट झाला असतांही, त्याचा हा चरित्रग्रंथ जशाचा तसा कायम असून त्यास कांहीं एक भंग नाहीं. बाबराचा इतिहास बराचसा ह्या आत्मचरित्रावरून व कांहीं भाग मीर्झा हैदरानें लिहिलेल्या ' तारीखी-राशिदी ' नांवाच्या मोगलांच्या इतिहासावरून उपलब्ध झाला आहे. शिवाय आणखी अनेक मुसलमानी ग्रंथांत बाबराचा उल्लेख थोडा बहुत आला आहे बाबराचीं दोन पत्रें हुमायुनास लिहिलेलीं उपलब्ध आहेत, त्यांतील उतारेः—' अडचणी सोसून संकटांत उडी घालण्याचे व शस्त्रास्त्रांनीं पराक्रम गाजविण्याचे हे तुझे दिवस आहेत. कोणतीही अडचण आली, तरी आपली शिकस्त करण्यास चुकूं नको. आळस व हयगय केल्यानें राज्य टिकत नसतें.

' तुझ्याशीं माझा एक वाद आहे. आज दोन तीन वर्षें तुझ्याकडून कोणीही मंडळी येऊन मला भेटत नाहींत मी इकडून लोक पाठविले, ते, वर्ष झालें, परत आले नाहींत. ' स्नेही मंडळी सोडून मला येववत नाहीं, ' असें तूं वारंवार आपल्या पत्रांत लिहितोस, परंतु हें ध्यानांत ठेव कीं राजा होणें ही जेवढी कैद आहे, तेवढी दुसरी कोणतीही नाहीं. म्हणून स्नेही सोबती सोडून येववत नाहीं, हें म्हणणें तुला शोभत नाहीं.

' मी सांगतों म्हणून तूं मला पत्रें लिहितोस खरीं: पण तीं तूं कधीं फिरून वाचून पाहत नाहींस. कारण तीं वाचून पाहतास, तर अशीं पत्रें तूं कधीं लिहिलीं नसतींस. तुझें शेवटचें पत्र वाचण्यास मला किती तरी प्रयास पडले. तें अगदीं अस्पष्ट व अशुद्ध होतें. तुला शुद्ध लिहितां येतें, तरी कित्येक चुका होतातच. पत्रांत इतकी दुर्बोधता कशास पाहिजे ! तुझ्या शब्दांचा संदर्भ नीट लागत नाहीं, म्हणून अर्थ चटदिशीं ध्यानांत येत नाहीं. तूं पत्रांत आपली विद्वत्ता दाखविण्यास जातोस, म्हणून सर्व चुकतें. आतां इतःपर स्पष्ट लिहीत जा. संदिग्धता ठेवूं नको. साधे शब्द वापर. अशानें लिहि-णारास त्रास नाहीं, व वाचणारासही नाहीं.

' फौजेची शिस्त व व्यवस्था अत्यंत काळजी पूर्वक ठेवीत जा. तुझें कुशल असो असें वारंवार चिंतून पुरें करितों. गुरुवार ता. १३ रबी;

दुसरें असेच एक पत्र ता. १३ नोव्हेंबर स. १५२८ चें आहे. त्यात बदकशान प्रातात हुमायुनास मुलगा झाला, त्याबद्दल त्याचे अभिनदन करून, समर्कंदचें राज्य परत मिळविण्याविषयी आग्रह केला आहे समर्कंदपासून बंगालपर्यंतच्या अफाट प्रदेशावर आपलें राज्य असावें अशी बाबराची फारच मनीषा होती. 'संकटास जुमानूं नको. वाटेल तसा प्रसंग आला तरी त्यातून हिंमतीनें वागून आपला मार्ग काढीत जा. आळसानें व ऐषआरामानें राज्य टिकत नाही. भाऊ कामरान काबुलास कारभार करीत आहे, त्याजशी गोडीने वागून, तूं स्वत. तिकडे इतक्या लाब एकटा आहेस, याजबद्दल दु ख करीत राहूं नको रोज दोन वेळ दरबार भरवून सर्वांच्या भेटी घेत जा. सल्लागाराची मसलत ऐकून तदनुसार वर्तन ठेव. फौजेचा बदोबस्त नीट ठेव.'

हिंदुस्थानात गोवध न करण्यासबंधानें बाबरानें आपला मुलगा हुमायून यास एक गुप्त आज्ञा दिलेली भोपाळ स्टेट लायब्ररींतून पैदा करून डा० सय्यद महमूद यानीं इंडियन रिव्ह्यू ऑगस्ट १९२३ च्या अंकात छापली आहे ती अशी —

'प्रिय पुत्रा! हिंदुस्थानात अनेक धर्मांचे लोक राहतात. परमेश्वरानें कृपाळुपणें या देशाचें राज्य तुझे हवालीं केलें आहे, तर धर्मासंबंधानें मनात दुराग्रह धारण करूं नकोस. सर्वांचा न्याय निष्पक्षपातानें करीत जा, आणि लोकाच्या धर्मभावना व चालीरीती यास कोणत्याही प्रकारें दुखवूं नकोस मुख्यत. राज्यात गोवध बंद ठेव, म्हणजे लोकाची अंत करणे तुला वश होतील, आणि ते कृतज्ञ भावानें तुला भजतील कोणाच्याही मंदिरास व तीर्थास उपद्रव करू नकोस व न्यायानें वाग, म्हणजे प्रजा सतुष्ट राहून देशात शाति व सतोष वास करतील लोकांचीं मनें शस्त्रानें न जिंकतां प्रेमानें व उपकारानें आपलींशीं करून घे. शिया व सुनी याचे कलहात लक्ष घालूं नकोस, नाहीं तर इस्लामालाच कमीपणा येईल.'

---

# प्रकरण २१ वें

## नासिरुद्दीन महंमद हुमायून

### इ. स. १५३०–४० व १५५५–५६.

१. राज्यारोहण व चुका, ( १५३० ). २. गुजराथची स्वारी, (१५३४-३५).
३. शेरखानाचें बंड, पदच्युति, (१५३७-४०). ४. शेरशहा सूर, ( १५४०–४५ ).
५. पुढील सूरवंशी सुलतान, (१५४५-५५). ६. हुमायूनचा वनवास, (१५४०-५५)
७. मृत्यु व योग्यता, ( स. १५५६ ).

**१. राज्यारोहण व चुका**, ( स. १५३० ).—प्रसिद्ध फ्रेंच प्रवासी बर्नियर ह्यानें शहाजहान व औरंगझेब ह्यांच्या कारकिर्दीचें वर्णन करितांना मोगलांच्या राज्यपद्धतींत एक शोचनीय दोष काढिला आहे, तो असाः—' ह्या राज्यांत एक घातुक प्रचार चालू होता. राज्यकर्ता मरण पावल्यावर त्याच्या मागून तख्तावर कोणीं बसावें ह्याविषयीं कांहीं ठरीव नियम नसे. त्यामुळें बळी तो कान पिळी, असा प्रकार दरवेळेस घडून येई. ' बादशहा मेला, कीं त्याच्या मुलांत व इतर वारसांत तंटे लागत. ज्याची शक्ति जास्त त्यास जय प्राप्त होऊन, इतरांची तो हवी तशी वाट लावी. ठार मारणें, डोळे काढणें, एखाद्या मजबूद ठिकाणीं जन्मभर कैदेंत टाकणें, कैफाचें वेड लावून राज्यकारभाराला नालायक करणें, अथवा मक्केच्या यात्रेस पाठविणें, इत्यादि नाना प्रकारच्या युक्त्यांनीं इतर हक्कदारांची वाट लावण्यांत येत असे. नवीन बादशहा स्वभावानें क्रूर नसला, तर तो अशा लोकांस दूरच्या प्रांतीं कामें देऊन ठेवी. परंतु त्या ठिकाणीं ते अनेक खटपटी करून बादशहास त्रास देत. म्हणून गादीस हक्कदार फार थोडे असत, तेव्हांच बादशहाची कारकीर्द विशेषतः भरभराटीची होई. उत्तरकालीन मोगल बादशहा ह्या प्रकार पूर्णपणें ओळखून, बहुधा सर्व हक्कदारांचा संहार करण्यास चुकत नसत.

बाबरास चार मुलगे होते. वडील मुलगा हुमायून. हिरातचा सुलतान हुसेन मीर्झा याच्या घरांतील मुलगी महाम बेगम इच्या पोटीं स. १५०८ त हुमायून जन्मला. ती जातीनें तुर्क होती. बाबराच्या दुसऱ्या मुलांचीं नांवें कामरान, हिंदाल व मीर्झा अस्करी अशीं होतीं. कामरान हा तुसट व विश्वासघातकी होता. बाबराचा मुलगा असा कसा निघाला ह्याचेंच आश्चर्य लोकांस वाटे. अस्करी व हिंदाल हे दोघेही पराक्रमशून्य

असून प्रसग पडेल तसे वागून वेळ मारून नेत. शिवाय दुसरे कित्येक चुलतबधु हुमायुनास त्रास देणारे होते मरणसमयी बाबरानें हुमायुनास जवळ बोलावून सांगितलें, ‘ बाबारे, अल्लानें हें राज्यपद तुला दिल्याम, तूं आपल्या भावास ममतेने वागीव. त्यास ठार मारून टाकूं नको ’ ही बापाची शेवटची आज्ञा पाळण्याचे त्या कोमल अंत.करणाच्या हुमायूनने लगेच कबूल केलें. बाबर मरण पावल्यावर हुमायून तख्तनशीन झाला, त्या वेळेस त्याचा भाऊ कामरान हा काबूलच्या सुभ्यावर होता. काबूल प्रात बादशाही अंमलाखालीं राहवा, स्वतत्र तोडला जाऊं नये, अशी बाबराची मनापासून इच्छा होती काबूलच्या आसपास तुर्क, मोगल, अफगाण वगैरे जातींचे लोक राहत असून, त्याच्यातूनच बादशाही फौजेतील लोकाची व विशेषत. वरिष्ठ अमलदाराची भरती होत असे हिंदु लोकावर अगर हिंदुस्थानातील अफगाण लोकावर आपणास भरंवसा टाकिता येणार नाहीं, प्रसगी उपयोगी पडण्यास आपल्या जिव्हाळ्याचे व जन्मभूमीतलेच लोक पाहिजेत, हें बाबर चागलें समजून होता. पण बाबराची शेवटची आज्ञा पाळण्याकरिता हुमायूननें कामरान यास काबूल व पंजाब हे दोन प्रात स्वतंत्रपणें तोडून दिले असें केल्याशिवाय त्यास गत्यतर नव्हते. हिंदाल यास अतर्वेदींतला संबळ प्राताचा कारभार देऊन, मीर्झा अस्करी यास दिल्लीच्या दक्षिणेस मेवाटचे काम सांगितले. हुमायूननें बादशाही पद धारण केले, पण लष्कराचे सामर्थ्याची हेळसाड केली. बाबराच्या चार वर्षांच्या कार्किर्दीत देशात स्वस्थता झाली नव्हती, म्हणून हुमायुनास सर्वस्वी आपल्या फौजेवर अवलंबून राहवें लागणार होतें परंतु अफगाणिस्तान कामरानचे हातात राहिल्यानें हुमायुनास फौजेची भरती वाढविण्याचे साधन राहिलें नाहीं येथे असलेली पूर्वीची अनुभवी फौज दिवसेंदिवस कमी होत गेली. हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत राहून त्याच्या अगीं आळस व ऐषआराम उत्पन्न झाला. शिवाय जी थोडी फौज हुमायूनजवळ होती, तीही सर्व त्याने एकत्र ठेविली नाहीं, निरनिराळ्या प्रांतात विभागून टाकिली. याप्रमाणें त्याचा बंधुलोभ व ढिलेपणा त्याच्या नाशास कारण झाला. मोठेपणा पावण्याजोगी हुमायूनची योग्यता होती. तो शूर व अक्कलवान होता, पण राज्यकर्त्यास लागणारा निश्चय व तडफ हे गुण त्याच्या अंगीं नव्हते त्यानें आपल्या भावाचा आरंभींच नीट बंदोबस्त केला असता, म्हणजे पुढील अनर्थ बऱ्याच अशीं टळले असते. जेव्हा तिघा भावाचा शेवट झाला, तेव्हाच हुमायुनास स्वास्थ्य प्राप्त झालें, पण त्याचा उपभोग घेण्यास तो पुढें फार दिवस वांचला नाहीं. गृहकलहांमुळें त्याचे सर्व आयुष्य विपत्तींत गेले.

**१. गुजराथची स्वारी,** ( सन १५३४-१५३५ ).—गादीवर बसल्याबरोबर तीन प्रकारचीं संकटें दिसत होतीं. एक त्याचा भाऊ कामरानची वायव्येकडील खटपट; पूर्वेस शेरखानच्या हाताखालीं अफगाणांचा जमाव; आणि गुजराथेंत बहादूरशहाचा उत्कर्ष. या प्रत्येक अडचणीचें कायम निरसन हुमायूननें केलें नाहीं. एक गोष्ट तशीच अर्धवट टाकून तो दुसरी हातांत घेई. निश्चयानें जोराचें वर्तन न करितां नेहमीं आळशी व ढिला राहून तो भांबावल्यासारखा होई. प्रथम हुमायुनास बुंदेलखंडावर स्वारी करावी लागली. तेथें कित्येक अफगाण सरदारांनी कालिंजर किल्ला घेऊन बंड चालविलें. हुमायूननें स्वतः जाऊन तो किल्ला घेतला. नंतर तसाच पुढें जोनपुरावर जाऊन गोमतीच्या कांठीं त्यानें महंमूद लोदीचा पराभव केला, ( सन १५३१ ). तों बनारसनजीक चुनारगड नांवाचा मजबूद किल्ला आहे, तो शेरखान नामक अफगाण सरदार व त्याचा मुलगा जलालखान बळकावून बसले आहेत, असें त्यास कळलें. हुमायूननें एकदम चुनारगडवर जाऊन किल्ल्यास वेढा घातला. चार महिनेपर्यंत वेढा पडल्यावर आपलें कांहीं चालणार नाहीं असें पाहून शेरखान शरण आला, तेव्हां त्याच्याशीं ठराव करून चुनारगड किल्ला हुमायूननें पुनरपि त्याच्याच ताब्यांत परत दिला. शेरखानाच्या दुसऱ्या एका मुलानें बादशहाच्या पदरीं नोकरी धरिली. ह्या वेळीं चुनारगड किल्ला हुमायूननें शेरखानाकडे ठेवला ही मोठी चूक झाली. पण त्याच्या स्वभावाप्रमाणें मेहेरनजर करून शेरखानाकडे तो किल्ला सोंपवून बादशहा आग्ऱ्यास परत आला, ( सन १५३२ ). या वेळीं शेरखानाच्या बंडाचा पुरा मोड त्यानें केला नाहीं. उलट बंगाल व बहार प्रांतांत त्याचेंच वर्चस्व कायम ठेविलें; आणि या भानगडींतच त्यानें गुजराथची स्वारी हातीं घेतली. ही हुमायूनची पहिली मोठी चूक होय.

ह्या वेळीं गुजराथचें राज्य फार भरभराटींत होतें. तेथें बहादूरशहा राज्य करीत होता. सन १५२६ त तख्तनशीन झाल्यापासून त्यानें माळवा वगैरे देश जिंकून आपल्या राज्याची मर्यादा पुष्कळ वाढविली. दक्षिणचे राजे सुद्धां त्यास करभार देऊं लागले. दिल्लीच्या बादशहाची तो उघड हेटाळणी करूं लागला. इतकेंच नव्हे तर जिकडे तिकडे बंडावे उपस्थित करून व आंतून त्यांस साहाय्य करून, बादशहाची खोड मोडावी, आणि मग बादशाही सुद्धां घशांत टाकावी, असा बहादूरशहाचा अंतस्थ कावा होता. कदाचित् लोदी सुलतानास त्यानें मान दिला असता. कारण पूर्वी तो स्वतः गुजराथेंतून पळून गेला होता, तेव्हां त्यास दिल्लीस लोदी सुलतानानें आश्रय दिला होता. तथापि बहादुरशहा स्वस्थ बसता, तर हुमायून त्याच्या वाटेस गेला

नसता. परंतु हुमायूनचा मेहुणा महंमद जमान मीर्झा म्हणून होता तो बंड करून गुजराथेत पळून गेला. त्यास बहादूरशहानें आश्रय देऊन मोठ्या सन्मानास चढविलें. त्याजबद्दल बोलाचाली चालू असता, इब्राहीम लोदीचा चुलता अलाउद्दीन लोदी अफगाणिस्तानात होता, तो एकाएकी हिंदुस्थानात आला, आणि हुमायूनशी लढण्या-करिता मदत मागण्यासाठी त्यानें बहादूरशहाकडे गुजराथेंत आपला मुलगा तातारखान यास पाठविले. त्यास उघडपणे मदत देण्याची बहादूरशहाची छाती नव्हती; तरी त्याने त्यास मुबलक द्रव्याची मदत दिली. त्या पैशानें मोठी नवीन फौज तयार करून तातारखान दिल्लीवर चालून आला तेव्हा हुमायूनने हिंदाल यास त्याजवर रवाना केलें. हिंदालने बियाना येथे त्या फौजेचा पराजय करून तातारखानास ठार मारिलें. ह्या सर्व उद्दामपणाबद्दल बहादूरशहाची खोड मोडण्याकरिता हुमायून स्वतः गुजराथेवर चालून गेला. त्या वेळेस बहादूरशहा चितोडगडास वेढा घालून बसला होता. अशा प्रसगीं त्याजवर एकदम हल्ला करावा तर काफर जे हिंदु त्यास मदत केल्यासारखी होईल, म्हणून काही दिवस हुमायून तशीच वाट पाहत स्वस्थ बसला. असे करण्यात आपण आपलेंच नुकसान करून घेतो, हें त्यास कळले नाहीं. अशा उदार कल्पनाच्या पोकळ नादात हुमायूनचें नुकसान होत गेलें. पुढें बहादूरशहानें चितोडगड घेतल्यावर, मंदसोर येथे त्याजवर हुमायूननें हल्ला केला. ( नोव्हेंबर सन १५३४ ). बहादूरची सारी भिस्त तोफखान्यावर असून त्याचे तोफा चालविणारे अधिकारी पोर्तुगीझ होते. परंतु हुमायूननें मंदसोरला वेढा घालून अन्नसामुग्रीची बंदी केल्यामुळें, बहादूरचा निरुपाय होऊन तो माडवगडास पळून गेला. तेथेही हुमायून त्याच्या पाठीवर आलाच, म्हणून बहादूरशहा पळाला तो खबायतवरून दीव येथें पोर्तु-गीज लोकांच्या आश्रयास गेला तेव्हा हुमायूनने गुजराथ प्रात काबीज करून चांपा-नेर किल्ल्यास वेढा घातला. हा किल्ला फार दिवस हातीं येईना. तेव्हा तटाच्या उभ्या कड्यात लोखंडी गज रोंवून त्यांच्या साह्यानें तीनशें लोक आत शिरले. प्रथम चाळीस लोक आत शिरल्यावर स्वत· हुमायून ४१ वा वर चढून गेला. किल्ल्यांतील शिबंदी दरवाजाच्या बाजूस शत्रूच्या फौजेस तोंड देऊन लढत होती. मागल्या बाजूनें लोक आलेले पाहून किल्लेकरी घाबरले, त्याबरोबर हुमायूनचे हातीं किल्ला आला. ह्या ठिकाणीं बादशहास बरेंच द्रव्य मिळाले. ह्या मोहिमेंत गुजराथ व माळवा हे दोन उत्कृष्ट प्रांत हुमायूनच्या ताब्यांत आले असतां, तेथें पुढील सर्व बंदोबस्त करून त्यानें आपला अंमल कायम केला पाहिजे होता. परंतु गुजराथचें हें काम अर्धेंच राहिल्यानें पुढें

बंगाल व बहार प्रांत हातचे गेले, त्या वेळीं ह्या गुजराथ व माळवा प्रांतांचा त्यास उपयोग न होतां चाल-ढकली स्वभावानें सर्व फसलें. धाकटा भाऊ मीर्झा अस्करी यास ह्या नवीन जिंकलेल्या प्रदेशाच्या बंदोबस्तास ठेवून हुमायून आग्र्यास गेला; आणि कांहीं काळ स्वस्त चैनींत राहिला. इकडे त्याचाच कित्ता अहंमदाबाद येथें अस्करीनें वळवून, उलट भावावर ताण केली. अस्करी चैनींत आला म्हणजे म्हणे, 'मीच सर्व बादशहा आहें.' अशा घमेंडींत दोघांचेंही नुकसान झालें. अहंमदाबादेस बहादूरशहाच्या पक्षाचे पुष्कळ लोक होते. त्यांच्या व पोर्तुगीझांच्या मदतीनें बहादूरनें परत येऊन आपलें राज्य काबीज केलें. तेव्हां अस्करी पळून गेला. पुढें बहादूरशहानें माळवा प्रांत सुद्धां जिंकून घेतला, तेव्हां हुमायूनची इकडील सत्ता नष्ट झाली.

**३. शेरखानचें बंड, बादशहाची पदच्युति,** ( स. १५३७–४० ).– शेरखान पुढें हिंदुस्थानचा बादशहा झाला, यास्तव त्याचा थोडासा पूर्ववृत्तान्त समजणें इष्ट आहे. सूर म्हणून घोर प्रांतांतील लोकांची एक जात आहे, तींत शेरखानाचा जन्म झाला. त्याचा आजा इब्राहीमखान सूर हा पेशावर प्रांतांतील रोह्र शहरीं राहत असे. बुहलोल लोदी दिल्लीस राज्य करीत असतां, इब्राहीमखान सूर नोकरी शोधीत त्याजकडे आला, बादशाही लष्करांत त्यास नोकरी मिळाली नाहीं. पुढें जोनपुरचा सुभेदार जमालखान यानें इब्राहीमखानास नोकरी दिली. इब्राहीमचा मुलगा हसनखान हा जोनपुरच्या राज्यांत पांचशे स्वारांचा असामदार असून, त्यास रोहठसजवळ जहागीर होती. हसनखानास आठ मुलगे असून त्यांपैकीं दोन औरस होते. वडील मुलगा फरीदखान स. १४८६ च्या सुमारास जन्मला, व हुशार असल्यामुळें त्याजकडे बापाचा सर्व कारभार आला. तरी बापानें एका राखेच्या नादीं लागून तिच्या पोटच्या सुलेमान नामक मुलास सर्व अधिकार सोंपविल्यामुळें, फरीदखान जोनपुरचें राज्य सोडून आग्र्यास आला, आणि तेथें त्यानें दौलतखान लोदीच्या पदरीं नोकरी धरिली. आज काल ज्याप्रमाणें इंग्लंडाहून आलेल्या लोकांस नोकरींत मान असतो, आणि त्यास नोकरी सहज मिळते, त्याचप्रमाणें मुसलमानी रियासतींत बाहेरच्या मुसलमानांस नोकरी मिळण्यास विलंब लागत नसे. इतकेंच नव्हे, तर असल्या परस्थ मुसलमानांची बादशाही लष्करांत नेहमींच जरूर असे. फरीदखानास दिल्लींत आश्रय मिळून त्याचा अनौरस भाऊ सुलेमान ह्याची जोनपुरास तजवीज लागली. ही व्यवस्था थोडे दिवस चालल्यावर सुलतान इब्राहीमखान लोदी यास ठार मारून बाबरानें दिल्लीपद काबीज केलें. त्या धालमेलींत महंमदशहा लोहानी नांवाचा एक

सरदार बहार प्रांत बळकावून बसला होता. त्याने फरीदखानास आपल्या पदरीं ठेविलें. एके प्रसगीं शिकारीत फरीदखानानें तरवारीच्या एका वारानें वाघ ठार मारिला, म्हणून त्यास शेरखान असें नाव प्राप्त झालें. त्याच नावानें पुढें तो प्रसिद्धीस आला. परंतु जोनपुरचा सुभेदार महंमदखान सूर त्याच्या वाइटावर होता. त्याने पुन: फरीदचा सर्व अधिकार काढून सुलेमान ह्यास दिला. तेव्हा शेरखानानें आसपासची काही फौज जमवून बाबर बादशहाच्या नावाने प्रांत जिंकण्यास सुरुवात केली. त्याने लवकरच पुष्कळ मुलूख काबीज केला, आणि महमदखानाकडून जोनपुरचा कारभारही घेतला. हळूहळू उद्योग करून त्याने पूर्वेकडील अफगाण सरदारात ऐक्य उत्पन्न केलें, आणि तिकडे बराच प्रांत ताब्यात आल्यावर, महंमदखान सूर ह्यास जोनपुरचा अधिकार परत दिला. पुढें दिल्लींतील नवीन बातबेत पाहण्याकरितां शेरखान दिल्लीस गेला. मोगलानीं बादशाही पद बळकाविलेलें त्यास रुचले नाहीं. काहीं तरी खटपट करून मोगलास हिंदुस्थानातून घालवावें, आणि अफगाण वंशाकडे फिरून बादशाही चालू करावी, असा त्याचा घाट होता सर्व अफगाण सरदार एक विचाराने चालतील, तर ही गोष्ट अशक्य नाही असें त्यास वाटलें एकदा बाबर बादशहाच्या तंबूंत भोजनास आला असतां, त्यास सुरी मिळाली नाहीं, तेव्हा कमरेचा खंजीर काढून त्याने आपले काम भागविलें. हें बाबरानें पाहून म्हटलें, 'लहानशा गोष्टींत ह्या अफगाण सरदाराचा असा अपमान करूं नका दैवयोगेकरून त्यास एकादे दिवशीं महान् पद प्राप्त होईल.' पुढे बादशहाच्या मनात आपणाविषयीं किंतु आला असें ताडून तो त्वरित निघून बंगाल्यात गेला. तिकडे लवकरच बहारचा सुलतान महंमदशहा लोहानी मरण पावला. तेव्हा त्याचा बहुतेक सर्व अधिकार शेरखानास प्राप्त झाला. अफगाण लोक परोत्कर्षासहिष्णु असत. म्हणूनच त्याच्या अनेक घराण्यांचा पाडाव झाला. शेरखानाचा उत्कर्ष बंगाल व जोनपुर येथील सुलतानास सहन न होऊन, त्यानीं शेरखानावर फौज पाठविली. पण शेरखानानेंच उभयताच्या फौजांचा पराजय केला. त्यामुळें त्याचा अधिकार पुष्कळ वाढला. त्यानें चुनारगड किल्ला आपणाकडे घेऊन तेथें उत्तम प्रकारचा बंदोबस्त केला. महमदशहा लोदी हुमायूनवर उठलाच होता. तेव्हा असे अफगाण सरदार प्रबळ झालेले पाहून हुमायुनास चैन पडेना. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं स. १५३१ त कालिंजर किल्ला घेतल्यावर तो एकदम शेरखानावर चालून गेला. शेरखानाची व महंमदशहा लोदी यांची फौज एकत्र जमली होती. ह्या प्रसंगीं शेरखानानें महंमदशहास सोडिलें. अर्थात् हुमायूननें

गोमतीच्या कांठीं एकट्या महंमदशहाचा तेव्हांच पराभव केला. नंतर हुमायूननें चुनारगड स्वाधीन करण्याविषयीं शेरखानाकडे मागणी केली. आरंभीं शेरखान कबूल होईना; परंतु बादशहा स्वतः चुनारगडावर फौज घेऊन येतो असें पाहून, शेरखान त्यास शरण गेला, आणि आपला मुलगा बादशहाच्या फौजेंत नोकरीस ठेवून त्यानें चुनारगड किल्ला स्वतःसाठीं मागून घेतला. पुढें जेव्हां स. १५३४ त हुमायुनास गुजराथेंत जावें लागलें, तेव्हां शेरखान व त्याचा मुलगा यांस पूर्वेकडील बाजू मोकळी सांपडून त्यांनीं बंगाल व बिहार हे प्रांत हस्तगत केले.

बादशहा गुजराथेंतून परत आल्यावर त्यास शेरखानाच्या बंडाची हकीकत समजली. लगेच गुजराथेंत अस्करीचा पाडाव झाल्याची बातमी येऊन हुमायुनास पुनरपि गुजराथेंत स्वारी करण्याचा प्रसंग आला, तरी तूर्त गुजराथेंत न जातां प्रथम शेरखानावर चालून जाण्याचाच हुमायूनानें निश्चय केला. पण ह्या विचारांत त्यानें आग्र्यास एक वर्ष फुकट घालविलें. बाबराची तडफ हुमायूनच्या अंगांत असती तर, दोनही कामें त्यानें लगोलग फत्ते केलीं असतीं. पुढें सन १५३७ च्या जुलै महिन्यांत तो शेरखानावर चालून गेला. शेरखान बंगाल प्रांतांत गुंतला आहे असें पाहून, बादशहानें चुनारगडास वेढा घातला. तो किल्ला घेण्यास त्यास बरेच दिवस लागले. तरी शेरखान दूरच गेला. तो मुद्दामच नजीक आला नाहीं. तो शरण आल्यास जोनपुर सुद्धां पूर्वेकडील सर्व प्रांतांचा कारभार त्यास देऊन आपण स्वस्थपणें परत जावें, असा हुमायूनचा विचार होता. इकडे शेरखानास स्वतःच्या जोरावर स्वतंत्र राज्य करावयाचें होतें; साधल्यास मोगलांस घालवून दिल्लीचें राज्य आपणच घेण्याचा त्याचा विचार होता. बहार प्रांतांतून बंगाल्यांत उतरण्याची राजमहालच्या डोंगरांत एक खिंड आहे, तींतून बादशहाने दूरपर्यंत पुढें यावें, त्याचा व मागील लोकांचा संबंध तुटावा, आणि नजीक आलेल्या पावसाळ्यामुळें परत बाहेर पडण्यास त्यास अवकाश सांपडूं नये, अशी शेरखानाची मसलत होती. ती यथासंकल्प तडीस गेली. रोठस किल्ल्यांत लूट, दारूगोळा, द्रव्य व इतर सामान बंदोबस्तानें ठेवून शेरखानानें राजमहालच्या खिंडींत मुलगा जलालखान ह्यास पाठविलें. स. १५३८ त हुमायून ह्या खिंडींतून बंगाल्यांत उतरला व त्यानें गौंड शहर काबीज केलें. आजूबाजूचा प्रांत शेरखानानें मुद्दामच उजाड पाडिला होता. तथापि अशा अडचणींत सुद्धां हुमायून बंगाल्यांत सहा महिने चैन करीत स्वस्थ बसला. नंतर पावसाळा सुरू झाला. गंगा नदीस पूर येऊन सर्व प्रदेश जलमय झाला. तेव्हां हुमायूनचा तळ गौंड नजीक होता. पावसानें व

आजाराने त्याची फौज भराभर कमी होऊ लागली. त्याचा भाऊ हिंदाल परवानगी-शिवाय त्यास सोडून आग्र्यास निघून गेला, आणि आपणास बादशहा म्हणवूं लागला. पावसाळा संपताच शेरखानानें दुसऱ्या वाटेनें वर येऊन मागच्या लोकाशीं बादशहाचें दळणवळण बंद केलें, आणि चुनारगड किल्ला परत घेतला ह्या हालचाली हुमायुनास वेळेवर कळल्या सुद्धां नाहींत शेरखानासारख्या वस्ताद शत्रूपुढे हुमायूनने इतके बेफिकीर राहवयाचे नव्हतें पुढें हुमायून बंगाल्यातून बहारकडे येत असता त्याजवर छापा घालून मोंगीरनजीक शेरखानाने त्याचा पराभव केला शेरखानाच्या फौजेची व्यवस्था व लढण्याची टापटीप विशेष चातुर्यानें आगाऊ ठरवून ठेविलेली होती कनोजच्या पूर्वेकडील सर्व प्रदेश त्याच्या ताब्यात होता, आणि रोठस येथे त्यानें आपणास ' स्वतंत्र सुलतान ' असे नांवही घेतले होतें. शेरखानाचें धाडस ह्या रोठस-गड काबीज करण्यात दिसून आले. चुनारगड बादशहापासून घेतल्यावर, शेरखानास आपलीं बायकामुले व खजिना ठेवण्यास सुरक्षित अशी जागा पाहिजे होती. नजीकच रोठस नांवाचा एक किल्ला हरिकृष्ण नामक किल्लेदाराच्या ताब्यात होता. त्यास शेर-खानानें विनंति केली, कीं आमचा खजिना व बायकामुलें रोठस किल्ल्यात ठेवून द्यावीं हरिकृष्णाने तें कबूल केलें. शेरखानानें त्या किल्लेदारास फसविण्याची युक्ति केली. बुरख्याच्या पालख्यातून हत्यारबंद शिपाई पाठवून त्याने हरिकृष्णास हांकून लाविले आणि रोठस किल्ला घेतला. ह्या किल्ल्यात मजबूद फौज ठेवून तेथूनच शेरखानानें बादशहाशीं टक्कर देण्याचा उद्योग केला.

इकडे आग्रा येथे कामरान हिंदालचें पारिपत्य करून तिकडेच राहिला हे दोघे भाऊ वडील भावाच्या मदतीस न जाता परभारें त्याची दुर्दशा पाहत स्वस्थ बसले. हुमायूनचा नाश केल्यावर शेरखान आपणावर उलटेल, अशी कल्पनाही त्यास शिवली नाही. हळूहळू ह्या गोष्टी हुमायूनच्या कानावर आल्या, पण तो डगमगला नाहीं. दोन महिने शेरखान व तो एकमेकां समोर छावणी देऊन राहिले. हुमायूनने एकदम हल्ला केला असता, तर कदाचित् शेरखानानचा पराजय झाला असता. पण तशी छाती कोणासच होईना. काहीं दिवस तहाची वाटाघाट चालली पण शेरखान हुमायुनास बादशहा असें कबूल करीना अशा स्थितींत तारीख २७ जून सन १५३९ रोजीं शेरखानानें बादशाही फौजेवर बक्सारनजीक चौनसा येथें अचानक हल्ला केला. त्या वेळीं हुमायूनची लढण्याची तयारी नसल्यामुळें त्याचा इतका नाश झाला, कीं त्याला

पळून जाण्यासही सवड सांपडेना. गंगा नदीवर होड्यांचा पूल तयार करण्याचें काम त्यानें चालविलें होतें, पण तें पुरें झालें नसल्यामुळें, अगदीं जिवावर बेतली तेव्हां नदींतून पोहून पलीकडे जाण्याचा विचार करून, हुमायूननें आपला घोडा नदींत घातला. घोडा तर बुडून मेलाच, आणि स्वतःही बुडावयाचा, पण एका पखालजीनें हवेनें फुगविलेल्या आपल्या पखालीवर त्यास सांवरून पलीकडे नेलें. तेथून तो तडक आग्र्याम आला. या खटाटोपांत त्याचीं दोन वर्षें फुकट जाऊन बापाच्या वेळचें उत्कृष्ट सैन्य शत्रूंच्या तरवारींखालीं आणि नदीच्या पुरांत बुडून मेलें. हुमायूनची राणी शेरखानाच्या हातीं सांपडली, तीस त्यानें सर्व इतमामानिशीं आग्र्यास हुमायूनकडे पोचतें केलें. मात्र शेरखानानें बादशहाचा पाठलाग केला नाहीं. मागें फौज राहिली होती, तिचा संहार करून त्यानें सन १५३९ च्या डिसेंबरांत गौड येथें बादशाही किताब धारण केला. इकडे हुमायून ता. १०-७--१५३९ रोजीं आग्र्यास पोंचल्यावर तेथें तो फारच गोंधळांत पडला. त्याची सर्व फौज जायां झाली. पराभव पावल्यामुळें त्याचा दराराही नाहींसा झाला. त्याचा भाऊ हिंदाल हा त्याजवर उठला; अस्करीचेंही मन शुद्ध नव्हतें; कामरानही काबुलाहून त्याजवर चालून येण्यास निघाला. पण तितक्यांत स्थिरस्थावर करून हुमायूननें कसेंबसें भावांशीं ऐक्य केलें. शेरखान आग्र्याकडे आलाच नाहीं. बंगाल प्रांतांत तो आपला अंमल पूर्णपणें बसवीत होता. सन १५४० च्या एप्रिल महिन्यांत फौजेची जमवाजमव करून हुमायून पुनः शेरखानावर निघाला, तेव्हां शेरखानही बंगल्यातून तयारीनिशीं पुढें आला. कनोजनजीक हरदोई जिल्ह्यांत बिलग्राम जवळ उभय सैन्यांची गांठ पडली. हुमायूननें गंगेवर होड्यांचा पूल बांधून आपली फौज पलीकडे नेली, ( १७ मे, १५४० ). पण ह्या वेळची हुमायूनची फौज शेंडीस फुलें बांधून कशी तरी भाडोत्री लोकांची बनविलेली होती. लोक घाबरून गेलेले असून वेळ पडेल तसें वागणारे होते. अशांनीं निभाव कसा लागणार ! पहिला बाण सुटतो न सुटतो, तोंच सर्व जण वाट फुटेल तिकडे सैरांवैरां पळून गेले, आणि विशेष आयास न करितां शेरखानास जय मिळाला. सारांश, दुर्दैवानें ह्याही प्रसंगीं हुमायूनची पाठ पुरविली. आतां त्यास कोठेंच थारा राहिला नाहीं. त्याचा घोडा जखमी झाला. स्वतःही शत्रूच्या हातांत सांपडावयाचा; पण तितक्यांत एका विश्वासु चाकरानें त्यास जवळ असलेल्या हत्तीवर बसविलें व तो हत्ती नदींतून पोहून पलीकडे गेला. तथापि पलीकडची दरड उंच असल्यामुळें हुमायून नदींतच बुडाला असता,

परंतु कांठावरील दोघा शिपायांनी त्यांस संकटात पडलेला पाहून आपलीं दोन पागोटीं एकापुढें एक गाठवून खालीं सोडिलीं, त्याच्या आधाराने तो वर आला. नतर त्याचे भाऊ हिंदाल व अस्करी हे त्यास येऊन भेटले. तिघे मिळून त्वरेनें आग्न्यास पळत आले, आणि जेवढी चीजवस्त वेळेवर घेता आली तेवढी व काहीं लष्कर बरोबर घेऊन त्यानीं लाहोरकडे पलायन केलें. लाहोरास कामरान आपणास मदत करील अशी त्यास आशा होती सर्व भाऊ एकत्र भेटले, पण त्याचे ऐक्य होईना. कामराननें त्यास पुरें फसविलें. शेरखान ही लगोलग पाठीवर आलाच, तेव्हा कामराननें पंजाब प्रात शेरखानास देऊन त्याच्याशीं सख्य केले, आणि स्वत:चा बचाव करून तो काबुलास निघून गेला. हिंदालही वाट फुटेल तिकडे गेला, अर्थात् हुमायुनास लाहोर येथेही थारा मिळाला नाही

**४. शेरशहा सूरची कारकीर्द**, ( स. १५४०–१५४५ ). वर सागितलेच आहे, की शेरखानानें स. १५३९ च्या डिसेबरात गौड येथे राज्यपद धारण करून शेरशहा आलम या नावाने खुत्बा वाचवून नाणेंही पाडिलें. त्या वेळी त्याचे वयास ५३ वें वर्ष होते. पुढें हुमायुनास हाकून देऊन त्याचा पाठलाग करण्याचे नादीं न लागता शेरशहानें दिल्लीस अफगाण वंशाची पुनरपि स्थापना केली. त्याने रोठस किल्ला मजबूद पायावर नव्याने बाधिला, आणि खवासखान नामक सरदारास तेथे ठेविलें. इतक्यात बंगाल्यातील त्याचा सरदार खिजरखान ह्यानें बंड केल्याचे वर्तमान कळल्या-वरून स्वत. जाऊन त्याने त्याचे पारिपत्य केलें, आणि बंगाल प्राताचे लहान लहान विभाग करून तेथें नवीन व्यवस्था केली. स. १५४२त मध्य हिंदुस्थानात स्वारी करून त्याने ग़्वाल्हेर, रतनभोर वगैरे किल्ले घेतले. परत आल्यावर त्याने प्रजेच्या हिताची अनेक कामे केली. सन १५४३ त त्याने माळवा प्रातावर स्वारी केली. रस्त्यांत त्यास असे कळले, कीं रायसीनचा ठाकूर प्राणमल्ल ह्यानें पुष्कळ मुसलमान स्त्रियास पकडून आपल्या जनानखान्यात ठेविलें आहे. तें ऐकून शेरशहाने प्राणमल्लास आपणाकडे बोलाविलें; पण तो आला नाही. फक्त सहाशें हत्ती त्यानें पाठवून दिले यावरून राग येऊन शेरशहानें रायसीनिला वेढा घातला. त्या प्रसंगी प्राणमल्लाचे लोक फारच शौर्यानें लढले. आपणाकडे असला एक सुद्धा शूर शिपाई नाही असें अफगाणास वाटलें. शेरशहाने निकराचे हल्ले केले. प्राणमल्लानें सहा महिने टिकाव धरिला. शेवटीं इलाज न चालून तो शेरशहास शरण गेला, आणि किल्ला स्वाधीन करण्यास कबूल झाला. तेव्हा लोकाची संपत्ति व हत्यारें आपण हिरावून घेणार नाहीं व बायकामुलास त्रास देणार नाहीं, असें

शेरशहानें त्यास वचन दिलें. त्यावरून प्राणमल्ल शहाच्या भेटीस आला. परंतु शेरशहाबरोबरच्या एका मुसलमान साधूनें त्यास सांगितलें, कीं काफरांस दिलेलें वचन पार पाडण्याची जरूर नाहीं. तेव्हां स्वाधीन झालेल्या त्या निरपराधी लोकांवर शेरशहानें फौज सोडून त्यांची कत्तल करविली. आपली कत्तल होणार असें प्राणमल्लास समजल्याबरोबर, रत्नावली नांवाची त्याची प्रियकर राणी होती, तिचा त्यानें स्वहस्तानें शिरच्छेद करून, इतर मंडळींसही त्यानें आपल्या बायकांचा शिरच्छेद करण्यास सांगितलें. तें करीत असतांच अफगाणांनीं हिंदूंची कत्तल केली. त्या प्रसंगीं स्वतः आपलें शूर पाणी दाखविण्यास रजपुतांनीं कमी केलें नाहीं. प्राणमल्ल स्वतः कापला गेला. त्याची एक मुलगी व तीन मुलगे शेरखानाच्या हातीं सांपडले. त्यानें मुलीस गाणारणीचा धंदा शिकवून, मुलांचें पुरुषत्व हरण केलें. असा प्रकार रायसीन येथें झाला. ( तारीखी-शेरशाही,-एल्यट, पु. ४ ). ही गोष्ट मुसलमान शिपायांसही अत्यंत घोर वाटली. रायसीन भोपाळजवळ पूर्व बाजूस आहे.

थोडा वेळ दम धरून शेरशहा मारवाडच्या मालदेवावर चालून गेला. मालदेवानें त्याच्या बरोबर निकरानें सामना केला. तेव्हां एक बनावट पत्र पाठवून रजपुतांत फितूर करण्याचा शेरशहानें प्रयत्न केला. राजा मालदेव ह्यास तें कपट न उमजून तो युद्ध सोडून गेला. पण त्याचा सरदार कुंभ ह्यानें शेरशहाचा कावा जाणून समरांगण सोडिलें नाहीं. कुंभानें मालदेवाची पुष्कळ समजूत केली, पण त्याची खात्री होईना. अखेरीस एकठयानें लढून रजपुतांचें नांव राखण्याचा कुंभाने निश्चय केला. शेरखानाजवळ ऐंशीं हजार फौज असून, कुंभाजवळ फक्त बारा हजार होती. रजपुतांनीं इतक्या निकरानें हल्ला केला, कीं शहाचा बहुतेक पराजय झाला. इतक्यांत शहास नवीन मदत आल्यामुळें दम सुटला. तेव्हां शेरशहानें पुष्कळांचा संहार केला. तथापि ह्या स्वारींत शेरशहास अतोनात नुकसान लागलें. ‘ मूठभर दाणे मिळविण्याच्या नादांत सर्व राज्य गमावण्याचा समय आला होता, ’ असें त्यानें स्वतःच बोलून दाखविलें. नंतर चितोडगडावर स्वारी करून शेरशहा रतनभोरास गेला. तेथें त्यानें आपला मुलगा आदिलखान ह्यास ठेविलें. तेथून निघून त्यानें कलिंजरच्या किल्ल्यास वेढा घातला. हा किल्ला फार मजबूद होता. रायसीनच्या लोकांस शेरशहानें विश्वासघातानें फसविलें, ही गोष्ट ऐकून कलिंजरचा राजा स्वाधीन होईना. तेव्हां शेरशहा स्वतः किल्ला घेण्यासाठीं झटत असतां किल्ल्यांतील तोफेचा गोळा एकाएकीं शहाच्या दारूखान्यांत येऊन पडला. त्यामुळें सर्व दारूखाना जोरानें उडून त्यांत स्वतः शेरशहा व त्याचे पुष्कळ सरदार ह्यांचा संहार

झाला. सध्याकाळी प्राण जाण्यापूर्वी किल्ला ताब्यात आला असे शेरशहास कळलें, त्यामुळे समाधान पावून त्यानें सायंकाळी देह ठेविला. ( २२-५-१५४५ ). या प्रमाणें केवळ चतुराईनें मिळविलेले राज्य त्यास फार दिवस लाभलें नाहीं.

शेरशहानें पाच वर्षे राज्य केलें. त्याचा बहुतेक काळ लढण्यात गेला. तरी तेवढ्यात प्रजाहिताच्या कामी त्यानें दुर्लक्ष केले नाहीं बंगाल्यात सोनारगावापासून सिंधुनदीपर्यंत दोनहजार मैलाच्या रस्त्यावर त्यानें दरदोन मैलास विहिरी व धर्मशाळा बाधिल्या. अशा विहिरींची सख्या पंधराशें होती त्याचप्रमाणें रस्त्यावर मोठमोठ्या ठिकाणीं मशिदी बाधिल्या. रस्त्याच्या दुतर्फा झाडें लावून लोकाच्या उपयोगासाठीं घोड्याच्या टपाली त्याने ठेविल्या. प्रवासी लोकास रस्त्यावर फुकट जेवण व पाणी मिळावें म्हणून मजले मजलेवर अन्नछत्रें घातलीं सर्व राज्यात वजने व मापें ह्याची एकच पद्धत चालू केली. रुपया हे चादीचें नाणे प्रथम ह्यानेंच सुरू केलें असें म्हणतात त्याचें एक तोळा वजन पुढें अकबरानें ठरविलें उत्तर हिंदुस्थानांत जमीनमहसुलाची व बिनचूक हिशेबाची पहिली व्यवस्थित पद्धत शेरशहाने ठरविली. त्याच्याच जवळ तोडरमल्ल तयार होऊन पुढें अकबराचे वेळेस प्रसिद्धीस आला. तोडरमल्लाचें गुरुपण शेरशहाकडे असून, तो अकबराचे पदरी वाढला नाहीं, हें ध्यानात ठेविलें पाहिजे. ( कानूंगोचा शेरशहा पृ. ४०५) भरज्वानींतच शेरशहा मरण पावला, नाहीं तर आणखी अनेक कामें करून मोठा लौकिक मिळविण्याची त्याची लायकी होती मोगल लोकास आपण कायमचें हिंदुस्थानांतून घालवून दिलें असें त्यास वाटलें. उत्तरहिंदुस्थानांत त्यास कोणीच शत्रु उरला नव्हता. अफगाण घराण्यातील राज्यकर्त्यामध्यें शेरशहाचे नाव विशेष प्रसिद्ध आहे. रायसीनच्या लोकाची त्याने कपटानें व क्रूरपणानें कत्तल केली, हा त्याचे नावास मोठा काळिमा आहे. बंगाल्यांत त्यानें पुष्कळ दिवस अंमल गाजविला; तरीं तेथील बहुतेक प्रजा हिंदु असताही, त्याजविषयीं त्यानें धर्मद्वेष दाखविल्याचें दिसून येत नाहीं. मात्र एखादा हेतु सिद्धीस नेण्याकारतां त्यानें अनेक प्रसंगीं विश्वासघात केला ही गोष्ट निर्विवाद आहे. युद्धकलेमध्ये तो प्रवीण होता. हुमायूनबरोबर त्यानें दोन झगडे केले, त्यांत त्याच्या अंगच्या विशेष चतुराईमुळेंच त्यास यश आलें. वास्तविक म्हटलें तर मोगलांच्या बादशाही सत्तेशीं टक्कर देण्याचें त्याचें सामर्थ्य नव्हतें. हुमायून कांहीं अक्कलमंद नव्हता, परंतु आरामाची आवड व ढिलाई यामुळें तो फसला. केवळ लष्करी चातुर्याच्या जोरावर बादशाही पद मिळविल्याचीं जीं उदाहरणें हिंदुस्थानच्या इतिहासांत आहेत, त्यांत शेरशहाचें नांव प्रमुख आहे. बहार प्रांतांत, रोठसच्या उत्तरेस

ससाराम येथें त्याची वडिलोपार्जित जहागीर असून, लहानपणीं या जहागिरीच्या कारभारांत त्यास जो उत्कृष्ट अनुभव आला, तोच पुढें त्यास चांगला उपयोगी पडला. मरण पावल्यावर त्यास ससाराम येथें पुरिलें. तेथें त्याची भव्य मशीद अजून चांगल्या स्थितींत आहे तिच्या सभोंवतीं एक मैल परिघाचा पाण्याचा खंदक असून, अफगाण पद्धतीच्या बांधणीचें हें काम सुरेख व पाहण्यालायक आहे.

शेरशहाच्या कारकिर्दीचा इतिहास पुढें अकबर बादशहाच्या हुकुमानें अब्बासखान सारवानी ह्यानें लिहिला. त्याचें नांव ' तारिखी शेरशाही ' असें आहे. अब्बासखानाचें शेरखानाशीं नातें होतें. त्यानें इतिहास लिहिला, त्या वेळीं अफगाण व मोगल ह्यांचीं जबरदस्त भांडणें चालू असून मोगलांची सरशी होत चालली होती. अशा प्रसंगीं ' अफगाण लोकांची तरफदारी करून शेरशहाची विनाकारण फाजील स्तुति अब्बासखानानें केली आहे, आणि शेरशहाचा सर्व काळ युद्धांत गेल्यामुळें प्रजेच्या हिताकडे लक्ष देण्यास त्यास फुरसत सांपडली असेल हें संभवत नाहीं,' असें एतद्देशीय इतिहासकारांविषयीं अनिवार बेभरवंसा दाखविणाऱ्या व्हीलरचें म्हणणें आहे. शेरखान अतिशय क्रूर व विश्वासघातकी होता, असें ह्या आंग्ल इतिहासकाराचें मत आहे. वास्तविक रीत्या हीं दोनही मतें पक्षपाताचीं असून दोहींतही कांहीं सत्यांश असावा हें निर्विवाद आहे.

**५. पुढील सूरवंशी सुलतान, सलीमशहा सूर,**(स.१५४५-१५५३).– शेरशहास आदिलखान व जलालखान असे दोन मुलगे होते. वडील मुलगा आदिलखान ह्यानें आपल्या पश्चात् तख्तावर बसावें अशी शेरशहाची इच्छा होती, पण जलालखान ज्यास्त लोकप्रिय होता. त्यासच कलिंजरच्या किल्ल्यावर सरदारमंडळीनें राज्याभिषेक केला, व सलीमशहा सूर असें नांव धारण करून तो राज्य करूं लागला. आग्र्यास गेल्यावर सलीमशहानें आपला भाऊ आदिलखान ह्यास राज्य स्वीकारण्याविषयीं निमंत्रण पाठविलें. तो आल्यावर भावाभावांच्या भेटी आनंदानें झाल्या. पण लोक आपणास अनुकूल नाहींत असें पाहून, आदिलशहानें राज्यावरील आपला हक्क आपण होऊन सोडिला, आणि भरतपुरच्या दक्षिणेस बियाना येथें जहागीर घेऊन तो स्वस्थ राहिला. खवासखान म्हणून शेरशहाचा मुख्य सेनापति व विश्वासु सल्लागार होता. त्याची वरील कृत्यास पूर्ण संमति होती. दोन महिने सर्व सुरळीत चाललें. पण सलीमशहाच्या मनांत भावाविषयीं अंदेशा उत्पन्न होऊन त्यानें कांहीं लोक बियानास पाठविले, आणि आदिलखानास सोन्याच्या बेड्या घालून आग्र्यास आणिलें. खवास-

खानास हें कळताच त्यास सलीमशहाच्या विश्वासघाताचा तिरस्कार उत्पन्न झाला. त्याने फौज घेऊन आदिलखानास मदत केली. उभयता भावाची लढाई होऊन सलीमशहास जय मिळाला आदिलखान पाटणाकडे पळाला, पण पाठलागाच्या भीतीनें तो तेथून कोणीकडे गेला तें कळलें नाहीं खवासखानही रानोमाळ पळत होता पुढें तो संबळचा सुभेदार ताजखान ह्याजकडे राहत असता त्यास ताजखानानें ठार मारिलें, ( सन १५५० ). त्याचे शव दिल्लीस आणून पुरण्यात आलें. खवासखानाविषयीं लोकाच्या मनात विशेष पूज्यबुद्धि होती. त्याच्या कबरस्तानाजवळ जाऊन लोक त्यास भजत, असे फेरिस्ता म्हणतो

सलीमशहानें नऊ वर्षें राज्य केलें बापाबरोबर अनेक स्वाऱ्यात काम केल्यानें त्याच्या अंगीं शौर्यधैर्यादि गुण आले होते. त्याची कारकीर्द एकंदरीत शाततेची गेली. त्यानें बापाप्रमाणेंच लोकोपयोगी अनेक कामें केलीं. बापानें टपालघरें बाधिली होती, त्याच्या दरम्यान एक एक टपालघर ह्याने जास्त वाढविलें, आणि रस्त्यावरून पोलिसचा उत्तम बंदोबस्त ठेविला त्याची मेहेनत व दृढनिश्चय त्यात कधींही अतर पडलें नाही. जखमेस जळवा लाविल्या असता काबूलच्या शहान पजाबावर स्वारी केल्याचे वर्तमान त्यास कळले, तेंव्हा ताडकन उठून सध्याकाळ होण्याच्या अगोदर सर्व फौजेसह तो मोठी मजल मारून गेला. त्या वेळीं बैल चरावयास गेले होते, त्याची वाट न पाहता मनुष्याकडून त्याने तोफखाना ओढवून नेला तो बरेच दिवस काही विकाराने आजारी होता, त्यामुळे लवकरच सन १५५३ त मरण पावला. त्याच वर्षी गुजराथचा सुलतान महंमूदशाहा व अहंमदशाहा व अहंमदनगरचा. सुलतान बुऱ्हाण निजामशहा हेही मरण पावले. म्हणजे एक प्रकारें क्रान्तीची वेळ येऊन ठेपली.

**महंमदशाहा सूर आदिली,** ( सन १५५३--१५५४ ).—भाऊ निजामखान सूर ह्याची मुलगी बिबीबाई इच्याशी सलीमशहाचें लग्न झाले असून, तिच्यापासून त्यास फिरोज नामक मुलगा झाला होता मुबारिझखान नामक बिबीबाईचा एक भाऊ होता, तो अल्पवयस्क फिरोज यास दगा करून आपण राज्य बळकावील, अशी भीति सलीमशहास होती. मुबारिझखानास मारून टाकण्याबद्दल अनेक वेळा सलीमशहानें बिबीबाईची परवानगी विचारिली, पण तिला ती गोष्ट पसंत पडली नाहीं. सलीमशहा मरण पावल्यावर त्यानें भाकित केल्याप्रमाणेंच गोष्ट घडून आली. मुबारिझखानानें आईच्या हातातून मुलास ओढून आणून ठार मारिलें, आणि महंमद-

शहा सूर आदिली ह्या नावानें तो राज्य करूं लागला. लहानपणापासून हलकट मंडळींत वाढला असल्यामुळें तो राज्य करण्यास अगदींच नालायक होता. त्यास लिहितां वाचतां सुद्धां येत नव्हतें. तो सर्व काळ व्यसनांत निमग्न असे. हिमू नांवाचा कोणी एक हुशार हिंदु व्यापारी होता, त्यास सलीमशहाच्या कारकिर्दीत बाजार–दरोग्याची जागा मिळाली होती. अहंमदशहानें त्यास आपला मुख्य प्रधान केलें, तेणेंकरून उद्दाम अफगाण सरदारांस आपली मानहानि झाली असें वाटून, ते शहावर उठले. हिमूनें मात्र आपल्या पुरस्कर्त्याची नोकरी इमानानें बजाविली. महंमदशहा सूरनें जे मूर्खपणाचे विलास भोगिले, त्यांचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यानें आपली संपत्ति नीच कामांत उधळून दिली. राज्यांत जिकडे तिकडे दंगे चालू लागले. इब्राहीमखान सूर म्हणून महंमदशहाचा एक मेहुणा होता, त्यानें दिल्लीचें राज्य बळकाविलें. तेव्हां महंमदशहा चुनारगड येथें पळून गेला आणि तेथें पूर्वेकडील प्रदेशावर राज्य करूं लागला. ह्याप्रमाणें राज्याचे दोन विभाग झाले. अहंमदखान सूर म्हणून महंमदशहाचा दुसरा एक मेहुणा पंजाबचा सुभेदार होता, तो फौज घेऊन दिल्लीवर आला, त्या वेळीं इब्राहीमशहानें आपलें सैन्य जमवून अहंमदखानाशीं टक्कर दिली. त्यांत इब्राहीमखान पराजय पावून पळून गेला, आणि अहंमदखान सूर हा सिकंदरशहा असें नांव धारण करून दिल्लीस राज्य करूं लागला. पण त्याचा उपभोग त्यास फार वेळ घेतां आला नाहीं.

इब्राहीमखान पळून काल्पीस गेला. तेथें हिमू हा महंमदशहाच्या तर्फेनें त्याजबरोबर लढण्यास फौज घेऊन आला. चुनारगड येथें त्यानें ही फौज उत्तम प्रकारें तयार केली होती. हिमूनें इब्राहीमखानाचा पराभव केला, आणि त्याचा पाठलाग करून त्यास बियानाच्या किल्ल्यांत कोंडिलें पण इतक्यांत बंगालचा सुलतान महंमदशहा सूर ह्यानें महंमदशहा आदिलीवर हल्ला केल्यामुळें, त्यानें हिमूस ताबडतोब परत बोलाविलें. इब्राहीमनें हा झगडा बरेच दिवस चालू ठेविला. अखेरीस सन १५६७ त अकबर बादशहानें पकडून त्याचा वध केला. हिमूनें आपल्या धन्यास मदत करून बुंदेल खंडांत बंगालचा सुलतान महमदशहा सूर ह्याच्याशीं लढून त्यास ठार मारिलें. इतक्यांत हुमायूननें हिंदुस्थानांत परत येऊन सिकंदरशहा सूर याजपासून दिल्लीचें तख्त परत मिळविलें. त्याचा पाडाव करण्यासाठीं हिमू मोठी फौज गोळा करून दिल्लीवर चालून आला. अकबरानें बहरामखान ह्यास त्याजवर पाठविलें. तेव्हां हिमूचा पराभव होऊन त्यास देहान्त शिक्षा झाली. हा प्रकार पुढें अकबराच्या कार्कीर्दीत

सागण्यात येईल. हिमू पराक्रमी सरदार होता तो आपल्या धन्यास कधींही विसरला नाही, किंवा त्याच्याशी कधी बेइमानी केली नाहीं. तो मेल्यावर महंमदशहा आदिलीचा पक्ष अगदीच बसला, आणि शेवटीं बंगालच्या महंमदशहा सूरच्या मुलानें त्यास युद्धात गाठून ठार मारिलें.

**सिकंदरशहा सूर,** ( स १५५४–१५५५ ) सिकदरशहास अफगाण सरदाराची चांगली मदत होती. पण त्यास तख्तावर बसविल्याबरोबर ते मानपानासाठीं आपसात भाडूं लागले. फेरिस्ता ह्मणतो, ‘ ह्या वेळीं कलहाग्नि फिरून पेटला आणि त्याच्या ज्वाला बेसुमार भडकल्या. ’ हे कलह ताब्यांत ठेवण्याचे सामर्थ्य सिकंदरशहाच्या अंगीं नव्हतें तो स्वत शूर होता, पण राज्य करण्याची अक्कल नसल्यामुळे तो पेंचात सापडला. इतक्यांत हुमायून परत आला. त्याला अडविण्यास सिकंदरशहानें आपली फौज पाठविली, तिचा पराभव झाला. पुन. तो स्वतः फौज घेऊन गेला, त्या वेळी सरहिंदनजीक बहराम व अकबर ह्यांनी त्याचा पुनरपि पूर्णपणें पाडाव केला. तेव्हा तो डोंगरी प्रदेशात पळून गेला. तेथून पुढें त्यानें कित्येक दिवस मोगलाशीं झगडा चालविला. पण त्याचा काही एक उपयोग न होता त्यास अज्ञातवासात मरण आलें. येथेंच ह्या सूर नामक शेवटच्या अफगाण वशाची समाप्ति झाली ह्या घराण्यातील पुरुषानी पुन कधीं वर डोके काढिलें नाहीं. अफगाणांच्या क्रूर वर्तनाचा लोकास फारच कंटाळा आला होता, आणि नवीन मन्वंतरास लवकरच प्रारंभ होऊन, त्याच्या जाचातून लोकाची सुटका व्हावी, असा नेमानेम होता. त्या हकीकतीस आता लागले पाहिजे

**६, हुमायूनचा वनवास,** ( स. १५४०–१५५३. ).—राज्यपदास मुकल्याबर हुमायून पंधरा वर्षें बाहेर राहून दिवस कंठीत होता. ह्या वनवासाची हकीकत जितकी हृदयद्रावक आहे, तितकाच तिजवरून त्याचा ढिला, अनिश्चित, व थंड स्वभाव व्यक्त होतो. बाबरालाही पुष्कळ वर्षें अशीच कंठावी लागली, पण बाबराच्या अगीं जे प्रखर पाणी त्या वेळेस दिसून आले, तें हुमायुनात नव्हतें. त्याच्या अंगीं जोर व तडफ असती तर त्याचीं इतकीं वर्षें फुकट गेलीं नसती. एक काबूल घेऊन कामरानचा बंदोबस्त करण्यांत त्याचीं सात वर्षे गेलीं. अगोदर चैन व मग उद्योग असा त्याचा सामान्य क्रम दिसून येतो. कारण स. १५३१ त त्यानें लोदीचा पाडाव केला, नंतर स १५३४–३६ चीं तीन वर्षें माळवा गुजराथच्या बंदोबस्तांत गेलीं, आणि सं. १५३७–४० पावतों बंगाल बहारकडे तीन वर्षें खर्च होऊन त्यास राज्यपदास

ह्या वेळीं कंदाहारचा कारभार कामरानच्या वतीनें मीर्झा अस्करी ह्याजकडे होता. अस्करी यास फितवून आपणाकडे घ्यावा, आणि आपण कंदाहारास राहून पुढील उद्योग करावा, असा बेत करून हुमायून तिकडे जावयास निघाला. कांहीं मजल गेल्यावर कंदाहार सुमारें शंभर सवाशें मैल दूर राहिलें असतां, हुमायुनास कळलें, कीं अस्करी हा फौज घेऊन आपणाशींच लढण्यास त्वरेनें येत आहे. हें ऐकतांच त्यानें इराणचा रस्ता धरिला. पळण्यास विलंब लागेल, म्हणून अकबरासही त्यानें रस्त्यांतच ठेविलें. बायकोस मात्र हुमायूननें आपणाबरोबर घेतलें. मीर्झा अस्करी चालून आला तों हुमायून निघून गेला होता. अकबर त्यास सांपडला. अस्करीनें त्यास सुरक्षितपणें कंदाहारास नेऊन, तेथून कामरान याजकडे काबुलास पाठविलें. अकबरास जेव्हां अस्करी घेऊन चालला, तेव्हां हुमायूनच्या एका राजभक्त नोकरानें पहारेकऱ्यांस पैसे देऊन मुलास सोडवून हुमायूनकडे नेण्याचा विचार केला. परंतु पहारेकऱ्यांनींच विचारा-अंतीं असें ठरविलें, कीं येणेंकरून कदाचित् मुलाच्या जिवास अपाय होईल; हुमायूनचा कांहीं तरी अंतस्थ हेतु असल्याशिवाय तो आपल्या मुलास अशा स्थितींत टाकून जाणारा नव्हे. पुढें त्या नोकरानें इराणांत जाऊन मुलाच्या सुखरूपतेची वार्ता हुमा-युनास कळविली.

इराणांत ह्या वेळीं शियापंथी सूफी शहा तह्मास्प् राज्य करीत होता. तह्मास्प्चा बाप इस्मईल ह्यानें इराणांत शिया पंथाची स्थापना केली. तुर्क लोकांनीं सन १४५३ त रोमन बादशाहीचा पाडाव करून युरोपांत मुसलमानी राज्य स्थापिलें, हें सांगितलेंच आहे. सन १५१६ त कांस्टांटिनोपलचा बादशहा पहिला सलीम ह्यानें इजिप्ट देश जिंकिला, आणि तेथील आब्बसी वंशाचा खलीफा मूतवक्किल याजपासून खिलाफत आपणाकडे घेतली. तेव्हांपासून तुर्कस्थानचा बादशहा हाच मुसलमानांचा खलीफा मानिला जात असे. परंतु तो महंमदाच्या वंशापासून जन्मला नसल्यामुळें, शियापंथी कट्टे मुसलमान त्यास खलीफा न मानतां इराणच्या शहास आपला मुख्य समजत. इस्मईल शहा ज्याप्रमाणें शिया पंथाचा कट्टा अभिमानी होता, तसाच त्याचा मुलगा तह्मास्प्ही होता. आरंभीं त्यानें हुमायूनचा आदरसत्कार फार उत्तम केला, आणि बादशहाच्या इतमा-मास शोभेल अशी त्याची बरदास्त ठेविली. तथापि प्रत्यक्ष भेट होण्यास कित्येक महिने लागले; आणि हुमायूननें मदतीची गोष्ट काढिली, तेव्हां उभयतांचें पटेनासें झालें. बहूरामखान नामक एक विश्वासु व चतुर सरदार वनवासांत नेहमीं हुमायूनच्या बरोबर असे. त्यास हुमायूननें बोलाचाली करण्याकरितां तह्मास्प्कडे पाठविलें. बहूरामखानास

असें कळून आले, कीं आपण सर्वस्वीं पराधीन आहों. इराणचा सुलतान आपल्या यजमानास मुळीच मोजीत नाहीं. ‘ हिंदुस्थानात शिया पंथ सुरू कराल तर तुम्हास मदत देतों ’ असे तह्मास्प्नें सागितलें ती गोष्ट हुमायूनच्यानें कबूल करवेना. शेवटी निकरावर येऊन तह्मास्प्नें हुमायूनकडे एक लाकडाची मोळी पाठवून कळविले, कीं, ‘ जर तुम्ही शिया धर्म न स्वीकाराल, तर हीच लाकडें तुमच्या सरणास उपयोगी पडतील ’ निरुपायास्तव हुमायूनने तह्मास्प्चे म्हणणें कबूल केले, आणि कदाहार प्रात जिकून तो त्यास देण्याचे वचन दिलें. (तेव्हा इराणच्या सुलतानानें आपला अर्भक मुलगा मीर्झा मुराद याच्या हाताखाली सरदार व चौदा हजार स्वार हुमायूनच्या मदतीस दिले, आणि मोठ्या सन्मानानें त्यास परत जाण्यास रजा दिली. सन १५४५ च्या मार्च महिन्यात हुमायून कदाहारसमोर आला. मीर्झा अस्करीनें सहा महिनेपर्यंत त्यास दाद दिली नाही. पुढें धान्यसामुग्री सपून तेथील किल्ला हुमायूनच्या ताब्यात आला आणि इराणचा शहाजादा तेथे जाऊन राहिला त्यांनी मीर्झा अस्करी यास बदोबस्तानें अटकेत ठेविलें येथपर्यंत हुमायूननें आपले वचन पार पाडिलें. पण पुढें विशेष मदतीची त्यास आशा दिसेना तेव्हा कामरानशी बोलाचाली करण्याकरिता तो काबुलास निघाला फारसा लाब गेला नाहीं, तोच इराणचा शहाजादा मुराद कदाहारास मरण पावल्याची त्यास बातमी समजली, तेव्हा औषधाशिवाय खोकला गेला असे समजून हुमायून लगेच परत आला, आणि इराणी लोकास घालवून देऊन त्याने कंदाहारचा चागला बंदोबस्त केला. मध्यंतरीं कामरानची समजूत करण्याकरिता बह्रामखानास हुमायूनने काबुलास पाठविलें, पण कामराननें त्यास दाद दिली नाही.

पुढें कदाहार येथें असता हुमायुनास अशी बातमी समजली, की काबूल येथे कामरान ह्यास पुष्कळ शत्रु उत्पन्न झाले आहेत. तेव्हा फौजेचा चागला बंदोबस्त करून तो काबुलास निघाला. त्याचा भाऊ हिंदाल गज्नीच्या सुभ्याचें काम पाहत होता, तो व दुसरे पुष्कळ सरदार रस्त्यात त्यास येऊन मिळाले. हुमायून येताच कामरान सिध प्राताकडे पळाला, आणि हिंदालनें त्याचा पाठलाग चालविला. सन १५४५ च्या ऑक्टोबर महिन्यात काबूल हुमायूनचे हातीं आलें तेथे मुलगा अकबर त्यास सुरक्षित येऊन भेटला काहीं दिवसानीं हुमायूनने बदक्शान प्रातावर स्वारी केली. इकडे कामरान सिध प्रातात थारा न मिळाल्यामुळे काबुलास परत आला. तेथें हुमायून नाहींसा पाहून, लगेच तें शहर त्याने काबीज केले. शहाजादा अकबरही

त्याच्या हातांत सांपडला. हिंदाल व हुमायून लगेच परत आले, आणि त्यांनीं किल्ल्यास वेढा दिला. कामरान ह्या प्रसंगीं अकबराच्या जिवास अपाय करणार होता, पण दैवानें त्यास वांचविलें. पुढें काबूल हुमायूनच्या हातीं आलें. कामरान पळून गेला आणि त्यानें बदक्शान प्रांत काबीज केला. सन १५४८ त कामरान ह्यास कैद करून हुमायूननें बदक्शान प्रांत परत घेतला. तरी त्यानें कामरान ह्यास फारच ममतेनें वागविलें. चारही भाऊ पुनः एकत्र होऊन गोडीगुलाबीनें कांहीं दिवस राहिले. परंतु लवकरच कामरान व मीर्झा अस्करी ह्यांनीं बंड करून काबूल हस्तगत केलें. हुमायून गैरसावध नव्हता. त्यानें काबूल परत घेतलें आणि कामरान पुनः पंजाबाकडे पळून गेला. हुमायूननें त्यास पुष्कळ ममतेचीं पत्रें लिहून जवळ राहण्यास बोलाविलें. पण कामरानास तें रुचलें नाहीं, तेव्हां हुमायूननें हिंदालास त्याजवर पाठविलें. पाठलाग करीत असतां एके दिवशीं कामरानच्या अफगाण लोकांनीं हिंदाल यास ठार मारिलें, (नोव्हेंबर १५५१). अलीकडे हिंदाल ह्यानें हुमायुनास उत्तम प्रकारें साह्य केल्यामुळें त्याजवर हुमायूनची विशेष प्रीति जडली होती, म्हणून त्याच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून हुमायुनास अत्यंत दुःख झालें. हिंदाल यास रझिया सुलताना नामक एक मुलगी होती. तिचें अकबराशीं लग्न लावून हुमायूननें बापाची सर्व संपत्ति तीस दिली. कामरानास हिंदुस्थानांत सलीमशहा सूर कडून आश्रय न मिळाल्यामुळें गक्कर वगैरे रानटी लोकांमध्यें तो भटकत होता. शेवटीं सन १५५२ त गक्कर लोकांच्या मुख्य सरदारानें त्यास हुमायूनच्या स्वाधीन केलें. तेवीस वर्षें हुमायूनशीं त्यानें एकसारखी बेइमानगिरी केली, याजबद्दल त्यास जिवें मारावें अशी मोंगल अधिकाऱ्यांची सल्ला पडली. पण हुमायुनास तें बरें न वाटून त्यानें त्याचे डोळे काढविले, ( १५५२ ). पुढे एके प्रसंगीं कामरानच्या भेटीस गेला असतां त्याची ती दुःखद स्थिति पाहून हुमायुनास अत्यंत कळवळा आला, आणि तो पुष्कळ रडला. कामरान ह्यासही कृतकर्माचा पश्चात्ताप झाला, आणि ज्यांचें ज्यांचें नुकसान केलें होतें त्या सर्वांची त्यानें क्षमा मागितली. अनेक वेळां विश्वासघात केल्यामुळें अशी शिक्षा करण्याशिवाय हुमायुनास दुसरा मार्ग नव्हता. कांहीं दिवसांनीं हुमायूनच्या परवानगीनें तो मक्केस जाण्यास निघाला, पण रस्त्यांतच सिंध प्रांतांत मरण पावला, ( १५५६ ). कामरान शूर व धीट होता, पण स्वभावानें कपटी व क्रूर असल्यामुळें, त्याजवर त्याच्या बायकोशिवाय कधीं कोणीं विश्वास ठेविला नाहीं. बायकोस तिचा बाप आपल्या घरीं बोलावीत असतां न जाऊन ती नवऱ्याबरोबर मक्केस गेली. मीर्झा अस्करी ह्यासही हुमायूननें हद्दपार केलें. तो मक्केस जाऊन तेथें सन

१५५८ त मरण पावला. येणेप्रमाणें ह्या भावाचीं बंडें, लढाया, बखेडे व एकमेकांनी एकमेकास पकडणे, ह्या गोष्टींची वारंवार आवृत्ति झालेली वाचून विस्मय वाटतो.

**७. मृत्यु व योग्यता,** ( स. १५५५–१५५६ ).—सर्व भावाचा निकाल लागल्यावर हुमायुनास स्वास्थ्य प्राप्त झाले. काबूलकडील राज्य ताब्यात आल्याने हिंदुस्थानाकडे लक्ष देण्यास त्यास फुरसत सापडली. शिवाय ही संधि चांगली होती सूर घराण्यातील पुरुषात तंटे लागून दिल्लीस धामधूम चालू होती प्रजेलाही अफगाण लोकाचा तिटकारा आला होता. आग्रा व दिल्ली येथे हुमायूनचे पुष्कळ स्नेही होते, त्यांचीं त्यास हिंदुस्थानात येण्याविषयी पत्रें गेली पण एवढे जोखीम अंगावर घेण्याची त्यास प्रथम छाती होईना. हुमायून स्वभावानें वाडशी नव्हता. बापाच्या शेवटच्या आज्ञेप्रीत्यर्थ त्याने आपल्या भावारा अमर्याद ममता दाखवून सर्वतोपरी स्वत ची खराबी करून घेतली. हिंदुस्थानात जावें कीं न जावें ह्या पंचाइतीत तो पडला. शेवटी शकून पाहता अनुकूल उत्तर आले तेव्हा त्यानें जाण्याचाच निश्चय केला सन १५५४ च्या डिसेंबर महिन्यात निर्धावलेले १५००० घोडेस्वार बरोबर घेऊन तो काबुलाहून निघाला त्याचा मुलगा अकबर व वजीर बाहरामखान हे गज्नी व कंदाहार येथील फौज घेऊन पेशावर येथे त्यास येऊन मिळाले. कामरानबरोबरचे युद्ध संपल्यावर गज्नीचा कारभार अकबराकडे आला होता ह्याच ठिकाणी स्वतत्रपणे राहून अल्पवयात त्याच्या अंगीं चातुर्य येत चालले पंजाबात तातारखान हा सूर सुलतानाचा कारभारी होता. त्याने हुमायुनास आडकाठी केली नाहीं. लाहोर व रोह्ठक किंवा हीं ठिकाणें त्यास अनायासे प्राप्त झाली सिकंदरशहानें तातारखानाच्या हाताखालीं हुमायूनवर आपली फौज रवाना केली. तिजवर हुमायूननें अकबरास बहरामखानाच्या स्वाधीन करून पाठविलें. बहरामखानानें सरहिंद हस्तगत करून तातारखानाच्या फौजेचा पराजय करून, दिल्लीच्या आसपासचा प्रदेश लहानलहान टोळ्या पाठवून घेतला. तेव्हा सिकंदरशहा स्वतः ८० हजार फौज व मोठा तोफखाना घेऊन युद्ध करण्याकरिता बाहेर पडला. बहरामखानाच्या बोलावण्याने हुमायूनही त्वरा करून आला. तारीख १८ जून सन १५५५ रोजीं उभय सैन्याची गाठ सरहिंद येथे पडली. बहरामखान व त्याचे धनी बापलेंक हे तिघेही भरगर्दींत लढले ह्या प्रसंगी अकबरानें विलक्षण शौर्यप्रभाव दाखविला. सिकंदरशहाचा पराभव होऊन कापाकापी सुरू झाली, तेव्हा जीव रक्षण करण्याकरिता तो पंजाबच्या डोंगरी प्रदेशात पळून गेला. सरहिंदच्या ह्या लढाईनें अफगाणवंशी सुलतानाची आशा समूळ खुटली. मोगलाकडे हिंदुस्थानचें

स्वामित्व जाऊन, हिंदुस्थानच्या राज्यकारभारास नवीन व निराळें वळण लागलें. पुढें दिल्ली व आग्रा हुमायूनचे काबीज होण्यास विलंब लागला नाहीं.

येणें प्रमाणें पंधरा वर्षें यातना व वनवास भोगलेला हुमायून जुलई महिन्यांत बादशाहीपदावर कायम झाला. पुढील पांच सहा महिने तो बारीकसारीक बंडें मोडण्यांत गुंतला होता. एवढ्या कष्टानें प्राप्त झालेल्या बादशाहीचा उपभोग घेण्यास तो दुर्दैवानें फार दिवस वांचला नाहीं. दिल्लीच्या राजवाड्यांत पुस्तकालयाच्या गच्चीवर लोकांस दर्शन देण्यासाठीं बसला असतां, सायंकाळच्या निमाजाची वेळ झाली असें समजून तो खालीं येऊं लागला. जिन्यावरच त्यानें मशीदींतील प्रार्थनेच्या पुकारणीचा शब्द ऐकिला. तेव्हां लागलाच पायरीवर गुडघे टेंकून तो निमाज पढूं लागला. तें कृत्य आटोपल्यावर तो काठी टेंकीत वर उठून खालीं येणार, तों अंगरख्यांत पाय गुंतून आरसपानी गुळगुळीत पायरीवरून काठी सरली, त्यामुळें तो धाडदिशीं खालीं चौकांत पडला; आणि जखमी होऊन पुढें चार दिवसांनीं मरण पावला. ( २५-१-१५५६ ). ह्या वेळीं त्याचें वय ५१ वर्षांचें होतें. तार्दीबेग म्हणून त्याचा विश्वासु सरदार होता, त्यानें लगेच दिल्लीचा बंदोबस्त करून हुमायूनच्या मृत्यूची बातमी कांहीं वेळ बाहेर फोडिली नाहीं. पुढें सर्वत्र बंदोबस्त झाला. अकबराशिवाय हकीम म्हणून त्यास दुसऱ्या बायकोपासून आणखी एक मुलगा होता दिल्ली येथें हुमायूनच्या थडग्यावर अकबरानें पुढें आरसपानाची सुंदर कबर बांधिली. ह्याच इमारतींत सन १८५७ सालच्या दंग्यांत दिल्लीचा बादशहा आपल्या पुत्रांसह लपून राहिला होता. इंग्रजांनीं दिल्ली घेतल्यावर हुमायूनच्या कबरेंत त्या दोघां शहाजाद्यांस ठार मारून वृद्ध बादशहास पकडून नेलें.

**हुमायूनची योग्यता.**—पडण्याचा संभव असला कीं हुमायून पडायचाच; त्याचा जन्म पडण्यांत गेला आणि पडण्यानेंच त्यास मृत्यु आला, ( असें लेन्पूल म्हणतो तें खरें आहे.[1] हमीदाशी केलेल्या लग्नावरून त्याचा अप्रयोजक, गुलजार व बेफिकीर स्वभाव व्यक्त होतो. हमीदाचा बाप मीरबाबा दोस्त हाच अली अकबर जामी ह्या नांवानें प्रसिद्ध असावा. हा इराणांतील एका थोर साधूच्या कुळांतला होता. ह्या साधूचें नांव अहंमद जाम. ह्या कुळांतलीच हुमायूनची आई महाम बेगमही होती.

---

१ Humayun tumbled through life and he tumbled out of it.

साधु अहंमद जाम ह्यानें इराणात तीन लाख लोकास मुसलमानी धर्मात आणिले होतें. हुमायून इराणात गेला असता, त्याने ह्या आपल्या पूर्वजाच्या कबरेचे दर्शन घेतले

हुमायून सिंध प्रातात स. १५४१ त बक्करचा किल्ला कावीज करीत होता, तेव्हा हिंदालविषयीं त्यास सशय येऊन तो पाट नावाच्या गावीं हिंदालच्या भेटीस गेला, त्या वेळीं हिंदाल मुक्कामावर नव्हता. हिंदालची आई दीलदार बेगम व बहीण गुलबदन ह्यानीं हुमायूनचें स्वागत करून त्यास मेजवानी दिली त्या प्रसगीं हमीदाबानू व तिचा लहान भाऊ हीं तेथेंच दीलदार बेगमपाशीं होती त्याचा बाप अली अक्बर ऊर्फ मीरबाबा दोस्त हा हिंदालचा गुरु होता. हुमायूनची व हमीदाची दृष्टादृष्ट होताच ‘ ही कोण ’, म्हणून त्याने विचारिलें ही अली अकबरची मुलगी असे समजताच, तो म्हणाला, ‘ मग तर ती आमच्यातलीच आहे. ’ तिच्यावर हुमायूनचे मन बसले, आणि त्याने आपल्या सावत्र आईस सागितले, ‘ इचें माझे लग्न जुळवून द्या ’ हिंदाल परत आल्यावर त्यास ही गोष्ट समजून राग आला तो म्हणाला, ‘ हमीदा मला बहिणीसारखी असून, तुमच्यासारख्या बादशहाला ती शोभत नाही आपण येथे मला भेटण्यास आला आहा, लग्नासाठी नाहीं ’ हें उत्तर ऐकून हुमायुनास फारच वाईट वाटून तो रूसून निघून गेला तेव्हा दीलदार बेगमने त्याची समजूत करून लग्न जुळवून देण्याचें कवूल केले. दुसऱ्या दिवशी दिलदार बेगमच्या मुक्कामावर त्याचें लग्न लागलें, ( सेप्टेंबर १५४१ ), तेव्हा तिचें वय १४।१५ वर्षांचे होतें हमीदाचे आयुष्य एकंदरींत फारसे सुखांत गेले नाहीं तिची पहिली पंधरा वर्षे हुमायूनबरोबर वनवासातच गेलीं. अकबर चौदा महिन्याचा असता त्यास रस्त्यात सोडून तिला नवऱ्याबरोबर इराणात जावे लागले. नवरा मरण पावल्यावर, अकबराने तिचा परामर्ष उत्तम घेतला. त्यानें तिचे वचन कधी मोडिलें नाहीं हमीदाला पुष्कळ मुले झाली, आणि नातू पणतू पाहून स. १६०४ त सत्त्याहत्तर वर्षांचे वय होऊन ती मरण पावली. तिचे दफन हुमायूनच्या कबरेत त्याच्याच शेजारीं करण्यात आलें हाजीबेगम म्हणून हुमायूनची दुसरी बायको होती.

हुमायूनच्या अंगी पुष्कळ दोष होते, तरी एकंदरींत तो थोर मनाचा व उदार होता. समरभूमीवर उभा राहिला म्हणजे तो शूर कमी होता असे नाही, पण निश्चय व हिकमत हे गुण त्याच्या अगीं नसल्यामुळे, त्याजवर नानातऱ्हेचीं सकटें आलीं. अशा सकटातून तो चागल्या रीतीने पार पडला हेंच विशेष आहे. ‘ ऐश्वर्यापेक्षा विपत्तीचे ओझे त्यास ज्यास्त चागलें सहन करिता येत असे, ’ असे एका

मार्मिक लेखकानें लिहिलें आहे तें योग्य आहे. तो उतावळा होता, पण उतावळीनें बोललेलें वचन तो खरें करी. गंगा नदीवरून ज्या भिस्त्यानें आपल्या पखालीवर त्याचा जीव वांचविला, त्यास अर्धा दिवस बादशाही तख्त देण्याचें हुमायूननें वचन दिलें होतें, तें त्यानें बरोबर पाळिलें. भावांस ममतेनें वागविण्याचें बापास दिलेलें वचन तो कधीं विसरला नाहीं. कामरानच्या मुलाचा हुमायूननें चांगला परामर्ष घेतला. पुढें अकबरानें मात्र कामरानचा मुलगा अबुल कासीम ह्यास ठार मारिलें. युद्धकलेंत अत्यंत निपुण जो शेरशहा सूर त्याच्याशींच हुमायूनची प्रत्यक्ष गांठ पडली, म्हणून त्यास अपयश आलें. दुसऱ्या एखाद्या शत्रूस त्यानें सहसा दाद दिली नसती. हिंदुस्थानांतील मुसलमानांची अफगाणांविषयीं पूज्यबुद्धि व मोगलांविषयीं तिरस्कार ह्यांमुळेंही शेरशहास पुष्कळ मदत झाली. शेरशहासारखा शत्रु उत्पन्न झाला नसता, तर हुमायूनला हिंदुस्थानचें राज्य मिळून तें त्यानें चांगल्या रीतीनें हांकिलें असतें, असें मानण्यास हरकत नाहीं. चितोडच्या राणीस मदत करण्याकरितां तो बहादुरशहावर चालून गेला, त्या वेळीं सर्व रजपुतांस आपले दोस्त बनविण्याची उत्कृष्ट संधि त्यानें वायां घालविली. पुढील संकटांत त्यास रजपुतांचा पाठिंबा असता तर त्याचें राज्य गेलें नसतें. तथापि भरज्वानींत त्यास जीं संकटें प्राप्त झाली, त्यांचा विचार केला असतां, कोणालाही कळवळा आल्याशिवाय राहणार नाहीं. त्याचा विश्वासू नोकर जौहर पिण्याचें पाणी सांभाळण्याच्या कामावर होता, त्यानें त्याचें चरित्र लिहिलें आहे, त्यांत त्या बादशहाच्या गुणावगुणांचें चांगलें वर्णन आहे. हुमायून वर्तनानें साधा, अंतःकरणाचा कनवाळू, आपल्या कुटुंबावर व परिवारावर अत्यंत ममता करणारा असा होता. खर्च करण्यांत व बक्षीस देण्यांत त्याचा हात सढळ होता. क्रूर कृत्यानें त्याच्या कीर्तीस डाग लागलेला नाहीं. त्यानें आपल्या भावाचे डोळे काढविले, ह्यापलीकडे दुसरें कोणतेंही क्रूर कर्म त्यानें केलें नाहीं. अकबरावर त्याची अमर्याद प्रीति होती. दहा वर्षांचा असतांच त्यास त्यानें कामांत घातलें. हुमायूनचा चरित्रकार अर्स्किन म्हणतो, 'त्याची बुद्धि तीव्र असून अनिश्चय, धरसोड व विचारशून्यता हे दोष, व औदार्य, ममताळुपणा, व सौजन्य हे गुण स्वभावतःच त्याच्या अंगीं होते. परंतु हळू हळू औदार्याच्या ठिकाणीं उधळेपणा, व सौजन्याच्या ठिकाणीं दुर्बलता त्याच्या स्वभावांत येत गेल्यामुळें, अखेरपर्यंत त्याजवळ खुषमस्करे व तोंडपुजे लोकांचा जमाव जमला. त्यास विद्येची अभिरुचि असून विद्वानांस तो चांगला आश्रय देई. त्याच्या आश्रयास कित्येक ज्योतिषी व इतिहासकार होते. वनवासांत सुद्धां त्याज-

बरोबर पुस्तकाचे भारे असत. तो व त्याचा भाऊ हिंदाल हे स्वत कविता करीत. गणित व ज्योतिष ह्या शास्त्राचा हुमायूनने बराच अभ्यास केला होता. एक वेधशाळा स्थापण्याचा त्याचा विचार होता मुसलमानी धर्मावर त्याची श्रद्धा दृढ असून मंत्र-तत्रावर व शकुनावर त्याचा भरंवसा असे. कोणत्याही गुणाचा अतिरेक म्हणजे दोषच होय, या नियमानुसार त्याचा प्रत्येक गुण अतिरेकाच्या योगानें दोष बनला, व त्याची नानातऱ्हेनें खराबी झाली ' यावरून हुमायूननें आपल्या सर्व आपत्ती स्वत ओढून आपल्यावर आणिल्या आणि त्याचा शत्रु कोण असेल तर तो स्वत च होय, असे ह्मणावे लागतें. बाबरानेंही आपल्या मुलाविषयी हाच अभिप्राय लिहून ठेविला होता, की ' लोकास हुमायून फार आवडेल, परंतु तो कर्तव्यशून्य होईल ' राज्यपद चालवावयाचे नसते तर हुमायूनसारखा चागला मनुष्य सहसा सापडला नसता मात्र त्यास अफूचे सेवन प्रिय होते, त्यामुळें कदाचित् त्याचे माद्य उत्पन्न झाले असेल. बाबर व अकबर यासही अफूचे व्यसन होते हुमायूनने आपल्या बापाचें आत्मचरित्र स्वहस्तानें लिहून व जागजागी ज्यास्त माहिती देऊन तयार केले. त्याच्या औदार्याच्या अनेक आख्यायिका आहेत, पण विस्तारभयास्तव त्या येथे देता येत नाहींत बाबराचे वीर्यशालित्व, व अकबराचें राजनीतिनैपुण्य, या दोहोंच्या उच्चत्वाचे दरम्यान हुमायूनची कर्तबगारी चमकत नाहीं, ही गोष्ट निराळी, पण तो बाबरास शोभेल असा पुत्र व अकबरास शोभण्यासारखा बाप होता ह्यात संशय नाहीं

वरील हकीकतीत बाबराच्या बायकामुलाचीं नावें आली आहेत ती खालील कोष्टकात चागली समजून येतील —

बाबर=
- १ स्त्री, महाम बेगम—हुमायून ज. १५०८
- २ स्त्री, गुलरूख बेगम—कामरान (ज १५१२), अस्करी (ज.१५१६).
- ३ स्त्री, दीलदार बेगम—गुलरंग (ज १५१४), गुलचिहरा (ज १५१७), हिंदाल (ज १५१९), गुलबदन (ज १५२३), अल्वार (ज १५२५ ).

# प्रकरण बाविसावें.

## जलालुद्दीन महंमद अकबर.

### सन १५५६-१६०५.



**१. पूर्वचरित्र व राज्यारोहण.**—बाप वनवासांत असतां उमरकोट येथें अकबराचा जन्म झाला हें मागें सांगितलेंच आहे. चौदा महिन्यांचा असतां, आई-बापांपासून त्याची ताटातूट होऊन तो चुलत्याच्या हातांत सांपडला. पुढें तीन वर्षांनीं काबूल येथें त्यास बाप भेटला, आणि आणखी सहा महिन्यांनीं आईची भेट झाली. त्या भेटीच्या वेळीं हुमायूननें मुद्दाम आईबरोबर दुसऱ्या पुष्कळ बाया आंत आणिल्या; पण अकबरानें न चुकतां आईस ओळखून तिला एकदम मिठी मारिली. पुढें पुनः तो चुलत्याच्या हातीं पडला. हुमायून व कामरान ह्यांचें काबुलास युद्ध चालू असतां, अकबरास तोफेचा गोळा लागावा अशा उद्देशानें कामरान ह्यानें मुद्दाम त्यास तटावर नेऊन ठेविलें. त्या ठिकाणीं केवळ परमेश्वरानेंच त्याचा बचाव केला. पुष्कळ वेळां त्यास कडक कैदही भोगावी लागली होती. जिवावरचे प्रसंग किती गेले याची तर गणतीच नाहीं. परंतु सर्वांतून तो सुरक्षित पार पडला. अशा संकटांमुळें लहानपणीं त्याचा विद्याभ्यास कसा तो मुळींच झाला नाहीं. स. १५४७ च्या नोव्हेंबरांत बापानें त्यासाठीं एक शिक्षक ठेविला. सुरुवातीच्या दिवशीं तो कोठें लपून बसला, तो कांहीं केल्या सांपडेना. पुढें शिकूं लागला, तेव्हां शिक्षक व तो दोघेही

कबुतरें उडविण्यात सर्व वेळ घालवीत. चुलता कामरान जरी त्याचा छळ करी, तरी त्याची दाई, चुलती व सावत्र आई ह्या त्यास अगदीं जीव की प्राण करीत असत. बाबरची बहीण खानोजेदा बेगम म्हणून होती, तिच्या ताब्यात लहानपणीं अकबर होता. ती त्यास अगदीं प्राणापलीकडे वागवी दहा वर्षांचा असता चर्ख व गज्नी हे दोन परगणे हुमायूनने अकबराच्या खर्चासाठीं लावून दिले, आणि हिंदाल मरण पावल्यावर त्याची सर्व जहागीर अकबरास मिळाली त्याच वेळेस हिंदालची मुलगी रुकैय्या म्हणून होती, तिच्याशीं अकबराचा निका ठरला ही अकबराची अगदीं पहिली बायको असून, ती त्याच्या मागून एकवीस वर्षांनी, चौऱ्याशीं वर्षांची होऊन मरण पावली. ती अकबराहून एक वर्ष लहान होती साराश, अकबराच्या शिक्षणाची लहानपणी अगदीच हेळसाड झाली एकदरीत आईबापापासून त्यास विशेष मदत झालेली दिसत नाहीं बाप प्रेमळ व उदार होता, पण अडचणीत असल्यामुळे, मुलाची काळजी त्यानें विशेष घेतली नाहीं धामधुमीच्या प्रसगात हजर राहून प्रत्यक्ष अनुभवाने जे शिक्षण मिळावयाचे तें मात्र अकबरास भरपूर मिळाले त्याची बुद्धि तीव्र असल्यामुळें, अशा शिक्षणाचा बोध त्याच्या मनावर चागला ठसला बहूरामखान हा हुमायूनचा सरदार एकनिष्ठ व शूर होता. कितीही सकटें आली, तरी हुमायुनास त्याने सोडिलें नाहीं. हुमायूनने आपला मुलगा बहूरामखानाच्या हवाली केला होता, तेव्हा अर्थात्च बहूरामखान अकबरचा गुरु व पालनकर्ता झाला. हरएक कामात हुमायून अकबराचा सल्ला घेत असे

बापाच्या मरणसमयीं अकबर जवळ नसून बहूरामखानाबरोबर पंजाबच्या मोहिमेवर होता बापाच्या मृत्यूची वार्ता कळताच बहूरामखानाने त्यास लागलेच बादशहा म्हणून जाहीर केले त्या वेळीं त्याचे वय तेरा वर्षे तोन महिन्याचें होतें त्यास पंजाबात स्वतत्र कारभार करण्याचा अनुभव सहा महिने मिळून, शिवाय बहूरामच्या तालमेत तो आपल्या जहागिरींत पुष्कळ गोष्टी शिकला. तेव्हा आरंभी प्रधानाच्या नात्यानें राज्याचा सर्व कारभार बहूरामखानच पाहूं लागला. अकबर राज्य करूं लागला, तेव्हा बादशाही अंमलाखाली दिल्ली व आग्रा ह्या शहरापलीकडे फारसा मुलूख नव्हता. परंतु पन्नास वर्षांच्या अवधीत अकबरानें अफगाणिस्तानपासून आसामपर्यंत, व दक्षिणेस अहंमदनगरपर्यंत, हिदुस्थानातील सर्व प्रदेश आपल्या ताब्यात आणिला; आणि नीतीने व चातुर्याने राज्यकारभार करून रयतेचें सगोपन केले. ह्यामुळें जगातील महान राज्यकर्त्यांमध्यें अकबराची गणना होत आहे.

**१. सूरवंशी शत्रूंचा बंदोबस्त.**—सरहिंदच्या लढाईमध्यें पराजय झाला असतांही सूरवंशी पुरुषांची आशा संपली नव्हती. सिकंदर शहा सूर हा पठाण लोकांची मोठी फौज घेऊन पंजाबांत राहिला होता. पूर्वेकडील प्रांतांत महंमदशहा आदिली व हिमू हे मोठ्या जमावानिशीं अकबराशीं युद्ध करण्यास तयार होते. मध्य हिंदुस्थान व रजपुताना येथील हिंदु राजे मुसलमानी अंमलास मोजीत नव्हते. नवीन मोगल सरदारांस हुमायूननें जहागिरी व नेमणुका करून दिल्यामुळें, जुन्या पठाण सरदारांस वैषम्य वाटून ते बादशहावर उठण्यास तयार झाले होते. अकबराची मोगल फौज तीस हजारांवर नव्हती. उलट पक्षीं शत्रूंची पठाण फौज एक लाखावर होती. अफगाणिस्तानांतले अंमलदार अकबराशीं नीट रीतीनें वागत नव्हते. अशा सर्व अडचणींचें ओझें चौदा वर्षांच्या या मुलावर एकदम येऊन पडलें.

अकबरानें बहरामखानास ' खानखानान ' म्हणजे राजाधिराज असा किताब देऊन त्याच्या हातीं सर्व अधिकार दिला. तथापि स्वतः सर्व गोष्टी पाहून व सर्व गोष्टींत मन घालून आणि मेहनत करून, तो बहरामखानाबरोबर हजर राहत असे. प्रथम तो सिकंदर शहाच्या बंदोबस्तास लागला. सरहिंद येथें पराभव झाल्यावर सिकंदर शहा फौजेचा जमाव करून पुनरपि युद्धाच्या तयारीनें राहूं लागला. अकबराची आत्या गुलबदन बेगम इचा नवरा खिजरख्वाजा ह्याचा सिकंदर शहानें पराभव केला, तेव्हां त्याचा बंदोबस्त करण्याकरितां अकबर मोठ्या फौजेनिशीं पंजाबांत चालून गेला. अंबालानजीक निकराची लढाई होऊन, सिकंदर शहाचा पराभव झाला. तेथून तो शिवालिक पहाडांत मानकोट किल्ल्यावर जाऊन राहिला. तेथें अकबरानें त्यास वेढा घालून ठिकाण काबीज केलें, ( मे १५५७). सहा महिने वेढा चालल्यावर सिकंदर अकबरास शरण आला, तेव्हां त्याच्या मुलास स्वतःजवळ नोकरींत ठेवून, सिकंदरास बंगाल्यांत राहण्याची परवानगी अकबरानें दिली. तेथें तो लवकरच मरण पावला. सुलेमान मीर्झा ह्यास हुमायूननें बदकूशान प्रांताचा कारभार सांगितला होता, त्यानें काबुलावर स्वारी करून तेथचा अधिकारी अकबराचा सावत्र भाऊ महंमद हकीम मीर्झा याजकडून तें शहर घेतलें, आणि तेथें सुलेमान स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. अकबर त्या वेळेस पंजाबांतील पहाडी लोकांशी लढत होता. त्यानें काबुलास कांहीं मदत पाठविली, पण तिचा उपयोग झाला नाहीं. तथापि इकडे हिमूनें फारच दंगा चालविल्यामुळें काबुलाकडे लक्ष देण्यास अकबरास ह्या वेळेस फुरसत मिळाली नाहीं.

महंमदशहा आदिली व हिमू हे पूर्वेकडून मुलूख काबीज करीत थेट दिल्लीपर्यंत आले. आग्र्याचा अधिकारी सुद्धां पळून दिल्लीस आला. खान जमान नांवाचा अक-

बराचा सरदार थोडीशी फौज घेऊन शादीखान नामक हिमूच्या सरदारावर चालून गेला असता पराभव पावून पळाला हिमूनें आग्रा शहर घेतले, आणि दिल्लीचा अधिकारी तार्दीबेगखान ह्याचा मीरत येथे पराभव केला ह्या गोष्टी घडत असता अकबर पंजाबात जालंदर येथे होता खान जमान, तार्दीबेग व दुसरे पराभव पावलेले सरदार आपापल्या फौजानिशी तेथे जाऊन अकबरास मिळाले. नंतर पुढील विचार करण्याकरिता मुख्य मुख्य सरदाराची एक सभा त्याने भरविली. हुमायूनची जशी पूर्वी दुर्दशा झाली, तसाच हा आणीबाणीचा प्रसग होता सभेत बहुतेकाचा सल्ला असा पडला, कीं अशा प्रसगी हिमूशी युद्ध करणे श्रेयस्कर होणार नाहीं, सर्वांनी मिळून तूर्त काबुलास निघून जावें. पण बहरामखानानें असा अभिप्राय दिला, की आपण एकदम जाऊन हिमूशी लढाईच केली पाहिजे एकवार शत्रु वाढला, म्हणजे तो हिंदुस्थानचे राज्य बळकावून बसेल, आणि पुनरपि तें घेण्यास प्रयास पडतील अकबरास बहरामखानाचा सल्ला पसत पडून, त्याने दिल्लीवर जाण्याचा निश्चय ठरविला. ह्या वेळी मोगल सरदारात शिस्त नव्हती प्रत्येक जण आपापल्या मर्जीप्रमाणे वागत असे. ह्याचा बदोबस्त होऊन जरब बसावी ह्या हेतूनें, अकबर छावणीच्या बाहेर गेला असता, बहरामखानाने तार्दीबेग खानास दिल्ली सोडून आल्याबद्दल ठार मारिलें. अकबर परत आल्यावर बहरामाने त्यास कळविलें, कीं 'आपल्या लष्करात जरब राहून सर्वांचा बचाव व्हावा अशा प्रकारची कडक शिक्षा एका इसमास करावी लागली. आपण कदाचित् असे करण्यास अनुमोदन देणार नाहीं, म्हणून मीच हें कृत्य आपणास न विचारिता उरकून घेतले' अकबरास हा प्रकार आवडला नाहीं. तार्दीबेगखान हा हुमायूनचा मूळपासून इमानी नोकर होता. अशा सरदाराचा प्राण विनाकारण बहरामाने घेतला, ही गोष्ट अकबर कधी विसरला नाहीं. तरी होऊन गेलेली गोष्ट परत येणे शक्य नाही असे पाहून, मोठ्या नाखुषीनें त्याने या कृत्यास आपली समति दिली. एकंदरींत ह्या कडक शिक्षेचा परिणाम व्हावा तसा झाला. बहरामखानास सर्व लोक भिऊ लागले. अकबराचें सैन्य दिल्लीकडे येऊ लागले, तसा हिमूही आपली फौज घेऊन पानिपतच्या समरभूमीवर गेला. अगोदरच हिमूनें विक्रमाजित हें नाव धारण करून दिल्ली येथे आपले राज्य सुरू केले होतें. हिमूचा तोफखाना अमळ पुढें गेला होता, त्याजवर एकदम छापा घालून, बहरामखानाने तो स्वाधीन करून घेतला. तारीख ५ नोव्हेंबर, सन १५५६ रोजी लढाईस प्रारंभ झाला. उभय दळे मोठ्या निकरानें झगडू लागली. हिमू आपल्या 'हवा' नामक

हत्तीवर बसून सर्वांपुढें झळकत असतां डोळ्यास तीर लागून पडला, तेव्हां हिमू मेला आणि दुसरा कोणी पुढारी नाहीं असें पाहून, त्याचे लोक पळून गेले. तो स्वतः पिछाडीस जात असतां अकबराच्या स्वारांनीं त्यास पकडून नेलें. ह्या काफरास स्वहस्तानें ठार मारून ' गाजी ' हें नांव मिळवावें, असा बहरामानें अकबरास पुष्कळ आग्रह केला. अकबराच्यानें ती गोष्ट करवेना. पतित शत्रूस मारण्याचें त्याच्या जिवावर आलें. त्याच्या डोळ्यांत आंसवें आलीं, असें पाहून बहरामखानानें चटकन पुढें होऊन आपल्या हातानें हिमूचा शिरच्छेद केला. अशा प्रकारें ह्या पुरुषाचा अंत झाला. हिमू केवळ स्वपराक्रमानें मोठ्या योग्यतेस चढला होता. त्याच्याच अकलेच्या जोरावर सूरवंशी पठाणांस इतके दिवस मोगलांशीं झगडतां आलें. मुसलमानांच्या ताबेदारींत राहून एवढ्या मोठ्या पदास चढलेला असा हा एकच हिंदु गृहस्थ होता. त्याची हुशारी व राजनिष्ठा ह्या गुणांचा मोबदला त्यास मिळाला नाहीं हें दुर्दैव होय. अकबरास एवढ्या मोठ्या फौजेशीं लढण्याचा पुनः कधीं प्रसंग आला नाहीं. वरील पानिपतची दुसरी लढाई होय.

ह्या जयानें अकबर निर्वेध झाला. पुढेंही त्यास एकसारखे लढण्याचे प्रसंग आले खरे, तथापि बंडाचा फैलाव होण्यापूर्वीच शत्रूवर हल्ला करण्याची त्यास आतां सोय झाली. हिमूचा पाडाव केल्यावर मोठ्या समारंभानें त्यानें दिल्लींत प्रवेश केला. आपल्या सन्मान्य पित्याच्या तख्तावर चढतांना त्याचें अंतःकरण कचरूं लागलें. कारण ह्या पदाच्या प्राप्तीकरितां अनेक रक्तपात घडून आले होते, आणि आपला पुढें परिणाम काय होईल हा विचार त्या वेळीं त्याच्या मनांत घोळत होता.

स. १५५७ त सिकंदर शहावरील स्वारींत असतां, अकबरानें काबुलास फौज पाठवून आपल्या आईस व इतर बायकांस तेथून आपणापाशीं आणिलें. हुमायून व अकबर काबुलाहून हिंदुस्थानांत आले, तेव्हां ह्या बायका मागेंच राहिल्या होत्या. ह्याच वेळेस अकबराचें दुसरें लग्न झालें. अब्दुल्लाखान मोगल म्हणून कामरानचा मेहुणा होता, त्याची मुलगी अकबरानें पसंत केली. बहरामखानास हा कामरानच्या नातेवाइकाशीं घडलेला संबंध आवडला नाहीं, तरी अकबरानें आग्रहानें लग्न लाविलें.

**३. स्वकीय सरदारांचे बखेडे.**—अकबरानें पन्नास वर्षें राज्य केलें. त्याच्या कारकिर्दीस मोगल बादशाहीचा सुवर्णकाल असें म्हणतात. वास्तविक त्या वेळेस सर्वत्र शांतता होती असें नाहीं. शहाणपणानें व दयेच्या वर्तनानें जरी त्यानें बरेंचसें काम केलें, तरी युद्ध केल्याशिवाय ह्या पन्नास वर्षांच्या अवधींत

एक वर्षही अकबराचें गेले नाही. प्रथम तर स्वत च्याच मंडळीचा त्यास बंदोबस्त करावा लागला

**( अ ) बहूरामखान,** ( १५५९–६१ ).—गुलरंग बेगम म्हणून हुमायूनची एक सावत्रबहीण होती, तिला सलीमा नावाची एक मुलगी होती. ही सलीमा बहूरामखानास द्यावयाची असे हुमायूनने ठरविलें होतें ती स्वरूपानें सुदर असून फार शहाणी म्हणून नावाजलेली होती स १५५७ त तिचें लग्न अकबरानें जालंदर येथे बहूरामखानाशी मोठ्या थाटानें केले ह्या वेळी बहूरामखानाची सर्वांशी गोडी होती. स १५६० त बहूरामखानाचा खून झाल्यावर, अकबरानेच ह्या सलीमाशी पुन. आपले लग्न लाविलें.

अकबर व बहूरामखान यास एक ठिकाणी काम करण्याचा प्रसंग पडूं लागला, तसा त्याजमध्यें मतभेद उत्पन्न झाला अनेक भानगडीचे प्रश्न दररोज उत्पन्न होत, आणि त्याचा निकाल करणे अकबरास भाग पडे आपल्यावरची जबाबदारी तो कधीही टाळीत नसे ज्यानी ज्यानी नोकरी चागल्या रीतीनें बजाविली, त्यास बक्षिसे, देणग्या वगैरे देताना तो उत्तरोत्तर बहूरामखानास विचारीनासा झाला. कित्येक वेळा बहूरामखान त्याच्याजवळ नसेही. बहूरामखान हा निष्ठुर, एककल्ली व स्वभावाचा खुनशी होता. तार्दीबेग खानाप्रमाणे त्याने अनेकास कडकपणाने वागविलें होते अधिकार वापरण्याच्या कामा तो न्यायान्याय सहसा पाहत नसे अकबराची दाई महाम अनागाहिनें बहूरामखानाविरुद्ध खटपट चालवून अकबराचें मन त्याजविषयी दूषित केले, आणि आपला कारभार आपण करावा, असे त्यास सुचविलें. अशा अनेक कारणानी बहूराम व अकबर ह्याजमध्ये द्वेषभाव वाढत चालला मुल्ला पीर महंमद म्हणून अकबराचा शिक्षक होता त्याचा व बहूरामाचा बेबनाव होऊन, बहूरामनें त्यास एकदम कामावरून काढिलें, आणि त्याच्या जागेवर आपल्या मार्फतीचा दुसरा शिक्षक नेमिला. एके दिवशी दरबारच्या सर्व लोकानीही बहूरामाविरुद्ध अकबराकडे तक्रारी नेल्या. त्या वेळीं अकबर मोठा होत चालला होता. आणि राज्यसत्ता आपल्या हातात असावी असेही त्यास वाटूं लागले त्याने काही तरी युक्ति करून, बहूरामच्या हुकमतींतून मोकळे होण्याचा प्रयत्न चालविला एके दिवशी दोघे मिळून शिकारीस गेले असता आपली आई आजारी पडल्याचें निमित्त करून अकबर कोणाच्या ध्यानी मनीं नसता दिल्लीस परत आला. तेथून त्याने बहूरामखानास कळविलें कीं, ‘ आजपर्यंत आमचा विद्याभ्यास व बाळपणचे खेळ चालले होते, म्हणून सर्व राज्याचा कारभार तुमच्या हातात असणे जरूर होते परंतु आता आपण आपले राज्य स्वतः

चालवावें असें आम्हीं मनांत आणिलें आहे, तरी आमचें कल्याण व्हावें या इच्छेनें तुम्हीं आतां सर्व कारभार सोडून द्यावा, आणि संसाराचा त्याग करून ईश्वरचिंतनांत कालक्रमण करण्याकरितां मक्केस जाऊन राहवें. तेथें तुमच्या खर्चाचा बंदोबस्त उत्तम ठेविला जाईल.' शिवाय त्यानें आपल्या सर्व लोकांस कळण्याकरितां असा एक जाहीरनामा काढिला, की 'आम्हीं आपल्या राज्याचा सर्व कारभार इतःपर आपल्या हातांत घेतला आहे, तरी यापुढें आमचा हुकूम सर्वांनीं पाळावा; दुसऱ्या कोणाचा मानूं नये.' हा जाहीरनामा बहराम-खानास कळला, तेव्हां प्रथम ह्या कृत्याचा त्यास राग आला नाहीं. निमूटपणें सर्व अधिकार सोडून तो मक्केस जाण्याकरितां म्हणून राजपुतान्यांत नागोरपर्यंत गेला. तेथें त्याची बुद्धि फिरली. बादशहाविरुद्ध बंडावा करून स्वतंत्र अधिकार बळकाविण्याचा तो उद्योग करूं लागला. सन १५५९ त त्यानें आपली स्वतंत्र फौज जमविली. तेव्हां अकबरानें त्याच्या पारिपत्यास सैन्य पाठविलें. त्यास चुकवून बहराम पंजाबांत पळाला, त्याचा पाठलाग करून मच्छीवाडा येथें अकबराच्या फौजेनें त्याचा पराभव केला. पुढें कांहीं दिवस रानावनांत भटकल्यावर निभाव लागत नाहीं असें पाहून, क्षमा मागण्यासाठीं त्यानें आपल्या तर्फेनें बादशहाकडे कांही मनुष्यें पाठविलीं. तेव्हां अकबरानें आपले उमराव रवाना करून मोठ्या सन्मानानें त्यास दरबारीं आणविलें, ( डिसेंबर १५६० ). पागोटें मानेस बांधून सिंहासनासमोर पडून त्यानें बादशहाची माफी मागितली. अकबर त्याची खरी योग्यता व पूर्वीचे उपकार विसरला नव्हता. बहरामखानाची ती दीनावस्था पाहून त्याच्या मनास कळवळा आला. आपल्या हातानें त्यास वर उठवून बादशहानें आपल्या उजव्या बाजूस त्यास त्याच्या पूर्वीच्या जागीं बसविलें, आणि बहुमान-पोषाख दिला. नंतर अकबर त्यास म्हणाला, 'बहरामखान, आमच्या घराण्यावर आपले बहुत उपकार आहेत. आपली इच्छा असेल, तर काल्पी व चंदेरी ह्या प्रांतांची सुभेदारी आपणांस देतों; तसें नसेल तर खुशाल येथेंच दरबारीं राहून काम-काज करीत जा. अथवा तेंही पतकरत नसेल, तर मक्केस जाऊन राहा. तेथें आपल्या मोठेपणास साजेल असा आपला बंदोबस्त ठेवण्यांत येईल.' बहरामखान अभिमानी व धूर्त होता. आपणास आपला पूर्वीचा स्वतंत्र अधिकार पुनरपि मिळणार नाहीं हें तो पक्कें जाणून होता. त्यानें मक्केस जाण्याचें पतकरिलें, आणि म्हणाला, 'खाविंद, एकवार आपल्या चरणापाशीं मीं बेइमान केलें; आतां येथें काम करण्याची माझी योग्यता

नाही आपण क्षमा केली, हेंच माझ्या नोकरीचे योग्य बक्षीस आपण मला दिलें.' बादशहानें त्यास सालीना पन्नास हजार रुपयाचें वेतन करून दिलें. नंतर तो मक्केस जाण्याकरितां गुजराथेंत आला तेथे एके दिवशीं होडीतून उतरून किनाऱ्यावर आल्यावर, मुबारिकखान नामें एक पठाण त्याच्या भेटीस आला. ह्या मुबारिकखानाच्या बापास बह्रामनें पूर्वी लढाईत ठार मारिलें होते भेटीचे वेळी मुबारिकनें बह्रामच्या पाठीकडून पोटात शस्त्र खुपसून त्याचा प्राण घेतला, ( जानेवारी, सन १५६१ ) त्याची बायकामुले आग्ऱ्यास पाठविण्यात आली, तेथे बादशहानें त्याची उत्तम बरदास्त ठेविली. त्याचा मुलगा मीर्झाखान ह्याजला अकबरानें मोठें काम दिले, आणि पुढें काही दिवसानी त्याची हुशारी पाहून बापाची खानखानान ही पदवी त्यास दिली हा गृहस्थ पुढें फार प्रसिद्धीस आला. बह्रामखानाचे समरांगणावरील शौर्य व आपत्कालचे धैर्य, इत्यादि अनेक गुण आठवून बादशहास आमरण त्याचे स्मरण होत असे एकंदरीत बह्रामखानासारखा हुशार व नेटावा पुरुष मिळाला, म्हणूनच हुमायून विपत्तीतून पार पडून, अकबरास पुढील सुदीन प्राप्त झाले बह्रामासारखा धाडसी वीर अकबराजवळ नसता, तर सूरवंशी सरदारानी अकबरासारख्या बालकाची डाळ कधीच शिजू दिली नसती. आणीबाणीच्या वेळी मोगल सरदारात ऐक्य व उत्साह राहिला, ह्याचें श्रेय बह्रामास आहे सारासार विचार न पाहता कोणतीही गोष्ट मनात आल्याबरोबर तडाख्यासरशी करून टाकणें हा त्याच्या वर्तणुकींत दोष होता, म्हणूनच त्याचा असा परिणाम झाला अशा उपकारकर्त्याचे अन्याय पोटात घालून, त्यास मोठ्या संतोषाने रजा देण्यात अकबराने जो मनाचा मोठेपणा व्यक्त केला, तो त्याच्या थोरपणास चागला शोभतो.

अकबराचें वय आता अठरा वर्षांचे झालें. इतःपर तो कोणाच्या ताब्यात राहिला नाहीं. स्वत च्या हिंमतीवर अनेक विकट प्रसगातून त्यानें आपली राज्यनौका सुस्थळास कशी आणिली हें आता पाहवयाचें आहे ‹

**( आ ) आदमखान वगैरे,** ( १५६१ ).–अकबराची दाई महाम अनागा ही हुशार व खटपटी बाई होती. ती हमीदाची नातेवाईक होती असें दिसतें. हरएक कारभारात ढवळाढवळ करण्याची तिला हौस होती. ती स्वभावानेंही दुष्टच होती तिचा मुलगा आदमखान ह्यास योग्यतेस चढविण्यासाठीं तिनें नाहीं नाही त्या खटपटी केल्या एकदां असा प्रकार घडला, कीं बाझ बहादूर म्हणून एक पठाण सरदार माळव्यात माडवगड येथे स्वतंत्र वागत होता. त्याजवर अकबराने या आदमखानास पाठविलें. आदमखान

हा अकबराचा विश्वासू कामदार होता. त्यानें बाझ बहादूरचा पराजय करून, त्याचा सर्व मुलूख काबीज केला. तेव्हां बाझ बहादूर पळून बऱ्हाणपुराकडे चालता झाला. परंतु पुढें आदमखानानेंच अधमपणाचें वर्तन चालविलें. सर्व लूट त्यानें स्वतःकडे ठेविली, आणि बाझ बहादूरचा जनानखानाही आपल्याजवळ अडकवून ठेविला. त्यांत बाझ बहादूरची सुंदर स्त्री रूपमती होती. तिचा अभिलाष धरून आदमखानानें तिच्या भेटीस जाण्याची वेळ नेमिली. तिला नाहीं म्हणतां येईना. ती सुंदर पोषाख करून आदमखान येण्याच्या वेळेस पलंगावर निजून राहिली. खान आल्यावर पाहतो, तों ती मेलेली दिसली. आदमखानाकडून अप्रतिष्ठा न व्हावी म्हणून रूपमतीनें विष खाऊन आत्महत्या केली होती. बाझ बहादूरच्या दुसऱ्या पुष्कळ स्त्रिया जनानखान्यांत होत्या, त्या अकबरास चहाड्या सागतील म्हणून, महाम अनागानें सर्वांस ठार मारविलें. बाझ बहादूर हा मुसलमान असूनही हिंदु धर्माचा द्वेष करीत नसे. त्याच्या जनानखान्यांत पुष्कळ हिंदु स्त्रिया होत्या. आदमखानानें अधिकाराबाहेर काम केलें हें अकबरास खपलें नाहीं. तो एकदम फौज घेऊन आग्र्याहून आला, आणि आदमखानास पकडून घेऊन परत गेला. पुढें त्याजपासून सर्व लूट परत घेऊन त्यास कामावरून काढिलें, आणि त्याच्या जागीं आपला गुरु पीरमहंमदखान यास नेमिलें. स्वतः बादशहा आपणावर रागावला आहे असें आदमखानास वाटलें नाहीं. महंमदखान ऊर्फ शम्सुद्दीन नांवाचा अकबराचा वजीर त्याच्या एका आवडत्या दाईचा नवरा होता. बहरामखानाचा बंदोबस्त करण्यांत ह्यानेंच पुढाकार घेतला असून, महाम अनागाचें प्रस्थही त्यानेंच मोडिलें, म्हणून आदमखानाचा त्याजवर डोळा होता. तेव्हां हाच आपला नाश करूं पाहत आहे असें समजून, वजीर वाड्यांत काम करीत बसला असतां त्याजकडे जाऊन त्याचा आदमनें प्राणघात केला, ( मे १५६२ ). हें वर्तमान ऐकून अकबर त्या ठिकाणीं आला. आदमखान त्यास गच्चीवर दिसला. अकबराचा हात तलवारीकडे गेला; पण झटकन आत्मसंयमन करून त्यानें आदमखानास गच्चीवरून खालीं लोटून देण्याचा हुकूम केला. तो अंमलांत येऊन खानाचा अंत झाला. मुलाच्या दुःखानें आई महाम अनागा पुढें चाळीस दिवसांनीं मरण पावली.

आपल्याकडील बाजीराव मस्तानी प्रमाणें बाझबहादर व रूपमती यांच्या प्रेमबंधाचें स्मरण उत्तर हिंदुस्थानांत अद्यापि ताजें असून, त्याजवर अनेक कवनें झालेलीं आहेत. प्रेमासाठीं त्यांना धर्मत्याग करावा लागला नाहीं. ( पारसनीस कृत इ. संग्रह, ऐ. गोष्टी पहा. )

बहरामखाना प्रमाणेंच महाम अनागा ही राज्याचा कारभार आपल्या हातीं ठेव-ण्यासाठी महा खटपट करीत होती अलीकडच्या दोन तीन वर्षांत तिचेच प्रस्थ राज्यांत असल्यामुळे, तिचा मृत्यु ( स. १५६२ ) हा अकबराच्या स्वतत्रतेचा आरंभ सलजला जातो. म्हणजे वयास वीस वर्षे होताच त्याने सर्व सत्ता आपल्या हातात घेतली. या पूर्वीच्या कारभारास ' जनानी कारभार ' म्हणतात.

मुन्यिमखान व शिहाबुद्दीन हे दोघे सरदार शम्सुद्दीनच्या खुनाचे प्रसंगीं जवळ होते, परंतु त्यानी आदमखानास खून करू दिला, हें अकबरास आवडले नाहीं. ते पळून गेले. अकबरानें त्यास पकडून आणून क्षमा केली. मुन्यिमखान पुढें वजीर झाला शराफुद्दीन म्हणून दुसरा एक गृहस्थ होता त्यास अकबराची बहीण बक्षीबानू दिलेली होती त्याने पळून जाऊन बंड उभारिलें त्याच्या एका गुलामानें मागे राहून अकबराचा खून करण्याचा प्रयत्न केला. दिल्ली शहरात अकबर सायकाळीं वाड्यात परत येत असता, त्या गुलामानें त्यास बाणानें घायाळ केलें त्याबरोबर जवळचे लोक गुलामास पकडून तपास करूं लागले. परंतु तपासात भलभलतींच नावे बाहेर येऊन ज्यास्त त्रास होईल सबब अकबरानें त्यास एकदम मारून टाकविलें काही दिवसानीं त्याची जखम बरी झाली. शराफुद्दीनला पकडून अकबरानें कैदेत ठेविले.

ख्वाजा मुअज्जम म्हणून अकबराचा मामा होता तो मोठा व्रात्य असून बेलाशक खून वगैरे करीत असे. जहरा आगा नावाची त्याची बायको होती, तिचा तो अति-शय छळ करी. तिची आई बिबी फातिमा हिची देखरेख हुमायूनच्या जनानखान्या-वर असे. तिच्यावर अकबराची भक्ति होती तिनें ख्वाजाची दुष्ट वर्तणूक अकबरास कळवून आपल्या मुलीचे सरक्षण करण्याविषयी त्यास विनंति केली. अकबर शिका-रीस म्हणून निघाला तो ख्वाजाच्या घरावरून गेला, आणि पुढें निरोप पाठवून त्यास कळविलें, कीं ' जरा बाहेर येऊन मला भेटा ' तें ऐकून ख्वाजास राग आला. त्याने लगेच घरात जाऊन, बायकोचा खून केला, आणि रक्ताने भरलेली कट्यार अकबराचे जासुदास दिली. अकबरास हें वर्तमान समजताच तो लगेच ख्वाजाच्या घरात गेला. ख्वाजा तलवारीस हात घालून अकबरावर चाल करणार, तोच अकबरानें त्यास दरडा-वून गप्प बसविलें, आणि गरीब बायकोचा खून का केलास, म्हणून विचारलें त्यावर तो बादशहास शिव्या देऊं लागला. तेव्हा त्यास पकडून अकबरानें ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैदेत ठेविलें, तेथेच तो मरण पावला ( सन १५६३ ).

( इ ) खानजमान ( स. १५६६ ).—महंमदशहा आदिली व हिमू याचा

निकाल लागल्यावर शेरखान नांवाचा सूर जातीचा पठाण सरदार बंगाल व अयोध्या प्रांतांकडे बंडावा चालवीत होता. त्याच्या बंदोवस्तासाठीं खान्ज़मान नांवाचा इमानी सरदार अकबरानें रवाना केला. शेरखान हा मुलूख जिंकीत जोधपुरपर्यंत आला. खानजमाननें त्याचा पराजय करून सर्व लूट हरण केली, पण शेवटीं स्वतःच स्वतंत्रतेनें राहण्याचा त्याचा झोंक दिसूं लागला. अकबरास ह्या गोष्टी कळल्या. बादशहा स्वतः आपणावर येत आहे हें समजतांच, त्यानें सर्व लूट त्याजकडे पाठवून दिली. तेव्हां बादशहा परत गेला. पण खानजमानाच्या मनांतील द्वेषबुद्धि कमी झाली नाहीं. कित्येक ऊझबक लोकांनीं अयोध्या प्रांतांत बंडें चालविलीं, त्यांस खानजमान व आसफ्खान ऊझबेक नांवाचा दुसरा एक अकबराचा सरदार, कुरा प्रांताचा सुभेदार होता तो, असे जाऊन मिळाले. तेव्हां भरपावसाळ्यांत अकबर अयोध्या प्रांतांत गेला. सर्व फौज मागें टाकून फक्त बरोबरच्या खाशा स्वारांनिशीं तो शत्रूंपाशीं पोंचला. गंगेच्या पलीकडच्या कांठीं शत्रूची फौज उतरली आहे, असें पाहून अकबर आपल्या स्वारांनिशीं रातोरात नदींतून पोहून पलीकडे गेला. मध्यें नदी असल्यामुळें अकबराच्यानें अलीकडे येववणार नाहीं, अशा समजुतीनें शत्रु स्वस्थ बसले होते. अकबरानें एकाएकीं येऊन हल्ला करितांच ते सैरावैरां पळून गेले. खानजमान मारला गेला. इतर सरदारांस पकडून अकबरानें हत्तीच्या पायीं दिलें, ( सन १५६६ ). त्या योगानें ह्या पूर्वेकडील प्रांतांत बरीच स्वस्थता झाली.

**( ई ) महंमद हकीम मीर्झा,** ( सन १५६६. ).—अकबराचा सावत्र भाऊ हकीम ह्यास सुलेमान मीर्झा यानें काबुलांतून घालवून दिलें, तेव्हां तो पंजाबांत आला, व तो प्रांत हस्तगत करण्याचा विचार करूं लागला. अकबर पूर्वेकडे ऊझबक लोकांचीं बंडें मोडण्यांत गुंतला असतां हकीमचें इकडे चांगलें फावले. नोव्हेंबर सन १५६६ त अकबर स्वतः पंजाबांत गेला. तो आल्याची बातमी लागतांच हकीम त्वरेनें परत काबुलाकडे गेला. तेथें सुदैवानें काबूल त्याच्या हस्तगत झालें; कारण सुलेमान मीर्झा बदकृशान प्रांतांत गेला होता. तूर्त हकीमच्या वाटेस अकबर गेला नाहीं. त्याची हकीकत पुढें काबूलप्रकरणीं येईल.

ह्यांशिवाय आणखी अनेक सरदारांनीं दंगे केले; पण त्यांत विशेषेंकरून ऊझबक सरदारच पुढारी असत. त्या सर्वांचा बंदोबस्त अकबरानें केला. सन १५६० पासून १५६७ पर्यंत अकबराचा काळ असलीं बंडें मोडण्यांत गेला. कोणतेंही काम त्वरेनें करण्याची अकबराची हातोटी आणि शत्रूसही क्षमा करण्याचें त्याचें औदार्य, हे त्याचे

गुण ह्या सर्व प्रसंगीं विशेष दृष्टोत्पत्तीस आले. अकबराच्या राज्यात अजून स्वस्थता झाली नव्हती.

नर्मदेच्या उगमाजवळ गढा मंडळा प्रात असून तेथील गोंड राजा संग्रामशहा याची सून राणी दुर्गावती आपल्या अल्पवयी मुलास साभाळून शहाणपणानें राज्य करीत होती. तिच्या जवळ वीस हजार घोडेस्वार व एक हजार हत्ती एवढी फौज असून तिनें अनेक वार बाजबहादरचा पराभव केला होता तिच्या शौर्याची कीर्ति सर्वत्र पसरून तिला जिंकल्याशिवाय आपल्या सत्तेस शोभा नाहीं, असे अकबरास त्याचा सरदार आसफखान यानें कळविलें ह्या आसफखान करा प्राताचा सुभेदार होता. त्यानें बादशहाच्या परवानगीनें दुर्गावतीवर स्वारी करून गढाप्रात जिंकिला (स १५६४) युद्धात निभाव न लागल्यामुळे शत्रूच्या हातीं पडण्याचा प्रसग राणीवर आला, तेव्हा तिनें आपल्या छातींत खंजीर खुपसून प्राणत्याग केला. आसफखानाने या स्वारीत बुंदेल खडातील पन्ना येथील हिऱ्याच्या खाणी हस्तगत करून बादशहास दिल्या.

**४ अकबरानें जिंकिलले प्रदेश,** (स. १५६१—१६०० ).

**उपक्रम**—अकबराच्या राज्याचा विस्तार बंडखोरांची पारिपत्यें करिताना झाला अशी बंडखोरी स. १५७६ त समाप्त होऊन तदुत्तर त्याच्या कारभारास निराळें वळण लागलें. म्हणून स. १५६२ पासून पुढील चौदा वर्षांचा काळ ह्या अकबराच्या ऐन तडफेचा व तरुण पराक्रमाचा होय ह्या चौदा वर्षांत त्याने अफगाण प्रतिस्पर्धी जिंकून त्याच अनुषंगानें रजपुताना, गुजराथ आणि बगाल हे प्रात जिंकिले, तेणें करून त्याची बादशाही कायम होऊन नर्मदोत्तर प्रदेशात तो चक्रवर्ती बनला .पहिलीं पाच वर्षें बह्‌रामच्या हाताखालीं, व पुढील काही वर्षें बंडावे वगैरे मोडण्यात, मिळून अकबराने पहिल्या आठ वर्षांतच जो अनुभव मिळविला, त्यावरून आपलें राज्य लोकास सुखावह व चिरस्थायी कसे करिता येईल, ह्याविषयीं त्याचे मनांत विचार घोळू लागले. चारशें वर्षें झालीं, तरी मुसलमानाचे राज्य टिकाऊ झाले नाहीं हुमायूनवरील प्रसंग त्याच्या डोळ्यापुढें होते अशा स्थितींत रजपूत राजाची मने आपणाकडे वळवून आपले राज्य सुरक्षित करण्याचा त्याने निश्चय ठरविला. सर्वांस समतेनें व ममतेने वागवावयाचें, राज्यकर्त्यांचा जाच त्यास होऊ द्यावयाचा नाहीं, त्याची सामाजिक व सापत्तिक स्थिति सुधारावयाची, धर्माच्या बाबतींत कोणावर जुलूम करावयाचा नाहीं, अशा रीतीनें लोकप्रीति सपादून सर्व हिंदुस्थान देश युक्तिप्रयुक्तीने आपल्या ताब्यात आणावयाचा, अशी आपली कर्तव्यमर्यादा कायमची ठर-

वून अकबरानें तसा उद्योग आरंभिला. स. १५६२ त त्यानें मारवाडच्या मालदेवाची मुलगी जोधाबाई इच्याशीं लग्न लाविलें. लगेच हिंदूंना अत्यंत जाचक झालेला जिझिया कर त्यानें माफ केला (स. १५६२ ); तसेंच हिंदू यात्रेकरूंवर यात्रेच्या ठिकाणीं कर घेण्यांत येत असे, तोही त्यानें बंद केला. अशा उपक्रमानें त्यानें आपला मुख्य उद्देश कसा तडीस नेला, हें पुढें हळू हळू व्यक्त होईल.

अकबरानें आपलें राज्य चिरस्थायी करण्याकरितां ज्या ज्या युक्त्या योजिल्या, त्यांत रजपुतांशीं केलेले शरीरसंबंध ही गोष्ट मुख्य होय. पुरातन काळापासून रजपूत राजे हिंदुस्थानचे राज्यकर्ते होते. मुसलमानांनीं अनेकवार रजपुतांस जिंकिलें, पण त्यांचा अंमल बसावा तसा बसला नाहीं. ते स्वतंत्रतेनें वागतच होते. अकबरानें त्यांजवर आपला अंमल सहानुभूतीच्या युक्तीनें बसविला. त्यांचीं राज्यें खालसा करण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं. तर त्यांच्याशीं शरीरसंबंध जोडून आणि त्यांस आपल्या दरबारीं लष्करी व इतर खात्यांत मोठमोठीं कामें देऊन, आपलेसें करून घेतलें. अफगाण हे मोगलांचे शत्रु होते. अफगाणांचा पाडाव करण्यास रजपूत आपणास चांगले उपयोगी पडतील, हें अकबरानें पक्कें ताडिलें, आणि आपल्या बादशाही साम्राज्याची व्यवस्थाच त्यानें अशा प्रकारची ठरविली, कीं तींत सर्व प्रकारच्या व सर्व जातींच्या लोकांचा समावेश व्हावा. रजपूत व मुसलमान ह्यांस त्यानें समान दृष्टीनें वागविलें. ह्या कृत्यांत अकबरास जें यश आलें, आणि जे प्रमाद त्याच्या हातून घडले, त्यांजपासून सर्व राज्यकर्त्यांनीं बोध घेण्यासारखा आहे.

**( अ ) रजपूत राज्यें,** (स. १५६१–१५६७).—**जयपुर.** स. १५६१त अकबर रजपुतान्यांत गेला. त्या वेळेस जयपुर संस्थानचा रजपूत राजा बहारमल्ल यानें आपली मुलगी अकबरास दिली. त्याजबद्दल त्या राजास व त्याचा मुलगा भगवानदास ह्यास अकबरानें आपल्या लष्करांत सरदारी देऊन ठेविलें.

**जोधपुर,** ( स. १५६१ ).—अकबर अजमिरास गेला असतां त्यानें मीर्झा शरीफुद्दीन हुसेन ह्यास जोधपुरच्या राजाचा मेडतें किल्ला काबीज करण्याकरितां पाठविलें. राजा मालदेव ह्यानें हुमायुनास त्रास दिला होता, आणि तो अकबरासही एकदम शरण आला नाहीं. मेडत्याचा किल्ला घेण्यास अकबराच्या फौजेस फार प्रयास पडले. आंतील अन्नसामुग्री संपेपर्यंत किल्ला मोगलांच्या स्वाधीन झाला नाहीं. अर्धे रजपूत लोक लढून मेले, तेव्हां राजा मालदेव अकबरास शरण गेला. त्याचा अकबरानें आपल्या दरबारीं उत्तम सन्मान केला. दरबारांत बादशहाच्या उजव्या बाजूस

त्यास जागा मिळाली, आणि ज्यास्त मुलूखही बादशहाकडून त्यास प्राप्त झाला मालदेवानें आपली मुलगी जोधाबाई अकबरास दिली, तिचाच मुलगा सलीम होय. ह्याप्रमाणें दुसरे अनेक रजपूत राजे अकबरास शरण आले.

**मेवाड.**—मेवाडचा राणा उदयसिंह ह्यानें अकबराचे सार्वभौमत्व कबूल केले नाहीं. तो आपणाला स्वतंत्र समजे, आणि सर्व रजपूत राजात आपण श्रेष्ठ व सार्वभौम आहों, असे तो आपणास मानी. रजपुताना हाच खालीं दक्षिणेस येण्याचा मार्ग व त्यात प्रमुख मेवाड. तेव्हा मेवाड जिंकिल्याशिवाय रजपुतान्यावर आपला अमल बसावयाचा नाहीं, हें अकबर पूर्णपणे ओळखून होता बाझ बहादूर माळव्यातून पळून गेला, त्यास उदयसिंहानें आश्रय दिला. तेव्हा ऊझबक लोकाच्या बंडातून मोकळा होताच अकबर स्वत माळव्यातून तोडरमल्ल, शुजायतखान, आसफखान वगैरे सरदार व तोफा घेऊन चितोडगडावर चालून आला, ( १५६७ ) चितोडगड किल्ल्याच्या सरक्षणार्थ आठ हजार लोक ठेवून राणा उदयसिंह दुसऱ्या एका अवघड जागीं जाऊन राहिला. ह्या वेळपर्यंत अकबराने तोफखाना बाळगिला नव्हता. हा किल्ला घेण्याचे काम त्याने स्वत तडीस नेलें. चितोडगड चारशें फूट उंच असून वर अगदीं अवघड आहे. तो अकबराच्यानें काबीज करवणार नाहीं, असे उदयसिंहास वाटलें होतें. किल्ल्यात धान्य, दारूगोळा, वगैरे भरपूर सामान असून, आठ हजार शूर शिपाई जयमल्ल नामक सेनापतीच्या हाताखालीं लढण्यास सिद्ध झाले. जयमल्ल व अकबर ह्या दोघानीं लढाईची व हरएक युक्तीची शिकस्त केली. अकबराचाही निश्चयच झाला होता, कीं हा किल्ला घेतल्याशिवाय राहवयाचें नाहीं कारण अकबराच्यानें हिंदुस्थानातला अमुक एक किल्ला काबीज करवला नाहीं, असे पुन लोकानीं म्हणूं नये त्यानें जयमल्लास 'संग्राम' नावाच्या आपल्या बंदुकीनें ठार केले, तेव्हाच किल्ला हस्तगत झाला. त्या वेळी रजपुतानीं जोहार केला त्यात नऊ राण्या, पाच राजकन्या व आणखी अनेक स्त्रिया यानीं अग्नींत प्राणाहुति देऊन प्रळय उडविला, त्याची आठवण कधी नाहींशी होणार नाहीं. चितोड येथें अकबरानें दाखविलेलें युद्धकलानैपुण्य त्या वेळच्या पाश्चात्य सेनानायकाच्या अंगीं सुद्धा नव्हतें असे अनेकाचें मत आहे. चितोडगडावर अकबरास जय मिळाल्यामुळें रजपुतान्यात सर्वत्र स्वस्थता होऊन बहुतेक राजे स्वसरक्षणार्थ अकबरास शरण आले. उदयसिंहानें मात्र त्यास दाद दिली नाहीं. राजधानी मुसलमानाच्या ताब्यात गेली, तरी कित्येक वर्षे त्याच्या कुटुंबानें अरण्यवासात काढिलीं, आणि शेवटीं उदयसिंहाचा मुलगा राणा प्रतापसिंह यानें अकबराच्या

तोडून आपलें स्वातंत्र्य कसें कबूल करविलें, तो प्रकार पहिल्या भागांत उदेपुरच्या इतिहासांत सांगितला आहे.

सन १५६९ सालीं रतनभोर व कालिंजर हीं रजपुतांचीं ठिकाणें अकबरानें काबीज केलीं. सन १५७०त बिकानेरचा राजा कल्याणमल्ल ह्यानें आपल्या भावाची मुलगी बादशहास दिली; आणि बादशहानें राजास आपल्या लष्करांत मनसबगिरी दिली. कल्याणमल्ल व त्याचा मुलगा राय रायसिंग हे पुढें पुष्कळ दिवस बादशाही नोकरींत होते. अशा रीतीनें लहान मोठे रजपूत राजे बादशहाची नोकरी बजावण्यांत भूषण मानूं लागले.

**( आ ) गुजराथ, ( १५७२–७३ ).**—हिंदुस्थानांतील निरनिराळे प्रांत आपल्या ताब्यांत आणून सर्व देशावर आपलें साम्राज्य स्थापण्याचा अकबराचा मनोदय मूळपासूनच होता. शिवाय ज्या ज्या ठिकाणीं त्याच्या बापास त्रास पडला, ते प्रांत तर अवश्य जिंकावयाचे अशी त्याची इच्छा होती. त्यास अनुसरूनच गुजराथ, बंगाल वगैरे प्रांत त्यानें जिंकून आपल्या अमलाखालीं आणिले. गुजराथेंत या समयीं मोठी अंदाधुंदी सुरू होती, हें त्या प्रांताच्या इतिहासांत सांगितलेंच आहे. तयमूरच्या वंशांतील सुलतान मीर्झा ह्या नांवाचा एक राजपुत्र बाबरबरोबर हिंदुस्थानांत आला होता, त्यास हुमायूननें अंतर्वेदींत संबळच्या सुभ्याचें काम दिलें होतें. पुढें त्याच्या मुलांनीं बंडें केलीं. माळवा प्रांतांत अकबरानें त्यांचा मोड केल्यावर ते गुजराथेंत पुंडाई करूं लागले. शिवाय, गुजराथच्या गादीबद्दल लागलेले तंटे मोडण्याकरितां इतिमादखान नामक सरदारानें अकबरास गुजराथेंत बोलाविलें. त्याप्रमाणें सन १५७२ च्या सेप्टेंबर महिन्यांत अकबर दिल्ली सोडून गुजराथेंत पाटण येथें आला. तेथील सुलतान मुज्फरशहा यानें अकबरास शरण येऊन सर्व राज्य त्याच्या स्वाधीन केलें. त्यास अकबरानें दिल्लीस नेऊन बंदोबस्तांत ठेविलें. तेथून कांहीं दिवसांनीं चुनारगड येथें व पुढें गौड येथें त्याची रवानगी झाली. (अकबरानें अजीज कोका नांवाच्या सरदारास गुजराथचा सुभेदार नेमिलें, आणि प्रांताच्या बंदोबस्ताची सर्व व्यवस्था केली. नंतर सुरत, भडोच व चांपानेर येथें वर सांगितलेले मीर्झा फौजबंद राहिले होते, त्यांजवर जाऊन अकबरानें त्यांचा पाडाव केला, व पुढें त्याच्या फौजेनें त्यांचा पाठलाग करून त्यांस घालवून दिलें. त्यांच्याशीं गुजराथेंत लढतांना एकदां आनंदनजीक सारसा येथें अकबरावर जिवावरचा प्रसंग आला होता. परंतु जयपुरचा राजा भगवानदास व त्याचा पुतण्या मानसिंह यांनीं विलक्षण पराक्रम करून अकबराचा जीव वांचविला;

आणि अखेरीस अकबराची फत्ते झाली. नतर ते मीर्झा पंजाब व माळव्याकडे पळाले. गुजराथचा बदोबस्त करून अकबर आग्र्यास गेला. पुढें स. १५७३ त अहंमदाबादेहून अकबर खबायतेस जाऊन, तेथें त्यानें प्रथम समुद्रदर्शन घेतले. खंबायत हें त्या वेळीं अत्यंत भरभराटीचे व जगाच्या व्यापाराचें बंदर होतें. तेथे एक आठवडा राहून अकबर बडोद्यास आला. तेथें त्याने गुजराथच्या बंदोबस्ताची सर्व व्यवस्था लावून दिली नंतर भडोच घेऊन अकबर सुरतेस गेला सुरत घेण्यास तर फारच प्रयास प-ले तेथील तट फार मजबूद होता. अकबराने दीड महिना वेढा चालवून सुरत काबीज केले, आणि तेथील बंदोबस्त करून स. १५७३ च्या जून महिन्यात अकबर आग्र्यास परत गेला समुद्रावर पोर्तुगीझ लोकानीं काय उद्योग चालविले आहेत, ह्याची कल्पना अकबरास या स्वारींत प्रथम झाली गुजराथेंत पुनरपि बंड झाल्याची बातमी त्यास आली. महंमद हुसेन मीर्झा व गुजराथचा एक पदच्युत सुलतान ह्यानीं तेथें दंगा चालविला अकबर विलक्षण चपळ होता. प्रसंग पडल्यावर तो वाटेल तें काम तेव्हाच उरकून टाकीत असे. त्याने दोन हजार स्वार पुढें एकदम रवाना केले, आणि लागलेच खास तैनातींतील तीनशे इसम बरोबर घेऊन साडणीवर बसून तो लाब लाब मजला मारीत भयंकर उष्णता सहन करून पाटण येथे आला. नऊ दिवसात साडेचारशें मैलाची त्याने मुशाफरी केली. पाटण येथे त्याची फौज तीन हजार होती विश्राति न घेता तो लागलाच अहंमदाबादेवर चाल करून आला. अहमदाबादेस जी अकबराची थोडी फौज होती, तिला वेढा पडला होता अकबर इतक्या त्वरेनें आला, हें शत्रूच्या लोकास खरें सुद्धा वाटलें नाहीं अकबराने लगेच लढाई सुरू करून बंडखोरास जिंकून ठार मारिलें, आणि पुनरपि गुजराथचा सुभा अजीज कोका याच्या स्वाधीन करून, अहंमदाबादच्या आसपास त्यास जहागीर तोडून दिली. दिल्लीस परत गेल्यावर गुजराथ प्राताची जमाबदी व नवीन व्यवस्था ठरविण्याकरिता बादशहानें प्रसिद्ध खत्री अमलदार राजा तोडरमल्ल यास पाठविले. त्याने गुजराथ प्राताची दराबस्त पाहणी केली, आणि प्रतबंदी व दरठरोती करून तोडरमल्ल दिल्लीस परत गेला अजीज कोका हा फार सात्त्विक वृत्तीचा होता. राज्यकारभाराची दगदग न आवडून तो विरागी होऊन दिल्लीस जाऊन राहिला. पुढें माळव्याचा अधिकारी शहाबुद्दीन अहमदखान व इतिमादखान हे गृहस्थ काहीं दिवस अहंमदाबादच्या सुभेदारीवर होते. सुलतान मुजफर बंगाल्यात कैदेत होता, तेथून तो सुटून पुनरपि गुजराथेंत आला, आणि अहंमदाबाद काबीज करून

त्यानें बंड चालविलें. त्यानें बडोद्याचा अंमलदार कुत्बुद्दीन ह्यास ठार मारून बहुतेक गुजराथ प्रांत हस्तगत केला. तें अकबरास कळल्यावर त्यानें बहरामखानाचा पराक्रमी मुलगा मीर्झाखान यास गुजराथच्या बंदोबस्तास पाठविलें, ( १५८३ ). मीर्झाखानानें मुज़्फरशहाचा पराभव करून अहंमदाबादचा बंदोबस्त केला. ह्या पराक्रमाबद्दल अकबरानें खूश होऊन मीर्झाखानास खानखानान ही पदवी दिली. अकबर व जहांगीर ह्यांच्या कार्किर्दीत हा सरदार फार प्रमुख होता. पुढें सन १५९० त मीर्झाखानास अकबरानें परत बोलावून अजीज कोका यास पुनरपि गुजराथचें काम दिलें त्या वेळीं मुज्फरशहा रानावनातून भटकत होता, त्यास कच्छ प्रांतांत अजीज कोकाचा मुलगा अब्दल्ला ह्यानें पकडिलें. तेथून जुनागडास येत असतां रस्त्यांत मुज्फरनें वस्त्र्यानें आपली मान कापून आत्महत्या केली, ( स. १५९२ . त्याचा मुलगा बहादूर ह्यानें पुढें बरेच दिवस बंड चालविलें. तो जहांगीरच्या वेळेस स. १६१४ त मरण पावला. इकडे स. १५९० त अजीज कोका गुजराथचा बंदोबस्त केल्यावर, बादशहाच्या परवानगीशिवाय मक्केस निघून गेला. तेव्हां अकबरानें गुजराथची सुभेदारी आपला मुलगा मुराद यास दिली. त्यास पुढें अहंमदनगरास जावें लागलें, आणि तिकडे मुराद मरण पावल्यावर अजीज कोका मक्केहून परत आला होता, त्यास पुनरपि अकबरानें गुजराथच्या सुभ्यावर नेमिलें. अकबर मरण पावला त्या वेळेस हाच गृहस्थ गुजराथच्या कामावर होता. कोका म्हणजे दूधभाऊ. अजीज हा अकबराच्या प्रमुख सरदारांपैकीं असून त्याची एक मुलगी मुराद यास व दुसरी खुस्रूस दिलेली होती.

( इ. ) बंगाल, ( १५७५ ).—आपल्या बापास बंगाल्यांत जाच झाला, सबब तो सधन प्रांत जिंकून आपलें राज्य एकछत्री करण्याची अकबरास मोठी उत्कंठा होती. बंगाल, बहार व ओढ्या ह्या तीनही प्रांतांवर सूरवंशी सुलतानांचे अफगाण अंमलदार स्वतंत्र कारभार करून होते. पहिला अंमलदार ताजखान म्हणून होता. तो मेल्यावर त्याचा भाऊ सुलेमान कारभार करूं लागला. प्रथम तो तांडा येथें राहत असे, पण पुढें पाटणास गेला. तांडा हें गोगरा नदीच्या काठीं अयोध्येच्या दक्षिणेस आहे. सुलेमान स. १५७२ त मेल्यावर त्याचा मुलगा दाऊद कारभार पाहूं लागला. सुलेमाननें सामदामानें वागून अकबराशीं तंटा उपस्थित केला नाहीं. पण दाऊद एकदम स्वातंत्र्य धारण करून अकबरास जुमानीना. तेव्हां अकबरानें स्वतः स्वारी करून पाटणा शहर काबीज केलें, ( स. १५७४ ), आणि दर्यापुरपर्यंत दाऊदचा पाठलाग केला. तेथून अकबर परत आग्र्यास गेला, तो पुन-

रपि बंगाल प्रांतात कधीं गेला नाहीं. परत येताना अकबरानें मुन्यिमखान व तोडरमल्ल ह्या दोन सरदारास बंगालची कामगिरी पुरी करण्यासाठी ठेविलें. ह्या दोघा सरदारांच्या दाऊदखानाबरोबर दोन तीन लढाया झाल्या. दाऊदखान प्रथम तांडा येथें पळून गेला, आणि त्याने लाबून बंडाळी चालविली. सन १५७५ त बंगाल, बहार व ओढ्या हे तीनही प्रात अकबराच्या अमलाखालीं आले. मुन्यिमखान हा ह्याच वेळेस तांडा येथें मरण पावला, तेव्हा त्याच्या जागी हुसेन कुलीखान ऊर्फ खानजहान ह्याची नेमणूक झाली तो बहूरामखानाच्या बहिणीचा मुलगा होता त्याच्या अगीं बहूरामची तडफ होती. त्याने दाऊदचा जोराने पाठलाग करून त्यास पकडून ठार मारिलें. पुढें स. १५७८ त खानजहान मरण पावल्यावर बंगाल्यात पुनरपि बंडाळी चालू झाली, तेव्हा नवीन जिंकिलेल्या प्रातातून जबरीनें पुष्कळ वसूल गोळा करण्यासाठी लहान मोठे अनेक अधिकारी अकबराने त्या प्रातावर सोडिलें, त्यास रयत त्रासून गेली. फौजेत ठेवावयाचे घोडे सरकारात पसंत करिताना, त्याजला डागून खूण करीत, त्यामुळे घोडे मिळेनातसे झाले, आणि फौजेत भरती होईना. हा असंतोष वाढून बंगालचा नवीन अमलदार मुज्फरखान ह्याचा तांडा येथे खून झाला, ( १५८० ). ह्या बंगालच्या बंडखोरास अकबराचा मावत्र भाऊ मीर्झा हकीम ह्याची काबुलातून मदत होती. पण व्यसनी व भित्रा असल्यामुळें तो काबुलातून बहेर आला नाहीं. नाही तर त्याजपासून अकबरास फार त्रास झाला असता स. १५८१ त हकीमवर नजर ठेवण्याकरिता अकबर स्वतः पंजाबातून थेट काबूल येथे गेला पण हकीमची त्याची प्रत्यक्ष भेट न होऊन आणि हें प्रकरण ज्यास्त वाढवूं नये असा शहाणपणाचा बेत करून, अकबर परत आला. काहीं वर्षांनीं बंगालचा कारभार राजा मानसिंह यास मिळाला त्या प्रातात आणखी बरेच दंगे झाले, पण अकबराच्या फौजेनें त्या सर्वांचा बंदोबस्त केला ( १५९२ ) तरी बंगाल्यातील बंड अकबराच्या कारकिर्दींत कायमचे मोडले नाहीं पुढें जहागीरच्या कारकिर्दींत तेथे स्वस्थता झाली.

( ई. ) **काबूल**, ( १५७९ ).—सन १५७५ पासून अकबराची तीन चार वर्षें शाततेत गेलीं. त्या अवकाशात त्यानें राज्यव्यवस्थेंत कित्येक सुधारणा केल्या, आणि सिक्री व आग्रा येथें इमारती बाधिल्या. तो बहुशः दिल्लीस न राहता ह्याच दोन ठिकाणीं राहत असे. सन १५७९ त त्याचा भाऊ महंमद हकीम मीर्झा काबुलास राज्य करीत होता, त्यानें राज्यलोभानें पंजाब प्रांतावर स्वारी केली पंजाबात राजा मानसिंह कारभारावर होता, त्याचा हकिमानें पराभव केला. हें वर्तमान कळताच

अकबर एकदम पंजाबांत गेला. त्यासरशी हकीम परत काबुलास गेला. शहाजादा मुराद यास अकबरानें फौज देऊन हकिमाचा पाठलाग करण्यास काबुलास पाठविलें, परंतु मुरादाचा पराजय झाला, तेव्हां अकबरानें स्वतः जाऊन हकिमाची खोड मोडिली. काबूल प्रांताचें काम त्यानें पुनरपि हकिमास दिलें, तरी तो पुनः कदाचित् दंगा करील, म्हणून जयपुरचा राजा भगवानदास यास काबूल येथें ठेविलें. परत येतांना अकबरानें अटकचा किल्ला पुनः बांधिला. हकीम मीर्झा स. १५८५ त मरण पावला. त्यासही दारूचें व्यसन असून, मरणसमयीं त्याचें वय फक्त ३१ वर्षांचें होतें. हकीमच्या मृत्यूची वार्ता ऐकून अकबरानें लगेच राजा मानसिंहास काबुलास पाठविलें; आणि आपणही स्वतः पंजाबांत गेला. मानसिंहानें काबुलांतील घोटाळे मोडून सर्व पक्षांस संतोषकारक अशी व्यवस्था केली. स. १५८९ त अकबर पुनः काबुलांत गेला. तेथें दोन महिने त्याचा मुक्काम होता. तेव्हां त्यानें पूर्वजांच्या कबरींचें दर्शन घेतलें. परत येतांना बहरामखानचा मुलगा खानखानान ह्यानें अकबरास बाबराच्या आत्मचरित्राची हस्तलिखित प्रत नजर केली.

( उ. ) **काश्मीर, ( १५८७ ).**—काश्मीरसारखा सुंदर प्रदेश आपल्या ताब्यांत असावा अशी अकबराची मोठी इच्छा होती. ह्या समयास काश्मिरांत पुष्कळ अव्यवस्था चालू होती. तरी तो प्रांत जिंकण्यास अकबरास फार अडचणी होत्या. तेथील रस्ते अत्यंत बिकट असून लोक हट्टी व शूर होते. काश्मीरचा सुलतान यूसुफ् अकबराचें सार्वभौमत्व कबूल करीना. तेव्हां अकबरानें मोठी फौज व कित्येक नामांकित सरदार पंजाबांत गोळा करून त्यानें सर्व सरहद्दीवरील प्रदेशांत रवाना केले. त्यांत काश्मिरावर राजा भगवानदास ह्यास पाठविलें, त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. दुसऱ्या वर्षी महंमद कासीमखान ह्याचे हाताखालीं जी फौज गेली, तिनें काश्मीरच्या राजास पकडून आणिलें. तेव्हां काश्मीर प्रांत अकबराच्या राज्यास जोडला जाऊन, तेथील राजास अकबरानें बहार प्रांतांत लहानशी जाहागीर देऊन ठेविलें.

पण त्या बाजूचे तंटे अद्यापि मिटले नव्हते. पेशावरच्या पलीकडील अफगाण लोकांस जिंकण्याची अकबराची इच्छा होती. हे अफगाण युसफझै जातीचे असून ते हिंदुकूश पर्वताच्या पहाडी प्रदेशांत राहत असत. वर ज्या अनेक फौजा अकबरानें पाठविल्या म्हणून सांगितलें, त्यांत झैनखान कोका, मागें सांगितलेला अकबराचा दूधभाऊ, ह्यास त्या अफगाण लोकांवर अकबरानें पाठविलें. झैनखानाचा बाप नेहमीं हमीदाच्या हौद्याजवळ हजर असे. त्याची बायको लहानपणीं अकबराची दाई होती.

ह्या स्वारींत झैन खानाचा पराजय होऊन त्याची बहुतेक फौज कापली गेली. एवढा मोठा फौजेचा नाश अकबराच्या एकंदर कार्किर्दींत कधीं झाला नाही. अगोदरच जेव्हा खानाने ताबडतोबीने अकबराकडे मदत मागितली तेव्हां ह्या कमावर कोणास पाठवावें हा विचार चालून, अबुल् फज़्ल् व बीरबल ह्या दोघाच्या नावाच्या चिठ्या टाकून पाहता, बीरबलाच्या नावाची चिठ्ठी निघाली. त्याप्रमाणे बीरबलाची रवानगी स्वारींत झाली. वास्तविक बीरबलाच्या मनात जावयाचे नव्हतें, आणि त्यास युद्धाचा प्रत्यक्ष अनुभवही नव्हता. झैनखान अनुभवी आहेच, तेव्हा बीरबल गेला तरी हरकत नाही अशा समजुतीनें अकबराने त्यास रवाना केलें आपणास लोकानीं भित्रा म्हणूं नये, म्हणून बीरबलही मोठ्या हिंमतीनें गेला डोंगराळ प्रदेशात जेव्हा मोगल फौज शिरली, तेव्हा अफगाण लोकानीं रात्रीच्या समयीं तिचा चागलाच समाचार घेतला. त्याच्या परत येण्याच्या सर्व वाटा बद झाल्या. राजा बीरबल व त्याचे आठ हजार लोक हे एका भयंकर घाटात अफगाण लोकाचे हातून ठार झाले, ( फेब्रुवारी १५८६ ). दुसऱ्या बाजूनें खैबर घाटातून तोडरमल्ल व राजा मानसिंह गेले होते, त्यास मात्र काहीं जयप्राप्ति झाली तेव्हा ह्या अफगाण लोकाबरोबर मिटते घेऊन अकबरानें आपली फौज परत आणिली. ह्या स्वारीत त्याची जी खराबी झाली, तशी पूर्वीं कधी झाली नव्हती. या बाजूचे अफगाण मोगलाच्या अंमलाखालीं आले नाहींत.

बीरबलाच्या मृत्यूचें वर्तमान अकबरास अटक येथें समजून त्यास अतोनात दुःख झाले, आणि सेनापति निवडण्याचा प्रश्न आपण चिठ्या टाकून ठरविला ह्याबद्दल त्यानें अत्यंत खेद केला अटक येथे अकबर तीन महिने होता, त्या अवधीत तोफा ओतणें, गोळीबार उडविण्याचा अभ्यास करणे, सरहद्दीच्या बंदोबस्ताची व्यवस्था लावणें, आणि जिंकिलेल्या प्रातात वसुलाची व इतर तजवीज करणे, ह्या गोष्टी तो अहर्निश करीत होता. अटक येथे काश्मीरचा यूसफ्शहा त्यास शरण आला. तथापि काश्मीर प्रांत पूर्णपणे ताब्यात आला नाहीं, म्हणून आग्र्याचा किल्ला बाधणारा कासीमखान ह्यास त्याने काश्मिरात पाठविलें. त्याने तो प्रात नीट रीतीनें जिंकिल्यावर, एप्रिल सन १५८९त अकबर स्वतः काश्मीर प्रातात गेला, आणि दोन महिन्यांत तेथील कारभाराची सुव्यवस्था लावून तेथून तो काबुलास गेला. सेप्टेंबरात त्यास तेथे अशी खबर कळली, कीं आपला हुशार मुत्सद्दी राजा तोडरमल्ल हा मरण पावला. ह्या बातमीनें त्यास अत्यंत दुःख झाले, आणि तो एकदम लाहोरास परत आला.

तोडरमल्ल हा शेरशहाच्या हाताखालीं तयार झालेला गुजराथच्या स्वारीत प्रथम

अकबराचे नजरेस आला. त्यानंतर त्यानें अनेक मोठमोठीं कामें केलीं राजा बीरबल मरण पावल्यावर मानसिंह व तोडरमल्ल ह्या दोघांनीं सरहद्दीवरील अफगाण लोकांची खोड मोडून बीरबलाच्या मरणाचा सूड उगविला. पुढें वृद्धापकाळ झाल्यामुळें तोडरमल्लानें गंगेच्या कांठीं जाऊन राहण्याची परवानगी मागितली. प्रथम अकबरानें कबुली दिली. तथापि लाहोरासच स्वस्थ बसून होईल तो उद्योग करा, असें अकबरानें त्यास सांगून हरिद्वाराहून परत आणविलें. तेव्हांपासून तो लाहोरास होता. त्याच्या अंत्यविधीस राजा भगवानदास हजर होता, तोही स्मशानांतून परत आल्याबरोबर लगेच मरण पावला. एवंच हे दोन मोठे सरदार अकबराच्या कामगिरीवर असतां एकदम परलोकवासी झाले.

( ऊ. ) **सिंध प्रांत,** ( सन १५९२ ).—मीर्झा अजीज कोका हा गुजराथ प्रांताचा सुभेदार होता, त्यानें सन १५८९ त काठेवाडांतील जामराजास जिंकण्याचा प्रयत्न केला, पण तो सफल झाला नाहीं पुढचे वर्षी त्यानें जुनागड काबीज केलें. सिंध प्रांतांत अर्घून घराण्याचा शेवट होऊन तेथें कित्येक इराणी सरदार अंमल करीत होते. त्यांचे आपसांत तंटे लागले होते, ही संधि साधून अकबरानें लाहोराहून उत्तरेच्या बाजूनें सिंध प्रांतावर फौज रवाना केली. स्वान हें रेल्वे स्टेशन सिंधूचे पश्चिम तीरावर हल्लीं आहे तेथें **सावान** नांवाचा किल्ला नाक्यावर होता, त्याजवर मोगल फौजेनें हल्ला केला. गुजराथची फौज घेऊन मीर्झा अजीजही दक्षिणेकडून सिंध प्रांतावर गेला होता. मीर्झा जानीबेग नांवाचा गृहस्थ सिंध प्रांतांत स्वतंत्र कारभार करीत होता, तो अकबराच्या फौजेशीं लढण्याकरितां होड्यांतून मोठा तोफखाना घेऊन आला. लढाई निकराची झाली. आरंभीं जानीबेगनें मोगलांस मागें हटविलें. तेथें आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून मीर्झा अजीज खानानें मोगल फौज ठठ्ठा शहर काबीज करण्यास पाठविली. त्याजबरोबर जानीबेगनेंही आपली अर्धी फौज ठठ्ठा शहरावर रवाना केली. पण असें केल्यामुळें मोगल फौजेस इकडे जयप्राप्ति झाली, सिंध प्रांत अकबराच्या ताब्यांत आला आणि जानीबेग ह्यास मोगल लष्करांत नोकरी मिळाली.

**कंदाहार,** ( सन १५९४ ).—इराणची मदत घेऊन हुमायूननें कंदाहार काबीज केलें होतें. त्या वेळेस इराणचा शहाजादा मरण पावल्यामुळें ठरलेल्या करारान्वयें तें ठिकाण इराणच्या शहास मिळालें नाहीं. हुमायून गादीवर बसण्याच्या सुमारास इराणच्या शहानें आपली फौज पाठवून कंदाहार काबीज केलें, तें सन १५९४ पर्यंत इराणच्या ताब्यांत होतें. ह्या वर्षी अकबरानें आपली फौज कंदाहारवर पाठविली.

तेव्हां लढाई केल्याशिवाय किल्ला व सभोंवारचा प्रदेश अकबराच्या स्वाधीन झाला. कंदाहार येथे जो इराणी सरदार होता, त्यास अकबराने आपल्या फौजेंत नोकरीस ठेवून त्यास मुलतान प्रांताची सुभेगिरी दिली.

सुलतान शहा आब्बास हा इराणांत राज्य करीत होता स्वराज्यातच त्यास पुष्कळ काम असल्यामुळे कंदाहार परत घेण्याच्या भरीस तो पडला नाहीं त्याची व अकबराची दोस्ती होती. कंदाहार ताब्यात आल्याने अकबराच्या ताब्यात उत्तर अफगाणिस्तानपासून बंगालच्या उपसागरापर्यंतचा सर्व प्रदेश आला, म्हणजे सिंधुनदीच्या पश्चिमेकडील वडिलोपार्जित सर्व राज्य त्याच्या कबज्यात आलें. काश्मीर, बंगाल, बहार, ओढ्या व आसाम, हे प्रांत त्याच्या ताब्यात आलेच होते. गुजराथचा बंडखोर सुलतान मुजफरशहा मरण पावल्यामुळे, त्या प्रांतांतील बखेडे नाहींसे झाले. उदेपुरच्या राण्याशिवाय इतर सर्व रजपूत राजांनीं त्याचें सार्वभौमत्व कबूल केलें. एवंच नर्मदेच्या उत्तरेस जेवढा प्रदेश अकबराच्या ताब्यात आला, तेवढा पूर्वी कधीही एका सुलतानाच्या अमलाखाली नव्हता येणे प्रमाणे सर्वत्र स्वस्थता झाल्यावर दक्षिण देशाकडे लक्ष देण्यास अकबरास फुरसत मिळाली.

**( ऋ महाराष्ट्र,–अहंमदनगर,–खानदेश–**( स. १५९५–१६०० ). उत्तरेकडील भानगडींत गुंतला असता दक्षिणेत काय प्रकार घडत आहेत इकडे अकबरानें दुर्लक्ष केले नव्हतें सन १५७२ त अहंमदनगरच्या निजामशहानें वऱ्हाड प्रांत जिंकिला, त्यामुळे निजामशहाची सत्ता वाढली हें अकबरास खपलें नाही पण प्रथम काही काळ त्यास या बाजूस लक्ष घालण्यास सवड नव्हती पुढें अहमदनगरच्या राज्यात घोटाळे उत्पन्न झाले दक्षिणी व परदेशी ह्या पक्षाचे तंटे माजून त्यामुळे राजधानींत कहर उसळला. बुऱ्हाण निजामशहा पूर्वीच अकबराकडे येऊन राहिला होता, तो अहंमदनगरास जाऊन निजामशाहीच्या तख्तावर बसला. सन १५९० त दक्षिणच्या सर्व राजाकडे वकील पाठवून त्यास आपले सार्वभौमत्व कबूल करण्याविषयीं अकबरानें निरोप धाडिले. परंतु कोणीच ती गोष्ट कबूल केली नाही पुढें आपला पुत्र मुराद ह्यास त्यानें गुजराथचा सुभेदार नेमून पाठविलें, आणि जेणेकरून अहमदनगरात आपला प्रवेश होईल असे उपाय करण्याविषयी त्यास ताकीद दिली. त्याच वेळीं बहरामखानचा मुलगा मीर्झाखान ऊर्फ खानखानान ह्यास फौज देऊन अकबरानें दक्षिणेंत पाठविलें. मीर्झाखान प्रथम मांडवगडास गेला. इतक्यात बुऱ्हाणशहा मरण पावून अहंमदनगरास गादीविषयीं तंटे लागले, आणि तेथच्या वजिरानें गुजराथचा अमलदार-

शहाजादा मुराद ह्याजकडे मदत मागितली. तेव्हां मुरादही बापाची परवानगी घेऊन अहंमदनगरास गेला. मीर्झाखानाची व त्याची गांठ पडली. तेव्हां अहंमदनगरच्या फौजेचें आधिपत्य चांदबिबीनें स्वीकारून बादशहाशीं लढण्याची सिद्धता केली. मोगलांनीं नगरास वेढा घातला, त्या वेळीं चांदबिबीच्या शौर्यापुढें मोगल फौजेचें कांहीं एक चाललें नाहीं. अखेरीस दोनही फौजा टेंकीस आल्यावर वऱ्हाड प्रांत मोगलांस देऊन चांदबिबीनें तह केला, ( १५९६ ) मुराद वऱ्हाड प्रांत ताब्यांत घ्यावयास गेला, पण त्यास तो मिळाला नाहीं. त्या प्रांताबद्दल सर्व दक्षिणच्या राजांस लोभ असल्यामुळें ह्यांनीं एक मत करून मोगलांशीं लढण्याची तयारी केली. गोदावरीच्या कांठी सुपें सोनपत येथें तीन दिवस निकराचें युद्ध झालें, परंतु जयापजयाचा निकाल लागला नाहीं. मीर्झाखान व मुराद यांचें वांकडें आलें. मीर्झाखान शत्रूस फितूर आहे असा अकबरास संशय आला, तेव्हां त्यास परत बोलावून त्यानें आपल्या भरवंशाचा सरदार अबुल् फज्ल् यास दक्षिणेंत पाठविलें. अबुल् फज्ल् हा त्या वेळीं अडीच हजार स्वारांचा मनसबदार होता. तो ताबडतोब बऱ्हाणपुरास आला. तेथचा अधिकारी बहादूरखान याची त्यानें मदत मागितली. ती बहादूरखानानें दिली नाहीं आणि अबुल् फज्ल् यास लांच देऊन परत लावण्याचा त्यानें प्रयत्न केला. तो प्रयत्न सफळ झाला नाहीं, आणि अबुल् फज्ल् एकटाच अहंमदनगरास आला. रस्त्यांत मुराद परत येत होता तो त्यास भेटला. तेथून मुराद वऱ्हाडांत गेला. अहंमदनगर आपल्या हातून काबीज होत नाहीं, ह्याजबद्दल त्यास अत्यंत लज्जा व खेद वाटत असून त्यांतच त्याचा मद्यपानाचा नाद अनावर झाला होता. खानदेशच्या बहादूरखानाच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें होतें. पुढें हा शहाजादा बऱ्हाणपुरच्या दक्षिणेस शहापुर ( ऐने अकबरी—जालनापुर ) येथें एकाएकीं मरण पावला, [ १५९८ ]. तेव्हां इतर सरदारांनीं दिल्लीस परत जाण्याविषयीं अबुल् फज्ल् यास आग्रह केला. ही गोष्ट त्यास बरी न वाटून तो तसाच अहंमदनगरवर चाल करून गेला, आणि तिकडचे घोटाळे व आपल्या सरदारांची फितुरी पाहून, त्यानें खुद्द अकबरास तिकडे येण्याविषयीं लिहिलें. आज चौदा वर्षें अकबर सिंधु नदाच्या आसपासच्या प्रांतांत राहत होता. तेथून निघून सन १५९९ ह्या वर्षीं प्रथमच तो नर्मदा उतरून दक्षिणेंत बऱ्हाणपुरास आला. त्यापूर्वीच दौलताबादचा किल्ला मोगलांनीं घेतला होता. अहंमदनगर काबीज करण्याकरितां अकबरानें आपला मुलगा दानियाल व खानखानान यांस रवाना केलें. तेथें बेबंदशाही चालू होती. कोणी दुष्टांनीं पराक्रमी चांदबिबीचा खून केला, ( जुलई १६०० ), तेव्हां निजामशाहीस

कोणीच त्राता उरला नाहीं, आणि अहंमदनगर राजधानी अकबराच्या फौजेनें काबीज केली, ( सन १६०० ) तरी सर्व राज्य कांहीं अकबरास प्राप्त झालें नाहीं. मलिकंबर वगैरे कित्येक मुत्सद्यांनीं दुसऱ्या ठिकाणी निजामशाहीचे तख्त नेऊन कांहीं दिवस राज्य चालविले. अकबराचे सरदार आपल्या कामात कसूर करीत, म्हणून ही मोहीम फत्ते झाली नाहीं. [ मु. रि. भा. १ निजामशाही पहा ]

अहंमदनगरास असा प्रकार चालू असता खानदेशच्या सुलतानाचा अकबराशीं जेबनाव झाला होता. मोगल फौज दक्षिणेत आली, तेव्हांपासून त्या सुलतानानें अकबराचें स्वामित्व कबूल करून स्वत चा बचाव केला होता पुढें अकबराने एक वर्षपर्यंत त्या सुलतानाबरोबर लढून अशीरगडचा किल्ला व खानदेश प्रात काबीज केला. वऱ्हाड व खानदेश ह्या प्रांताचा कारभार त्याने दानियाल यास सागितला आणि खानखानान यास त्याचा वजीर नेमिलें. विजापुर व गोवळकोंडें येथील सुलतानांकडून नजराणे घेऊन वकील आले होते त्यांचा स्वीकार करून, अकबराने आपला मुलगा दानियाल याचे लग्न विजापुरच्या शहाजादीशीं केले. हें लग्न पैठण येथें मोठ्या थाटानें झालें. पुढें अहंमदनगरकडील युद्धाचें काम अबुल् फज्ल् याजवर सोपवून अकबर परत आग्र्यास गेला. त्यानें अबुल् फज्ल् यास चार हजाराची मनसब दिली. ह्या स्वारींत अकबराच्या तोफखान्यावर इंग्रज लोक नोकरीस होते.

**५. सलीमचें दुर्वर्तन**—अकबराचीं शेवटचीं वर्षें दु खात व त्रासांत गेलीं. स. १५९७ च्या नोव्हेंबरात तो काश्मिरातून परत आला. काश्मिरांत त्याने एकंदर तीन सफरी केल्या. पहिली स. १५८९ त, दुसरी १५९२ त, व ही १५९७ तली तिसरी ह्या वेळीं परत येतांना मुरादचा मुलगा मीर्झा रुस्तम वारला. तो अकबराचा फार आवडता होता. त्याच्या मृत्यूने त्यास फार दुःख झाले. अजीजखानाची आई जिजी अनागा रुस्तमची पणजी होत होती, तिनें त्यास वाढविलें होते. एकंदरींत मुलापेक्षां सुद्धा नातवंडावर अकबराची मर्जी विशेष होती. जहागीरचे मुलगे खुस्रू व खुर्रम् ह्यास तो अगदीं जीव कीं प्राण करी. रुस्तमच्या मृत्यूनतर दीड वर्षानें त्याचा बाप मुराद वारला, आणि त्याच समयीं अहंमदनगरची स्वारी फसल्याचें वर्तमान आलें. त्या योगानें अकबराची कबर अगदीं खचून गेली.

पुढें सलीमनेही त्रास देण्यास सुरुवात केली. पूर्वीपासून सलीम बंडखोर व खुनशी होता. अकबरानें इतर मुलास राज्यात कामें दिलीं, तरी सलीमास बरेच दिवस दिलीं नाहींत. एकदां त्यास मध्यआशियाखंडातील स्वारीवर जाण्यास अकबरानें सागितलें,

पण तो जाईना. एकदां उदेपुरावर पाठविलें असतां, मार खाऊन परत आला. लाहोर येथें अनारकळी नांवाची अकबराची एक राख होती, तिजवर सलीमचें मन गेलें हें ऐकून अकबरानें तीस जिवंत पुरून टाकिलें. सलीमनें पुढें तिजवर टुमदार थडगें बांधिलें. लहानपणीं फैजी हा सलीमचा शिक्षक होता. पण त्यांचें बिलकुल पटलें नाहीं. अशी एक गोष्ट सांगतात, कीं सलीम एकदां अबुल् फज्ल्च्या घरीं एकाएकीं गेला. तेव्हा तेथें चाळीस लेखक कुराणाच्या एका मोठ्या टीकेच्या प्रती उतरून घेत आहेत असें त्यास आढळलें. ही विस्तृत टीका फज्ल्चा बाप मुबारीक ह्यानें लिहिलेली होती. सलीमनें ते सर्व कागद तसेच नेऊन बापास दाखवून कळविलें, कीं ‘ अबुल् फज्ल् तुमच्या तोंडावर मात्र नवीन धर्माची बढाई मारतो, पण अंतःकरणांत त्याची भक्ति कुराणावरच आहे. ह्या प्रती तो मोठमोठ्या राजेरजवाड्यांकडे पाठविणार आहे. असे हे तोंडपुजे लोक तोंडावर गोड बोलून तुम्हांस फसवितात. ’ हें ऐकून अकबराची फज्ल्वर थोडीशी इतराजी झाली. ह्याजबद्दल फज्ल् ह्यास अत्यंत वाईट वाटलें. तो म्हणाला, ‘ अलीकडे बरेंच दिवस, कामांत असल्यामुळें, सलीमच्या भेटीस जाण्यास मला सवड झाली नाहीं. त्यावरून त्याची मर्जी जाऊन माझी खराबी करण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. माझे द्वेष्टे पुष्कळ आहेत. त्यांनीं आगींत तेल ओतलें आणि वाटेल तसें खऱ्याचें खोटें केलें. ’ वरील इतराजीमुळेंच अकबरानें फज्ल् ह्यास अहंमदनगरच्या स्वारीवर काढिलें. कांहीं दिवस गेल्यावर पुनः अकबर व फज्ल् ह्यांचें प्रेम पूर्ववत् जुळलें. एकंदरींत सलीमचा स्वभाव दुष्ट होता. एकदां त्यानें आजी हमीदाचा अतिशय अपमान केला. ह्या बाईचें प्रस्थ घरांत मोठें असून तिची अवज्ञा करण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. सलीम होडींतून अलाहबादेस जात असतां रस्त्यांत तिचा मुक्काम होता; तिनें त्यास सांगून पाठविलें, ‘ मी तुझ्या भेटीस येत आहें; जरा थांब. ’ ह्या वेळीं सलीमचें व बापाचें पटत नव्हतें. तेव्हां त्यास दोन गोष्टी सांगून दोघांची गोडी करून द्यावी अशी बाईची इच्छा होती. तिचा निरोप ऐकून सलीम थांबला नाहीं. उलट त्यानें आपल्या होडीवाल्यांस निकड लावून ज्यास्तच त्वरेनें पोबारा केला. बिचारी बाई फार कष्टी होऊन परत आली. अलाहबादेस सलीमनें बापाचे सर्व कामदार काढून, आपल्या मर्जींतली मंडळी नेमण्याचा सपाटा चालविला; आणि बहार प्रांताचा सर्व वसूल स्वतः घेऊन तिकडे तो बादशहा म्हणून कारभार करूं लागला. हा प्रकार स. १६०० सालीं घडला. पुढच्या वर्षीं बापाशीं युद्ध करण्याच्या बेतानें तो अलाहबादेहून निघाला. पण त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं. मात्र अबुल् फज्ल् दक्षिणेंतून

परत येत असतां ओर्च्छांचा राजा वीरसिंह ह्याच्या मार्फत त्याने त्याचा खून करविला. अबुल् फज्ल् आपल्या वाइटावर आहे, तो जिवत असे पर्यंत आपले बेत सिद्धीस जावयाचे नाहींत, अकबराच्या पश्चात् आपणास राज्य मिळू नये, अशी पण तजवीज ह्या करून ठेवील, असे सलीमच्या मनानें घेतलें, आणि त्यास ह्या जगातून नाहींसा करण्याचा विचार त्याने ठरविला ओर्च्छांचा राजा वीरसिंहदेव हा पुष्कळ दिवस सलीमजवळ नोकरीस होता. ह्या वेळी तो अलाहबादेसच होता. अबुल् फज्ल् ओर्च्छांच्या वाटेनें येत आहे असें कळताच, सलीमनें ही कामगिरी वीरसिंहास सांगितली, आणि ती फत्ते झाल्यास मोठी इनामें त्यास देऊं केलीं काम काही विशेष कठिण नव्हतें ओर्च्छांचा प्रदेश डोंगरांनीं व जंगलानी व्यापिलेला होता. त्यातूनच फज्लूची वाट होती अबुल् फज्ल् उज्जनीस आला, तेव्हा वीरसिंह आपणास मारण्यास टपला आहे असे त्यास कळलें. ओर्च्छांचा रस्ता सोडून दुसरीकडून आग्र्यास जावे असे त्यास पुष्कळांनीं सांगितले. पण त्याने तें मानिलें नाही. तो तसाच पुढें गेला. ग्वाल्हेरच्या दक्षिणेस अंत्रीनजीक त्याजवर वीरसिंहाच्या लोकांनी छापा घालून त्यास ठार मारिलें, (ता. १२ आगष्ट, १६०२) आणि त्याचे शीर अलाहबादेस जहांगीरकडे पाठविलें. जहांगीर आपल्या आत्मचारित्रात म्हणतो, 'फज्लूच्या मृत्यूने माझ्या बापास अत्यंत दुःख झालें खरे, तथापि त्याचा एक परिणाम चांगला झाला. मला समक्ष जाऊन बापाशी उघडपणें बोलता येऊ लागलें, आणि हळू हळू मजविषयीं त्याचे मन साफ झालें' जहांगीरनें फज्लूचें शीर गलिच्छ जागीं टाकून दिलें त्याच्या धडावर अंत्री येथे लहानसें थडगे अबुल् फज्लूचे म्हणून अद्यापि दाखविण्यात येतें

ह्या भयंकर कृत्याबद्दल अकबरानें मुलास कडक शिक्षा केली नाहीं, ह्यावरूनच त्याचे मन आता पुष्कळच दुर्बल झालें होतें असे दिसतें. वीरसिंहाचा छळ करून अकबरानें आपल्या मनाचें समाधन करून घेतलें. वीरसिंह चार पांच वर्षें जंगलात लपून होता. जहांगीरनें पुढें त्यास ओर्च्छांचे राज्य दिलें. सलीमनेंच फज्लूचा खून करविला ह्याबद्दल अकबराच्या मनात संशय नव्हता. अकबर कबुतरें उडवीत असलेलीं पाहत बसला असता, फरीद बक्षीनें येऊन, अबुल् फज्लूचा खून झाल्याची बातमी त्यास कळविली. त्याबरोबर एकदम मोठ्यानें ओरडून अकबर बेशुद्ध पडला. पुढें काही वेळाने शुद्धीवर आला, पण कित्येक दिवसपर्यंत त्याचे अश्रु खळले नाहीत. तो एकसारखा सलीमावर चडफडूं लागला, आणि खरें म्हटलें म्हणजे त्यास त्यानें क्षमा केली असे कधींच झाले नाहीं भाग इतकाच कीं, कौटुंबिक पेंचात सांपडल्यामुळें, मुलास शिक्षा करण्याचें

साधन त्यास राहिलें नाहीं. स्वतःच्या मुलास शिक्षा करण्याचें काम अकबरा सारख्यासही अशक्य झालें. अबुल् फज्ल्च्या ह्या दुःखानें अकबर पुढें मरेपर्यंत सदैव अत्यंत विव्हळ होत असे. तो असें सुद्धां म्हणे कीं, ' सलीमास राज्यच पाहिजे होतें, तर त्यानें मलाच मारावयाचें होतें. बिचाऱ्या फज्लास मारून त्यास काय मिळालें ! ' कांहीं दिवस सलीमाशीं त्यानें कठोरपणा धारण केला. पण प्रत्यक्ष त्याची आई, आत्या गुलबदन बेगम, त्याची बायको सलीमा सुलताना ह्यांनीं नाना प्रकारें सलीमबद्दल अकबरापाशीं रदबदली केली. सलीमास समजावून आणण्याचें त्यांनीं आपल्या अंगावर घेतलें. अकबरानें कबुली देतांच सलीमा सुलताना निघून अलाहबादेस गेली. 'अकबरानें तुला क्षमा केली आहे, ' ह्याची खात्री करण्याकरितां, तिनें एक हत्ती, एक घोडा व पोशाख असा नजराणा सलीमास दिला. अशा रीतीनें त्याची समजूत झाल्यावर तो येऊन बापास भेटला. बारा हजार मोहरा व जवळ जवळ एक हजार हत्ती एवढा नजराणा त्यानें बापास केला. दोघांची समजूत झाली. पण खरें म्हटलें तर अकबरानें सलीमास मनांतून क्षमा केली नव्हती. ह्याच सुमारास हुमायूनची सावत्र बहीण गुलबदन बेगम ८१ वर्षांची होऊन मरण पावली, ( ७ फेब्रुवारी, १६०३ ). हुमायून-नामा नांवाचा बहुमोल ग्रंथ तिनें लिहिलेला आहे.

सलीमची करामत ठाऊक असतांही त्यास पुनः अकबरानें फौज देऊन उदेपुरच्या राण्यावर पाठविलें अकबराचें दौर्बल्य वाढत होतें, याचें हें आणखी उदाहरण होय. सलीम सुमारें वीस मैल गेला असेल नसेल तोंच, माझ्या हातून ही कामगिरी होत नाहीं म्हणून तो रड सांगूं लागला. त्यावर अकबरानें त्यास अलाहबादेस निघून जाण्यास सांगितलें. सन १६०४ त बंगाल्यांत मानसिंहानें विजय मिळविल्याची बातमी येऊन अकबरास जरासें समाधान वाटलें पण सलीमच्या वर्तनानें त्याजवर विरजण पडलें. अलाहबादेस गेल्यावर सलीम इतका व्यसनाधीन झाला, कीं त्याच्यां-तलें मनुष्यपण बहुतेक नाहींसें झालें. त्याच्या एका कारकुनानें नोकरीचा राजीनामा दिला म्हणून त्यास त्यानें जिवंत सोलविलें, आणि त्याच्या दोघां सोबत्यांचे हातपाय तोडून जीव घेतले. अकबरास ही गोष्ट कळली तेव्हां तो मोठ्या उद्वेगानें बोलला, ' अरे, मी नुसती मुंगी चिरडण्यास भितों, मेलेल्या बकऱ्याची सुद्धां चामडी सोल-ण्यास मला धीर होत नाहीं, आणि ह्या माझ्या पोटच्या पुत्रानें मनुष्यप्राण्याची दशा अशी करावी ! ' त्या उद्वेगाच्या झटक्यांत तो स्वतः अलाहबादेस जाण्यास निघाला. थोडें अंतर गेल्यावर त्याची होडी पाण्यांत रुतली; आणि वादळ होऊन लोकांचे हाल

झाले. इतक्यात आई हमीदा अत्यत आजारी असल्याची बातमी आली, त्यामुळे तो लगेच परत आला त्याची आई ता. २९ ऑगस्ट १६०४ रोजी वारली तिची त्याची भेट झाली, पण ती शुद्धीत नव्हती. दिल्ली येथे हुमायूनच्या कबरेत तिचें दफन करण्यांत आले. तिला सर्व मंडळी परात ' मारियं मकानी ' म्ह० घराची मेरी असे म्हणत. आई वारल्याबद्दल सात्वन करण्यासाठी म्हणून सलीम नोव्हेबरांत अकबराकडे आला. बरोबर बापास खूश करण्यासाठीं त्याने नजराणेही पुष्कळ आणिले. बापानें ते स्वीकारिले, परंतु त्याचा राग कमी झाला नाही त्याने बारा दिवस सलीमास घुशालखान्यात कोंडून ठेविलें, तेवढ्या अवधींत त्यास दारू किंवा अफू बिलकुल दिली नाहीं त्याच्या वहिणी मात्र जाऊन त्यास भेटत असत त्याची कैद जास्त कडक करण्याचा अकबराचा विचार होता, परंतु त्याच समयी दानियाल अत्यत आजारी आहे, जगण्याची आशा नाही, अशी बातमी आल्याने, सलीमास कठोरपणा दाखविण्यास अकबराचे मन धजलें नाहीं त्यानें त्यास मोकळा करून पूर्वीचा मानमरातब दिला.

**६. मृत्यु, बायकामुलें.**—अकबराच्या कार्किर्दीस पन्नासावें वर्ष लागलें. सन १६०५ च्या एप्रिलात दानियाल बऱ्हाणपुर येथे मद्यातिरेकानेंच मरण पावला. तीनही मुलगे असे मद्यपी निघाले. तिघेही निरनिराळ्या हिंदु व मुसलमान स्त्रियाच्या पोटीं जन्मलेले होते तेव्हा अशीं व्यसनें आनुवंशिक असतील, तर त्याचा उगम कोठून व कसा झाला असावा ! अकबर मद्य व अफू याचें सेवन करीत असे, असा पुरावा आहे. त्याचा बाप, आजा व पणजा ह्या सर्वांस तीं व्यसनें होतीं असो. अकबराच्या सर्व मुलात दानियाल हाच विशेष हुशार व कर्तृत्ववान होता. सर्वांत बापाचा लाडका तोच होता. त्याच्या मृत्यूने अकबर अत्यंत हताश झाला. सर्व जग त्यास अंधारमय दिसूं लागले. मन अगदी भाबावून गेलें. त्यास पुढें आशातंतु कोठेंच दिसेना. त्याची प्रकृति क्षीण होत चालली, आणि सन १६०५ च्या सेप्टेंबर महिन्यात तो अगदी अंथुरणास खिळाला. पुढें तख्तावर कोणी बसावें ह्याजबद्दल वाटाघाटी चालू झाल्या. राज्य चालविण्यास सलीमाशिवाय दुसरा इसम लायक आहे असे अकबरास वाटत नव्हतें. पण मानसिंह हा खुस्रूचा मामा, व दुसरा प्रबल सरदार अजीजखान कोका हा खुस्रूचा सासरा होता. ह्या उभयतानीं खुस्रूच्या पक्षानें खटपट चालविली. आपल्या जिवास अपाय होईल अशी धास्ती सलीम यास पडून तो राजमंदिरात येईनासा झाला. शहाजादा खुर्रम् हा मात्र आज्या-जवळ सदा सर्व काळ बसलेला असे. सलीमनें आपणास भेटावें अशी अकबरानें वारं-

वार इच्छा दर्शविली. कायदेशीर हक्काच्या विरुद्ध ठराव करण्यास त्याचें मन धजेना. तेव्हां आपल्या पश्चात् सलीमनेंच राज्य चालवावें असें पुनः पुनः त्यानें सर्वांस जाहीर केलें, त्याबरोबर अजीज व मानसिंह सुद्धां सर्व सरदार निमूटपणें सलीमास मिळाले. मग सलीम राजवाड्यांत जाऊन बापास भेटला. अकबरानें सर्व अमीरउमरावांस जवळ बोलावून सर्वांचा शांतपणें निरोप घेतला. 'मीं कोणाचा अपराध केला असल्यास त्यांनीं मला क्षमा करावी,' असें मागणें मागून, त्यानें सलिमास सदुपदेश केला. 'कुटुंबांतील मनुष्यांचा आणि दोस्त व आश्रित मंडळीचा चांगला परामर्ष घेत जा. राजघराण्यांतील बायकांच्या नेमणुकांस यत्किंचित् धक्का लावूं नको. ज्यांनीं ज्यांनीं मजबरोबर इतकीं वर्षें श्रम करून मला कीर्ति मिळवून दिली, त्यांशीं तूं वांकडें धरूं नको.' वगैरे निर्वाणीचीं बोलणीं बोलून, आणि मुसलमानी धर्मोप्रमाणें कलमा म्हणून, हा थोर व पराक्रमी बादशहा, तारीख १५ ऑक्टोबर सन १६०५ ह्या वर्षी, त्याचें त्रेसष्टावें वर्ष संपलें त्याच दिवशीं, आग्रा येथें मरण पावला.

आपण दैविक अंशावतार आहों; इतर मनुष्यप्राण्यांहून आपण ज्यास्त जगणार; ही अकबराची बढाई, बदाऊनी म्हणतो, क्षणांत नष्ट झाली. तथापि त्याच्या सर्व पूर्वजां पेक्षां, आणि औरंगजेबशिवाय त्याच्या बहुतेक अनुजांपेक्षां अकबर ज्यास्त जगला. मरणापूर्वी त्यानें 'सदरजहान' म्हणजे धर्माध्यक्ष यास जवळ बोलाविलें, आणि त्याजकडून कुराणांतील कलमा वाचविला. नंतर वर सांगितल्याप्रमाणें पुनः सलिमास उपदेश करून पुनरपि त्यानें सदरजहानकडून कलमा वाचविला, आणि आपणही त्याजबरोबर स्पष्ट आवाजानें तो म्हटला. दुसरेही कुराणांतले कित्येक भाग व इतर कवनें त्यानें मोठमोठ्यानें म्हटलीं. त्यांत फैजीची एक कविता होती. अशा रीतीनें देहावसानसमयीं त्यानें इसलामाचा विधि पाळिला. दुसऱ्याच दिवशीं शिकंदरा येथें त्याचें दफन झालें.

सलीम व त्याचे तिघे मुलगे ह्यांनीं स्वतः अकबराचें प्रेत उचलून किल्ल्याबाहेर पुढें आणिलें. तेथून आग्र्यापासून चार मैलांवर शिकंदरा येथें तें दरबारच्या कामदारांनीं वाहून नेलें शिकंदरा येथें त्याचें दफन झालें, त्या ठिकाणीं जहांगीर बादशहानें पुढें सुंदर कबर बांधिली, तिचें वर्णन पुढें येईल. ह्याच कबरेंत १८०३ सालीं दिल्ली काबीज करीत असतां लॉर्ड लेक ह्याच्या स्वारांस राहण्यास जागा मिळाली. अकबराच्या मृत्यूनें मोगल बादशाहीरूपी नाटकाचा पहिला अंक समाप्त झाला. तें राज्य भक्कम पायावर स्थापन झालें व सुमारें दीडशें वर्षें तें अबाधित चाललें. हें बादशाही

पद हिरावून घेणाऱ्या एका संस्थेचा जन्म अकबर जिवत असतानाच साता समुद्रापलीकडे झाला होता. सन १६०० ह्या वर्षी इंग्लडात ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली, आणि धिमेपणानें पुष्कळ वर्षें परिश्रम करून तिनें ह्या पुरातन वैभवशाली भरतभूमीचे आधिपत्य आपल्या राष्ट्रास प्राप्त करून दिलें.

**अकबराचीं बायकामुलें.**—अकबराच्या लग्नाच्या व राखलेल्या पुष्कळ बायका होत्या पहिली बायको हिंदालची मुलगी रुकिया वेगम ही वृद्ध होऊन सन १६२६त वारली तिला मूल झाले नाहीं शहाजहानचा लहानपणीं साभाळ करण्याचे काम अकबरानें तिच्याकडे सोपविलें होते. नवरा मेल्यावर नूरजहानला पकडून आणून जहागीरनें तिला रुकियाच्या ताब्यात दिले. अकबरानें स्वत पसंत केलेली दुसरी बायको, कामरानचा मेहुणा अब्दुल्ला मोगल ह्याची मुलगी त्याची तिसरी बायको सलीमा सुलतान बेगम ही बाबराच्या मुलीची मुलगी तिचा मुलगा मुराद तिचें पहिलें लग्न बहरामखानाशीं झाले होते अकबरानें सन १५६१ त तिच्याशीं लग्न लाविले हीच अकबराची विद्वान, चतुर व शहाणी बायको होय हमीदा व गुल्बदनबेगम ह्या दोघीची तिजवर भक्ति होती त्या तिघी दोन वर्षें मक्केस जाऊन राहिल्या होत्या सलीमा बेगम सन १६११ त वारली, त्या वेळी तिचे वय साठ वर्षांचे होतें ह्यावरून, सन १५५७ त बहरामखानाशीं तिचे लग्न झाले, तेव्हा ती सात वर्षांची असली पाहिजे ती कविता करी बदाऊनी तिच्याबद्दल आदराने बोलत नाहीं तिनें आपलें एक पुस्तक बदाऊनीस वाचण्यास दिलेले त्याजकडून हरवले, तें प्रकरण अकबरापर्यंत जाऊन बरेंच विकोपास गेले. सन १५६२ त अकबराने साबर येथे अबरच्या बिहारीमल्लाच्या मुलीशीं लग्न केलें. ही भगवानदासाची बहीण व मानसिंहाची आत्या मारवाडचा राजा मालदेव याची मुलगी जोधाबाई ही त्याची आणखी एक रजपूत बायको. तिला सलीम हा मुलगा सन १५६९त झाला तिनें अकबराच्या जनानखान्यात मुसलमानी पेहराव पत्करिला. हा पेहराव करून कुराणातला एक मंत्र म्हटला कीं, हिंदु स्त्री मुसलमान बनत असे पुढें सुद्धा जोधपुरच्या अजितसिंगानें आपली मुलगी इंद्रकुमारी फर्रुखसेयर बादशहास सन १७१५ त दिली असता त्याचा खून झाल्यावर बापानें तिला रजपूत पेहराव देऊन परत आपल्या घरीं घेतलें बिबी दौलतशाद म्हणून आणखी एक अकबराची बायको होती, तिला दोन मुली व मुलगा दानियाल अशीं तीन अपत्ये झालीं. अकबराच्या आणखी बायका होत्या. रंगराई, बिबी आराम बक्ष, बिबी सेल्मा, बिबी खैरा, आणि मिहरूसमा अशीं

आणखीं नांवें अकबराच्या बायकांचीं आढळतात, ( H. Beveridge ). मॅलेसन ( Rulers of India, Akbar ) म्हणतो, सलीमच्या आईचें नांव जोधाबाई; ही जोधपुरच्या मालदेवाची मुलगी. मॅलेसन व लेन्पूल म्हणतात, बिकानेरची राजकन्या अकबराची तिसरी रजपूत बायको होती. ह्यावरून अकबराच्या तीन बायका रजपूत व इतर मुसलमान होत्या, असें दिसतें.

प्रथम अकबरास हसन व हुसेन नांवाचे दोन जुळे मुलगे झाले, ते एक महिन्याच्या आंत मृत्यु पावले. नंतर सलीम आणि दुसरे दोघे दानियाल व मुराद हे झाले. त्यास तीन मुली होत्या; शहाजादी खानम, शकुन्निसा बेगम ( ल० मीर्झाशहारुख ), आणि आराम बानू. शहाजादी खानमचें लग्न चोविसाव्या वर्षीं झालें. दुसऱ्या दोघी बिबी दौलतच्या मुली. ह्या सर्व अकबराच्या मृत्यूनंतर पुष्कळ वर्षें जिवंत होत्या. पहिल्या दोघींचीं लग्नें १५९४त झालीं. तिसरीचें लग्न झाल्याचें दिसत नाहीं. ती बापाची फार लाडकी होती.

गोळाबेरीज म्हणून खालील कोष्टक ध्यानांत ठेवण्यास सोयीचें होईलः—

हुमायून= {
१ स्त्री महाबेगम,—महंमद हकीम.
२ स्त्री हमीदा बेगम,—अकबर.

अकबर= {
१ स्त्री जोधाबाई ऊ० मार्यमुज्जमानी–सलीम, खानम सुलतान बेगम.
२ स्त्री सलीमा बेगम,—मुराद.
३ स्त्री दौलत शाद,–दानियाल, शकरुन्निसा बेगम, आराम बानू बेगम.

मुराद यास एक मुलगी होती तिचें लग्न जहांगीरचा मुलगा पर्वीझ ह्याजबरोबर झालें होतें. दानियालचें लग्न बहूरामखानाचा मुलगा खानखानान याच्या जानान बेगम नामक मुलीशीं होऊन, त्यास मुलगे तीन झालेः– १ तहमूरास, ल० सुलतान बहार बेगम, जहांगीरची मुलगी; २ बायसंघर; ३ हुशंग, ल० खुस्रूची मुलगी होशमंद बानू बेगम. ह्या मुलांस पुढें शहाजहाननें ठार मारिलें. शिवाय दानियालास चार मुली होत्या.

# प्रकरण तेविसावें.

## अकबराची योग्यता.

| | |
|---|---|
| १ नवीन धर्मस्थापना | २. शरीर, स्वभाव व करामत. |
| ३. राज्यकारभाराचें धोरण. | ४. जमाबंदीची व्यवस्था. |
| ५. अवातर सुधारणा. | ६ आग्रा–सिक्रीचीं बाधकामें. |
| ७. परिस्थिति व तुलना. | ८. बीव्हरिज्चा अकबरावर अभिप्राय. |

९. अकबराचा नवरत्नदरबार

| | |
|---|---|
| ( क ) अबुल्फज्ल् व फैजी | ( ख ) राजा मानसिग. |
| ( ग ) मुल्ला दोप्याजा. | ( घ ) राजा तोडरमल्ल. |
| ( ङ ) राजा बीरबल. | ( च ) तानसेन. |
| ( छ ) हकीम हुमाम. | ( ज ) बदाऊनी. |

१. **अकबराची नवीन धर्मस्थापना**—येथपावेतों अकबराच्या कार्किर्दीचे वर्णन झालें. त्याची योग्यता व करामत ह्याचा अंदाज करण्यापूर्वी त्याने आपलें राज्य चिरंतन करण्यासाठी जी धर्माची मुख्य बाब हाती घेतली, तिचे वर्णन प्रथम करणें जरूर आहे कारण त्यामुळें पुढील विषय चागला समजेल.

मोगल लोकास आरंभीं तुर्क जातीचे वळण होतें. पुढें ते इराणी वळणावर गेले, हें मागें एकवार सागितलेंच आहे, ( भा. १ प्र. ४ क ३ ) तुर्की वळण जाऊन इराणी वळण येऊं लागलें, अशा सक्रमणकाळातील पुरुष बाबर व हुमायून हे होत ते दोघेही नावाचे मुसलमान होते त्याचा मुसलमानी बाणा केवळ दिखाऊ होता हुमायूनने शिया पंथ स्वीकारिला. हिंदुस्थानात परत आल्यावर त्याचें मोगली वळण दिसेनासे झालें. इराणी वळणाचा पहिला मोगल राज्यकर्ता अकबरच होय त्याची आई इराणातील होती त्याचे वर्तन व विचारसरणी इराणी धर्तीची होती धर्मसबंधात मोगल लोक दुराग्रही नाहींत, एवढेंच मोगलाच्या स्वभावाचें लक्षण त्याच्यात उतरले होतें. अकबर धर्माच्या बाबतींत ढिला व बेपरवा होता. मुसलमानाची कडक श्रद्धा त्याच्यात

नव्हती. इराणी वर्षाच्या प्रथम दिवशीं नवरोझचा सण असतो, त्या सणाचा मुसलमानी धर्माशीं संबंध नसतां, अकबर त्या दिवशीं मोठा समारंभ करी. दरबारीं भिन्न रंगांचा पोषाख करून तो सप्तग्रहांची पूजा करी. तो आपल्या रजपूत राण्यांबरोबर यज्ञयाग व ब्राह्मणोक्त धर्मविधी करूं लागे. तरी आरंभीं दिसण्यांत तो मुसल्मान होता. त्याला मूल होत नव्हतें, म्हणून अजमीरच्या साधूस केलेला नवस फेडण्याकरिता दोनशें मैल तो पायीं चालत गेला.

ह्याप्रमाणें मुसलमानी धर्माविषयीं बादशहाचा अनादर आग्र्याचे उलमांस ( पृष्ठ १६८ टीप पहा ) खपेनासा झाला. दरबारांत उलमांचें वजन भारी होतें. त्यांचें मत घेतल्याशिवाय बादशहास कोणत्याही विकट प्रश्नाचा निकाल करितां येत नसे. न्यायाधीश, कायदेपंडित वगैरे जागा ह्या उलमांस देण्यांत येत. कोणत्याही प्रश्नाच्या निकालाविषयीं सर्व मिळून जो अभिप्राय देत, तोच प्रत्येक प्रश्नावर शेवटला निकाल समजला जाई. आग्र्याचे उलमा दुराग्रही सुनी पंथाचे होते. शियापंथी मुसलमानांस ते छळीत असत. इराणांत सूफी नांवाचा नवीन मसलमानी पंथ निघून तो हिंदुस्थानांत पसरत चालला होता. त्या नवीन पंथाचा हे उलमा अत्यंत द्वेष करीत. बहरामखानाचा पाडाव करून अकबरानें सर्व सत्ता आपल्या हातांत घेतली, तेव्हांपासून हे उलमा विशेष गवगवा करूं लागले. हिंदुस्थानांत शिया व सूफी पंथ पसरत चालले हें उलमांस खपेना. त्या पंथांचा मोड करण्यासाठीं ते तरुण अकबरास आपल्या मुठींत ठेवण्याचा प्रयत्न करूं लागले. अकबर तर मूळपासून धर्मसंबंधांत उदासीन असून, दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारा नव्हता. अर्थात् उलमा खवळून गेले; आणि लोकांत त्यांजविषयीं द्वेषबुद्धि उत्पन्न झाली.

त्या वेळचे धर्मकलह विशेष स्मरणीय आहेत. त्याच वेळेस क्रिस्ती धर्मांतही असेच कलह माजले होते. युरोपांत थोतांडी व दांभिक उपाध्यायांशीं नवीन मतांचे सुधारक भांडूं लागले होते. मुसलमानी धर्माच्या इतिहासांतील एक भविष्य त्या वेळेस खरें व्हावयाचें होतें. ' इस्लामाचीं एक हजार वर्षें भरतांच जिकडे तिकडे धर्माची अवनति होईल; सर्वत्र हाहाकार उडेल; ईश्वरास संकट पडून धर्माचें व लोकांचें तारण करण्याकरितां परमेश्वर पृथ्वीवर अवतार घेईल, आणि जिकडे तिकडे देवराज्य होऊन लोक सुख पावतील. ' असा लोकसमज पसरत चालला होता मुसलमानांत जे बारा इमाम होऊन गेले, त्यांतील शेवटचा इमाम मह्दी हा पुनः पृथ्वीवर अवतरणार, आणि हें भविष्य खरें होण्याचा हाच समय आहे असें लोकांस वाटूं लागलें. सोळाव्या

शतकात मुसलमानी धर्माचा ऱ्हास सर्वांस दिसूं लागला होता. देवभोळ्या उपाध्यायास धर्मात होत असलेला नवीन फेरफार केव्हांच खपत नसल्यामुळें, 'धर्म बुडत चालला, आता परमेश्वर अवतार घेऊन सकटपरिहार करणार,' अशी ओरड ते नेहमीं करीत असतात. लोकसमुदायास हें म्हणणे खरें वाटतें. कारण असा नवीन अवतार आपणास पाहवयास मिळणार याविषयीं त्यास मोठा अभिमान वाटतो. हिजरी शकाचीं एक हजार वर्षें क्रिस्ती सन १५९१त भरत होतीं तेव्हा लोकाची मने ह्या धर्मवेडानें भरून गेली. त्यामुळें उलमा मंडळींचा रस्तोरस्तीं उपहास सुरू झाला त्याचा पोकळ अभिमान, त्याची दांभिक विद्वत्ता, व सरकारी नोकरी मिळविण्याकरिता त्यानी केलेल्या खटपटी, ह्याजबद्दल सर्वतोमुखी त्याचीं थट्टा सुरू झाली न्यायाचे काम त्याच्या हातीं असल्यामुळें, अन्याय, पक्षपात वगैरेसबंधाने त्याजविरुद्ध बादशहाकडे असख्य तक्रारी भराभर येऊ लागल्या. त्याच सधीस परमेश्वर अवतार घेऊन यणार, म्हणून सर्व लोक एके ठिकाणीं जमून प्रार्थना करूं लागले तितक्यात भोंदू महदी उत्पन्न झाले, तेव्हा दंगे होऊ लागले. मग वाटेल तशा शिक्षा देऊन उलमा न्यायाधीश आपल्या अधिकाराच्या जोरावर ह्या अपमानाचा वचपा काढू लागले.

धर्माच्या ह्या भानगडींत कित्येक मोठमोठे लोकही पडले होते. **शेख मुबारिक** नावाचा एक प्रसिद्ध विद्वान गृहस्थ उलमावर उठला होता. केवळ चालत आलेल्या प्रघातावर अवलंबून न राहता स्वत विचार करून धर्माच्या बाबतींत योग्य दिसलेले फेरफार करण्यास तो उद्युक्त झाला. लूथरप्रमाणेंच ( १४८३–१५४६ ) तो स्वतत्र विचार करणारा होता मुबारिकचा जन्म सन १५०५ त झाला व सन १५९३ त तो मरण पावला. मागें सांगितलेंच आहे की सोळावे शतकात सुनी, शिया व सूफी असे तीन वेगळे पंथ मुसलमानात झाले होते सूफी पंथाची उत्पत्ति इराणात झाल्यामुळे, सूर्य व अग्नि ह्याची उपासना पारशी लोकातून त्या पंथाच्या लोकानीं स्वीकारली. ह्याशिवाय आणखी एक चवथा धर्मप्रवाह नुक्ताच हिंदुस्थानात शिरला होता. गोवें येथे पोर्तुगीझ लोकानीं ह्याच सुमारास रोमन–क्याथोलिक नामक क्रिस्ती पंथाची स्थापना केली उत्तरेत मुसल्मान व हिंदु ह्या धर्माचा सामना होऊन गुरु नानक ( १४६९–१५३८ ) व कबीर ( १३८०–१४२० ) इत्यादि थोर पुरुष निपजले, आणि दोनही धर्मांतील उदात्त तत्त्वाचें ग्रहण करून लोकात त्याचा प्रसार त्यानी चालू केला. हिंदु व मुसलमान ह्या उभयताचा देव एकच आहे असे ते प्रतिपादन करूं लागले. शेख मुबारिकचा वर्तनक्रम ह्या समयास अगदी अनुरूप आहे.

तो सुनी पंथांत वाढला होता. त्या वेळच्या प्रघातास अनुसरून त्यानें आरंभीं पुष्कळ वर्षें उत्तर हिंदुस्थानांत प्रवास केला, आणि अनेक गुरूंजवळ विद्याभ्ययन केलें. त्यानें आपली विद्वत्ता इतकी वाढविली, कीं त्या वेळीं त्यास ज्ञानाचें चालतें बोलतें भांडार असें लोक म्हणूं लागले. पुढें त्यानें सुनी पंथ सोडून शिया पंथ स्वीकारिला. आपला प्रवास संपल्यावर तो आग्रा येथें येऊन राहिला. विद्वान् लोकांच्या उपजीवनासाठीं बादशहाकडून कांहीं जमिनी तोडून दिलेल्या असत, तशी एक नेमणूक त्यास मिळाली; आणि तो अध्यापकाचें काम करूं लागला. (त्यास पुढें दोन मुलगे झाले. वडील अबुल् फैजी हा सन १५४७ त आणि धाकटा अब्दुल् फज्ल् सन १५५१ त जन्मला. महदीचा अवतार होणार असें सांगण्यांत मुबारिक पुढारी होता. त्यामुळें उलमा लोक त्याजवर दांत ओंठ खाऊं लागले. त्यांनीं अकबरास कळविलें, कीं शेख मुबारिक स्वतः पतित असून दुसऱ्यांस नरकास पोंचवीत आहे, यासाठीं त्यास एकदम देहान्त प्रायश्चित्त द्यावें. त्यास पकडण्याचा त्यांनीं हुकूम मिळविला, पण मुबारिक ह्यास ती खबर पोंचून तो पळून गेला. त्याचे मुलगे आग्र्यास राहिले.) हे मुलगे पुढे मोठ्या योग्यतेस चढले. त्या वेळच्या लोकांवर त्यांनीं आपलें वजन बसविलें. वडील **फैजी** हा सूफीपंथी कवि होता. तो सदैव विचारांत मग्न असे. फुलें, सुवास, सौंदर्य, मद्य, इत्यादि विषयांत त्याचें मन गढलेलें असे. तो केव्हां सुरेख कवनें करी; केव्हां भक्तिपुरःसर ईश्वराचा स्तव करी. त्याचीं कवनें अकबराच्या कानावर गेलीं. बादशहास कवितेची फारशी अभिरुचि नव्हती; परंतु फैझीच्या नवीन व चमत्कारिक कल्पना पाहून, बादशहानें त्यास जवळ बोलावून घेतलें, ( सन १५६८ ). तेव्हांपासून मुबारिकच्या कुटुंबाचें दैव उघडलें. उलमांनीं त्याचा छळ बंद केला आणि तो आग्र्यास परत येऊन लोकांस नवीन धर्मतत्त्वें पढवूं लागला.

धाकटा भाऊ **अबुल् फज्ल्** ह्याची बुद्धि विशाल आणि महत्त्वाकांक्षा जबर होती. लहानपणींच तो त्या वेळच्या सर्व विद्यांत निपुण झाला. त्यास अधिक ज्ञान मिळविण्याची उत्कंठा लागली. जगांतील सर्व धर्मांच्या मुळाशीं जाऊन त्यांची ओळख करून घ्यावी, असें त्यास वाटूं लागलें. क्रिस्ती, बौद्ध, पारशी इत्यादि धर्म, गोवें, तिबेट, इराण वगैरे ठिकाणीं जाऊन तो शिकणार होता, इतक्यांत वडील भावाच्या शिफारशीनें त्याची बादशहाशीं ओळख झाली. अकबराच्या मनांत त्यानें आपणाविषयीं उत्तम ग्रह उत्पन्न केला, आणि त्याजवर आपली छाप बसविली. पुढें लवकरच तो बादशहाचा विश्वासु मित्र आणि चतुर सल्लागार बनला. अकबर व फज्ल् हे दोघेही

पुरुष थोर होते. हिंदुस्थानच्या इतिहासनभोमंडलातील ते दोन देदीप्यमान तारेच होत. त्याचे विचार त्या वेळच्या मानानें पाहता फार पुढे गेलेले होते, आणि उभयतामध्यें जे मनोदौर्बल्य होते, तें एकमेकाच्या साहाय्यानें त्यास भरून काढिता आलें. अकबराच्या अंगीं मोगलाचे दुर्गुण आले होते. तो गर्विष्ठ, अज्ञान व चिकित्सक असून दुसऱ्याचे मदतीची पर्वा करणारा नव्हता. अबुल् फज्ल् हा स्वभावत दरबारी, खुशामत वगैरे करण्यात तरबेज होता. प्रसगानुरूप वर्तन ठेवून स्तुतिपाठकाचे काम करण्यात त्याचा हातखंडा होता. अकबरास तो परम दैवत समजूं लागला. देवाप्रमाणे त्याजला नमन करून भजूं लागला अर्थात् दोघाचा स्नेह जमण्यास उशीर लागला नाहीं. एकमेकाची एकमेकास जरूरच तशी होती अबुल् फज्ल्पासून अकबरास स्तुति प्राप्त होई, आणि अकबरापासून अबुल् फज्ल् यास गौरव प्राप्त होई. अबुल् फज्ल्चे मदतीशिवाय अकबराच्या बुद्धीचे तेज काहीच पडले नसते. तसेंच अकबरासारखे स्तुतिप्रिय दैवत अबुल् फज्ल यास प्राप्त झाले नसते, तर त्याच्या योग्यतेचे काहीच चीज झालें नसतें

अबुल् फज्ल्ची गाठ पडली, त्या वेळेस अकबर मोठ्या कचाट्यात सापडलेला होता. सर्व लोकाना सारख्या प्रेमानें वागवावयाचें, असा त्याच्या मनाचा निर्धार असता उलमा त्याचे आड येत आग्र्याच्या सरन्यायाधीशानें, पुष्कळ लोकास शिया पंथ स्वीकारिल्याबद्दल आणि विचारस्वातंत्र्य प्रकट केल्याबद्दल देहान्त शिक्षा सागितल्या; आणि बादशहानें त्या अमलात आणाव्या म्हणून उलमा त्यास आग्रह करूं लागले. उलमाशीं कुरापत काढून त्यास दुखविण्याची अकबरास इच्छा नव्हती. तथापि केवळ अन्य मार्गानें ईश्वरभक्ति केल्याबद्दल लोकास दिलेल्या त्या जबरदस्त शिक्षा अमलात आणण्यास त्याचें मन धजेना. अबुल् फज्ल् यानें अकबराच्या मनातील हेतु बरोबर ताडिला. आपल्या बापास त्रास दिल्याबद्दल उलमाचा सूड घेण्याची ही संधि त्यास आयतीच सापडली. उलमा हे अभिमानानें फुगून गेलेले व हेकेखोर होते. आरबी भाषा व कुराण ह्यापलीकडे त्याची विद्वत्ता गेलेली नव्हती जे आपल्याला येत नसे व समजत नसे तें ते छपवून ठेवीत. अबुल् फज्ल्सारख्या माणसास त्याचा तिरस्कार येणे साहजिक होतें. परंतु तो दरबारात वागलेला व मनोनिग्रही असल्यामुळे, त्यानें आपले विचार एकदम प्रकट केले नाहीत. आपसात उलमा मंडळींचा मिलाफ नव्हता, हें फज्ल् यास पक्के ठाऊक होते. त्याना बादशहापुढें वादविवाद करण्यास लावावें. म्हणजे त्याच्या पोकळ ज्ञानाचा भोंपळा तेव्हाच फुटेल, आणि त्याची खरी योग्यता

काय आहे हें बादशहास आपोआप कळून येईल, असा विचार फज्लच्या मनांत आला. बरीच वाटाघाट झाल्यावर अखेरीस अकबरास तो बेत पसंत पडला. उलमानीं सर्व प्रश्नांचा ऊहापोह आपल्या देखत करावा, म्हणजे मग खऱ्याखोट्याचा निकाल सहज करितां येईल, असा अकबरानें हुकूम सोडिला. हा मार्ग अबुल् फज्ल यानेंच सुचविला असें म्हणण्यास निश्चित आधार नाहीं. पण आगींत तेल ओतण्यास अबुल् फज्लनें कांहीं कमी केलें नसेल. धर्मसंबंधांत सर्व लोकांनीं आपले अभिप्राय बादशहापुढें मांडावयाचे, आणि त्यानें बसून निकाल करावयाचा असा बेत ठरला जरूर लागल्यास अबुल् फज्ल् मदत करण्यास जवळ तयार असावयाचाच. फार तर काय, पण प्रश्न विचारण्याचें आणि अभिप्राय मागविण्याचें काम अबुल् फज्लच करणार बादशहानें फक्त ऐकून निकाल द्यावयाचा. अशा प्रकारें वादविवाद करण्यासाठीं नवीनच जंगी तयारी करण्यांत आली.

हिंदुस्थानांत अशी वादविवाद करण्याची चाल पुरातन काळापासून चालत आली आहे. तदनुसार सन १५७६ च्या सुमारास बादशहानें वादविवादाकरितां फत्तेपुरसिक्री येथील खासबागेंत एक भव्य व सुंदर मंदिर बांधिलें. त्यास इबादतखाना असें नांव होतें. त्याला चार मोठीं दालनें होतीं. प्रत्येक दालनांत भिन्न भिन्न धर्मांचे लोक बसत. सर्व जातींच्या आणि धर्मांच्या विद्वान् लोकांस बोलावून त्यांजकडून तो या मंदिरांत वादविवाद करवून आपण ते ऐकत बसूं लागला. दरबारची इतर मंडळीही त्या ठिकाणीं हजर असत. असे वादविवाद बहुधा दरगुरुवारीं रात्रीं होत. प्रश्न काढून वादविवाद सुरू करण्याचें काम अबुल् फज्ल करी. बादशहा गांभीर्य धारण करून ऐकत असे. एखादें संभाषण विशेष चांगलें झालें, म्हणजे तो बोलणारांची तारीफ करून बक्षिसें वगैरे देई. अबुल् फज्लनें लिहून ठेविलें आहे कीं, सूफी पंडित व दुसरे धर्मोपदेशक, वकील, सुनी, शिया, ब्राह्मण, बौद्ध, क्रिस्ती, यहुदी, फारसी, व इतर पंथांचे विद्वान् लोक या सभेंत वादविवाद करण्यासाठीं मुद्दाम बोलावून आणिलेले होते. प्रत्येक जण आपलें म्हणणें निर्भीडपणें सांगत असे. केव्हां हे वादविवाद फार वेळ आणि मोठ्या आवेशानें चालत. गोव्याच्या एका पाद्र्यानें सर्वांचें म्हणणें खोडून काढिलें; आणि मोठ्या गांभीर्यानें व तत्परतेनें असें सुचविलें कीं, ‘ मी बायबल हातांत घेऊन अग्नींत दीव्य करण्यास तयार आहें. मुसलमानांनीही तसेंच दीव्य करून दाखवावें. जो दीव्यांत उतरेल, त्याचा पक्ष खरा. ’ मुसलमानांनीं त्वेषानें ती गोष्ट नाकबूल केली. ‘ जन्मतःच मनुष्याची प्रवृत्ति धर्माकडे असते, ’ ह्या म्हणण्याची सत्यता पाहण्याकरितां अकबरानें एक चम-

त्कारिक प्रयोग करविला. आईच्या अगावर पिणारी लहान मुले घेऊन त्यास एकात-वासात त्याने कोंडून ठेविलें तेथें त्याच्या कानी कोणत्याही भाषेचा शब्द मुद्धा पडूं नये. अशी तजवीज ठेविलेली होती ह्या प्रयोगापासून काहीच निष्पन्न झाले नाहीं सर्व मुलें मुकी मात्र निघालीं. असो.

कित्येक दिवसपर्यंत हें वादविवादाचें काम मुरळीत चाललें. परंतु बादशहाशी जसजशी विवादकाची घसण ज्यास्त पडूं लागली, तसतसे ते विशेष बहकू लागले, एके दिवशी वादविवादात मोठी आरडाओरड झाली बादशहासमोर विद्वान् लोक एकमेकास शिव्या देऊ लागले ह्याचे कारण काही अशी अबुल् फज्लच होता तो पाहिजे ते प्रश्न पुढें आणून उलमास चिडवी अकबराकडून असा एक प्रश्न त्याने विचारविला, की ' धर्मशास्त्राप्रमाणे किती बायका करण्याचा मला अधिकार आहे ? ' अकबराच्या बायका पुष्कळ होत्या अकराचीं तर नावें दिलेलीं आहेत कुराणातील नियम असा आहे की, चोहोपेक्षा ज्यास्त बायका करूं नयेत उलमा सकटात पडले चारच बायका करणे योग्य आहे असे म्हणावें, तर बादशहा रागावणार, सर्वच योग्य आहेत असे म्हणावें, तर धर्मशास्त्राविरुद्ध खोटें बोलल्याचें पाप लागणार. एका दोघा पंडितानी कुराणाला अनुसरून उत्तर दिलें, म्हणून बादशहानें त्यास सभेतून घालवून दिलें तेव्हापासून नवीन नवीन मुधारक पंडित सभेत येऊ लागले, आणि अकबर आपल्या धर्मातील दोष उघडपणें काढूं लागला होता होता सुनी पंथावरील त्याची श्रद्धा उडाली त्याला शिया पंथ बरासा वाटूं लागला उलमांचा पाडाव करून त्याचा सर्व अधिकार आपण घ्यावा, आणि पूर्वीं धर्मकलहाचा निकाल करण्यास ' मुजाहिद् ' नेमलेले असत, त्याच्या ऐवजीं आपणच धर्मगुरु बनावें, अशी अकबरास इच्छा उत्पन्न झाली एके दिवशी गुरुवारीं त्याने हा प्रश्न काढिला त्याजबद्दल उलमा गहजब करतील हें त्यास ठाऊकच होतें वादविवादावरून एक गोष्ट उघड दिसून आली होती ती अशी, की उलमा मंडळींतच मतभेद फार आहे हें जाणून अकबराने असे मुचविलें, कीं ज्या ठिकाणी उलमाचा मतभेद पडेल, त्या ठिकाणी बादशहाने निकाल करावा. पुढें उलमाच्या नावानें एक करारनामा करण्यात आला. त्यात असे लिहिल होतें, की जेव्हा जेव्हा मतभेद होईल, तेव्हा निकाल करण्याचा व कुराणातील वच-नास अनुसरून धर्मात नवीन फेरफार करण्याचा अधिकार बादशहास आहे. हा करार-नामा शेख मुबारिक ह्याने लिहून काढिला अकबरानें सर्व उलमास त्याजवर सह्या करण्यास सागितलें. उलमास जर बादशहाच्या पदरीं सरकारी नोकऱ्या नसत्या तर

त्यांनीं सह्या केल्या नसत्या. शेवटीं निरुपायास्तव त्यांनीं सह्या केल्या, ( सन १५७९ ). नंतर हा करारनामा जिकडे तिकडे प्रसिद्ध करण्यांत आला. झालें उलमांचा अधिकार गेला. बादशहा करील ती पूर्वदिशा असें झालें. लवकरच उलमांचा अध्यक्ष, आणि सरन्यायाधीश या दोघांस अकबरानें एकदम नोकरीवरून दूर केलें. इंग्लंडांत आठव्या हेन्रीनें सन. १५३४ त जसा पोपचा संबंध तोडून, आपणच धर्माचा मुख्य असें जाहीर केलें, तसाच हा प्रकार होय. हिंदुस्थानांत मुसलमानी धर्माच्या इतिहासांत उलमांचा पाडाव झाला, ही गोष्ट विशेष स्मरणीय आहे. उलमा जरी अज्ञानी आणि दुराग्रही होते, तरी मुसलमान धर्माचीं चालत आलेलीं मतें व मुसलमानी दरबार यांचें स्वरूप कायम राखण्यास त्यांनीं अव्याहत प्रयत्न केले होते. आजपर्यंतच्या मुसलमानी धर्मांत त्यांचें महत्त्व विशेष होतें. महंमद पैगंबराच्या कायद्याची बरोबर अंमलबजावणी करून ते एखाद्या दुष्ट राजाच्या जुलमी वर्तनाला मर्यादेबाहेर जाऊं देत नसत; आणि राज्यांतील सर्व कामदारांस ते कुराणाचीं महातत्त्वें पाळण्यास लावीत. एकंदर मुसलमानांचें सार्वजनिक मत अमुक एक प्रकारचें आहे असें ठरविण्यांत ते पुढारी असत. सारांश, राजाच्या मर्जीविरुद्ध कोणतीही गोष्ट करण्यास उलमा मंडळीच कायती धजत असे.

गुरुवार रात्रींच्या वादविवादांस एकदां सुरुवात झाल्यावर चार वर्षांच्या आंत उलमांचा अधिकार नाहींसा झाला. एवढ्यानेंच अबुल् फज्ल्चें समाधान झालें नाहीं. बुद्धीचें धाडस आणि खुशामतीची इच्छा ह्या दोहोंसही वाव मिळेल असा एक नवीनच बूट त्यानें बाहेर काढिला. ' अकबर हाच बारावा इमाम होय; जगाचा उद्धार करण्याकरितां परमेश्वरानेंच हा अवतार घेतला आहे, ' असें अबुल् फज्ल्नें जाहीर केलें. ही गोष्ट ऐकून सर्व दरबारास अचंबा वाटला. परंतु एकंदरींत त्या वेळेस अकबरावर लोकांची भक्ति विशेष असल्यामुळें त्यांनीं त्याबद्दल कुरकुर केली नाहीं. अकबराला तर ही गोष्ट फारच मनोरम वाटली. अबुल् फज्ल्विषयीं त्याच्या मनांत ज्यास्त पूज्यबुद्धि आणि विश्वास उत्पन्न झाला. इतक्या गोष्टी होतांना अकबराच्या धर्मसमजुतींत फारच फरक पडला. ( विचारसरणीच्या व सामान्य नीतितत्त्वांच्या सांच्यांतून जेवढें उतरेल तेवढें खरें, आणि बाकी सगळें झूट, असा त्याचा पक्का ग्रह बनला ) अर्थात् मुसलमानी धर्मावरील त्याचा विश्वास साफ उडाला. महंमद पैगंबरानें दहा वर्षांच्या आयेषाशीं लग्न लाविलें. झैनाब ही त्याच्या दत्तक-पुत्राची बायको असतां, तिचा घटस्फोट झाल्यावर महंमद पैगंबरानें स्वतःच तिच्याशीं

लग्न लाविले असले अनाचार करणारा महंमद परमेश्वराचा प्रेषक होऊ शकणार नाही, असे अकबर उघडपणे म्हणू लागला. महमद पैगंबर एका रात्री स्वर्गास चालून गेला, अशी जी गोष्ट आहे ती खोटी होय, असे त्याने जाहीर केलें तेव्हा आता दुसऱ्या धर्मांचा तपास करण्याची जिज्ञासा अकबरास आपोआप उत्पन्न झाली. मोठमोठे विद्वान्, ब्राह्मण, सूफी व फारशी पंडित आणि क्रिस्ती साधू यास त्याने आपआपले धर्म प्रतिपादन करण्यासाठी दिल्लीस आणिले आत्म्याचे जन्मातर व अखेरीस त्याचा मूलप्रकृतीत लय होणे, सूर्य व अग्नि हे परमेश्वराचे पार्थिव अंश होत असे मानणे, इत्यादि गोष्टींवर त्याचा भरंवसा बसत चालला. क्रिस्ती धर्माकडे त्याचा कल विशेष दिसूं लागला तथापि क्रिस्ताची देवत्रयी व त्याचे अवतार हे विषय त्यास खरे वाटले नाहीत क्रिस्ती धर्माकडे त्याचा ओढा वळण्यास आणखी कित्येक कारणे झालीं. पोर्तुगीझ लोकानी थोड्याच वेळात जे यश हिंदुस्थानात संपादन केलें होतें, तें त्याचे कानावर जाऊन, त्याजबद्दल त्याचा ग्रह अनुकूल झाला पोर्तुगीझ लोकांचीं विशाल गलबते, त्याचे दुर्भेद्य किल्ले आणि अवजड तोफा, इत्यादि गोष्टी ऐकून, त्याने गोवें येथील मुख्य अधिकाऱ्यास पत्र लिहिलें, आणि क्रिस्ती धर्म शिकविण्याकरिता तीन चार विद्वान् गृहस्थ फत्तेपुरसिक्रीस बोलाविले. एवढ्या पराक्रमी बादशहास आपल्या धर्मांत ओढण्याची संधि आलेली पाहून गोव्यातील पाद्री लोक हर्षोद्रेकानें वेडे होऊन गेले. जो तो आपणाला पाठविण्याविषयी आग्रह करूं लागला. शेवटीं फादर आक्काविया, हेन्रीक व मान्सेराट असे तीन असामी सिक्रीस गेले. अकबर मोठ्या उत्कंठतेनें त्याची प्रतीक्षा करीत होता. ते सिक्रीस जाऊन पोचले, तेव्हा अकबरानें त्याचा चागला सत्कार केला क्रिस्ती धर्मांची पुस्तके वगैरे कित्येक नजराणे त्यानीं आणिले होते, त्याचा बादशहानें मोठ्या आदरानें स्वीकार केला. बायबलाचें पुस्तक त्यानें आपल्या डोक्यावर ठेविले. तें वाचण्याची त्याला इतकी उत्कंठा झाली होती, की लागलाच तो त्या क्रिस्ती गुरूपाशीं तें वाचीत बसला. वाड्याच्या नजीकच त्याने त्यास उतरण्यास जागा दिली. अंतर्यामीं त्याचा मुसलमानी धर्म सुटला होता, तरी बाह्याचार फारसा बदलला नव्हता. मुसलमानी मुल्ला आणि क्रिस्ती गुरु याजला आपआपल्या धर्मांचें प्रतिपादन करण्यासाठीं त्याने वादविवाद करण्यास लाविलें. क्रिस्ती धर्मांवर त्याची श्रद्धा बसली. मुसल्मान इतिहासकार क्रिस्ती गुरूना वाक्प्रहार करितात. बदाऊनी म्हणून जो इतिहासकार आहे त्याने लिहिलें आहे, कीं अकबर क्रिस्ती झाला. परंतु वास्तविक प्रकार तसा नव्हता. क्रिस्ती गुरूनीं होता तितका प्रयत्न केला, तरी अकबर बाप्तिस्मा घेण्यास

तयार झाला नाहीं. त्यानें आपला तेरा वर्षांचा मुलगा मुराद यास त्यांचे हवालीं करून, क्रिस्ती धर्म आणि पाश्चात्य शास्त्रें यांचा अभ्यास करण्यास लाविलें, आणि बायबलाचा तर्जुमा करण्यास अबुल् फज्ल् यास हुकूम दिला. त्यानें एक क्रिस्ती मंदिर बांधविलें. त्यांत तो पोर्तुगीझ गुरूंबरोबर केव्हां केव्हां जाई, आणि क्रिस्ताच्या मूर्तीपुढें नमन करी. आपल्या राज्यांत पाहिजे तेथें लोकांनीं क्रिस्ती धर्म शिकण्याची आणि आपलें धर्मविधी उघडपणें करण्याची त्यांस मोकळीक दिली. इतकें करूनही अकबरानें त्या धर्माची प्रत्यक्ष दीक्षा घेतली नाहीं. अबुल् फज्लाशिवाय दुसरा कोणी तसें करण्याविषयीं त्यास आपली संमति देईना. त्याची आई पुष्कळ दिवस जिवंत होती, तिनें त्याचा फार निषेध केला. त्याच्या बायका तर क्रिस्ती धर्म स्वीकारण्यास तयार नव्हत्याच. अखेरपर्यंत अकबरानें धर्मांतर केलें नाहीं. सन १५८२ च्या सुमारास फत्तेपुरसिक्री सोडून राज्याचे बंदोबस्ताकरितां त्यास लाहोर येथें जाऊन राहवें लागलें. अकबराच्या धर्मसमजुतींत फरक पडला हें ऐकून अफगाण लोक त्याजविरुद्ध उठले होते. त्यांच्या दुराग्रहाचा पाडाव करण्याकरितांच राजा मानसिंग यास अकबरानें काबूलचा सुभेदार नेमिलें.

लाहोर येथें गेल्यावर अकबरानें नवीन धर्म स्थापण्यास सुरवात केली. महंमद पैगंबरानें ज्याप्रमाणें यहुदी आणि क्रिस्ती ह्या दोन धर्मांतील चांगल्या चांगल्या गोष्टी निवडून मुसलमानी धर्म तयार केला, त्याचप्रमाणें सर्व धर्मांतून कित्येक चांगल्या गोष्टी निवडून घेऊन, अकबरानें ह्या आपल्या नवीन धर्माची स्थापना केली. त्याचें नाव त्यानें '**दीने इलाही**' असें ठेविलें. अकबर स्वतः ह्या धर्माचा पैगंबर झाला. सृष्टींतील अनेक चमत्कार पाहून जें सृष्टिकर्त्या परमेश्वराचें ज्ञान होतें, त्याजवर ह्या धर्माचा पाया असून, यच्चयावत् प्रसिद्ध धर्मांतील उत्तमोत्तम संप्रदायांचा ह्यांत समावेश केलेला होता. मुसलमानांतील सुंता व बहुपत्नीत्व, क्रिस्तांमधील बाप्तिस्मा व येशूची उपासना, हिंदु धर्मांतील पुनर्जन्म व आत्म्याचें श्रेष्ठत्व, फारशी लोकांतील अग्निपूजा इत्यादि विषयांची त्यानें एक गोळाबेरीज केली. एवंच लाहोरास तो उघडपणें इस्लामाचा विरोधक बनला. त्यानें अनेक मशिदी मोडून त्यांत घोड्यांचे तबेले केले. हिंदु लोकांवर जिझिया कर आजपर्यंत घेण्यांत येत असे, तो त्यानें माफ काढिला. सरकारी संबंधांत जे जातिभेद व धर्मभेद चालत आले होते, ते सर्व त्यानें मोडून टाकिले. आपणाला ईश्वराचा अंश समजून लोकांनीं भजावें अशी त्याची इच्छा होती. तथापि त्याचा धर्म खरोखरी

काय होता हें बरोबर समजत नाहीं सकाळी, दुपारीं, सायंकाळी व मध्यरात्री तो सूर्याची उपासना करी वर्षातून एकवार नवीन अग्नि तयार करवून तो त्याची पूजा करी. इराणात किर्मान येथे मुद्दाम माणसे पाठवून आणि मोठा खर्च करुन, त्यानें तेथील मंदिरातून पवित्र अग्नि आणविला. अकबराचे कित्येक अनुयायी बनले होते, ते त्यास परमेश्वराचा अंश समजत, पण असे करण्यात त्याचा स्वार्थापलीकडे दुसरा हेतु नसावा. लोकास अपूर्व चमत्कार दाखविण्याची त्यास फार आवड होती रोग बरे होण्यासाठीं तो त्यास आपल्या पायाचें तीर्थ देई. मुले होण्याकरिता पुष्कळ बायका त्यास नवस करीत त्याच्या इच्छा तृप्त झाल्यावर त्या नवस फेडण्यास येत, तेव्हा त्यानीं आणिलेल्या वस्तूंचा अकबर मोठ्या आनदानें स्वीकार करी. सकाळी त्याचे दर्शन घेण्यास पुष्कळ लोक येत, त्यासाठी पहिल्या मजल्यावर लोकास दर्शन देण्यासाठी झरोका म्हणून एक जागा तयार केलेली होती, त्या ठिकाणी अकबर येऊन बसे, आणि लोक खाली उभे राहून त्याची देवाप्रमाणे पूजा करीत. आपणास परमेश्वराचा अवतार समजून लोकानीं भजावे, ह्या त्याच्या इच्छेवरून त्याचे मनात काय होतें हें समजण्यास साधन मिळतें. सर्व जातीच्या लोकास एका अमलाखाली आणावयाचे, हा त्याचा मुख्य हेतु केवळ राजकीय स्वरूपाचा होता. राज्यात एकी राहण्यास मुसलमानी धर्म त्यास सोयकर वाटला नाही. प्रथमत आपण बारावा इमाम आहो असे त्याने जाहीर केले. परंतु मुसलमानाशिवाय इतराचा या गोष्टीवर भरंवसा बसण्यासारखा नव्हता. म्हणून ही इमामाची कल्पना त्यास लवकरच सोडून द्यावी लागली.

ह्या नवीन धर्मसंस्थापनेत बीरबलाचेही अग विशेष होतें. सूर्योपासनेबद्दल अकबराची खात्री बीरबलानें केली. शेतेंभाते, धान्यें आणि फळफळावळ इत्यादि उत्पन्न होण्यास तेजाची अत्यंत जरूरी असून सूर्यापासून ह्या अखिल विश्वास प्रकाश मिळतो, सर्व ब्रह्माडास ज्याच्या पासून जीवनकला प्राप्त होते, त्या परमात्म्याचा सूर्य हा प्रतिनिधि आहे. म्हणून सर्वाआधीं सूर्याची पूजा करणें अवश्य आहे, हें बीरबलानें अकबरास शिकविलें. त्याचप्रमाणें अग्नि, उदक, धेनु, वनस्पति इत्यादि उपयुक्त सृष्ट पदार्थाच्या ठिकाणीं ईश्वरी अंश खेळत असतो, हीही कल्पना बीरबलानेंच अकबरास शिकविली.

मीर अब्दुल लतीफ हा लहानपणीं अकबराचा शिक्षक होता. त्याला मोठमोठ्या कवींचे सर्व ग्रंथ तोंडपाठ येत असत, त्यापैकीं पुष्कळशी चागली कवनें त्यानें लहानपणीं अकबराकडून गाण्याच्या सुरावर पाठ म्हणून घेतली. अशा रीतीनें अकबरास जें काय ज्ञान प्राप्त झाले तें कानाच्या द्वारें झालें. डोळ्यानीं झालें नाहीं. मोठेपणी तर

त्याजपाशीं सर्व धर्मांचे विद्वान जमा झाले होते. हिंदूंपैकीं पुरुषोत्तम पंडित नांवाच्या एका विद्वान ब्राह्मणाचा सल्ला अकबर वारंवार घेत असे. पुष्कळ फारशी शब्दांचीं संस्कृत नावें या पंडिताकडून अकबरानें स्वीकारून व्यवहारांत आणिलीं. देवी म्हणून दुसरा एक पंडित होता तो महाभारत वाचून दाखवी. पण याहीपेक्षां हिंदुधर्माचा पगडा त्याचे मनावर बसण्यास जनानखान्यांतील हिंदु स्त्रियाच विशेष कारण झाल्या.

शीखांचा उदय तर अकबराचे पूर्वीच झालेला असून, हिंदुमुसलमानांचें ऐक्य करणें हेंच त्या पंथाचें मुख्य काम होतें. अकबरालाही हेंच पाहिजे असल्यामुळें तो जेव्हां जेव्हां पंजाबांत जाई, तेव्हां शीख गुरूंचें दर्शन मोठ्या आदरानें घेत असे. शीख गुरु अमरदास ( १५५२–७४ ), गुरु रामदास ( १५७४–८१ ) व गुरु अर्जून ( १५८१–१६०६ ) ह्या तिघांशीं अकबराचा परिचय होता. लाहोरास असतां अकबर अनवाणी पायीं चालत गुरु अमरदासाचे मठांत जाऊन त्यास भेटला. त्याच्या सात्त्विक वृत्तीची छाप अकबरावर बसून तो त्या गुरूस कांहीं इनाम जमीन देऊं लागला. गुरु बोलला, ‘ जगन्नियंत्याकडून मला सर्वच जमिनी इनाम मिळाल्या आहेत त्यांबद्दल मला कांही एक घ्यावें लागत नाहीं. आजची गुजराण झाली. उद्यांची तजवीज परमेश्वरानें लावलीच आहे. ’ त्यावर त्या जमिनी बादशहानें गुरूची मुलगी बिबीभानी म्हणून होती तिच्या नांवें करून दिल्या. तिचाच नवरा गुरु रामदास पुढें गादीवर आला, त्यानें त्या इनाम जमिनींत एक मोठा विस्तीर्ण तलाव खोदून त्यास ‘ अमृतसर ’ नांव दिलें. त्याच तलावाचे बाजूस पुढें शहर वसलें, तेंच शीखांचें पवित्र स्थान होय. त्या पुढचा गुरु अर्जून ‘ यानें ग्रंथसाहेब ’ रचिला, त्यांतले पुष्कळ भाग अकबरानें वाचून घेतले. अशाच भक्तीनें मीराबाई, सूरदास वगैरेंचीं प्रेमळ कवनें तो बादशहा वारंवार ऐकत असे.

इ. स. १५७३ त अकबरानें सुरतेस वेढा घातला, तेव्हां नवसरी येथील दस्तुर मेहेरजी राणाची व त्याची ओळख झाली. डॉ० मोदी यांनीं या मेहेरजीची हकीकत प्रसिद्ध केली आहे. मेहेरजी राणा कैक वर्षे आग्र्यास जाऊन बादशहाजवळ राहिला होता. त्याच्यापासून पारशी धर्माची पूर्ण माहिती बादशहानें मिळविली.

त्याचप्रमाणें गुजराथेंत असतां श्वेतांबरी जैनसाधु हीरविजय सूरि ( सूरि=पंडित ) याची व अकबराची भेट झाली. त्यानें अहिंसेचें तत्त्व बादशहाच्या मनावर अत्युत्तम ठसविलें. त्याच्या उपदेशानें खूष होऊन बादशहानें पंडितास कांहीं मागणें मागण्यास सांगितलें. तेव्हां बागांतल्या पिंजऱ्यांतील सर्व पक्षी सोडून दे व शिकारीचा त्याग कर, या दोन

गोष्टी त्यानें मागितल्या. थोड्या अपवादानें गुरूच्या या मागण्या बादशहानें कबूल केल्या. स १५८३ त हीरविजय परत स्वदेशी गेला, तेव्हा पुन काहीं मागून घ्या म्हणून बादशहा त्यास म्हणाल्यावर पंडित बोलला, मी व इतर सर्व प्राणी सारखेच आहों, तेव्हा इतराचे जेवढें बरें होईल तेवढें करीत जा म्हणजे ते माझेच बरें झाले असे मला वाटेल.' त्यानंतर श्रीशान्तिचंद्र सूरि म्हणून दुसरा एक जैन साधु अकबराकडे आला होता. त्याने कोणतीही प्राणिहिंसा राज्यात होऊ नये अशी बादशहाजवळ विनंति केली. त्यावरून काही नियम करण्यात आले, जेणेकरून वर्षांतून निदान सहा महिने तरी प्राणिहत्या सर्वथा बंद असे. मासनिवृत्तीचे हे दिवस उत्तरोत्तर वाढतच गेले. एकदा बादशहा लाहोरास असता इदीचा सण आला आणि त्या दिवशी हजारों प्राणी मारण्याची मुसलमानाची तयारी झाली तें पाहून शातिचद्राला अत्यंत दु ख झाले आणि आपण लगोलग शहरातून निघून जाण्याविषयीं त्याने बादशहाकडे परवानगी विचारिली. त्याबरोबर बादशहानें विशेष फर्मान काढून इदीच्या दिवशीं प्राणिहत्येची साफ मनाई केली. पुढें शातिचद्र पट्टणास निघून गेला आणि भानुचद्र बादशहाजवळ राहिला त्याने बादशहास सूर्यसहस्र–नाम शिकविले वरील साधू खेरीज विजयसेन सूरि, जैनचद्र व सिद्धिचद्र वगैरे जैन साधू अकबराजवळ असल्याचे उल्लेख सापडतात

गोव्याहून अनेक जेझुइट क्रिस्त पडित अकबराकडे गेल्याबद्दल निरनिराळ्या हकीकती प्रसिद्ध आहेत, त्याचे तपशील येथे द्यावयाचे म्हटल्यास स्वतत्र ग्रथच होईल राज्य चिरस्थायी करण्यास राजानें सर्वधर्मा प्रजास कसें सतुष्ट ठेवलें पाहिजे ही गोष्ट अकबराच्या उदाहरणाने स्पष्ट होते.

सूर्य व अग्नि याची उपासना ही हिंदु व फारशी या दोनही लोकास मान्य होती. राजा हा ईश्वरी अश आहे, सर्व जगतास प्रकाश पुरविणाऱ्या सूर्यदेवतेचा तो एक किरणच होय, अशी कल्पना अबुल् फज्ल्ने पुढें आणिली तीच अकबरानें उचलली. राजा ईश्वरी अश होय, ही कल्पना प्राच्य लोकास नवी नाही इंग्लंडातही एलिजाबेथ राणीची हीच कल्पना होती अशा सर्व साहित्यानिशीं अकबरानें आपला नवीन धर्म स्थापन केला. अकबर स्वत या नवीन धर्माची दीक्षा देत असे. जो कोणी दीक्षा घेण्यास येई, तो डोकीचे पागोटें काढून बादशहाचे पायापाशीं ठेवी. बादशहा त्यास काहीं खूण देई. तीत परमेश्वराचे नाव असून 'अल्ला हो अकबर' अशी अक्षरे लिहिलेलीं असत. अकबर या शब्दाचे अर्थ दोन आहेत. अकबर

म्हणजे थोर आणि अकबर हें बादशहाचें नांव. ह्यामुळें वरील वाक्यांचे अर्थ दोन होतात. अल्ला म्हणजे ईश्वर हा थोर आहे हा एक अर्थ; आणि अकबर हाच ईश्वर आहे, असा दुसरा अर्थ. अशा संशयित अर्थाच्या वाक्याचा उपयोग करून, अकबरानें कोणास न दुखवितां आपला हेतु तडीस नेला. दरबारांत होणारे सर्व मुसलमानी सणांचे समारंभ त्यानें बंद केले. एकंदरीनें पाहतां त्याच्या नवीन धर्मांत फारशी व हिंदु या दोहोंचें मिश्रण मुख्य होतें. फारशी लोकांचा शक आणि त्यांचे सण अकबरानें राज्यांत चालू केले. नवरोजचा जंगी समारंभ सुरू केला. गोवध व गोमांस आणि कांदा लसूण यांचें भक्षण त्यानें मना केलें; दाढ्या राखणें व चुलत बहिणीशीं लग्न लावणें हीं त्यानें मना केलीं. नमाज पढणें आणि मक्केची यात्रा करणें ह्या गोष्टी त्यानें बंद केल्या. सन १५८३ त तो स्वतः गंध लावूं लागला. गाय पवित्र मानावी, आणि डुक्कर व कुत्रा यांस अपवित्र समजूं नये, असें त्यानें फर्माविलें. अकबराचा एक आवडता कुत्रा मेला, त्याजवर त्यानें मोठी कबर बांधिली. मद्यप्राशनाची मनाई त्यानें काढून टाकिली; मात्र त्याच्या अतिरेकाबद्दल शिक्षा ठरविल्या. वेश्यांच्या नांवाची नोंध करून सैतानपुरा नामक पृथग्भाग त्यांस नेमून दिला, आणि त्यांजवर कर बसवून अल्पवयी मुलींस अशा धंद्यांत घेण्याची सक्त मनाई केली. ह्या नवीन फेरफाराविषयीं दरबारांतील मुसलमानांचें कांहीं चाललें नाहीं. ते अबुल फज्ल्चा द्वेष करूं लागले. हिंदूंस मोठमोठे अधिकार दिल्याबद्दल त्यांस मोठें वैषम्य वाटे. आरंभींच उलमांची थट्टा करण्यास लोक शिकले होते, तेव्हां अंतःकरणांतून प्रत्यक्ष बादशहाचाही ते उपहास करीत असतील.

तथापि अकबराच्या मनांत आपल्या ह्या नवीन धर्माबद्दल दुराग्रह नव्हता. धर्माचा प्रसार करण्याच्या भरांत त्याची दृष्टि पक्षपातानें मुळींच अंध झाली नाहीं. कोणीकडून तरी राज्याचा उत्कर्ष व्हावा, हा त्याचे मनांतील मुख्य हेतु असल्यामुळें, स्वसंस्थापित धर्माच्या अभिमानाचें विवेकबुद्धीस अंधत्व आणणारें प्रखर वारें त्याच्या अंगीं संचार करीत नव्हतें. म्हणून त्याच्या मृत्यूबरोबर त्याचे धर्माचाही अंत झाला. सामान्य जनसमूहास देवभोळेपणा पाहिजे, तो नसल्यामुळेंच अकबराचा धर्म नाश पावला असावा असें वाटतें. या नवीन धर्माच्या अनुयायांचीं अबुल् फज्ल् यानें अठरा नांवें दिलीं आहेत. त्यांत स्वतः अबुल् फज्ल्, त्याचा भाऊ व बाप असे तिघे असून हिंदूंचें नांव एकच आहे, तें बीरबलाचें होय.

सन १५९७ च्या सुमारास लाहोर येथें बादशहा नवरोजचा समारंभ करीत होता. सूर्याची मूर्ति गादीवर बसवून तिची त्याने पूजा चालविली होती, इतक्यात एकाएकीं मोठी वीज पडून त्याची सर्व छावणी जळून गेली. तेव्हापासून आपल्या धर्माविषयी अकबरास संशय येऊं लागला. क्रिस्ती उपदेशक बरोबर घेऊन काही दिवस तो काश्मिरास जाऊन राहिला. तेथून पुढें लाहोरास परत आला पुढील काहीं वर्षे दक्षिणेतील युद्धसंग्रामात गेली. अबुल् फज्ल्चा खून झाला, तेव्हापासून अकबराची सर्व हिंमत खचली. आलेला दिवस कसा तरी लोटावयाचा यापलीकडे त्याने पुढें काही केलें नाही. त्यामुळे त्याचा नवीन स्थापिलेला धर्मही जागच्या जागींच राहिला.

अकबराच्या धर्मस्थापनेवर बीव्हरिजने मार्मिक साधकबाधक टीका केली आहे, तिचा गोषवारा बोधप्रद असल्यामुळें पुढें देतो.

‘अकबराच्या धर्माचें विवेचन अनेक ग्रंथकारांनी निरनिराळ्या ठिकाणी केलें आहे. टेनिसन कवीनें त्याजवर कविता सुद्धा लिहिली आहे नीट विचार केला असतां, अकबराने खऱ्या धर्मसस्थापका सारखा निष्ठापूर्ण उद्योग मुळींच केला नाही. केवळ वळ जाण्याचे व थोडीबहुत जिज्ञासा भागविण्याचे तें एक साधन त्यास झाले होतें इतकेंच. क्रिस्ती व मुसलमान पंडित जोराजोराने वादविवाद करूं लागले म्हणजे त्यास मोठी मौज वाटे क्रिस्ती धर्म मनापासून स्वीकारावा अशी त्यास मुळींच इच्छा झाली नाही त्याचे एकंदर धोरण, स्वभाव व करामत ह्याचा नीट विचार केला म्हणजे खरी धर्मस्थापना करण्याच्या कामास तो नालायक होता असेंच म्हणावे लागते. अकबर मुत्सद्दी होता, आणि इहलोकचे व्यवहार सुरळीत चालविण्याची त्याची ही सर्व खटपट होती भोजनानतरची कर्मणूक म्हणून धर्माचे वादविवाद त्याने कितीही ऐकिले असले, तरी त्यानें आपल्या दृष्टीपुढचें मुख्य कर्तव्य यत्किंचित् ढळू दिलें नाही. इबादतखान्यात रात्रभर वादविवाद ऐकून, सकाळीं तो आपली नित्याची कामे शांतपणें सुरू करी. धर्माचा विचार त्या मंदिराबाहेर त्यानें आणिला नाही. त्याच्या धर्मसुधारणा कितीही योग्यतेच्या असल्या, तरी त्या जर सुरळीत राज्यकारभाराच्या आड येण्यासारख्या असल्या, तर त्याचा स्वीकार तो करीत नसे. धर्मसस्थापकाची योग्यता त्यास नव्हती, म्हणून त्या कामात त्यास यशही आलें नाही. मनापासून जर तो धर्माचे नादास लागता, तर त्यास राज्य तरी सोडावें लागतें, अथवा औरंगजेबाप्रमाणें, धर्मसिद्धीसाठी राज्यास मुकावें तरी लागलें असते. धर्म म्हणजे काय, आणि त्याजवर आजपर्यंत कसा व किती विचार झाला आहे,

हें समजण्याइतकी बुद्धि व विद्वत्ता अकबराच्या अंगीं मुळींच नव्हती. त्यास लिहितां वाचतां सुद्धां येत नव्हतें, मग ज्यास्त तर काय ! बदाऊनी म्हणतो, ' अकबर अगदींच अक्षरशून्य होता. ' म्हणून विद्वानांचे धार्मिक वादविवाद चालले असतां, त्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्यास तो बिलकुल लायक नव्हता. नुसती निरनिराळ्या विद्वानांनीं बोलण्यांत वापरलेली परिभाषा त्यास समजली असेल कीं नाहीं ह्याची सुद्धां शंका आहे. बोलणारांचे आवेशी हावभाव पाहण्यांतच त्यास करमणूक होऊन, जो जोरानें व आवेशानें आपलें म्हणणें प्रतिपादन करील, तो खरा असें त्यास वाटलें असेल. पूर्ववयांत स्थानेश्वर येथें एका मेळ्याचे प्रसंगीं तो हजर होता, त्या वेळीं तलावांत स्नान करण्याचे बाबतींत दोन पंथांच्या साधूंचा तंटा लागला. ते बादशहासमोर येऊन म्हणाले, आम्ही आपसांत लढून ह्या तंट्यांचा निकाल करितों. ' अकबरानें होय म्हणून लढाईची मौज पाहिली. दोनही बाजूंचे बहुतेक लोक मरून गेले. ही जशी प्रत्यक्ष लढाईची मौज त्यास विनदिक्कत आवडली, तसेंच इबादतखान्यांतील हें जिव्हायुद्ध त्यास आवडलें. पुढें पुढें ह्या विषयांत त्यास बरेंच यश येऊं लागलें, तेव्हां त्यांस वाटूं लागलें, कीं आपणास विद्या येत नाहीं हें एकपरी चांगलेंच आहे धर्मसंस्थापकांस कोठें विद्या येत असते ! ' त्याच्या खुषमस्कऱ्यांनीं ही कल्पना त्याच्या डोक्यांत भरवून दिली, आणि त्यालाही ती आवडली. जर विद्या न येणें हा खरोखर गुण असेल, तर मग महंमदपैगंबराविषयीं अकबराचे मनांत एवढा अनादर काय म्हणून ! ' पैगंबर काय यःकश्चित् अडाणी आरब ! ' अशी त्याची निंदा तरी अकबरानें कां करावी !

' पुष्कळ प्राच्य लोकांस धर्माचे बाबतींत लुडबुडण्याची संवय असते. तयमूर, बाबर, हुमायून, बुखाऱ्याचा शयबानीखान, नादीरशहा, टिपु सुलतान, अशा अनेक पुरुषांनीं धर्मसंस्थापनेची घमेंड मारिलेली आहे. अकबरांत व त्यांच्यांत फरक एवढाच कीं, धर्माच्या नांवाखालीं त्यानें कोणावर जुलूम केला नाहीं. उलट पक्षीं प्रत्येक धर्मांत कांहीं तथ्य व कांहीं भेसळ आहे, अशी त्याची खात्री झाली. अकबराच्या ठिकाणीं असा विशेष फरक पडण्याचें कारण इतकेंच दिसतें, कीं त्याची बुद्धि कोणत्याही विषयाचा स्वतंत्र विचार करण्यास समर्थ होती, आग्रही नव्हती. ह्या त्याच्या गुणाची तारीफ बदाऊनीनेंही केली आहे. तथापि मुसलमानी धर्माबद्दल त्यानें इतका कठोरपणा धारण करण्याचें कारण नव्हतें. आरंभीं इस्लामावर अकबराची निष्ठा दृढ होती. दररोज पांच वेळ तो नमाज पढे; सालोसाल अजमीर येथील पीराच्या दर्शनास

पायी जाई, मक्केची यात्रा करण्यास लोकांस प्रोत्साहन देई. यात्रेकरूंसाठीं अकबरानें जितका खर्च केला, तितका दुसऱ्या राजानें कधीं केला नाहीं स्वत मक्केस जाण्याचाही त्याचा इरादा होता त्याने यात्रेकरूचा पोशाख घातला आणि काही मार्ग गेलाही, परंतु सर्वांनीच निषेध केल्यामुळें त्यास परत यावें लागलें तो स्वत च म्हणतो, ' आरंभीं मी लोकावर धर्माच्या बाबतीत जुलूम करीत असे परंतु माझे ज्ञान वाढत गेले, तशी सर्व धर्माबद्दल माझ्या मनात समता उत्पन्न झाली. जुलमानें मुसलमान झाल्याची किंमत काय ? ' प्रत्यक्ष व्यवहार'त मात्र हे सुंदर तत्त्व त्याने पाळिल्याचें दिसत नाहीं बदाऊनी लिहितो, कंदाहार व अन्य ठिकाणीं पुष्कळ शेख व फकीर गुलाम म्हणून विक्रीसाठी पाठवून, त्याचे बदल्यात तिकडून अकबर घोडे आणवीत असे ही गोष्ट त्याने पोरवयात केली, असे मॅलेसन म्हणतो, तें खरें नव्हे माणसें देऊन घोडे आणण्याचे काम स १५८१–८२ तले, म्हणजे अकबराने मुसलमानी धर्म सोडल्यानतर पुष्कळ दिवसाचे आहे अकबराच्या दयाळु स्वभावाच्या लाब लाब गोष्टी सागण्यात येतात प्रत्यक्ष तो स्वतः हा गुण आपल्या अगीं असल्याची प्रौढी मिरवितो तथापि नीट तपासून पाहिलें असता औरगजेबाहून तो जास्त क्रूर होता. त्याने निरपराधी लोकाची कत्तल तर केली, हत्तीच्या पायाखालीं माणसे तुडविलीं, आणखी क्रूरपणा तो कसा असावयाचा ? तो गरीब व दयाळु दिसतो याचे कारण, सलीमप्रमाणे रागाच्या आवेशात तो क्रूर कृत्य करीत नसे. तथापि त्याचे अत करण कठोर होतें, आणि बापाचा गोड व विनोदी स्वभाव त्याच्या ठिकाणीं मुळींच उतरला नव्हता.

' अकबराची मुसलमानी धर्मावरची श्रद्धा उडण्यास आणखीही कारणें झालेली आहेत एकदा रजपूत मुलींशीं लग्न करून रजपुतास खुष ठेवण्याचा प्रयत्न त्याने स्वीकारिला, त्यामुळे मुसलमानी धर्मास फाटा देणे ओघानेंच प्राप्त झालें दुसऱ्या धर्मात हजारो लोक पवित्रपणे व नीतीनें वागणारे त्यास दिसल, तेव्हा धर्माचा व नीतीचा अर्थार्थी संबंध नाही अशी त्याची खात्री होऊ लागली. पोर्तुगीझ मिशनरी आणि इटॅलियन विद्वान् पाद्री आक्वेव्हिया याच्या सगतीचा परिणामही अकबराच्या मनावर पुष्कळ झाला. तो कालच सुधारणेचा व विचक्षणेचा होता. युरोपात त्या वेळेस धर्मकलह चालले होते, त्याचा थोडाबहुत परिणाम परंपरेनें हिंदुस्थानावरही झाल्याशिवाय राहिला नाहीं. वास्तविक धर्माच्या सबंधात अकबरानें नवीन विशेष काहीं न करिता, पहिलें असलेले मोडिलें जास्त. मुसलमानी धर्म बरा नाहीं, म्हणून तो मोडण्याची कामगिरी त्याने बरोबर केली,

पण नवीन धर्म बनविण्याचें काम त्यास साधलें नाहीं त्याचा ' दीनेइलाही ' धर्म मनापासून एकानेंही स्वीकारिला नाहीं. आणि तो अकबराबरोबरच समाप्तही झाला. धर्मसंस्थापकाच्या अंगीं जी जाज्वल्य निष्ठा असावी लागते ती त्याच्या ठायीं नव्हती. बुद्ध, किंवा क्रिस्त यांच्या ठायीं सर्वस्वाचा त्याग करण्याचें सामर्थ्य होतें, तें अकबराच्या ठिकाणीं नव्हतें. राज्यव्यवस्थेच्या बाबतींत आपल्या नवीन धर्माचा अडथळा येतो असें दिसतांच, त्याचा वेग त्यानें लगेच कमी केला. त्याच्या धर्मस्वातंत्र्याच्या नवीन कल्पनांनी बंगाल्यांत बंड झालें असें कळलें, त्याबरोबर त्यानें पूर्वीचा पोकळपणा बराच सोडून दिला. बंडापूर्वी क्रिस्ती पाद्र्यांस जसा तो आदरानें भेटे तसा बंडानंतर भेटेनासा झाला. स. १५८६ त तुराणचा अव्दुल्लाखान ऊझबेग ह्यानें अकबरास वकिलाबरोबर पत्र पाठविलें, आणि मुसलमानी धर्माची अवज्ञा करून ब्राह्मण वगैरे पंडितांना आदर दाखविल्याबद्दल त्याची खूप कानउघाडणी केली. त्यावर अकबरानें जो जबाब लिहिला, त्यावरून अकबराची लटपट दिसून येते. आरंभीं कुराणांतील वाक्यें लिहून तो म्हणतो, ' माझा धर्म कुराणास अनुसरून आहे, आणि त्यामुळेंच माझ्या राज्याची अशी भरभराट होत आहे. धर्म आणि भाग्य हीं जुळीं भावंडें आहेत; आणि सर्व धर्मांचे लोक माझ्या भजनीं आहेत. अशा रीतीनें हिंदु व क्रिस्ती ह्या दोघांचाही पाडाव मीं केला आहे. तेव्हां मुसलमानी धर्माचें मीं धारण केलेलें स्वरूपच योग्य आहे ह्यांत संशय नाहीं. आतां माझी एवढीच इच्छा आहे, कीं हिंदु लोक पूर्णपणें ताब्यांत आल्यावर, मग फिरंग्यांचा समाचार घ्यावा. ह्या फिरंग्यांनीं पश्चिम किनाऱ्यावर बराच मुलूख काबीज केला असून, ते आमच्या मक्केच्या यात्रेकरूंना विनाकारण त्रास देत असतात. मी सुनी असून, इराणच्या शहाचा शियापंथ मला पसंत नाहीं. ' तुराणचा अबदुल्लाखान सुनीच होता.

' एल्फिन्स्टन म्हणतो, कीं ' अकबराच्या धर्मांत परमेश्वराची शुद्ध भक्ति तेवढीच राहिलेली होती. पण हेंही खरें दिसत नाहीं. आपण स्वतःच परमेश्वराचा अवतार असें तो समजे. ह्या बाबतींत अबुल फज्लसारख्या त्याच्या भजकांनीं हिंदुधर्मांतील बऱ्याच तत्त्वांचा स्वीकार केला. धर्माच्या बाबतींत बादशहाच मुख्य आहे, तो करील तें सर्वांनीं निमूटपणें मानिलें पाहिजे, असा जो करारनामा मुबारिकनें लिहिलेला जाहीर करण्यांत आला, तो तरी निव्वळ अकबराची स्तुति करण्याकरितांच होय. ह्या असल्या महत्त्वाच्या करारनाम्याचा उल्लेख अबुलफज्ल मुळींच करीत नाहीं, ह्यावरून हा सर्व प्रकार त्यास संमत होता असें दिसत नाहीं. '

**२ शरीर, स्वभाव व करामत.**—अकबराच्या तसबिरा अनेक प्रसिद्ध आहेत, आणि त्या निरनिराळ्या वेळी व निरनिराळ्या लोकानीं काढिलेल्या आहेत. त्यावरून असें दिसते, की तो बराच लठ्ठ व गोरा असून त्याचे कपाळ रुंद होतें, आणि त्यास दाढी नव्हती. जहागीर आपल्या वृत्तान्तात लिहितो, 'अकबराची उंची बेताची असून रंग गव्हासारखा गोरा, आणि डोळे व भिवया काळ्या कुळकुळित होत्या. त्याचा चेहरा पाणीदार व सुदर दिसे त्याची कमर बारीक, छाती रुंद, व हात लाब होते. डाव्या नाकपुडीवर एक लहानसा चामखूळ होता, त्याच्या योगानें चेहरा खुलत असे. त्याचा आवाज फार मोठा असून वर्णनाच्या वगैरे भरात जास्त मधुर भासत असे त्याच्या चर्येत दिव्य तेज झळकत असे त्याच्या गुणाची स्तुति करावी तितकी थोडीच त्याचे वर्णन करूं लागल्यास मोठे ग्रंथ होतील, पण गुण संपावयाचे नाहींत. एवढें राज्य, एवढी अपार सपत्ति, इतके लढाऊ हत्ती व घोडे वगैरे सर्व काही असून, त्याने आपला अत्यंत नम्र भाव व ईश्वरभक्ति केंसाइतकी ढळू दिली नाही परमेश्वरापुढे आपण नीच पामर आहो असे तो सदैव समजत असे.' गोव्याचे पोर्तुगीझ पाद्री त्याजपाशीं होते. ते म्हणतात, 'पंन्नास वर्षांचा असता अकबर युरोपियन लोकासारखा गोरा असून विशेष शहाणा व बुद्धिमान् होता.'

अकबराच्या स्वभावातील मोठा गुण म्हणजे लोकावरील त्याचें प्रेम होय. मित्र सपादन करण्याची त्याची तऱ्हा अप्रतिम होती. बाबर व हुमायून याच्या ठिकाणीही हा गुण होता. अबुल् फज्ल्, फैजी, बीरबल, दूधभाऊ अझीझ कोका, त्याच्या अनेक राण्या व इतर मंडळी ह्या सर्वांवर त्याचें अकृत्रिम प्रेम होतें अझीझ कोका लहरी होता. त्याने पुष्कळदा अकबरास चीड येण्यासारखी कृत्ये केली, तथापि अकबरानें त्यास नेहमीं क्षमा करावी. अझीझचा बाप लहानपणी अकबराचे लाड करीत असे, तें आठवून अकबरानें अझीझचे सर्व अपराध पोटात घातले. जहागीर म्हणतो, 'अकबरानें मला स्वप्नात येऊन सागितलें, की बाबारे, कसेही करून अझीझचे अपराध पोटात घाल. त्यास शासन करूं नको.'

सामान्य राज्यकर्त्यापेक्षा अकबराच्या अगीं अनेक विशेष गुण होते, त्यामुळेच तो इतका मोठेपणास चढला दुसऱ्याच्या कह्यात राहवयाचें नाही, हा सर्व मोगलात सापडणारा गुण अकबराच्याही अगीं होता. तरी तो अत:करणाचा कोमल व अत्यंत मनमिळाऊ होता शरीराने तो फार उंच नव्हता व फार ठेंगूही नव्हता. त्याची छाती रुंद व हात लाब असून एकंदर बाधा सुंदर होता. वर्ण पिंगटगोरा होता. त्याची शक्ति

विलक्षण असून धैर्यही तसेंच अप्रतिम होतें. हिमूशीं लढण्यांत त्यानें अतिशय चातुर्य व शौर्य प्रगट केलें तें कोणाही वीरपुरुषास शोभण्यासारखें आहे. हत्तीनें आपल्या माहुतास ठार मारिलें असतां हा त्याजवर चटकन उडी मारून बसे, आणि त्यास ताळ्यावर आणी. त्यानें अतिशय जलद चालणाऱ्या सांडणी बाळगिल्या होत्या, त्यांच्या साह्यानें तो दूरदूरच्या मजला थोड्या अवकाशांत पार पाडून, त्वरेनें शत्रूस गांठून निमिषमात्रांत त्याचा नाश करी. दरसहा मैलांवर त्यानें टपालाचे पळते शिपाई ठेविले होते, आणि सांडणीस्वारांकरवीं लांबलांबच्या ठिकाणीं देखील बादशहाचे हुकूम त्वरित पोंचत असत. त्याचे एकंदर खासगी घोडे बाराहजार होते.

निशाण मारण्यांत तो मोठा पटाईत होता. संग्राम नांवाची त्याची एक आवडती बंदूक होती, तिच्या साह्यानें त्यानें हजारों माणसें मारिलीं. चितोडगड घेतांना सरदार जयमल्ल याचा वध त्यानें ह्याच बंदुकीनें केला.

अकबरास शारीरिक खेळांची अतोनात आवड होती. त्यास पोलो खेळण्याचा नाद इतका असे कीं रात्री सुद्धां आगीचे गोळे करून तो खेळत असे. मुसलमानांनींच हा खेळ प्रथम जनानखान्याकरितां शोधून काढिला. मोगलांच्या जनानखान्यांत हा खेळ विशेष प्रिय असून, सर्व स्त्रिया घोड्यावर बसण्यांत उत्कृष्ट पटाईत होत्या. अकबरास शिकारीचा नाद अतिशय होता. मोठमोठे हाके करून, चाळीस पन्नास मैल घेराचें जंगल वेढण्यांत येई. त्यांत सर्व प्रकारचीं श्वापदें सांपडत. त्यानें एका दिवसांत साडेतीनशें हत्ती पकडल्याचा उल्लेख आहे. अकबरास यांत्रिक कलेची आवड होती. अनेक उपयुक्त युक्त्या त्यानें स्वकल्पनेनें बसविल्या होत्या. नवीन नवीन प्रयोग व जिन्नस तयार करण्याची त्यास हौस असे. हिंदुस्थानांत तंबाखू आरंभीं त्याच्याच वेळेस आला, तो त्यानेंच प्रथम वापरून पाहिला.

अकबराचा मुलगा जहांगीर यानें असें लिहिलें आहे, कीं ‘ माझ्या बापास लिहितां वाचतां येत नव्हतें; तरी तो सर्व प्रकारच्या विद्वान् लोकांशीं संभाषण करीत असे; आणि नेहमीं चतुर व हुशार लोकांशीं सहवास घडल्यानें त्याची भाषा इतकी सुधारलेली होती, कीं त्याला विद्येचा गंध नव्हता हें कोणासही ओळखतां येत नसे. पद्य व गद्य यांतील खुब्या त्यास चांगल्या कळत असत.’ हें अकबराच्या मुलानेंच लिहिलें असल्यामुळें खोटें म्हणतां येत नाहीं. तरी त्याला लिहितां वाचतां सुद्धां येत नसावें हें संभवत नाहीं. खरा प्रकार निराळाच होता. तेरा वर्षांचा असतांना तो गादीवर बसला. तोंपर्यंत त्यास लिहितां वाचतां येण्याचा संभव नव्हता. चुलत्याजवळ राहत

असल्यामुळें त्यास शिक्षण देण्याची कोणी काळजी घेतली नसेल. कटकपणा, उद्योगाची आवड व धैर्य हे गुण मात्र त्याच्या अगी लहानपणींच आले. राज्यावर आल्यानंतर त्याला शिक्षणाची आवड उत्पन्न झाली त्याने एक हुशार शिक्षक ठेविला. त्याचे नाव मीर अब्दुल्लतीफ्. अब्दुल्लतीफ्च्या बापानें अकबराच्या कार्किर्दीचा इतिहास लिहिलेला आहे, त्यात पुढील वाक्य आहे 'त्या वेळेस अकबरास लिहिता वाचता येत नव्हते.' 'त्या वेळेस' ह्या शब्दावरून अकबर-मागाहून विद्या शिकला हें उघड होते. पुढल्या काळात अनेक पुस्तके अकबरानें वाचिलीं, आणि दुसरे कित्येक शिक्षक ठेविले, असा पुरावा सापडतो म्हणून जहागीरच्या लिहिण्याचा अर्थ इतकाच, की राज्यावर आला त्या वेळेस अकबरास काहीं येत नव्हतें. निरनिराळ्या राष्ट्राचे इतिहास वाचण्याचा अकबरास फार नाद होता दररोज कोणी तरी विद्वान् गृहस्थ त्याप पुस्तकें वाचून दाखवी प्रत्येक पुस्तक अथपासून इतिपर्यंत वाचण्याचा त्याचा नेम होता वाचन बंद होई, तेथे तो पुस्तकावर तारीख घालून ठेवीत असे त्याच्या ऐकण्यांत व अवलोकनात न आलेली अशीं पुस्तके फारशीं राहिलीं नव्हती. कित्येक पुस्तकें तो पुन.पुन वाचीत असे. त्या वेळीं विद्वान् गणले जाण्यास कोणकोणत्या विषयाचे ज्ञान असावे लागत असे, हेंही अकबराची विद्वत्ता ओळखणारानी लक्षात ठेविलें पाहिजे आरबी भापा चागली लिहिता वाचता येणे, कुराणाचा बराच भाग तोंडपाठ म्हणता येणे, फारशी भापा अवगत असून, सादी आणि हाफीज ह्या कवींचे ग्रंथ आणि फिर्दौसीची कित्येक कवने समजणे, कित्येक राजाची चरित्रें वाचिलेली असणे, गणित व ज्योतिष शास्त्राचा थोडा बहुत परिचय, आणि गायनकलेचे ज्ञान असणे, इतक्या गोष्टी ज्यास येत, अशाचीच गणना विद्वानात होत असे जहागीरच्या कार्किर्दीपावेतों मोगलास तुर्की भाषाही येत असे.

'जहागीर व त्यानतरच्या मोगल बादशहापेक्षा अकबर चागला होता, हें खरें, पण तो कितीही चागला व थोर असला, तरी त्या वेळच्या देशकालाचे दुर्गुण त्याच्या अंगी पूर्णपणें होते शिवाय तो अत्यंत अज्ञानी होता. त्याची श्रम करण्याची हौस व अकल विशेष असून तो मोठा नशीबवान होता, म्हणून त्याची वाहवा होते पण ही तारीफ थोडीशी फाजील असून, खरा प्रकार म्हणजे सामान्य मंडळींत तो चागला होता एवढाच आहे. अकबराचा बाप व आजा विद्वान् असून, तो इतका अशिक्षित राहिला हें आश्चर्य होय.' एच्. बीव्हरिज,—इंडियन वर्ल्ड, ऑक्टो०, १९०५.

अकबराच्या दरबारचा डामडौल कांहीं कमी नव्हता. त्याचे स्वारीचा थाट पाहून, गोव्याहून आलेल्या पोर्तुगीज गुरूंना अत्यंत अचंबा वाटला. लाहोरास जातांना त्याजबरोबर पांचहजार हत्ती होते. त्यांच्या डोक्यांवर लोखंडी ढाली बांधिल्या असून सोंडांस तलवारी व दांतांस कट्यारी बांधिलेल्या होत्या. प्रत्येक हत्तीवर चार चार तिरंदाज किंवा बंदूकवाले असत. असें होतें, तरी अकबराच्या एकंदर व्यवस्थेंत विलक्षण साधेपणा दिसून येत असे. केवळ बाह्य डामडौल आणून लोकांचे डोळे दिपविण्याची त्यास आवड नव्हती. लोकांस न्याय ताबडतोब देण्याविषयीं तो फार जपत असे. ज्या शहरांत त्याचें वास्तव्य असे, तेथील सर्व खटले तो स्वतः पाहून निकाल करी. त्याच्या संमतीशिवाय मोठ्यामोठ्या शिक्षा देण्यांत येत नसत. फांशीं देणें, किंवा सुळावर चढविणें, ह्या त्यानें देहान्त शिक्षा ठरविल्या होत्या. अकबरानें देहान्त शिक्षेचा उच्चार तीन वेळ केल्याशिवाय ती शिक्षा कायमची अमलांत येत नसे. दररोज एकदां तो दरबार भरवी. तेथें पाहिजे त्यास येण्याची मोकळीक होती. ह्या ठिकाणीं सामान्य लोकांकरितां व खासगी मंडळीकरितां असे दोन वेगळाले भव्य दिवाणखाने करून प्रत्येकांत गादी ठेविलेली असे. लोकांचें म्हणणें ऐकून घेणें, त्यांनीं आणिलेल्या नजराण्यांचा स्वीकार करणें, इत्यादि गोष्टी तो ह्या वेळेस करी. अशा प्रसंगीं तो गादीवर न बसतां बाजूस उभा राही. इतर वेळीं अकबर गालिच्यावर बसत असे. बारा विद्वान् गृहस्थ नेहमीं त्याजवळ असत; ते एखाद्या विषयावर वादविवाद करीत, किंवा त्यास इतिहासांतल्या गोष्टी सांगत. कसाही मनुष्य त्याजकडे आला, तरी अकबर त्याजवर आपली छाप बसविल्यावांचून राहत नसे. सामान्य लोकशीं तर तो फारच ममतेनें वागे; परंतु सरदार आणि बडे लोक मात्र त्याजपुढें चळचळां कांपत. अंतःकरणाचा मृदुपणा व कठोरता ह्या दोन गुणांचें त्याच्या स्वभावांत गोड संमेलन झालें होतें. व्यवहारांतल्या बहुतेक सर्व गोष्टी त्यास स्वतः करितां येत होत्या. तोफा ओतणें व बंदुका करणें हीं कामें तो स्वतःची देखरेख ठेवून करीत असे. वाड्याच्या आवारांत तोफा ओतण्याचा एक कारखाना त्यानें ठेविला होता. त्याजबद्दल बारीक नियमही त्यानें बांधिले होते. प्रत्येक बंदुकीला त्यानें नांव दिलें होतें. अकबरास मर्दानी खेळांची फार आवड होती. कुस्त्या, कसरत, जनावरांच्या टकरा, साठमाऱ्या वगैरे खेळ तो नेहमीं करवी. हत्ती, घोडे, वगैरे सर्व जनावरांचीं त्यानें निरनिराळीं नांवें ठेविलीं असून, त्या नांवांनीं तो सर्वांस ओळखीत असे. त्यास शिकारीचा नाद फार होता, आणि

शिकारीकरिता चित्ते शिकविलेले असत एकीकडे खेळ वगैरे चालू असत, तेव्हा दुसरीकडे तो दरबारची कामें करीत असे. त्याचा आहार अगदी नेमस्त पण दाडगा होता. मासान्न तो फारच क्वचित् खाई, दूधभात व मेवामिठाई ही त्याच्या खाण्यात विशेष असत तो बहुधा दिवसातून एकदाच जेवी त्याची पचन-शक्ति तीव्र होती मासाहाराविषयी तो असे म्हणे, कीं ' परमेश्वरानें नानाप्रकारचे खाद्य पदार्थ पृथ्वीवर उत्पन्न केले असता, हा खादाड मनुष्यप्राणी इतर प्राण्याचा जीव घेऊन आपल्या सुदर पोटात त्याचे दफन करितो, हें केवढें अज्ञान आहे ! मी राजा नसतो तर मासाला शिवलो सुद्धा नसतो तरी तें हळूहळू सोडून देण्याचा माझा विचार आहे ' त्याला फळफळावळीची विशेष आवड असून दूरदूरच्या देशातून नानाप्रकारची फळझाडे त्यानें हिंदुस्थानात आणून लाविलीं होती. अकबर रात्री तीन तासापेक्षा ज्यास्त झोंप घेत नसे कदाचित् तो दिवसा थोडा निजत असेल रात्री आपले खासगी मंडळ बरोबर घेऊन त्याजबरोबर कालक्रमण करीत असे अकबरास सुवासाची मोठी आवड असे. नानाप्रकारचीं सुवासिक फुले आणि सुवासिक अत्तरें याचा तो नेहमीं उपयोग करी. सर्व खोल्यातून दह्य सुवासिक पदार्थांचा सुवास एकसारखा चालू असे. फुलें व अत्तरे याजबद्दलही बारीक नियम अकबराने ठरविले होते.

सख्ख्या व सावत्र आईची आज्ञा अकबरानें कधीही उल्लघन केली नाहीं. एकदां मात्र त्यास आईची आज्ञा मोडावी लागली हमिदानें अकबरास सागितलें, ' ख्रिस्ती लोकाचे बायबल कुत्र्याच्या गळ्यात बांधून त्याची धिंड काढ. ' ही गोष्ट त्याने ऐकिली नाही. त्याचे मन व शरीर कधीं निरुद्योगी नसे मन उद्योगी असल्यामुळे राज्यकार-भारात व समाजात त्यानें पुष्कळ सुधारणा केल्या. त्याने युद्ध व स्वाऱ्या दरसाल चालू ठेविल्या, हें तरी त्याच्या मानसिक कार्यव्यापृतत्वाचें लक्षण होय. ह्याच कारणामुळें, नवीन धर्म व नवीन शक ह्याची त्यानें सुरवात केली.

कित्येक दुर्गुणही अकबराच्या अगीं होते. केव्हा केव्हां तो अत्यंत क्रूरपणाचें आचरण करी. मुसलमानाचा त्यानें छळ केला तो फार अयोग्य आहे लहानपणीं त्याचा स्वभाव फार क्रूर होता. एके दिवशीं रात्रीं तो नेहमींच्या पेक्षा लवकर निजावयास गेला, तों महालाचा बत्तीवाला झोंपी गेलेला त्यास आढळला. ह्याबद्दल त्याने त्या नोकराचा बुरुजावरून कडेलोट केला. पाहरेकरी आपल्या कर्तव्यात चुकले, तर त्याचा केव्हा केव्हा तो फार छळ करी. चितोडगड काबीज केल्यावर त्यानें बाराहजार रजपुताची कत्तल उडविली. आपल्या कारकिर्दीच्या अठराव्या वर्षी त्यानें दोनहजार लोकाचा डोकीं

कापून त्यांच ढीग रचिले. त्यानें आरंभीं अनेक लोकांस क्रूरपणाच्या शिक्षा दिल्याचीं उदाहरणें आहेत. पण हीं सर्व कृत्यें तरुणपणचीं व अबुल् फज्ल्ची गांठ पडण्यापूर्वींचीं आहेत. तो मोठा होत गेला तसतशी त्याची वर्तणूक बदलत गेली. आपल्या शत्रूंस ठार मारण्याची एक विलक्षण क्रूर पद्धत त्यानें स्वीकारिली होती. नेहमीं त्याजबरोबर एक मनुष्य पानपट्टीचा डबा घेऊन हजर असे. त्या डब्यास तीन खण असत. त्यांतील एकांत सुपारी, दुसऱ्यांत पाचक गोळ्या व तिसऱ्यांत विषयुक्त गोळ्या असत. बादशहाकडे गेल्यावर तो ज्याच्या त्याच्या सलगीप्रमाणें त्यास वरील वस्तूंपैकीं कांहीं तरी खावयास देई. बादशहानें खावयास दिलेल्या वस्तूचा अनादर करणें शक्य नसे. मोठा प्रसाद समजून सर्वांस त्याचा स्वीकार करावा लागे. अशा रीतीनें किती लोक मेले, तें कळण्यास मार्ग नाहीं. स्वतः अकबरास अशीच एक गोळी जहांगीरनें दिली अशी वदंता होती; पण ती खरी असेल असें वाटत नाहीं. कदाचित् ही सर्वच गप्प असेल.

अकबर लहानपणीं खादाड असे, पण उत्तरोत्तर तो फारच मिताहारी झाला. फज्ल् म्हणतो, ' तो एकदांच जेवी, आणि पदार्थांकडे विशेष लक्ष नसे. ' शेवटीं शेवटीं त्यानें मांस सुद्धां वर्ज्य केलें. उपासही पुष्कळ करी. त्याच्या बापआज्यांस अफू घेण्याची सवय होती, तशी त्यासही होती. फज्ल् म्हणतो. ' तो केव्हां केव्हां मद्य, अफू व गांजा ह्यांच सेवन करी. ' त्या वेळेस चहाकाफीचा प्रचार नव्हता. तो बाहेरख्याली नव्हता. त्याच्यासारखा उद्योग करणारास अशा विषयाकडे फुरसतच मिळत नाहीं. त्या वेळीं सृष्टक्रमाविरुद्ध अनाचार मध्यआशियाखंडांत फारच प्रचलित होता. बाबर-हुमायून सुद्धां त्यापासून अलिप्त नव्हते. अकबरानें मात्र या व्यभिचाराचा आपल्या राज्यांत त्वेषानें निषेध केला.

स्वतःची विद्वत्ता बेताचीच असल्यामुळें, कोणीं कांहीं येऊन सांगितलें, तरी त्याज-वर अकबराचा भरंवसा बसे; आणि सर्व बाजूंनीं विचार न करितां तो नवीन सूचना अंमलांत आणी. पूर्वींचे खलीफा प्रार्थनापीठावर उभे राहून, लोकांस उपदेश करीत, हें ऐकून त्याच्याही मनांत तसें करण्याचें आलें. सन १५७९ त फत्तेपुरसिक्री येथें तो उपदेश करण्यास उभा राहिला, त्या प्रसंगीं बोबडी वळून, त्यास परत जागेवर येऊन बसावें लागलें.

**३. राज्यकारभाराचें धोरण.**—अकबराच्या कार्किर्दीची कची हकीगत आइन–इ–अकबरी नांवाच्या ग्रंथांत त्याचा विश्वासु व विद्वान् मित्र अबुल् फज्ल् ह्यानें दिली आहे. मोगल बादशहाच्या ऐश्वर्याची आणि अकबराच्या नीतिमत्तेची व

कर्तृत्वाची ह्या पुस्तकात दिलेली हकीकत प्रत्येक इसमानें वाचण्यालायक आहे. राज्य-वृद्धि करण्याकरिता अकबराने ज्या मोहिमा केल्या, त्याची हकीकत त्याचा स्वभाव ओळखण्यास उपयोगी आहे खरी तरी त्याने राज्यकारभार करण्यामध्ये जे कौशल्य प्रगट केलें, त्याचें वर्णन अत्यंत मनोरम आहे अबुल् फज्ल् म्हणतो, 'लोकाच्या रीति-भाती सुधारणें, शेतकीस उत्तेजन देणें, सैन्याची व राज्याच्या इतर अंगाची पद्धतवार व्यवस्था लावणे, आणि ह्या उपयुक्त गोष्टी करिताना लोकास खुष राखून व वसुलाची व्यवस्था बरोबर ठेवून काटकसरीनें खर्च करणे, हीच राजाने प्रजेकरिता करण्याची उत्तम कामें होत, हें कोणीही कबूल करील ह्या गोष्टी लक्षात ठेवून राज्यकारभार केल्यास लोक वैभवास चढलेच पाहिजेत.' अकबराची राजनीति अशा प्रकारची होती. ह्यावरून तयमूरलग व अकबर ह्याच्या समजुतीत केवढा बरें फरक दिसून येत आहे ! लोकास संतुष्ट करण्याची अकबराची आतुरता कोणीकडे, आणि असंख्य शहरांचा पाडाव करून मानवी शिरकमलाचे मनोरे बांधण्याची तयमूरची हौस कोणीकडे !

अकबर राज्य करूं लागला, तेव्हा त्याचे वय तेरा वर्षांचे होतें तो अठरा वर्षांचा होईपर्यंत त्यास बहिरामखानाच्या हाताखाली शिक्षण मिळालें तो आपले युद्धकलानैपुण्य बहिरामखानापासून शिकला. लहानपणी ठिकठिकाणी प्रवास घडला, त्या वेळी दाडगाईची जुलमी राज्यपद्धति चहूकडे त्याच्या दृष्टीस पडली. त्या पद्धतीस तयमूरलंगाची राज्यपद्धति असें नाव दिलें असता शोभेल. बाबर व हुमायून याच्या उदार व उदात्त स्वभावाने त्या पद्धतीवर काय परिणाम घडले, हें त्याने प्रत्यक्ष पाहिलें. त्यावरून त्याच्या मनात एक गोष्ट चागली बिंबली, ती ही की, हिंदुस्थानावर राज्य करणे असेल, तर तेथील राजाशी खरोखर सख्य ठेविलें पाहिजे, त्याशी भाडून परिणाम लागावयाचा नाही. हा उद्देश पार पाडण्यासाठीं पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीत पुष्कळ फेरफार केले पाहिजेत. सर्वांसच कुराणात सांगितलेला मुसलमानी कायदा लागू केल्याने हिंदु लोक सतुष्ट राहवयाचे नाहींत. म्हणून धर्म व राज्यकारभार या बाबतींत लोकाशी विशेष ममताळूपणानें वागण्याची आवश्यकता अकबरास दिसून आली. ही विचारसरणी बहिरामखानास पसंत पडली नाहींसें दिसतें. जनानखान्यातील कित्येक वजनदार स्त्रियासही ती पसंत पडली नाही. बहिरामखानास तर त्याने मोठ्या सन्मानाने रजा दिली, आणि सन १५६० पासून तो सर्व कारभार स्वतंत्रपणें करूं लागला. यापुढें फंदफितूर व तंटेबखेडे मोडून

राज्यांत शांतता व सुव्यवस्था करण्यांत त्याचीं एकंदर तेरा वर्षे गेलीं. पुढेंही त्यास पुष्कळ युद्धप्रसंग करावे लागले, पण त्यांत स्वतः अंगावर घेऊन त्यानें फारशीं कामें केलीं नाहींत.

सन १५७४ त अबुल् फज्ल् ह्याचा अकबराच्या दरबारांत प्रवेश झाला. त्याच वेळेपासून त्याच्या कार्किर्दीच्या उत्तरभागास सुरुवात झाली. ह्यापुढें धर्मसंबंधांत अकबराचे जे विशिष्ट ग्रह बनत चालले, त्यांचा परिणाम राज्यकारभारावर घडूं लागला. पहिल्या भागांत अकबराची वर्तणूक कट्ट्या मुसलमानास साजण्यासारखी होती. पण उत्तरभागांत सर्व धर्मांच्या लोकास सारख्या ममतेनें वागविण्याचा त्यानें क्रम आरंभिला. अकबराची धर्मसंबंधी मतें समजल्याशिवाय त्याच्या राज्यकारभाराचें गुह्य समजावयाचें नाहीं असें कित्येकांचें म्हणणें आहे, त्याचें कारण हेंच. अबुल् फज्ल् म्हणतो, ' धर्मांच्या बाबतींत लोकांवर जुलूम केल्यानें मनांत धरलेला उद्देश निष्फळ होतो. लोक तेवढ्या वेळेपुरतीं आपलीं मतें चोरून ठेवितात; जुलूम केल्यानें तीं बदलत नाहींत.' (अकबरानें प्रत्येक खात्यांत एक हिशेबी शाखा नेमिली. ह्या शाखेकडून दररोजचे, मासिक, त्रैमासिक व वार्षिक हिशेब तयार होत. सरकारी जड-जवाहीर होतें, त्याची मोजदाद करून, त्यानें किंमती ठरविल्या. मोत्यांच्या माळा बांधून टोंकांस मोहोरबंद करून ठेविल्या. त्या योगानें त्याचें हरवणें व बदलणें बंद झालें. नाणें पाडण्याकरितां अकबरानें एक टांकसाळ घातली, आणि ती चालविण्याचे नियम बांधून दिले. अकबराच्या वेळचीं नाणीं चोख व ठरींव वजनाचीं होतीं. स्वतः प्रयोग करून नाण्यांची भेळ तो ठरवीत असे. बारीक-सारीक गोष्टींबद्दलही त्यानें सूक्ष्म नियम करून ठेविले होते. हत्तींना दाणावैरण बरोबर पोंचते कीं नाहीं, ह्याचा तपास करण्यासाठीं हत्तींच्या रोडकेपणाचे त्यानें तेरा विभाग ठरविले होते. ह्यावरून अकबराचे नियम किती सूक्ष्म होते, तें दिसून येतें.)

कोणत्याही विषयाचें वर्गीकरण करून व्यवस्था बांधून देण्याची अकबरास विशेष आवड असे. त्याच्या बापालाही अशी आवड होती. पण हुमायूनचें बहुतेक आयुष्य वनवासांत गेल्यामुळें, आपली इच्छा पार पाडण्यास त्यास सवड झाली नाहीं. हुमायून राज्य करूं लागला, तेव्हां दरबारच्या एकंदर लोकांचे त्यानें तीन विभाग केले. राजघराण्यांतली मंडळी, सरदार व लष्करी अंमलदार ह्यांचा वर्ग पहिला; फकीर, पैगंबराचे वंशज, विद्वान् लोक, न्याय करण्यास नेमलेले कामदार, ज्योतिषी, कवि व अशाच प्रकारचे इतर लोक ह्यांचा वर्ग दुसरा; गवई मंडळी व त्याच दर्जाचे इतर

लोक ह्याचा समावेश तिसऱ्या वर्गांत होई ह्या प्रत्येक वर्गाच्या लोकाकडे ठरीव दिवसाची कामें त्यानें नेमून दिलीं होती. पण ह्या व्यवस्थेचा फारसा उपयोग झाला नाहीं.

जनानखान्यासंबंधीं अकबराची धूर्तता विशेष ध्यानात ठेवण्याजोगी होती जनानखाना कायम राहून त्यापासून उपद्रव होऊं नये, म्हणून त्यानें हिंदुस्थानांतील व इतर देशातील राजघराण्याशीं लग्नसंबंध जोडिले. त्यामुळे सभोवारच्या राजघराण्याशीं स्नेह जडून, त्याजपासून भीति नाहींशी झाली. विशेषतः रजपूत राजाशीं लग्नसंबंध जोडण्यात अकबराच्या मनात असलेली विचारसरणी समजणें कठीण नाही कारण आजपर्यंत रजपूत राजेच हिंदुस्थान देशावर राज्य करीत आले. अनेक मुसलमानी राजानी त्याचा पाडाव केला असता, ते नाहींसे झाले नाहीत, तेव्हा कोणीकडून त्यास आपल्या ताब्यात आणण्याची ही सोपी युक्ति अकबराने योजिली. त्याशीं दोस्ती करून बंडखोर अफगाण लोकाशी झगडण्यास त्यास पाठवावें, असे अकबराच्या मनात आलें. मुसलमान व हिंदु ह्याचें हाडामासाचे मिश्रण झाल्याने परिणाम फार हितावह होईल, असेही त्यास वाटलें. ही कल्पना अगदीं नवीन पण उदात्त होती. पण ती तडीस नेताना मुसलमानी धर्माची त्यास अडचण वाटली. लगेच त्याने आपल्या धर्मसमजुतीत फेरफार केला रजपुताशी अकबराने जीं युद्धें केलीं, त्यात अकबराचा खरा उद्देश काय होता, हें समजून घेतलें पाहिजे थोडासा ज्यास्त मुलूख जिंकण्याची त्याची इच्छा नव्हती. जयपुर, जोधपुर व उदेपुर ह्या तीन प्रमुख रजपूत घराण्यानीं आपलें सार्वभौमत्व कबूल करावें, हा त्याचा अतस्थ हेतु होता. रजपुताच्या मुली आपण करून आपल्या त्यास द्याव्या, म्हणजे रजपूत राजे आपल्या कबजात येतील असा त्याने तर्क बांधिला. रजपुतास ही गोष्ट आवडली नाही. शेवटीं नाइलाजास्तव कित्येकानीं अकबराचे म्हणणे कबूल केले. तरी पण मुसलमानाच्या मुली त्यानीं केल्या नाहीत. अकबराच्या मनात हीही गोष्ट होती, पण ती तडीस गेली नाहीं. अकबराची रजपूत राण्यांवर विशेष प्रीति असे. त्याच्याकरिता तो ब्राह्मणास दानधर्म करी, आणि त्यांच्याबरोबर हिंदु दवताची पूजाअर्चा करी. मुसलमानास अकबराचें करणे आवडलें नाहीं. पण त्याच्या हातात सर्व अधिकार असल्यामुळें दोघाचेंही काहीं चाललें नाहीं. अकबराचा उद्देश बऱ्याच्च अंशीं तडीस गेला. त्याच्या राज्याची उभारणी मजबूद पायावर झाली. अर्थात् तें पुढें पुष्कळ दिवस टिकलें. एकनिष्ठ रजपुताचे त्यास साह्य असल्यामुळें अफगाण व मोगल हे त्यास शिरजोर झाले

नाहींत. अकबरानें हिंदूंस योग्यतेस चढविलें, तें त्यांचें कल्याण करण्याच्या इराद्यानें नव्हे, असें व्हीलरचें म्हणणें आहे. अफगाण लोक नेहमीं दंगेखोर असत; अकबराचे अमीरउमराव अनेक प्रसंगीं त्यास मोजीत नसत. त्यास दावात ठेवण्यासाठीं अकबरास रजपुतांचें साह्य घ्यावें लागलें. जे मुसलमानी धर्माचे कट्टे अनुयायी होते, त्यांस त्याचें धर्मांतर रुचलें नाहीं, म्हणून ते त्याजवर उठण्यास तत्पर असत; आणि ज्यांस अकबराचें धर्मांतर आवडलें, ते त्याच्या चांगुलपणाचा फायदा घेऊन स्वतः सत्ता बळकाविण्यास टपले होते. अशा पेंचामुळें हिंदु लोकांस संतुष्ट ठेवणें अकबरास भाग पडलें.

अकबराचें सर्वांत मोठें कृत्य म्हणजे त्यानें हिंदुस्थान देश एकछत्री अंमलाखालीं आणिला, हें होय. ही गोष्ट साध्य करण्याचे प्रयत्न पुष्कळांनीं केले; पण अकबरानें मात्र ती सिद्धीस नेली. समरकंदपर्यंतचा सर्व प्रदेश ताब्यांत आणण्याचा त्याचा फार मनोदय होता; त्याच हेतूनें त्यानें पुष्कळ वर्षें लाहोरास काढिलीं. परंतु समरकंदच्या नादास लागल्यानें, हिंदुस्थानही हातचें जाण्याचा प्रसंग येईल, असें मनांत आणून, त्यानें शहाणपणानें आपला उद्देश आवरून धरिला. त्याच्या नातवास मात्र तो शहाणपणा साधला नाहीं. शहाजहाननें मध्य-आशिया खंडांत फौज पाठवून बाल्ख काबीज केलें, पण तें त्यास लगेच सोडून द्यावें लागलें.

**४. जमाबंदीची व्यवस्था.**—हिंदुस्थानांत सरकार-उत्पन्नाची मुख्य बाब जमीनमहसूल असल्यामुळें, हा महसुलाचा प्रश्न नेहमींच मोठया महत्त्वाचा आहे. हिंदु धर्मशास्त्रांतही त्याचा विचार असून, मुसलमानांत प्रथम अलाउद्दीन खिलजी व पुढें शेरशहा ह्या दोघांनीं ह्या बाबतींत बरेच नियम वगैरे केले. शेरशहानें अलाउद्दीनचेच कित्येक नियम स्वीकारिले. मुसलमानी राज्यकर्त्यांची राज्यमर्यादा नेहमीं कमीज्यास्त होत असे; त्यांच्या नाण्यांची किंमतही निरनिराळ्या वेळीं भिन्न होती, इत्यादि कारणांस्तव कोणत्या राज्याचा वसूल किती होता, हें आज नक्की सांगतां येत नाहीं. बाबराचे राज्याचा वसूल अडीच पावणेतीन कोट रुपये असावा. ख्वाजा अब्दुल मजीद नावाचा हुमायूनचा एक विश्वासू नोकर होता. त्याजला अकबरानें प्रथम आसदखान हा किताब देऊन जमाबंदीच्या कामावर नेमिलें. पुढें १५६७ त आसफखानाची जमाबंदी रद्द करून, मुजफरखान याजकरवीं फिरून जमाबंदी कराविली. पुढें सन १५८२ त सर्व राज्याचे एकंदर बारा सुभे करून अकबरानें राजा तोडरमल्ल व शहा मनसूर यांजकडून तिसरी जमाबंदी कराविली, ह्यांनीं मागील दहा वर्षांचे आंकडे घेऊन त्यांच्या सरासरीवर

नवीन रक्कम बांधून दिली. अमील म्हणजे वसूल गोळा करणारे १८२ कामदार नवीन नेमण्यात आले. शहा मनसूरवर पुढें राजद्रोहाचा आरोप ठेवून त्यास अकबरानें फाशी दिले तथापि तोडरमल्लाच्या उद्योगातील बरेंचसे काम शहा मनसूराचे हुशारीचे फल होय, हें निर्विवाद आहे. अकबरानें कुळाकडून रोकड रक्कम घेण्याची वहिवाट सार्वत्रिक केली पूर्वी हाच प्रघात थोड्या बहुत अशानें शेरशहानें सुरू केला होता

सन १५९६ त अकबराचे राज्याचे १२ सुभे असून, त्या सर्वांत १०५ सरकार होते आणि त्यांचा वसूल ९ कोटि रुपये होता, तो हळू हळू १४ कोटि रुपयावर वाढला, आणि ज्यास्तीत ज्यास्त म्हणजे १७॥ कोटींच्या वर कधींच गेला नाहीं जमीनमहसुलाशिवाय तयार झालेल्या कित्येक पदार्थांवर कर होते जिझिया, आणि यात्रेकरूवरील व इतर कित्येक कर अकबरानें माफ केले, तरी त्यानें कित्येक नवीन करही बसविले.

प्रत्येक प्रांतावर सुभेदार हा मुख्य कामदार असून त्याच्या हाताखालीं फौजदार म्हणजे लष्करी मदतनीस असे. त्याचे काम प्रांतात बंदोबस्त ठेवण्याचे होतें शिवाय मीर आदल व काजी हे दोन कामदार न्यायाचे कामासाठीं असत प्रत्येक शहरास एक कोतवाल असे.

तोडरमल्ल अत्यंत प्रामाणिक व उद्योगी होता. काम करण्यांत त्याची बरोबरी कोणाच्यानें होत नसे, ( Beveridge ) तो पैशाचा लोभी नव्हता तोडरमल्लाच्या विरुद्ध इतर कामदार एकसारखा गिल्ला करीत व अनेक कट घडवून आणीत पण कोणाचेही न ऐकता तोडरमल्लाचे हुशारीचा उपयोग अकबरानें करून घेतला, हें त्यास भूषणावह आहे. फारच गिल्ला झाला म्हणजे अकबर आपल्या मुसलमान कामदारास सांगे, 'हिंदु कामदाराची मदत घेतल्याशिवाय तुमच्यापैकी एकाचेही काम तडीस जात नाहीं, मग तशाच प्रकारें मी सुद्धा एक हिंदु गृहस्थ माझ्या कामांत मदतीस घेतला तर तें तुम्हास का खपत नाहीं ?' सर जॉन् शोअर म्हणतो, 'बादशहाच स्वत उद्योगी व व्यवस्थित असल्यामुळे त्याच्या बहुतेक कामदारानाही तसेच शिस्तीनें राहवें लागे, आणि ह्यामुळेच राज्यात सुव्यवस्था कायम होती '

तोडरमल्लासारखा हुशार पुरुष अकबराला लाभला, हें त्या बादशहाचे मोठें सुदैव म्हणावयाचें अबुल् फज्ल् ह्यानें लिहिलें आहे, कीं 'प्रामाणिकपणा, योग्य वर्तन, धारिष्ट, प्रत्येक कामाची पुरी माहिती व खात्याची सुरळीत व्यवस्था बांधून देण्याचें चातुर्य, ह्या गुणांत तोडरमल्लाची बरोबरी करू शकेल, असा एकही पुरुष मिळावयाचा नाहीं.' विद्वान् ग्रंथकार वुइल्सन यानें लिहिले आहे, कीं ' अकबराच्या महसुलाच्या

पद्धतींत जेवढें चांगलें म्हणून आहे, त्याचें सगळें श्रेय हिंदूंस आहे.' येथें हिंदु म्हणजे राजा तोडरमल्लच होय. बादशहा चतुर होता. कामदारांनीं सुचविलेल्या पद्धतीचे गुणावगुण ओळखून तावडतोब हुकूम सोडण्याचें त्याचें कसब कांहीं लहान नव्हे. प्रथमतः सर्व जमिनीची मापणी करण्यांत आली. नंतर त्या जमिनीची प्रतवारी ठरविली. उत्तम, मध्यम, व कनिष्ठ अशा तीन प्रती अकबरानें ठरविल्या होत्या. मागील एकोणीस वर्षांचे उत्पन्न काढून त्याच्या सरासरीनें प्रत्येक बिघ्याचें सरकारदेणें त्यानें ठरविले. उत्पन्नाचा तृतीयांश सरकारांत घ्यावयाचा प्रघात घातला. शेरशहा सूरनें ठरविलेला जमीनदस्त ह्यापेक्षां कमी होता. परंतु अकबरानें जमिनीच्या साऱ्याशिवाय इतर सर्व कर माफ केले; कामदार लोकांस ज्या रकमा द्याव्या लागत, त्या बंद केल्या; आणि इजाऱ्यानें जमिनी देण्याची वहिवाट बंद करून वसूल जमा करण्यास सरकारी अधिकारी नेमिले. इजाऱ्याची वहिवाट अशी होती, की सबंध परगणे लिलांव करून जास्त रकम देणारांस ते सोंपण्यांत येत. जो लिलांव घेईल, त्यास इजारदार म्हणत. हे इजारदार रयतेस पाहिजे तसे पिळून काढीत. इजारे बंद केल्यामुळे रयतेचीं बहुतेक पीडा नाहींशी झाली अकबराची महसुलाची पद्धत हल्लींच्या मुंबई इलाख्यांतील पद्धतीसारखी होती. जमिनीची मापणी व प्रतवारी, लागवड करणारांची नांवनिशी, उत्पन्नाचा अंदाज, इत्यादि गोष्टींमध्ये दोहोंचें अगदीं निकट साम्य आहे. अकबरानें लोकाकडे वहिवाटीस असलेल्या व चालत आलेल्या जमिनी काढून घेतल्या नाहींत. जोंपर्यंत सरकारानें ठरवून दिलेल्या साऱ्याचा ऐवज पैशानें किंवा ऐनजिनसी कुळाकडून भरला जाई, तोंपर्यंत त्यांच्याकडील जमीन काढून घेण्याची कोणाची प्राज्ञा नसे. त्या पद्धतींत दोष नव्हते असें नाहीं आरंभीं केलेले नियम फार सूक्ष्म आणि त्रासदायक होते. प्रथम दरवर्षी शेतांची पाहणी करण्याचा ठराव होता, पण त्यामुळें फार त्रास पडूं लागला. तेव्हां दहा वर्षांचा सारा एकदम ठरवून देण्यांत आला. ह्याच धर्तीवर पुढील राज्यकर्त्यांनीं आपली व्यवस्था बांधून दिली. खुद्द इंग्रज सरकारासही अकबराच्या पद्धतीचा फार उपयोग झाला आहे.

अकबराच्या राज्याचे मुख्य सुभे सोळा होते, ते हेः— १ काबूल, २ लाहोर, ३ मुलतान, ४ सिंध ( ठ्ठा ), ५ गुजराथ, ६ माळवा, ७ अजमीर, ८ दिल्ली ९ आग्रा, १० अलाहबाद, ११ अयोध्या, १२ बहार, १३ बंगाल, १४ वऱ्हाड, १५ खानदेश, आणि १६ अहंमदनगर. ओढ्या व काश्मीर हे दोन मागाहून झाले. ह्या प्रत्येक प्रांतावर एकेक सुभेदार असून त्याजकडे मुलकी व लष्करी अशा दोनही

कामाचा पूर्ण अधिकार होता लष्करी, मुलकी आणि जमाबदी, अशीं तीन मुख्य खातीं त्याच्या हातात असन हे सर्व प्रात मिळून अकबराचा महसूल चौदा कोटि रुपये होता हंटरच्या मते इंग्रज सरकारच्या वसुलापेक्षा अकबराचा वसूल ज्यास्त होता. ह्या म्हणण्याच्या समर्थनार्थ त्याने अनेक आधार दाखविले आहेत एतद्देशीय सस्थानें सोडून इंग्रज सरकारचा हिंदुस्थानचा वसूल आज एकशें तीस कोटींवर आहे. खानदेशच्या अलीकडील दक्षिण हिंदुस्थान सोडून व अफगाणिस्तान धरून अकबराचा वसूल चौदा कोटि रुपये होता. हल्ली हिंदुस्थानच्या उत्पन्नातून सुमारें तीस चाळीस कोटि रुपय इंग्लडातील खर्चास जातात अकबराचा सर्व पैसा ह्याच देशात खर्च होई. एकदरीत जमिनीच्या साऱ्याचा प्रश्न फार महत्त्वाचा असून ह्या विषयाचा स्वतंत्र अभ्यास करणारास त्यापासून पुष्कळ माहिती मिळण्यासारखी आहे. ( ' पूर्वी प्रातातील कामदार बहुधा स्वतंत्र असत अकबरानें नानाप्रकारच्या नियमानी त्याच्या स्वैर वर्तनास आळा घातला. ठिकठिकाणीं तपासणी कामदार नेमून, लोकावर जुलूम न व्हावा, अशी तजवीज केली शेतकऱ्यास विशेष सवलती देऊन तीन वर्षात सर्व पडित जमीन लागवडीस यावी, अशी योजना केली. जमीन महसुलासबधानें पूर्वी हिंदु व मुसलमान शतकऱ्यात भेदभाव ठरविलेला होता, तो अकबराने काढून टाकिला ' ( Malleson ) )

बदाऊनी नावाच्या मुसलमान इतिहासकाराने तोडरमल्लाच्या पद्धतीतील एक दोष दाखविला आहे पडतर जमीन लागवडीत आणण्यासाठी करोडा नावाचे अधिकारी नेमण्यात आले, आणि प्रत्येकाकडे नवीन मापणीप्रमाणे पंचवीस हजार रुपये उत्पन्नाची जमीन सोपविण्यात आली तीन वर्षात जमिनींची लागवड झाली पाहिजे, असा नियम होता हा नियम पाळण्याबद्दल प्रत्येक करोडीकडून जामीन घेतलेला होता. परंतु ह्या व्यवस्थेचा काहीं एक उपयोग झाला नाहीं। उलट लोकास त्रास मात्र फार सोसावा लागला करोडींनीं स्वतःच्या तुंबड्या भरून सर्व देश भिकेस लाविला तोडरमल्लानें असल्या पुष्कळ अमलदारास कडक शिक्षा केल्या त्यांत पुष्कळ मुसलमानासही शिक्षा झाल्या दूरदूरच्या प्रातात रयतेवर पुष्कळ जुलूम होत असे. बंगाल्यातील कोनाकोपऱ्यात मुसलमान कामदार रयतेस अत्यंत त्रास देत, अशाबद्दल बराच पुरावा सापडतो. एका ग्रंथकारानें लिहिले आहे, की ' सर्व लोकावर सारखा जुलूम चालला होता. अधिकारी सरकारी पत्रकात पडतर जमिनी पिकाच्या म्हणून दाखल करीत आणि खोटी मापणी करून पाऊण बिघ्याच्या ठिकाणी एक बिघा

लिहीत. खजानजीस दररुपयावर कांहीं रकम ज्यास्त घेत, यामुळें पुष्कळ शेतकरी आपलीं गुरें, ढोरें विकून जमिनी सोडून जात.'

ह्या गोष्टी जरी सर्वथैव खोट्या नाहींत, तरी त्या अपवादादाखल आहेत. मागाहून जिंकिलेल्या प्रांतांत पुष्कळ अंदाधुंदी होती. परंतु जुन्या प्रांतात सर्व कामें सुरळीत चालत, यात संशय नाहीं. तसेंच अकबर व राजा तोडरमल्ल यानीं रयतेच्या कल्याणाकरिता पुष्कळ गोष्टी केल्या, म्हणूनच त्याचें नांव चिरस्मरणीय झालें आहे.

**( ५ ) लष्कराची व्यवस्था.**—अकबराची राज्यव्यवस्था सुरळीत चालण्यास रजपुतांशीं केलेल्या शरीरसंबंधांहून दुसऱ्या अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या. अकबराच्या लष्कराची व्यवस्था त्या वेळच्या मानानें फार चांगली होती. त्यानें रजपूत राजांस आपल्या लष्करात मोठमोठ्या जागा दिल्या. रजपुतांस दुसरें कांहीं नको होतें. लष्करी काम दिलें म्हणजे ते अगदीं खूष असत. तरी बादशहाचे स्वतःच्या घराण्याबाहेर स्वकीय असे कोणी नव्हतेच तेव्हां रजपुतास जागा देण्यास सवड होती. पांच हजारांवर फौज बाळगणाऱ्या सरदारास अमीर अशी संज्ञा होती. पांच हजाराहून कमी लोक बाळगणारास मनसबदार असें म्हणत. ह्याशिवाय खालच्या दर्जाचे लहान लहान असामदार पुष्कळ होते. तसेच अहदी नांवाचे एकेकटेच चाकरीस राहणारे लोक पुष्कळ असत. अमीर व मनसबदार ह्यांची संख्या सुमारें ४१५ होती. खालच्या दर्जाचे सरदार सुमारें १८०० होते. शहाजादा सलीम हा दहाहजारांचा अमीर होता, दुसरा मुलगा मुराद हा आठ हजारांचा आणि तिसरा दानियाल सात हजारांचा सरदार होता. शहाजाद्याशिवाय दुसऱ्या कोणास पाचहजारांवरची जागा सहसा मिळत नसे. सलीमचा पुत्र खुस्रू हा पाच हजारांचा अमीर होता. मनसबदाराचा पगार दरमहा दीडशें रुपयांहून कमी किंवा सातशेंहून ज्यास्त नसे. सातशेंहून ज्यास्त पगार अमिरास असे. अमीर व मनसबदार ह्यांची पूर्ण यादी आयने–अकबरींत दिली आहे, तीवरून असें दिसून येतें, कीं हिंदुस्थानातल्या मुसलमानांस वरिष्ठ प्रतीच्या जागा फारशा मिळत नसत; बहुतेक जागा इराणी, तुर्क किंवा आरब ह्या लोकास दिल्या जात, तसेंच एकंदर ४१५ असामींपैकीं ५१ लोक हिंदु होते. शहाजहानच्या वेळेस ६०९ मनसबदार असून त्यांपैकीं ११० हिंदु होते.

पूर्वीं लष्करी अंमलदारांच्या खर्चासाठीं जहागिरी तोडून दिलेल्या असत. त्यामुळें लष्कर ठेवण्याची आपली जबाबदारी पार न पाडतां ते रयतेपासून पैसा मात्र पिळून घेत. ही व्यवस्था मोडून अकबरानें होईल तितक्या रोकड नेमणुकी बांधून दिल्या.

पगार देण्यापूर्वी प्रत्येक सरदारानें नेमणुकीप्रमाणे लोक ठेविले आहेत की नाहीत हें दाखविण्याकरिता हजिरीपत्रकें ठेवण्याची अकबराने फरज पाडली त्या पत्रकात प्रत्येक इसमाच्या चेहऱ्यावरील खाणाखुणा दाखल कराव्या लागत घोड्याची संख्या बरोबर राहवी व अदलाबदल होऊ नये, म्हणून त्यावर राजचिन्हाचा डाग देण्यात येई लष्करास लागणाऱ्या इतर जनावरांची व तसेच सामानाचीं पत्रके ठेवण्याची अकबरानें वहिवाट घातली. प्रत्येक मनसबदाराने स्वाराच्या निम्मे पायदळ ठेवावे, त्यातील चतुर्थांश बंदुकवाले असावेत, आणि बाकीचे तिरंदाज असावेत, अशी व्यवस्था होती अकबराच्या एकंदर फौजेची संख्या किती होती तें समजत नाहीं, तरी ती दोन लाखाजवळजवळ असावी असा अदाज करिता येतो

अकबरानें एवढा जरी बंदोबस्त केला, तरी त्याच्या लष्कराची घडी बरोबर बसली नाही सरदार लोक माणसाच्या व जनावराच्या खोट्या हजिऱ्या भरीत आणि काही केलें तरी त्यास लबाडी करण्यास सवड सापडेच फार तर काय, पटात दाखल केलेल्या संख्येचा फक्त एक तृतीयांश प्रत्यक्ष कामावर असे, बाकीचे लोक हजिरीच्या वेळेपुरते संख्येच्या भरतीसाठी आणण्यात येत पटावर संख्या पाच हजार, व प्रत्यक्ष हजर असलेले लोक पाचशे असा प्रकार वारंवार घडे. शिवाय सरदारगिरी मिळणें केवळ बादशहाच्या मर्जीवर असे, त्यामुळे नेहमीं चागल्याच लोकाची निवड होई असे नाहीं. एकंदरीत त्या वेळच्या मानानें अकबराने लष्करात पुष्कळ सुधारणा केली. आपसातील फुटीमुळे त्याची व्यवस्था चागली टिकली नाहीं मोगल अशी ज्यास संज्ञा होती, ते वर्णानें गोरे असून परदेशांतून आलेले लोक होते त्याच्यात पिढीजाद गुण काहीं नव्हता इराणी, तुर्क, आरब वगैरे कोणत्याही जातीचा मनुष्य असला, तरी वर्ण गोरा असला म्हणजे तो मोगल समजला जाई. अशाच लोकास बादशहा वरिष्ठ प्रतीच्या जागा देई जे अमीर म्हणून असत त्याच्यातूनच कित्येकास वजीर, सुभेदार वगैरे जागा देण्यात येत हे मोगल लोक दोन तीन पिढ्या हिंदुस्थानांत राहिले म्हणजे त्याचा वर्ण बदले मग त्याच्या वंशजांस जागा मिळत नसत, अर्थात् त्यास हलक्या जागा पतकरून राहवे लागे त्याचप्रमाणे गोऱ्या परदेशीय लोकास जहागिरी वगैरे मिळाल्या, तरी त्या वंशपरंपरेनें चालत नसत. जहागीर संपादन करणारा इसम मरण पावल्यावर त्याच्या वारसास लहानशी नेमणूक देऊन, जहागीर खालसा करण्याची वहिवाट होती

परंतु मोगल सरदारांची ही व्यवस्था रजपुतांस लागू केलेली नव्हती. रजपुतांविषयीं केलेला प्रत्येक निर्बंध वंशपरंपरा चालावयाचा असे. त्यांच्या नोकरीबद्दल त्यास वंशपरंपरा चालणाऱ्या जहागिरी नेमून दिलेल्या असत. रजपूत शिपाई आपल्या यजमानाची नोकरी करी; तो यजमान राजाच्या तैनातीस असे; आणि असे राजे सार्वभौम दिल्लीपतीचे मांडलिक असत. ही पद्धत अकबरानें फिरविली नाहीं. प्रथम रजपूत राजास अकबराची नोकरी करणें आवडलें नाही. पण त्यानें सुचविलेली व्यवस्था उभयतांसही हितावह होती. रजपूत राजास त्यानें अमिरांच्या योग्यतेस चढविलें, तेव्हां ते त्याची नोकरी एकनिष्ठपणें करूं लागले. ज्या प्रांतातून फौजेचें कूच होई, तो प्रांत उद्ध्वस्त होत असे. ह्या कारणानें झालेलें शेतकऱ्याचें नुकसान भरून द्यावें, असें अकबरानें ठरविलें.

येणेंप्रमाणें मोगल व रजपूत अशा दोन फौजा अकबराच्या पदरीं होत्या. त्यांपैकीं मोगल लोक भाडोत्री माणसाप्रमाणें तात्पुरतें काम करणार होते. रजपूत लोक अनेक पिढ्यांपर्यंत वंशपरंपरा काम करीत आले होते. ह्यामुळेंच ह्या दोन जातींत स्नेहभाव असणें शक्य नव्हतें.

तसा स्नेहभाव उत्पन्न करण्याचा अकबरानें प्रयत्न केला नाहीं असें नाहीं. साऱ्या मोगल बादशाहीच्या इतिहासात रजपूत व मोगल ह्यांचें परस्परांतील वैमनस्य आणि उभयतांच्या वितुष्टामुळें अफगाण लोकांनी केलेले पुढें येण्याचे प्रयत्न, ह्या दोन गोष्टी विशेष महत्त्वाच्या आहेत.

**५. अवांतर सुधारणा.**—शहाणपणानें व औदार्यानें राज्य करण्याची ज्याची इच्छा असेल त्याने अकबराचा कित्ता घ्यावा, असें सांगतात. जमिनीच्या महसुलासंबंधानें अकबराची व्यवस्था दुसरीकडे सांगितली आहे. सरकारदेण्याचें ओझें सर्वांवर सारखें पडावें, हा त्याच्या व्यवस्थेचा विशेष गुण होता. अवर्षण किंवा दुष्काळ पडे, तेव्हां सरकारचा सारा सगळा किंवा अंशतः तरी तो माफ करीत असे. पूर्वीपासून अनेक अनियमित कर चालत आले होते, ते सर्व त्यानें माफ केले. सर्व राज्यांत त्यानें ठरींव वजनें व मापें सुरू केलीं; सरकारी अंमलदारांस देणग्या वगैरे कित्येक बाबी रयतेकडून मिळत, त्या सर्व अकबरानें बंद करून कामदारांस नियमित पगार बांधून दिले. ह्यामुळें त्यांच्याकडून रयतेवर होणारा जुलूम बंद झाला. सर्व खात्यांचे नियम ठरवून टाकिल्यामुळें अधिकाऱ्यांचा स्वेच्छाचार अगदीं बंद झाला. उदाहरणासाठीं अशा प्रकारच्या कांहीं नियमांचें सार येथें देतों.

**सुभेदार**—यानें लोकाच्या सुखाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे दूरवर विचार केल्याशिवाय कोणास देहान्त शिक्षा देऊ नये, न्याय मागण्याकरिता आले असतील, त्यास विलंब करून छळू नये. विपन्नावस्थेत असलेल्या इसमाची हकीकत ऐकून घ्यावी आणि त्यास शिक्षा करू नये, रस्ते नेहमी सुरक्षित ठेवावे 'उद्योगी शेतकऱ्याचा मित्र' असा लोकाच्या मनावर आपणाविषयी त्याने ग्रह उत्पन्न करावा

**काजी** ( न्यायाधीश ).—लोभ व पक्षपात ह्या दुर्गुणाचा त्याने आपणास स्पर्श सुद्धा होऊ देता कामा नये गुन्हेगार कोण व निरपराधी कोण, ह्याचा सूक्ष्म रीतीने निकाल करून त्याप्रमाणे आपले वर्तनही शुद्ध ठेवावे.

**कोतवाल**—ह्याची वागणूक चोख व प्रामाणिकपणाची असली पाहिजे जे निरुद्योगी असतील त्यास काही तरी उद्योग करण्यास लावावे कमी वजनाची नाणी सरकार भरण्यात आल्यास जितकें वजन कमी असेल तितक्यापुरतीच ज्यास्त रक्कम घ्यावी, अधिक घेऊं नये लोकात मद्यपान बंद करण्याची सक्त तजवीज ठेवावी, पण असे करिताना लोक गुप्त स्थळी काय करितात तें जाणण्याची आतुरता बाळगू नये. नवऱ्याच्या शवावरोवर सती जाण्याची कोणा विधवेची इच्छा नसेल तर तिजवर लोकाचा जुलूम होऊ देऊ नये.

**मुलकी कामदार**—आपण शेतकऱ्याचे निकट व जिवलग दोस्त आहों, असे ह्यानें सर्वदा मनात बाळगावें, शेतकऱ्याशी सर्व व्यवहार स्वत करावा, मध्यस्थांची जरूर ठेवूं नये. शेतकऱ्यास जरूरीच्या प्रसंगीं कर्जाऊ पैसे द्यावे, आणि त्याची फेड पुढें सवडीसवडीनें करून घ्यावी, ठरलेल्या रकमेपेक्षा ज्यास्त सारा वसूल न होईल अशी खबरदारी ठेवावी, वसूल गोळा करण्याचे काम जोरजवरी करूं नये कित्येक निरर्थक व त्रासदायक कराच्या बाबी आहेत, त्या वसूल करूं नयेत

लावलचक नियमाचा हा केवळ गोषवारा आहे ह्यापैकी काही नियमाच्या अस्सल प्रती आज उपलब्ध आहेत बऱ्याच अंशीं हे नियम पाळले जात होते, ह्यात संशय नाहीं निदान आपणास काय कर्तव्य आहे हें डोळ्यापुढें ठेवून अकबर नेहमीं वर्तत होता, एवढें तरी त्यावरून निर्विवाद दिसते

**न्याय.**—मीर आदिल ह्या किताबाचा मुख्य न्यायाधीश व एक काजी असे दोघे सर्व कज्याचे निकाल करीत काजीचे काम कायदा सागण्याचे व मीर आदिलचे काम निकाल देण्याचें असे. मुसलमानी चाली व मनूचे कायदे ह्याचा आधार घेऊन अकबराने सर्व अपराधाच्या शिक्षा ठरवून दिल्या होत्या. पोलिसचा बंदोबस्त

रामोशी वर्गाच्या लोकांकडून ठेविला जाई. त्यांजवर देखरेख कोतवालाची असे. खेड्यापाड्यांतील पोलिसची व्यवस्था गावपंचायतीकडे सोंपविलेली असे.

आपणापुढें येणाऱ्या अमीर मंडळींनी सिज्दा म्ह० नमस्कार घालावा असा हुकूम अकबरानें काढिला, पण तो फार दिवस चालला नाहीं. एकंदरींत अकबराचा अधिकार अनियंत्रित होता. त्याचे प्रांतोप्रांतींचे सुभेदारही अनियंत्रित अधिकार वापरीत असत. पापाचरण न करण्यास त्यांस बादशहाची भीति एवढीच काय ती दहशत असे. बादशहानें तरी मर्जीस येईल तसें वर्तन न करण्यास त्यास फंदफितूर होण्याचीच कायर्ती भीति असे. बादशहावर दाब ठेवण्यास उलमामंडळ होतें, तें तर अकबरानें उडवून दिलें; तेव्हांपासून लोकांच्या हातांतील सर्व अधिकार गेला; आणि अखिल मोगल बादशाहींत यथास्थित स्वेच्छाचार चालू झाला. राज्य-कारभार पाहण्यास तो वजीर नेमीत असे, पण बादशहाच्या हातांत सर्व सत्ता असल्यामुळें वजिराचें कांहीं चालत नसे. केव्हां केव्हां वरिष्ठ प्रधानांचें मंडळ अकबर जमवीत असे. त्यांत विशेषेंकरून मुख्य प्रधान आणि हिशेबी व टपाल ह्या खात्यांचे मुख्य अधिकारी असत. ह्यांशिवाय इतरांस बादशहा कारणपरत्वें बोलावी. एकंदरींत बहरामखान व अबुल फज्ल् ह्याखेरीज इतरांचें बादशहावर कांहींच वजन पडलें नाहीं.

अकबर आपला वेळ कसा घालवीत असे हें समजण्यासाठीं त्याच्या तीन विशिष्ट संस्था होत्या, त्या समजून घेतल्या पाहिजेत. त्या संस्था म्हणजे झरोका, दरबार व घुसलखाना ह्या होत. झरोका म्हणून वाड्याच्या पिछाडीस एक खिडकी होती. ह्या ठिकाणीं दररोज सकाळीं येऊन अकबर सूर्याची पूजा करी; आणि अकबरास वंदन करण्याकरितां खालच्या मैदानांत भक्त मंडळींची गर्दी जमलेली असे. हा विधि आटोपल्यावर पुनः एक दोन तासांनीं तो त्या झरोक्याजवळ येई. त्या वेळीं खालच्या मैदानांत कांहीं कुस्त्या वगैरे खेळ चालत. लष्कराची तपासणी करून कवाईत पाहणें हेंही काम तो ह्याच वेळेस करी. वाड्याच्या पुढच्या बाजूस मोठ्या दालनांत दरबार भरत असे. त्या ठिकाणीं अकबर दररोज येऊन गादीवर बसे, सर्वांच्या भेटी घेई, लोकांचे अर्ज ऐके, न्यायमनसुबा करी, मांडलिक राजे, परदेशचे वकील व अमीर यांच्या भेटी घेई. दरबारच्या सर्व मोठमोठ्या मंडळींस ह्या दरबारांत व झरोक्यापासीं हजर राहवें लागे. घुशालखाना एका स्वतंत्र जागेंत होता. तेथें दररोज सायंकाळीं खासगी मंडळ जमा होई. ह्या ठिकाणीं राज्याच्या कित्येक गुप्त गोष्टींचीं व भानगडीचीं कामें चालत. तशीं कामें नसलीं म्हणजे

इतर सामान्य विषयावर चर्चा होई मुसलमानापेक्षा हिंदु व विशेषत रजपूत लोकावर अकबराची विशेष भक्ति होती तो राज्यावर आला तेव्हाच त्यास असें कळलें, कीं, अफगाण व मोगल ह्याच्या भाडणात आपला निभाव मुळीच लागावयाचा नाहीं आजपर्यंत कोणत्याही बादशहास त्यानीं मोजिलें नाही, म्हणून रजपुताचा व इतर सर्व हिंदु लोकाचा स्नेह सपादून आणि त्याजला भरंवशाची कामे सागून आपल्या राज्यास त्याने बळकटी आणिली.

अकबराची स्वारी बाहेर फिरावयास निघाली, म्हणजे त्याच्या छावणीचा देखावा एखाद्या मोठ्या नादत्या शहराप्रमाणे दिसे त्याची स्वारी म्हणजे एक अवाढव्य शहरच असे राजधानीप्रमाणे सर्व सोयी त्याच्या छावणींत केलेल्या असत. नोकर, चाकर, व्यापारी, जनावरें वगैरे त्याच्या बरोबर फिरत असत अकबराजवळ पुष्कळ प्रकारचीं मोर्तबें होती आणि कोणत्या प्रसगास कोणत्या मोर्तबाचा उपयोग करावयाचा हें ठरलेले होतें कोठार किंवा मुदपाकखान्याच्या बारीकसारीक गोष्टीतही अकबराचें लक्ष पोचत असे ह्या खात्यावर चागल्या विश्वासु व इमानी माणसाची नेमणूक तो करी. समोर वाढून आणिलेलें अन्न प्रथम चाखून पाहण्यास योग्य इसम नेमिलेले असत अन्न शिजताना त्याजवर सक्त पाहरा असे ‘ बादशहाच्या उपयोगास जी जी म्हणून ताब्याची भाडीं लागावयाचीं, त्याजला महिन्यातून दोन वेळ कल्हई करावी व जनानखान्याच्या व शहाजाद्याच्या उपयोगास लागणाऱ्या भाड्यास महिन्यातून एकच वेळ कल्हई करावी, ’ असा अकबरानें नियम ठरविला होता ह्यावरून त्याचे अवलोकन किती सूक्ष्म असे हें उघड होतें तो गंगेचे पाणी पीत असे व तें थड करण्याकरिता सो-ऱ्याचा उपयोग करी पाणी व त पिण्याचीं भाडीं मोहोरबंद ठेविलेली असत त्याचप्रमाणे बागा व दारूखाने ह्याजवर सक्त पाहरा असे. राजपुरुषाचे जीव घेण्याचीं कारस्थानें वारंवार चालत असत, म्हणून अशा प्रकारच्या नियमाची विशेष जरूर होती

आरंभीं अकबराने क्रूर आचरण केले असले, तरी पुढील वयात याने केलेल्या प्रजाहिताच्या अनेक गोष्टीकडे पाहता त्याचे दोष क्षम्य समजले पाहिजेत. लढाईत पकडलेल्या लोकास गुलाम करण्याची चाल त्यानें बंद केली, आपल्या कारकिर्दीच्या आठव्या वर्षी यात्रेकरूवरील कर त्याने माफ केले, नवव्या वर्षी जिझिया कर काढून टाकिला आणि कराचे ओझे सारखे बसविण्याच्या हेतूनें त्याने सर्व राज्याची खानेसुमारी केली.

आपल्या रयतेचें नैतिक वर्तन सुधारण्याची अकबराची फार इच्छा होती. व्यभिचार बंद करण्यासाठीं त्यानें अनेक उपाय केले. मद्यपानाची बंदी केली नव्हती, तरी त्याच्या अतिरेकानें माद उत्पन्न झाल्यास, शिक्षा ठरविलेली होती. मुलगे सोळा वर्षांचे होईपर्यंत, व मुली चौदा वर्षांच्या होईपर्यंत, त्यांचीं लग्नें करूं नयेत असा त्यानें कायदा केला होता. हिंदु विधवांस पुनर्विवाहाची बंदी होती ती त्यानें काढून टाकिली. मुसलमानांनीं अनेक बायका करणें, आणि हिंदूंच्या बायकांना सती जाण्याची सक्ती करणें ह्या गोष्टी त्यानें मना केल्या. तसेंच वृद्ध बायकांनीं तरुण पुरुषांशीं लग्नें करूं नयेत, आणि वधूवरांच्या संमतीशिवाय कोणतेंही लग्न होऊं नये, असें त्यानें ठरविलें. यावरून एकोणिसाव्या शतकांतील सामाजिक सुधारणेची कल्पना अकबरास अगोदरच झाली होती, असें दिसतें. एकंदरींत या बाबतींत अकबरास विशेष यश आलें नाहीं, ही गोष्ट त्या कालाच्या मानानें फारशी आश्चर्यकारक नाहीं.

आपण केलेली व बोललेली प्रत्येक गोष्ट लिहून ठेवण्यासाठीं त्यानें लेखक नेमिले. ह्या लेखास बादशाही तवारीख म्हणत. मोठमोठ्या शहरांतून आणि बाहेरच्या प्रांतांतून विशेष वर्तमान काय चाललें आहे, तें लिहून कळविण्यासाठीं तो स्वतःचे अंमलदार नेमून पाठवी. त्यांजकडून आलेल्या बातम्यांचा ह्या तवारिखींत संग्रह केला जात असे. वाड्यांत त्यानें एक घंटा टांगून ठेविली होती. तिची सांखळी बाहेर देवडीवर ठेवून, ती पाहिजे त्यानें ओढावी म्हणजे त्याची बादशहाकडे लागलीच दाद लागत असे. अकबर स्वभावतः फार शोधक होता. मुद्दाम पुष्कळ खर्च करून गंगेच्या उगमाचा त्यानें शोध लाविला. मुलाची उपजत प्रवृत्ति कोणत्या धर्माकडे असते हें कळण्याकरितां त्यानें एक प्रयोग करून पाहिला, तो मागें सांगितलाच आहे. मुसलमान फकिरांस अन्न देण्याचे कारखाने पूर्वी होतेच. त्यांशिवाय गोपीपुरा नांवाचा एक नवीन भाग आग्रा शहराच्या बाहेर वसवून, तेथें मुसलमानांप्रमाणें हिंदु अतीत अभ्यागतांच्या भोजनाची व राहण्याची तजवीज अकबरानें केली.

अकबराच्या अंगीं चित्रकलेविषयीं मार्मिकता वसत होती. पहिल्यापासून उत्तेजन देऊन ही कला त्यानें पुष्कळ सुधारिली. निरनिराळे चितारी लोक चित्रें काढून त्याजकडे पाठवीत, त्यांचे दर आठवड्यास बादशहापुढें एकदां प्रदर्शन होऊन प्रत्येकास योग्यतेप्रमाणें बक्षीस मिळे. त्याच्या दरबारच्या अठरा नामांकित चितार्‍यांची नाव-निशी अबुल् फज्लनें दिली आहे. पुस्तकांत चित्रें घालून त्यांतील विषय मनोरंजक व स्पष्ट करण्याचा प्रघात त्या वेळीं पडला. दरबारच्या मोठमोठ्या पुरुषांच्या तसबिरा

काढून त्याचे पुस्तक बांधून ठेविलेले होतें अकबरानें असे म्हटलें आहे, की ' चित्रकाराच्या अगीं परमेश्वरास ओळखण्याची एक विशेष शक्ति असते एखादें हुबेहूब चित्र काढिलें म्हणजे त्यात जीव उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं नाहीं, तें परमेश्वराच्याच ठिकाणीं आहे, हें ध्यानात येऊन आपला उणेपणा व परमेश्वराचा थोरपणा डोळ्यापुढे उभा राहतो ' गाण्याचाही अकबरास फार शोक होता त्यास त्या कलेची उत्तम माहिती होती रात्रीं झोंप लवकर न येण्यास उत्तम उपाय गाणें होय असे अकबरास वाटे

फैजीचे पुस्तकालय होतें, त्यात ४६०० हस्तलिखित पुस्तकें होतीं अकबराचा पुस्तकसंग्रह ह्याहूनही मोठा होता अबुल फजलची गाठ पडल्यापासून अकबराच्या वर्तणुकींत अत्यत फेर पडला एकदरीत अबुल् फज्लने आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केला असे म्हणता येत नाहीं शहानवाजखान नामक गृहस्थानें असे लिहून ठेविलें आहे, की पुष्कळ लोक म्हणतात, कीं ' अबुल् फज्ल हा नास्तिक होता ' असे म्हणण्यापेक्षा तो अद्वैतवादी होता हें म्हणणे योग्य आहे तो फार थोर मनाचा असून सर्व प्रकारच्या लोकांशीं स्नेहभावानें वागण्यास इच्छित असे ह्यात संशय नाहीं. सर्वांशीं त्याचे वर्तन उदारपणाचे होतें तो मनाचा निर्मळ होता राज्याचीं कामें करण्यात त्याचे वर्तन चोख, निस्पृह, व प्रामाणिक होतें त्याची लिहिण्याची शैली फार मोहक होती ' अकबराच्या बाणांपेक्षा फज्लच्या लेखणीस लोक ज्यास्त भीत असत ' अबुल् फज्ल हा अकबराचा उत्कृष्ट मुत्सद्दी, राजनिष्ठ व इमानी नोकर, उदार साह्यकर्ता, आणि सन्माननीय मित्र असा होता अकबराची कीर्ति वाढण्यास पुष्कळ अंशीं तोच कारण झाला आहे

**६. आग्राशिक्रीचीं बांधकामें**—अकबरानें बांधिलेल्या इमारती फारशा नाहींत आग्रा व अलाहबाद येथील किल्ले त्यानें बांधिले. फत्तेपुरशिक्री येथील मशीद व राजवाडा पाहण्यालायक आहे दिल्लींतील हुमायूनची कबर अकबरानेच बांधविली शहाजहानसारखे कलाकौशल्याचे पुरस्कर्ते पुढें निपजले नसते, तर ह्या कामीं अकबराचाच लौकिक ठळक दिसला असता पूर्वी आग्र्याची भिंत हलकी विटांची होती तेथील लाल दगडाचा मजबूद व प्रेक्षणीय किल्ला अकबरानें बांधिला, आणि तेथील मोठमोठ्या सुंदर इमारती पुढें शहाजहाननें तयार केल्या. अकबराने स. १५६५ त कासिमखान नामक सरदारास ह्या किल्ल्याचे काम सोंपविलें. त्या कामास आठ वर्षे व बत्तीस दिवस लागले. तेथच्या लाल दगडांचे सांधे

लोखंडाच्या कड्यांनीं खिळलेले आहेत. आग्रा, फत्तेपुरशिक्री व लाहोर, इतक्या ठिकाणीं अकबराचें बहुतेक वास्तव्य झालें.

सलीमच्या जन्मामुळें फत्तेपुर शिक्रीचा जन्म झाला. स. १५६८ च्या फेब्रुवारींत चितोडगड पडला, त्या वेळच्या भयंकर प्रळयात लाखों लोक प्राणांस मुकल्याबद्दल अकबरास चटका लागला, आणि त्या पापाचें क्षालन करण्याकरितां तो अजमीर येथें मैमुद्दीन चिस्ती म्हणून एक साधु होऊन गेला, त्या पीराच्या दर्शनास पायीं चालून गेला. लोकाचे जीव बळी घेतल्यावर पापक्षालनाचा हा मार्ग अकबरास उत्कृष्ट साधला होता. कारण कोणतीही स्वारी आटपली व फुरसत सापडली, कीं तो अजमिरास पीराच्या दर्शनास वारंवार जात असे. तसेंच आपणास मुलगा व्हावा म्हणून तो ठिकठिकाणीं नवस वगैरे करी. प्रथम दोन जुळे मुलगे त्यास झाले, ते लागलेच मरण पावल्यावर, त्यास कोणीं सांगितलें, कीं शेख सलीम चिस्ती म्हणून एक साधु शिक्री येथें राहत आहे. शिक्री गाव आग्र्याच्या नैर्ऋत्येस २२ मैल आहे. तेथें त्या साधूचें दर्शन घेतल्यावर त्यानें मुलगा होईल असा आशीर्वाद दिला. कांहीं दिवसांनीं त्याची राणी अंबरची राजकन्या, गर्भवती झाली. प्रसूतीचे दिवस नजीक आले तेव्हां अकबरानें तिला त्या साधूच्याच घरीं नेऊन ठेविलें. तेथें ती प्रसूत होऊन मुलगा झाला. त्यास त्या साधूच्या नावावरून सलीम हेंच नाव देण्यांत आलें. तेव्हांपासून वारंवार शिक्रीस जावें, तेथें दहा वीस दिवस राहवें असा क्रम चालला. त्या वेळीं येथें राहण्यास अडचण पडूं लागल्यामुळें, त्यानें तेथील एका उच्च टेकाडावर प्रथम एक वाडा बांधिला, आणि त्या साधूनें एक उत्तम मशीद बांधिली. नंतर दरबारच्या इतर मंडळींनींही आपआपलीं राहण्याचीं मकाणें तेथें केलीं. अशा रीतीनें नवीन शहर वसलें, त्यास अकबरानें 'फत्तेपुर-शिक्री' असें नाव दिलें; आणि सभोंवार सुंदर व मजबूद कोट बांधिला.

अकबराचे वेळीं शिक्रीचें वैभव अप्रत्तिम होतें. आज सुद्धां तेथील शांत व भव्य देखावा पाहून मनास उपरति होते, आणि मानवी जीविताचे खेळ कसे स्वप्नवत असतात ह्याची खात्री पटते. शिक्रीचा तट अजून चांगला आहे. त्याचा घेर सात मैल असून त्यास मोठाले दरवाजे आहेत. तेथील वाडे, मशीदी, साधु सलीम चिस्तीचें शुभ्र आरसपानी मंदिर, तेथील नकशीचें काम व सुंदर रंगांचीं चित्रें, इत्यादि देखावा पाहून प्राणरहित शरीराची कल्पना मूर्तिमंत डोळ्यांपुढें येते. फक्त चौदाच वर्षें शिक्रीचें भाग्य टिकलें. वुल्यम फिच्च् स. १६१० त शिक्रीस गेला, तेव्हां 'रात्रीं तेथें राहण्यास

भीति वाटते, ' असे तो म्हणतो त्याने स्थापिलेल्या ह्या सुंदर शहरात वास्तव्य करण्याची पुढें कोणाची छाती झाली नाहीं. तेथे पाण्याची सोय मुळीच नसल्यामुळे अकबरासच तें शहर सोडून द्यावें लागले तथापि पृथ्वीवरील एका थोर बादशहाची प्रत्यक्ष आठवण करून घ्यावयाची असेल तर शिक्रीचे दर्शन एकवार तरी अवश्य घ्यावे. अकबराचे स्नानगृह, शय्यागृह, अबुल् फजल वगैरे मंडळींची वसतिस्थानें इत्यादिकात आज आपणास फिरता येतें. तेथील भिंतावरील सुंदर व सोनेरी चित्रे, व रंगात बनविलेल्या फारशी कविता पाहून डोळ्यांचे सार्थक झालेसें वाटेल ' इबादत-खाना ' नावाचें व्याख्यानमंदिर येथेंच आहे त्यास चार मोठीं दालनें आहेत. दरगुरु-वारचे धार्मिक वादविवाद ह्याच मंदिरात होत. ह्या ठिकाणी सर्व धर्माच्या मोठमोठ्या विद्वान् व साधु लोकास अकबराने आणवून ठेविलें होते, आणि येथेंच त्याच्या समा-गमात त्याच्या रात्रीच्या रात्री केव्हाच निघून जात नवीन कवि, साधु किंवा विद्वान् पुरुष कोणी अकबराचे भेटीस आला, की त्याचें वास्तव्य ह्या मंदिरात होई आणि येथेंच बादशहा येऊन त्याची भेट घेई बहुधा हरहंमेश कोणी तरी नवीन पुरुष आल्याशिवाय रहात नसे त्यास पोषाख, बक्षिसे, नजराणे वगैरे देऊन ह्याच मंदिरात अकबर त्याची संभावना करी बुद्धिबळाच्या पटावरील मोहऱ्याएवजी प्रत्यक्ष स्त्रिया उभ्या करून, बुद्धिबळाचा डाव आपल्या राण्याबरोबर माडीवर बसून अकबर खेळत असे हा भव्य व विचित्र पट आणि त्यासमोर असलेला वरच्या मजल्यावरील रंगमहाल पाहून विलक्षण कौतुक वाटतें. पंचमहाल नावाचा पांचमजली इमला, राजा बीरबलचा वाडा, मातुश्री हमीदाची इमारत, इत्यादि अनेक कामांची वाखाणणी पाश्चात्य तज्ज्ञांनीं करून त्याची चित्रें व वर्णनें अनेक वेळा प्रसिद्ध केली आहेत इंडियन आर्टचा अभ्यास करणारास त्याचा अतिशय उपयोग होतो ख्रिस्ती, चिनी, बौद्ध, हिंदु वगैरे सर्व प्रकारचे कारागीर व चित्रकार लावून, अनेक धर्मातील चित्रें व कामें अकबराने तयार करविली. अकबरास चित्रकला फार आवडत होती दरआठवड्यास नवीन नवीन चित्रांचे प्रदर्शन त्याजपुढे होत असे. पूर्वीच्या दुराग्रही मुसलमानांनीं चित्रकलेचा त्याग केल्याबद्दल अकबरास मोठा खेद वाटून, त्यानें ती कला ऊर्जित दशेस आणिली पूर्वीच्या अफगाण अमदानींत ती अगदीं लयास गेली होती शिक्री येथील चित्रांची तुलना अत्युत्तम पाश्चात्य चित्रकाराच्या कृतींशीं केली असता, तीं कोणत्याही बाबतींत हीन नाहींत, असाच मार्मिक पाश्चात्यांचा अभिप्राय आहे. उत्कृष्ट चित्रकारांची

सुमारें शंभर नांवें अबुल फज्लनें दिलीं असून सर्वांत हिंदु चित्रकार श्रेष्ठ होते असें तो म्हणतो. ( 'The Moghul Achitecture of Fathpur Sikri, 4 vols, पहा. )

**७. परिस्थिति व तुलना.**—एकंदरींत अकबर बादशहाची गणना पृथ्वीवरील थोर राज्यकर्त्यांमध्यें झाली पाहिजे. हिंदु व मुसलमान यांच्या संबंधानें त्यानें जातिभेद किंवा धर्मभेद दाखविला नाहीं. इतका निष्पक्षपात हिंदुस्थानांत कधीं कोणीं दाखविल्याचें उदाहरण आढळत नाहीं. स्वजातीयांच्या हेकेखोरपणाबद्दल त्यानें शब्दानें व कृतीनें तिरस्कार व्यक्त केला आहे. दोनही धर्मांतील आढळून आलेलीं व्यंगें काढून टाकण्याचा त्यानें प्रयत्न केला, हें काम स्तुत्य होय. शौर्यामध्यें त्याची बरोबरी करूं शकणार असे थोडेच पुरुष सापडतील. त्याची बुद्धि अचाट होती. इंग्लंडांत त्याच्या वेळेस एलिझाबेथ राणी राज्य करीत होती. अकबर गादीवर येण्याचे अगोदर युरोपांत सीझर बॉर्जिया नुक्ताच मरण पावला होता. सन १५२७ त रोम शहराची सात महिनेपर्यंत भयंकर लुटालूट चालली होती इंग्लंडांत गणितशास्त्रावर पहिलें पुस्तक सन १५४० त छापलें गेलें. सेंट बार्थोलोमोची कत्तल सन १५७२ त झाली. स्पेन देशाहून इंग्लंड देश जिंकण्याकरितां आलेल्या मोठ्या आरमाराचा सन १५८८ त नाश झाला. शेक्सपियर कवीचें पहिलें काव्य सन १५९३ त छापलें गेलें. सन १६०० मध्यें रोम शहरांत ब्रूनोला जिवंत जाळिलें. युरोपांतील भिन्न भिन्न राष्ट्रांमधील व्यवहाराचें नियमन करणारा कायदा तयार होण्यास आणखी शंभर वर्षांचा काल लागला चेटकें करणारास इंग्लंडांत सन १७१२ पर्यंत फाशीची शिक्षा होत असे. सन १७१८ पर्यंत फ्रान्समांत व सन १७८० पर्यंत स्पेन देशांत चेटकी लोकांस जाळून टाकीत. प्रत्यक्ष लूथर ( सन १५३० ) ह्यास भुतांबरोबर झगडे करावे लागले. म्हणजे लूथरसारख्या माणसाचा त्या वेळीं भुतांवर विश्वास होता. त्या काळच्या लोकांत चेटकाविषयीं असा समज होता, कीं चेटक करणारणीच्या घरचें मांजर घेऊन त्याचें रक्त काढावें; सात वर्षांच्या कुमारीनें सूर्योदयापूर्वी उठून कांहीं वनस्पतींचा पाला गोळा करावा; आणि तो त्या रक्तांत वांटून त्याचा लेप लावावा म्हणजे चेटक उतरतें; असा युरोपांत लोकांचा समज होता. ब्लेझ पॅस्कल एक वर्षाचा असतांना त्याचें चेटक वरील उपचारानें उतरलें. विद्वान् शास्त्रवेत्ता केप्लर याच्या मावशीस चेटक करण्याबद्दल फाशीची शिक्षा झाली. त्याची आई मोठ्या मिनतवारीनें त्या संकटांतून सुटली. स्वतः केप्लर सर्व युरोपांत त्या वेळेस शास्त्रीय विषयांत इतका विद्वान् असतां,

'चेटकें सत्य आहेत, तीं मिथ्या असे कोणास म्हणता यावयाचें नाहीं,' असा त्याचा स्वत चा ग्रह होता केप्लर सन १६३० त मरण पावला साराश, अकबराच्या वेळचें हिंदुस्थान व यूरोप ह्याची तुलना केली असता, हिदुस्थानची स्थिति चागल्यापैकीं होती युरोपांतील बहुधा कोणत्याही देशाची राज्यव्यवस्था हिंदुस्थानपेक्षा चागली नव्हती. अकबराच्या ताब्यातील मध्यहिंदुस्थानच्या सामान्य लोकांपेक्षा इंग्लंडांतील सामान्य जनसमूहाची स्थिति ज्यास्त सुखकर नव्हती सतराव्या शतकाच्या आरंभी यूरोपच्या शेतकरी वर्गाची स्थिति वास्तविक कशी होती हें समजण्यास फारसा मार्ग नाही तरी 'मायमन साधूचें चरित्र' म्हणून फ्रेंच भाषेंत एक पुस्तक आहे, त्यात सन १७०९ च्या सुमारास, म्हणजे अकबरानंतर शंभर वर्षांनीं फ्रान्सच्या शेतकऱ्याची स्थिति कशी होती, ह्याचें फार मनोरम वर्णन दिलें आहे, तें वाचले असता हिंदुस्थानचें मागें दिलेले वर्णन मिथ्या अगर अतिशयोक्तीचे असे कोणासही वाटणार नाहीं. फ्रान्सच्या शेतकऱ्याची स्थिति विशेष निकृष्ट होती, ही गोष्ट खरी, पण अकबरानें दुःसह कर बंद करून, लोकास तगाईच्या रकमा देऊन, आणि आणीबाणीच्या प्रसगीं त्यास धान्य वाटण्याची तजवीज अमलांत आणून, आपत्काळीं लोकाचें रक्षण करण्याची उत्कृष्ट योजना करून ठेविली होती. इंग्लंडच्या लोकाच्या स्थितीबद्दलही अनेक पुस्तकातून माहिती मिळते पण अकबराच्या रयतेपेक्षा ते लोक ज्यास्त सुखी होते, असे मानण्यास कोठेंच आधार दिसत नाहीं.

रयतेच्या आबादानीच्या प्रश्नानंतर अकबराच्या वेळेस हिंदु लोकाची नीतिमत्ता कशी होती, तें समजून घेण्यासारखे आहे. बाबरास हिंदुस्थानचे लोक फारसे आवडत नव्हते, हें त्याच्या कार्किर्दीत सागितलेच आहे परंतु 'अबुल फज्ल ह्याने हिंदु लोकाविषयी खाली लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे 'एकंदरीनें पाहता, हिंदुलोक स्वधर्मनिष्ठ, मनमिळाऊ, आनंदी, विद्यार्जनरत, न्यायप्रिय, कृतज्ञ, सत्यवादी आणि अत्यंत अमानी असे आहत परकीयाशीं ते गोडीनें वागतात, कामकाजात ते दक्ष व हुशार असे आहेत, दुसऱ्याच्या भानगडींत ते पडत नाहींत समरागणातून पळून जाणे म्हणजे काय हें त्यास ठाऊक नाहीं, ते आपल्या गुरुवर अत्यंत भक्ति करितात, ईश्वरप्रीत्यर्थ देह अर्पण करण्यास ते मागेंपुढें पाहत नाहींत.' अन्य प्रसगीं अबुल फज्ल्नें भिन्न मत दिलें आहे. 'कित्येक देवासारखे चागले आहेत, पण कित्येकाचें आचरण केवळ राक्षसासारखे आहे.'

कैलासचद्र कानजीलाल म्हणतात, 'अकबराचे मोठें काम म्हणजे हिंदुमुसलमानाचें व अफगाणलोकाचें वैर त्याने मोडिलें. निरनिराळ्या धर्मांच्या व कल्पनांच्या लोकांस

एकछत्री अमलाखालीं बरोबरीच्या नात्यानें गोंवून, त्यांचें एक मजबूद राष्ट्र बनविण्याचें काम पूर्वी अकबरानें केलें, तेंच पुनरपि हल्लीं ब्रिटिश राज्यकर्ते करीत आहेत.' ( हिंदुस्थान रिव्ह्यू, एप्रिल १९०८ ).

अकबराची तुलना अशोकाशीं केली असतां शोभण्यासारखी आहे. अशोकाचा बाप मरण पावला, तेव्हा अकबराप्रमाणेंच तोही पंजाब प्रांतांत बंड मोडण्यांत गुंतला होता. अकबराप्रमाणेंच अशोकास आपलें राज्य वाढवून त्याची सुव्यवस्था लावण्यास पुष्कळ वर्षें लागलीं. नर्मदेच्या उत्तरेकडील सर्व प्रदेश अशोकाच्या ताब्यांत होता. अशोक परधर्मीयांचा उच्छेद करीत नसे. धर्मसंरक्षक हें नांव धारण करणाऱ्या उपाध्यायांचा त्यानें बहुत प्रकारें छळ केला. त्याचप्रमाणें नानातऱ्हेचे वाद-विवाद करवून अशोकानें नवीन धर्म स्थापिला. अशोक मांसाहार करीत नसे. अंतकाळीं अशोकानें बौद्धसंप्रदायानुसार वर्तन केलें; आणि अकबरानें इस्लामविधि पाळिला इत्यादि बाबतींत या दोन भिन्नकालीन महान् पुरुषांचें निकट सादृश्य दृष्टीस पडतें. धर्माच्या बाबतींत अकबराची प्रशंसा पाश्चात्य कवींनींही केली आहे. प्रसिद्ध इंग्रज कवी टेनिसन ह्यानें म्हटलें आहे, ' धर्मसंबंधांतील जाच बंद करून आणि सर्व धर्मांशीं समबुद्धीनें वर्तन ठेवून, अकबरानें टयूडर घराण्यांतील आमच्या राजपुरुषांना लाजविलें आहे. '

एकंदरींत अकबर हा थोर पुरुष होता यांत शंका नाहीं. परोपकार करण्यांत त्यानें आपला देह झिजविला. व्यक्तिसंबंधानें पाहिलें असतां त्याचा आजा बाबर हा जास्त पराक्रमी व दीलदार होता. ऐश्वर्याच्या संबंधानें पाहिलें, तर शहाजहानची बरोबरी अकबराच्यानें करवणार नाहीं. परंतु शहाणपण, नीति आणि औदार्य हे गुण व्यक्त करणारे असे नवीन नियम करून अकबरानें मोगल बादशाहीची मजबूद आणि टोलेजंग इमारत उठवून दिली; नाना जाति व धर्म वगैरे ह्या इमारतीचे निरनिराळे व परस्परविरोधी भाग जेथल्या तेथें युक्तीनें गोठवून तीस सुस्वरूप आणिलें. मोगल बादशाही म्हणजे केवळ जुलमी व रानटी राज्यकर्त्यांची एक मालिका असें ज्यांचें मत असेल, त्यांचें तें मत ह्या बादशाहीचें खरें स्वरूप अवलोकन केल्यावर बदलल्यावांचून राहवयाचें नाहीं. तयमूरच्या वेळेपासून अकबरापर्यंत एकंदर जनसमूहाची स्थिति पुष्कळ सुधारली होती. नानाविध विद्या व कला यांचें अध्ययन चालू होऊन लोकांच्या सौख्याची वृद्धि झाली. अकबरानें आशिया खंडाच्या पश्चिम भागांतील सर्व जातींच्या लोकांस व कारागिरांस उत्तेजन दिलें. बादशाहीचें जुनें दांडगाईचें, उग्र, लष्करी स्वरूप बदलून, तीस

सौम्य, उदार व रजपुती बाण्याचे नवीन स्वरूप आणून दिले. हाच क्रम पुढील कारकिर्दीत चालू राहिल्यामुळे जगाच्या इतिहासात मोगल बादशाहीचें नाव चिरस्मरणीय झाले आहे. अकबरापासून औरंगजेबापर्यंत जो काळ गेला, त्यास सर्व जातींचे लोक स्वावलंबनानें स्वातंत्र्याचा उपभोग घेत होते जो तो आपला कामधदा मर्जीमाफक करून राहत होता दुसरा काय करितो, किंवा आपणास काय म्हणतो, याची कोणी परवा करीत नसे औरंगजेबाच्या वेळेपासून हा प्रकार बदलला, आणि लोकांचें विचारस्वातंत्र्य व इष्टाचार नष्ट झाले तेव्हा थोडक्याच काळात पूर्वींचा मनु बदलून मोगल बादशाहीच्या इतिहासास निराळें स्वरूप प्राप्त झाले.

इग्लंडच्या इतिहासात ज्याप्रमाणें एलिझाबेथ राणीचें नाव पहिलें आहे, त्याचप्रमाणें हिंदुस्थानात अकबराचें आहे दोघेही समकालीन होते. दोघाच्याही स्वभावांत स्वच्छंदीपणा व थोडासा हेकेखोरपणा दिसून येतो दोघावरही लोकाची भक्ति विशेष होती दोघाबद्दलही लोकचर्चेत दुर्वर्तनाचा आरोप ऐकू येत असे दोघानींही आपापल्या प्रजेकरिता अनेक कामे केली परंतु एलिझाबेथनतर इग्लंडात पार्लमेंटचा अधिकार वाढत गेला आणि लोकास स्वातंत्र्याचा उपभोग मिळत चालला, तसा प्रकार हिंदुस्थानात घडून आला नाही लोकसत्तात्मक राज्यमत्तेचा प्रकार प्राच्य देशात प्रायः फारसा चालू नव्हता, म्हणून त्याजबद्दल अकबरास दोष देणे वाजवी नाहीं, परंतु आपलें राज्य चिरकाल चालून लोकमुखास व्यत्यय न यावा, याजबद्दल करावे तितके उपाय अकबरानें केले नाहींत याजबद्दल त्यास दोष देण्यास जागा आहे. मोगल लोकाच्या स्वभावास अनुसरून अकबर हा आपल्या मुलाविषयीं अत्यत स्नेहालु होता. त्याचे हट्ट त्याने चालूं दिले. त्यास त्याने दाबात ठेविलें नाहीं नवीन राज्यारोहणाविषयीं त्याने कायमचा नियम ठरविला असता, तर एकदर लोकावर उपकार होऊन, प्रत्येक बादशहा मरण पावल्यावर जो गोंधळ उठतो तो उठाला नसता, आणि मोगलवशाचे राज्य हिंदुस्थानात दिवसेदिवस प्रबल होत गेले असतें.

'सर्वाची अत करणे आपणाकडे वेधून घेण्यासाठीं बादशहा रात्रंदिवस खपत असतो, समोवार हजारों भानगडी चालू असताही त्याची चित्तवृत्ति अगदी बदलत नाही, आणि तो नेहमीं आनदी असतो. परमेश्वरास मान्य होईल अशीच वागणूक तो नेहमीं ठेवितो. तत्त्वज्ञानाच्या गहन विचारात त्याचे मन सदा निमग्न असतें. प्रत्येक इसमाचें म्हणणें तो स्वस्थपणें ऐकून घेतो रागाच्या आवेशात तो भलतीच गोष्ट कधीं करीत नाहीं अनेक शारीरिक व मानसिक बंधनें त्याने आपणास लावून घेतलीं आहेत. लोकांनीं

आपणांस नांवें ठेवूं नयेत, म्हणून आपल्या बाह्य आचरणाविषयीं तो विशेष दक्ष असतो. कोणत्याही जातीच्या किंवा धर्माच्या लोकाचा तो उपहास करीत नाहीं. कोणतेंही काम करावयाचें तो बाकी ठेवीत नाहीं. वारंवार ईशस्तव करून स्वतःचें वर्तन शुद्ध आहे कीं नाहीं हें तो नेहमीं तपासून पाहतो. सर्व लोकास सुखी ठेवण्याची त्याची इच्छा असल्यामुळें तो गुन्हेगारास देहान्त शिक्षा बेताबातानेंच देतो. दररोज दोन वेळा तो सर्व लोकास दृष्टीस पडतो. आणि कोणाच्या मध्यस्थीशिवाय स्वतः लोकांचे अर्ज घेतो. लोकांस संतुष्ट राखणें हें स्वतःच्या सुखाचें मुख्य साधन आहे, असें तो मानितो.' या आयनेअकबरींतील वर्णनांत अतिशयोक्तीचा अंश असला, तरी एतदनुसार वागण्याचा प्रयत्न करणाऱ्या पुरुषास थोर ही पदवी देणें अगदीं योग्य होईल.

८. **बीव्हरिजचा अकबरावर अभिप्राय.**—'सोळाव्या शतकांत पृथ्वीवरील थोर मंडळींत अकबर हा निःसंशय एक महान् व प्रसिद्ध पुरुष झाला. हिंदुस्थानच्या इतिहासांत तर त्याचें नाव अप्रतिम व अनुपमेय आहे. थोरपणाचें वर्तन, कर्तृत्वशक्ति, आणि प्रखर बुद्धि ह्या गुणांत त्याच्या वेळच्या कोणत्याही युरोपियन राजपुरुषांशी त्याची तुलना शोभण्यासारखी आहे. जहांगीरवरून इंग्लंडच्या पहिल्या जेम्सची आठवण होते, तशीच अकबराची तुलना एलिझाबेथ किंवा फ्रान्सचा चवथा लुई ह्यांच्याशीं सहज होऊं शकेल. कायदे, नियम व व्यवस्था विचारानें ठरविणें आणि कृतीनें पराक्रम गाजविणें, ह्या दोनही बाबतींत अकबर तयार होता. अकबराची योग्यता ठरविण्याचें काम बरेंच बिकट वाटतें. कारण त्याचें कर्तृत्व बहुविध असून, त्याच्या अंतस्थ स्वभावाची असावी तितकी माहिती उपलब्ध नाहीं. बाबरानें आपलें आत्मचरित्र स्वतः लिहिलें. हुमायूनची हकीकत त्याचा नोकर जौहर व बहीण गुलबदन ह्यांनीं लिहून ठेविलेली आहे. पण अकबराचा वृत्तान्त अशा प्रकारचा कोणींच लिहिलेला नाहीं. अबुल् फज्लनें मोठमोठे ग्रंथ लिहून वाटेल तितकी हकीकत दिली आहे. पण एक तर अकबर तीस वर्षांचा होईपर्यंत त्याची व फज्लची ओळख सुद्धा नव्हती शिवाय तो अकबराचा नोकर व भक्त होता, तेव्हा त्याच्या लेखांत फाजील स्तुति रेलचेल भरलेली आहे. औरंगजेबाचा वृत्तान्त 'मिरातुलालम' ह्या ग्रंथात किंवा बर्नियर व मनूची ह्यांच्या लेखांत भरपूर मिळतो, तसा अकबराचा मिळत नाहीं. जहांगीरच्या लेखांत तो असला पाहिजे होता, पण जहांगीरचें व बापाचें फार दिवस पटत नव्हतें; आणि एखाददुसऱ्या वाक्यापलीकडे त्याच्यात ज्यास्त कांहीं नाहीं. वदा-

ऊनीच्या लेखावरून मात्र बरीच माहिती मिळते बदाऊनी अकबराचा द्वेष्टा होता, तरी त्याच्या द्वेषमूलक लेखातून अकबराची जितकी तारीफ निघते, तितकी स्तुतिपाठक फज्लच्या लेखातून निघत नाही.

'अकबर स्वभावानें मानी असून अडचणीच्या प्रसगीं डगमगणारा नव्हता त्याचें शरीर व मन हीं मोठी तरतरीत होती आईबापाप्रमाणेच त्याची शरीरप्रकृति निकोप व कणखर होती त्याची विचारशक्ति मोठीशी खोल नव्हती आणि लहानपणचा वेळ खबुतरें उडविण्यासारख्या उनाडपणास ये गेल्यानें, त्याचे जे नुकसान झाले तें कधीं भरून आले नाही. परंतु तो अत्यंत उद्योगी होता कधी एका ठिकाणीं स्वस्थ बसला नाही बारीक चोकशी करून, हरएक विषयाची खडानखडा माहिती तो काढून घेई धर्म व तत्त्वज्ञान असल्या कठिण विषयांत सुद्धा तो मोठ्या आवडीनें मन घाली. बदाऊनी निंदेच्या हेतून म्हणतो, ' प्रत्येकाचे मन काढून घेण्याची बादशहास भारी आवड आरंभापासून अखेरपर्यंत त्याजवर नानाप्रकारचे प्रसंग आले सर्व प्रकारच्या पुस्तकांतून माहिती गोळा करण्याची त्यास मोठी उत्कंठा योग्यायोग्य न पाहता, वाटेल त्या शंका काढून तो पाहिजे तशा चर्चा करीत बसे हा प्रकार त्याचा त्यालाच शोभतो ' स्वतः अकबराचे शब्द अबुल फज्लने लिहून ठेविलेले आहेत, ते असे. ' एकदा तत्त्वज्ञानाचे वादविवाद ऐकू लागलो, म्हणजे मला दुसरें काही सुचत नाहीं. मोठ्या संकटाने, नाइलाज होऊन मन दुसऱ्या कामाकडे लावावें लागते.' फ्रान्सचा राजा सेंट् लुई किंवा रोमन बादशहा मार्कस् ऑरेलियस ह्याच्यासारखा अकबर साधु नव्हता, कारण अकबराचे मनोविकार पुष्कळदा अगदीं अनावर होत बाप किंवा योग्य शिक्षक ह्याजकडून लहानपणी त्याचे मन सुशिक्षित झाले नाहीं. साधुत्वास विरुद्ध असे पिंड त्याच्या ठिकाणी सदैव कायम होतें. कोरड्या ठणठणीत अरण्यांत त्याचा जन्म झाला, आणि नोकरांत व दुष्ट नातेवाइकांत तो वाढला, त्यावरून त्याचे मनही थोडेंसे तसेच कोरडें राहिले आईचा मात्र त्यास पुष्कळच उपयोग झाला तसेच त्याच्या आत्या व दाया ह्यांची त्याजवर अतिशय ममता होती, ह्यामुळें त्याच्या स्वभावांतील मूळचा कठोरपणा बराच नरम पडला एकंदरीत त्याची मानसिक वाढ पुष्कळच मंद होती बहरामखान व महाम अनागा ह्यांच्या मुठींत काही दिवस तो सर्वस्वी होता, त्यावरून त्याचे मन आरंभीं असावे तितकें निश्चयी व स्वतंत्र नव्हतें. जरूरीशिवाय तो कठोरपणा धारण करीत नसे, आणि जहांगीरच्या क्रूर कृत्याचा तर त्यास अतोनात तिटकारा येई. तथापि प्रसगीं क्रूरपणा

दाखविण्यास व त्रासदायक इसमांचा जीव घेण्यास त्याचें मन कचरत नसे. अबुल् फज्ल् त्याच्या दयेची तारीफ करतो ती वायफळ आहे. ' नरदेह ही परमेश्वराची कृति, आम्हीं माणसांनीं काय म्हणून तोडून टाकावी ? ' असे उद्गार अकबर वारंवार काढीत असल्यानें अबुल् फज्ल सांगतो. परंतु चितोडास त्यानें क्रूरपणाची सीमा करून दाखविली, किंवा पुष्कळांस आपल्या आवडत्या हत्तींच्या पायांखालीं चिरडून मारिलें, तेव्हां वरील उद्गार वायफळ नाहीत तर काय ? आपल्या आवडत्या प्राण्यांकडून असलीं कामे त्यानें घ्यावीं ! कामरानचा मुलगा इब्राहीम ह्यास त्यानें ग्वाल्हेर येथें ठार मारिलें. कित्येक मुलास यमुनेंत बुडविलें; मखदुमुल्मुल्क ह्यास विष दिलें, आणि अब्दुन्नबीचा श्वास कोंडून प्राण घेतला ! जहांगीरनें अबुल फज्ल्चा खून करविला, तशाच प्रकारें अकबरानें मैसूमखानावर मारेकरी घातले. अशीं क्रूर कृत्यें पुष्कळ आहेत, आणि त्यांत योग्य शिक्षा झाल्या असेंही नाहीं. तथापि हिमू व असेच दुसरे कित्येक इसम ह्यांचे प्राण घेण्याची संधि आली असतां, त्याने आपला हात मागे घेतला, अशीही उदाहरणें आहेत. अकबराहून औरंगजेब ज्यास्त क्रूर होता, असा लोकांचा सामान्य समज आहे. बादशाही तख्त मिळविण्याच्या वाटेत किंवा धर्मसंस्थापनेंत जे त्यास आड आले, त्यांची औरंगजेबानें वाट लाविली, हे प्रकार बाजूस ठेविले, म्हणजे उगाच लहरीखातर लोकांचे प्राण घेतल्याचे उदाहरण औरंगजेबाच्या हातून घडलेलें नाहीं. उलट पक्षीं जरूरीपेक्षाही कमीच शिक्षा औरंगजेब देई. खाफीखान म्हणतो, ' अशा प्रकारच्या भलत्याच दयेनें औरंजेबाच्या राज्यांत अव्यवस्था माजली. ' औरंगजेबाच्या निजण्याच्या खोलीच्या खालच्या मजल्यात एकदां चुकीनें नोकरांच्या हातून बंदुकीची दारू ठेविली गेली. तें औरंगजेबास कळल्यावर तो इतकेंच म्हणाला, ' जहांगीरच्या समोर असा प्रकार झाला असता तर त्याच दारूवर बसवून, त्यानें तुम्हांस उडवून दिलें असतें. ' सारांश, अकबराचा स्वभाव जात्या क्रूर होता. मात्र सारासारविचारानें तो पुष्कळ नरम पडला. नावडत्या लोकांस भेटीस बोलावून त्यांजकडून विष घातलेले विडे खावविणें, गर्भाची वाढ तपासण्याकरिता गर्भवती बायकांचीं पोटें चिरणे, मुलांची उपजतबुद्धि पाहण्याकरितां, त्यांस एकांतवासात कोंडून कायमचीं मुकीं बनविणें, हे अकबराचे प्रकार शास्त्राच्या नावाखालीं सुद्धां क्षम्य नाहीत. अकबर न्यायाच्या कामांत आपपर बिलकूल लक्षांत आणीत नाहीं असें फज्ल् वारंवार लिहितो. पण प्रत्यक्ष त्याचाच खून जहांगीरनें केला अशी अकबराची खात्री झाल्यावर, त्यानें मुलास कोणती शिक्षा केली !

**१. अकबराचा नवरत्न दरबार**—' घोड्यावर बसणे, शिकार करणें, कबुतरें उडविणें, अशात अकबराचे पोरपण निघून गेले. तथापि शहाण्या लोकाचा सहवास हें त्याच्या मोठेपणाचे कारण होय. मनुष्यमात्राशीं सहानुभूति ही त्याची गुरुकिल्ली. त्याच्या वेळेस चागली माणसेही पुष्कळ निपजली, अथवा अकबराची गुणग्राहकता व लोकसंग्रहेच्छा ऐकून चहूंकडची गुणी माणसें त्याजजवळ जमलीं. बहरामखान, राजा मानसिंग, तोडरमल्ल, बीरबल, अबुल् फज्ल्, फैजी हे गृहस्थ कोणत्याही काळीं व कोणत्याही ठिकाणी चमकल्याशिवाय राहवयाचे नाहीत. लोकसंग्रह करण्याचें कौशल्य मोगल लोकात खचित होतें. हीं नवरत्ने दूर करा आणि एकट्या अकबराचे चित्र पहा. तें अगदी उर्के, अपूर्ण, नीरस व हिडिस दिसेल. बरें हीं नवरत्ने ठेवा आणि त्यामधून अकबर नाहींसा करा, म्हणजे ह्या रत्नाचा मुख्य जीवच नाहीसा झाला असे होईल त्यास प्रोत्साहन देणें, त्याच्या गुणाचे चीज करणे, त्याच्याबद्दल सतत अश्रु ढाळणें, ही कामें अकबरानेच केली, आणि त्यासच तीं शोभतात नवरत्ने व त्याचा पोशिंदा अकबर, मिळून एक कुटुंब बनले होतें त्यानींच अकबरास राज्य मिळवून दिलें, आणि त्याची कीर्ति आजपर्यंत कायम ठेविली.' ( शहा मुनीर आलम, हिंदुस्थान रिव्ह्यु–जुलै १९१०. )

अकबराच्या बहुतेक साह्यकर्त्यांची थोडीबहुत माहिती वर ठिकटिकाणीं आलीच आहे. तथापि त्याचीं जीवनचरित्रें गमतीदार वाटल्यावरून अल्पाशानें खालीं देतों

अकबराच्या नवरत्नात बहरामखानाचे नाव प्रथम आहे बहरामखानाचे चरित्र मागे येऊन गेलेंच आहे अकबराने त्यास नोकरीतून कमी केलें, त्या वेळची त्याच्या अन्यायांची एक यादी अकबरनाम्यांत दिलेली आहे त्याने नोकरींत सारे आपले नातेवाईक भरले, असा एक आरोप अकबराने त्याजवर केलेला आहे तो कामावरून दूर झाल्यावर बहरामानें नोकरीस लावलेल्या मंडळींपैकीं त्याचे पचवीस नातेवाईक पाच-हजारी मनसबीवर होते, ह्यावरून, बीव्हरिज् म्हणतो, ' नोकरीत नातेवाईक भरले असे म्हणण्यापेक्षा लायक मनुष्य निवडण्याची हातोटी बहरामखानास साधली होती असें म्हणावें. त्याच्या स्वभावात प्रखर इराणी तेज भरलेलें होतें. '

बहरामचा मुलगा मीर्झा अब्दुर्रहमान जो पुढें खानाखानान ह्या नांवाने दक्षिणेंत प्रसिद्धीस आला, तो अकबराच्या सरदारात बलवान व विद्वान् म्हणून गणला जात असे.

**अबुल् फज्ल व फैजी.**—ह्याची बहुतेक हकीकत वर ठिकठिकाणीं येऊन गेलीच आहे. ह्या कुटुंबाचा पूर्वज शेख मुसा हा आरबस्तानातला राहणारा. म्हणजे हें कुटुंब अस्सल आरबी होतें. नवव्या शतकांत हें कुटुंब सिंध प्रांतांत येऊन राहिलें. पुढें शेख खिज्र हा साधु वृत्तीनें फिरत फिरत अजमीरनजीक नागोर येथें येऊन राहिला. तेथेंच त्याचा मुलगा शेख मुबारिक ह्याचा जन्म झाला. लहानपणापासून मुबारिकची बुद्धि तीव्र व चलाख होती. लहानपणींच दुष्काळानें ह्या कुटुंबाची वाताहत होऊन मुबारिक व त्याची आई एवढीं मात्र त्यांतून वाचलीं. तीही पुढें लवकरच वारली. त्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं विद्यापीठें असून, कित्येक अध्यापकांची ख्याति देशभर पसरलेली होती. अशांच्या पाशीं जाऊन मुबारिक बरीच विद्या शिकला. त्यानें पुष्कळ वर्षें अहंमदाबादेस काढिलीं. नंतर तो आग्र्यास जाऊन यमुनेच्या कांठीं एका साधूपाशीं राहिला आणि तेथेंच त्यानें अध्यापकाचें काम सुरू केलें. मुबारिक फार विद्वान होता, आणि त्याची विचारशैली व शिकविण्याची पद्धत प्रचलित पद्धतीहून अगदींच निराळी असल्यामुळे, त्याचा लौकिक सर्वत्र पसरला. विशेषतः जुन्या पुस्तकावर विश्वास न ठेवितां, खऱ्याखोट्याचा निर्णय स्वतः स्वतंत्र विचार करून ठरवावयाचा असा त्याचा नेम होता. त्यामुळें दुराग्रही मुसलमानी धर्मावरील त्याची श्रद्धा बरीच कमी होऊन इतर धर्मांतही पुष्कळ सत्य आहे, अशी त्याची खात्री झाली. आणि अशाच प्रकारचे विचार त्यानें आपल्या मुलांस शिकविले. त्या वेळीं मुसलमानी धर्मविचारांत एक मोठी क्रान्ति घडून येत होती. एक हजार वर्षांनीं मुसलमानी धर्म बुडून नवीन धर्म प्रचारांत येणार, असा एक सार्वत्रिक समज होऊन, त्यामुळें जो तो नवीन विचारास लागला. 'फ्री थिंकिंग' म्हणजे स्वतंत्र विचारास ऊत आला. अशा विचारांचे पुष्कळ पुरुष पुढें आले. युरोपांत विक्लिफ्, ल्यूथर वगैरे ज्या प्रकारचे पुरुष उदयास आले, तशांतलाच हा प्रकार असून, शेख मुबारिकनें आरंभापासूनच प्रचलित धर्मकल्पनांच्या विरुद्ध आपला मोर्चा फिरविला. जोनपुर येथें एक नवीन ' महादी ' उत्पन्न झाला, आणि अशाच प्रकारचे आणखी महादी दुसऱ्या ठिकाणीही पुढें आले ते रस्तोरस्तीं फिरून लोकांस नवीन पंथांचा उपदेश करूं लागले. आग्रा येथें दरबारांत ' मख्दुम्-उल्मुल्क ' ह्या नांवाचा एक वजनदार गृहस्थ जुन्या पक्षाचा पुढारी व मुख्य धर्माध्यक्ष असून, त्याचें व मुबारिकचें वांकडें आलें. कारण, मुबारिकचे नवीन विचार जुन्या पक्षास पसंत नव्हते, आणि त्यानें

आपले नवीन विचार लोकास शिकवू नयेत, म्हणून त्या पक्षाने नाना तऱ्हा केल्या. पुष्कळ महादीस व नवीन अध्यापकास त्यांनीं ठार मारविले हा क्रूरपणाचा प्रकार अकबर राज्यारूढ झाला, त्या वेळीं चालू असून पुढेंही कांहीं दिवस तो चालला सुनी पंथी उलमा व त्याचा अध्यक्ष मखदुमुल्मुल्क हे, बादशहाला जुन्या धर्ममार्गापासून हलूं द्यावयाचें नाहीं, हें आपलें मुख्य काम समजत त्याच्या तडाख्यातून आजपावेतो अकबर व अलाउद्दीन खिलजी हे दोघेच थोडे बहुत स्वतंत्र झाले ह्या उलमाचा पहिला रोख शिया पंथाच्या विरुद्ध होता बहरामखान शियापंथी होता. तो निवत असताना उलमा गप्प होते पण त्याचा पाडाव झाल्यावर अकबरास आपल्या जाळ्यात गुंतविण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला शेख मुबारिक ह्यास पकडून आणवून ठार मारावे, असा हुकूम त्यांनीं अकबराकडून मिळविला ही वार्ता कळल्याबरोबर मुबारिक आग्र्याहून पळून गेला त्यास शिक्रीचा शेख सलीम चिस्ती याची मदत होती त्याच्या साह्याने मुबारिक गुजराथेंत गेला इकडे त्याच्या शत्रूनी त्याचे घर फोडून सामानसुमानाची वाट लाविली गुजराथेंत अजीज कोका ह्यानें मुबारिक ह्यास आपल्या आश्रयाखालीं घेऊन, त्याजबद्दल बादशहाकडे रदबदली केली इकडे मुबारिकचे दोघे मुलगे अबुल फैजी व अबुल फज्ल बापासारखेच विद्वान व हुशार झाले होते फैजीची कवने वाचून अकबरास समाधान वाटलें आणि चितोडच्या वेढ्याचे काम चालू असता त्यानें फैजीस भेटीस बालाविले त्यास शिक्षा करण्याकरिता बादशहानें हें पाचारण केले असी प्रथम उलमाची समजूत होऊन, त्यास आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या फौजेच्या अधिकाऱ्याने मुबारिकच्या घरी जाऊन त्यास वाटेल तसा त्रासही दिला फैजीला पकडून त्याने बादशहासमोर नेलें. तेथें बादशहानें फैजीचा सत्कार केला, तेव्हा त्याच्या जिवात जीव आला. इकडे अबुल फज्ल बापाजवळ राहून उत्कृष्ट शिक्षण मिळवीत होता केवळ धर्मसमजुतीखातर आपल्या कुटुंबाचे असे हाल होत आहेत, हें पाहून मुसलमानी धर्माचा त्यास तिटकारा वाटूं लागला. फज्लच्या मनात सर्व धर्मांबद्दल जी समता पुढें उत्पन्न झाली, तिचें कारण त्याच्या आरंभीच्या विपत्ती होत. त्याने नानातऱ्हेची विद्या संपादन करून व सर्व नामांकित ग्रंथाचें अवलोकन करून उलमाचा पाडाव करण्याचा निश्चय केला ही त्याची तयारी पुढें अकबराच्या दरबारीं गेल्यावर त्याच्या फार उपयोगी पडली. पंधरा वर्षांच्या वयात त्याने बहुतेक ग्रंथ वाचून काढिले वीस वर्षांतच तो बापाप्रमाणे लोकास पढविण्याचें काम करू लागला. त्याची बुद्धिमत्ता अलौकिक होती.

इस्पहानी म्हणून एक नामांकित कवि पूर्वी होऊन गेला, त्याच्या ग्रंथाची एक उत्कृष्ट हस्तलिखित प्रत फज्लच्या हातीं पडली. ती तो वाचीत असतां, सर्व पानांची समग्र अर्धी बाजू सहज त्याच्या हातून जळून गेली. अशा स्थितींत त्यानें अवशिष्ट मजकुरावरून जळालेला सर्व मजकूर स्वतः जुळवून लिहून काढिला, आणि ती प्रत मालकास दिली. पुढें मूळकर्त्याच्या ग्रंथाची दुसरी एक अस्सल प्रत उपलब्ध झाली, तिजशीं ही नवीन प्रत ताडून पाहता, कांहीं ठिकाणी ती ज्यास्तच सरस झाली होती, असें दिसून आलें. ह्यावरून फज्लच्या बुद्धिशक्तीची कल्पना होईल.

फज्लच्या मनात संन्यासवृत्तीनें राहवें आणि निरनिराळ्या धर्मांचें ज्ञान संपादन करीत दूरदूरच्या देशांत फिरावें, असें होतें. परंतु अकबराने फैजीचा जो सत्कार केला, त्यानें हा सर्व प्रकार बदलून गेला. सन १५७४ त अकबर बंगालच्या स्वारींत असतां फैजी त्याजबरोबर गेला होता. तेथून फैजीचें पत्र भावास आलें, कीं तुम्हांस बादशहाने भेटीस बोलाविलें आहे. त्याप्रमाणें बादशहा परत आल्यावर फत्तेपुर शिक्री येथें अबुल् फज्लनें बादशहाची भेट घेतली. लगेच त्यानें आपल्या विद्वत्तेची छाप बादशहावर बसविली. दोघाभावांची ही चलती पाहून, मखदुमुल्मुल्क व त्याचे उलमा ह्यांस अत्यंत वाईट वाटलें. त्यांचा पाडाव करण्याचें अबुल् फज्लच्या मनांत होतें: त्याप्रमाणें बादशहाकडून दरगुरुवारीं रात्रीं त्यानें धर्मावर वादविवाद चालू केले. त्यांचें वर्णन वर आलेंच आहे. धर्माच्या बाबतीत बादशहाचा अधिकार सर्वोवर आहे, अशा आशयाचा जो जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला, तो शेख मुबारिकच्या हातचा असून, त्याची सर्व कल्पना अबुल् फज्लनें रचिलेली आहे. जाहीरनामा प्रसिद्ध झाल्या-नंतर लवकरच मखदुमुल्मुल्क नवीन व्यवस्थेस कंटाळून, आपलें काम सोडून, मक्केस निघून गेला: आणि अबुल् फज्लची फत्ते झाली. अकबरास ह्या दोघां बंधूंबद्दल अतिशय आदर वाटत असे. अबुल् फज्ल् सदैव बादशहाच्या संन्निध असे; आणि त्याजबरोबर स्वारीस जाई. फैजी ह्याजकडे कांहीं दिवस शहाजादा मुराद ह्यास पढविण्याचें काम होतें. पुढें त्याची आग्र्याच्या ' सदरच्या ' जागीं नेमणूक झाली. सन १५८८ त त्यास ' कविराज ' ह्या अर्थाचा किताब मिळाला. हिंदुस्थानांत दोनच मोठे उत्कृष्ट फारशी कवि होऊन गेले, पहिला अमीर खुस्रू व दुसरा फैजी.

सन १५८९ त अबुल् फज्लची आई मरण पावली. त्या प्रसंगीं बादशहा स्वतः सांत्वनार्थ त्याच्या घरी गेला होता. अबुल् फज्लच्या सल्ल्यानें बाद-

शहानें नवीन धर्म स्थापन केला, हा प्रकार पुष्कळ मुसलमानांस आव-डला नाहीं वाटेल तसे घाट करून हा प्रकार मोडून काढण्याचे अनेक प्रयत्न दरबारात चालू होते सलीमच्या सल्लागारानी त्यास विरुद्ध पक्षात आढिलें. त्यामुळे अबुल् फज्लच्या शत्रूंस बरीच बळकटी आली, आणि स्वत सलीम त्याचा पाडाव करण्याची खटपट करूं लागला. सलीमने बड केलें, त्या वेळीं अबुल फज्ल-शिवाय बाकीचे बहुतेक सर्व कामदार त्यास मिळाले होते ह्या खटपटीची व अबुल् फज्लच्या खुनाची हकीकत वर आलीच आहे सन १५९३ त शेख मुबारिक मरण पावला, तेव्हा त्याच्या दोघाही मुलास अत्यंत दु ख झाले मुबारिकला जरी पुष्कळ शत्रु होते, तरी त्याच्या विद्वत्तेबद्दल सर्व लोकात मोठा आदर होता बापाच्या पश्चात् दोन वर्षांनीं फैजी मरण पावला, ( ५ ऑक्टोबर, स १५९५ ) मरणापूर्वी थोडा वेळ बादशहा अकबर आपला विद्वान् हकीम बरोबर घेऊन फैजीच्या समाचारास गेला असता, फैजीचे बोलणे बंद झाले होतें बादशहा बोलला, ' शेखजी, माझे हकीम औषध द्यायला आणिले आहेत, औषध घ्या ' त्यावर कांहीच उत्तर आले नाहीं असे पाहून बादशहाला अत्यंत कळवळा आला वैतागानें डोकीचे पागोटें काढून त्याने जमिनीवर आपटलें, आणि बराच वेळ बसून अत्यत शोक केला नंतर कांहीं वेळानें अबुल् फज्लची समजूत करून, बादशहा परत गेला अशा विद्वद्रत्नाबद्दल भूषण मानणाऱ्या व शोक करणाऱ्या बादशहाची धन्य होय ' अबुल फज्लची बंधुप्रीति तर पदोपदीं व्यक्त झालेली आहे अबुल फज्लला खाण्याचा मोठा शोक होता त्याच्या मेजावर नानाप्रकारचे उत्तमोत्तम पदार्थ सदैव तयार असत, आणि त्याजबरोबर भोजनास मंडळीही पुष्कळ असे इतके विद्वान, उद्योगी व भाग्यशाली पुरुष क्वचित् आढळतात.

अबुल् फज्लची योग्यता तर बाप व भाऊ ह्या दोघांच्याही पेक्षा श्रेष्ठ होती त्याने किती काम केलें हें त्याच्या ग्रंथावरून दिसून येतें त्याची भाषा साधी व उदात्त होती त्याचे विचार थोर होते. खोडसाळपणाचा त्यास अत्यत तिटकारा होता. त्याच्या लेखात अपशब्द तर बिलकुल सापडत नाहीं तत्कालीन ग्रंथकारानीं अनेक आचार-विचाराबद्दल व स्त्रियाबद्दल वाटेल तसे तोंडसुख घेतलेले आहे, परंतु अबुल् फज्लच्या लेखात स्त्री काय किंवा पुरुष काय, राव काय, किंवा रंक काय, सर्वाविषयीं अत्यंत प्रेम, आदर व निष्पक्षपात ओतप्रोत भरलेला आहे इतका त्याचा छळ झाला, इतके त्याला शत्रु होते, तथापि एकाही इसमाबद्दल आपल्या मनातील द्वेषबुद्धीचा यत्किंचित् चकार-

शब्द त्याच्या लेखांत सापडत नाहीं. अकबरनामा ग्रंथांत उल्मांच्या कृत्यांची भरपूर चर्चा आहे, पण ती सर्व चर्चा इतकी गंभीर व उदात्त आहे, कीं ती वाचतांना अबुल फज्लच्या थोर मनाची अप्रत्यक्ष रीतीनें साक्ष पटत जाते. शत्रूवर द्वेषमूलक शब्दाचा वर्षाव तीन कोठेंच आढळत नाहीं. म्हणूनच अबुल् फज्लच्या लेखांस फारशी इतिहासांत अग्रस्थान मिळत आहे. शेख मुबारिकनें कुराणावर उत्कृष्ट व विस्तृत टीका लिहिली आहे. अबुल फज्लचा मोठा ग्रंथ म्हणजे '**अकबर-नामा**' होय. ह्या मोठ्या ग्रंथाचे तीन भाग असून तिसरा भाग '**आयने-अकबरी**' नांवानें प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ सरकारी कागदपत्राच्या साह्यानें त्यानें लिहिला. ह्या कामीं तो पुष्कळ वर्षे खपत असला पाहिजे आणि दुसऱ्या पुष्कळ मंडळीचें साह्यही त्यास झालें असलें पाहिजे. अकबरानें जीं कित्येक उत्कृष्ट कामें केलीं, त्यांत आपल्या वंशाचा जो हा संपूर्ण इतिहास विद्वानाकडून त्यानें लिहविला, त्याची किंमत विशेष असून, आज-कालच्या ऐतिहासिक जागृतीत ह्या कृत्याची महती विशेष आहे. अकबरनाम्याच्या पहिल्या भागांत तयमूरपासून हुमायूनचा इतिहास दिलेला आहे. दुसऱ्या भागांत अकबराच्या कारकिर्दीतील एकंदर महत्त्वाच्या गोष्टींचे वर्णन अबुल् फज्लच्या मृत्यू-पर्यंत दिलेलें आहे. तिसरा भाग 'आयने-अकबरी' म्हणजे अकबराच्या राज्यव्यवस्थेचा नियम. 'आइन' म्हणजे कायदा किंवा नियम. दुसरा भाग ऐतिहासिक असून, तिसऱ्या भागांत नियम व विवेचन केलेलें आहे. म्हणजे अलीकडे जसे रिपोर्ट किंवा गॅझेटियर्स प्रसिद्ध होतात, तशाच धर्तीचा हा '**आयने-अकबरी**' ग्रंथ आहे. हा तिसरा भाग सन १५९८ त पुरा झाला. आयने-अकबरीचे पांच विभाग आहेत. पहिल्यांत बादशहा, त्याचें कुटुंब, दरबार, इत्यादिकांचें वर्णन आहे. दुसऱ्यांत दिवाणी, लष्करी व दरबारी नोकर, त्यांची नांवें, कामें, पगार इत्यादिकांचें वर्णन आहे. तिसऱ्या विभागांत न्याय व जमाबंदी ह्या खात्यांचें विवेचन आहे. चौथ्या विभागांत लोकांची व विशेषतः हिंदूंची सामाजिक व बौद्धिक स्थिति वर्णिलेली आहे. पांचव्या विभा-गांत थोर पुरुषांच्या व कवींच्या उक्ती, म्हणी व स्फुट वचनें ह्यांचा संग्रह केलेला आहे. अशा प्रकारचा सर्व बाजूंनीं भरपूर विचार केलेला असा 'आयने-अकबरी' हा एकच ग्रंथ आहे. इतर इतिहास फारशी भाषेंत पुष्कळ आहेत, पण त्यांत युद्धाच्या व धामधुमींच्या हकीकतींशिवाय फारसें कांहीं सापडत नाहीं. तीन-चारशें वर्षांपूर्वी लोकस्थिति कशी होती, राज्यकारभार कसा चालला होता, राज्य-कर्त्यांपुढें मोठमोठे प्रश्न कोणते होते, आणि त्या वेळच्या व आजच्या स्थितींत आणि

विचारात कसें व किती अंतर पडलें आहे, इत्यादि प्रकार समजून घेण्यास ' आयने-अकबरी ' सारखा दुसरा ग्रंथ नाहीं आयने-अकबरीच्या बऱ्याचशा भागाचें इंग्रजी भाषांतर सन १७८३ त ग्लॅडविन ह्यानें करून, तें त्याने वारन् हेस्टिंग्ज् ह्यास नजर केलें तें सन १८०० ह्या वर्षीं छापिलें परंतु ग्लॅड्विन् ह्यास मिळालेली मूळग्रंथाची प्रत बरीच अशुद्ध असल्यामुळे, भाषांतरही चांगलें झाले नाहीं हल्ली ब्लॉकमन् व जरेट ह्यानीं अबुल् फज्ल्च्या अस्सल प्रतीवरून, इंग्रजींत सुंदर भाषांतर केलेले उपलब्ध आहे अबुल् फज्ल्विषयीं ब्लॉक्मनचा अभिप्राय येणेंप्रमाणे आहे

' अबुल् फज्लची सत्यप्रीति, परमतसहिष्णुता, दरबाराचा फार वर्षांचा त्याचा अनुभव, त्याची सुंदर भाषा व बादशहाचा त्यावरील भरवसा, ह्याच्या योगानें त्याच्या प्रयास विशेष किंमत आली आहे. हें त्याने आपल्या बादशहाच्या थोरपणाचें व स्वतःच्या विद्वत्तेचें एक प्रकारचें कायमचें स्मारकच करून ठेविलें आहे त्याच्या उदार अंतःकरणांत सर्व कांहीं चांगलें होतें त्यानें आपली धन्याची तरफदारी करण्याकरिता पुष्कळ गोष्टी लपवून ठेविल्या आणि त्याच्या स्तुतीनें आपलें पुस्तक भरून काढिलें, अशा प्रकारचा आरोप पाश्चात्यानीं केलेला असून, तो सर्वथैव निराधार आहे ( ह्या आरोपाचें दिग्दर्शन वर दिलेल्या बीव्हरिजच्या टीकेंत आलेंच आहे ) प्रसंगवशात् अबुल् फज्ल्च्या लेखणींतून अकबराची स्तुति उतरते, नाहीं असें नाही, पण ती अगदीं न्याय्य असून तिला तो बादशहा निस्संशय पात्र होता '

अकबरनामा हा अबुल फज्ल्चा सर्वांत मोठा ग्रंथ, शिवाय निरनिराळ्या राजेरजवाड्यास अबुल् फज्लने अकबराच्या नांवानें जी पत्रें लिहिलीं, त्यांच्या संग्रहांचें एक मोठें पुस्तक अबुल् फज्ल्चें आहे आणखी अनेक विषयांवर त्यानें लिहिलेलीं स्वतंत्र पुस्तकें व तर्जुमेही आहेत

अबुल फज्लचा बाप मुबारिक ह्यास दोन बायका होत्या पहिलीला मुलगे पाच, त्यांपैकीं पहिला फैजी व दुसरा अबुल फज्ल दुसरीला एक मुलगा होता. शिवाय त्यास चार मुली होत्या अबुल फज्लचा मुलगा शेख अब्दुर्रहमान अफ्झलखान हा बापाबरोबर दक्षिणच्या स्वारींत होता जहांगीरने त्यास बहार प्रांताचा कारभार दिला, तो स. १६१३ त मरण पावला. जहांगीरनें अबुल फज्लचें वैर त्याच्या मुलावर साधून घेतलें नाहीं.

**राजा मानसिंग.**—हा जयपुरचा कच्छवाह वंशी राजा ह्याचा बाप भगवानदास

प्रथम अकबरास सामील झाला, त्याचें शौर्य व स्वामिनिष्ठा पाहून अकबर फार खुष झाला, आणि त्यानें त्यास आपल्या पदरीं ठेवून घेतलें. पुढें भगवानदासाच्या बहिणीची मागणी अकबरानें केली, ती कबूल होऊन पुढें तें लग्न हिंदु रीतीनें सप्तपदी वगैरे होऊन मोठ्या थाटानें झालें. गुजराथच्या स्वारींत बडोद्यानजीक सारसा येथें अकबरावर जिवावरचें संकट आलें, त्या प्रसंगीं मानसिंगानें शिकस्त करून बादशहाचा जीव वांचविला. त्यावरून मानसिंगास त्यानें मोठमोठीं कामें देऊन चढविलें. पुढें मानसिंगानें पराक्रम करून काबूल व बंगाल हे प्रांत जिंकून घेतले, त्याचें वर्णन मागें आलेंच आहे. मानसिंग हा फार दिवस अकबराचा मुख्य सेनापति होता. ' सप्तहजारी ' मनसबदारी अकबरानें प्रथम मानसिंगासच दिली, येणेंकरून सर्व मुसलमानांपेक्षां ज्यास्त गौरव अकबरानें मानसिंगाचा केला. पुढें कांहीं दिवसांनीं आणखी दोघां मुसलमान सरदारांस त्यानें ' सप्तहजारी ' पद दिलें. ' मीर्झा ' म्हणजे 'राजपुत्र' ही मुसलमानी पदवीही बादशहानें मानसिंगास दिली, तिजवरून पुढें जयपुरचे राजे ' मीर्झा राजा ' असें आपल्या नावामागें लावीत. चितोडगड काबीज करण्यास मानसिंगाचा उपयोग अकबरास फारच झाला: आणि त्यामुळें रजपूत घराण्यांत दुफळी होऊन ती फार दिवस कायम होती. जसें अकबराच्या राज्यकारभारांतील सुधारणांचें श्रेय मुख्यतः अबुल् फज्ल् ह्यास आहे, त्याचप्रमाणें अकबराच्या युद्धकर्मांतील मुख्य श्रेय मानसिंगास आहे. बंगाल प्रांत जिंकिल्यावर मानसिंगानें अकबरनगर नांवाचें शहर स्थापिलें, तेंच हल्लींचें ' राजमहाल ' होय. अकबराच्या मृत्युसमयीं जे कट झाले, त्यांत मानसिंग होता. मानसिग दक्षिणच्या स्वारींत असतां स. १६१४ त मरण पावला. त्याचें प्रेत अंबरास आणून दहन करण्यांत आलें. त्या प्रसंगीं त्याच्या १५०० बायकांपैकीं साठ बायका सती गेल्या. ' हिंदु लोकांचीं अंतःकरणें प्रेमळ असून, त्यांस ममतेनें वागविलें असतां, ते आपले गणगोत सुद्धां विसरून, आपल्या उपकारकर्त्याला मनापासून भजणार आहेत; स्वतःचें हिताहित न पाहतां हरएक अर्थाचा त्याग करून आपली कृतज्ञता ते व्यक्त करतील. हा प्रकार मानसिंगाच्या उदाहरणावरून उत्तम व्यक्त होतो. ' ( सरदार जोगेन्द्रसिंग, ईस्ट एन्ड वेस्ट, जानेवारी १९०५ ).

**मुल्ला दोप्याजा.**—अकबराच्या नवरत्नांमध्यें मुल्ला दोप्याजा म्हणून एक गृहस्थ होता. तो आरबस्तानांत तैफ् येथें जन्मला. त्याचा बाप फार श्रीमंत

होता. त्याची आई फार देखणी व विद्वान् वायको होती. लहानपणापासूनच हा फार चलाख होता. सगळें कुराण त्यानें तीन वर्षांत तोंडपाठ केले. नवव्या वर्षी त्याची आई वारली आणि बापानें दुसरें लग्न केले. तें सुखकारक न होऊन बाप घर सोडून गुप्तपणें चालता झाला मुलगा त्याच्या मागोमाग शोध करीत निघाला, तो भिक्षा मागत इराणांतून हिंदुस्थानात आला हुमायूनच्या पदरीं असलेल्या एका गृहस्थाची व त्याची ओळख होऊन तो त्याजपाशीं राहिला; आणि हुमायूनच्या लवाजम्यात तो हिंदुस्थानात आला त्या वेळीं त्याचे वय अवघे १५ वर्षांचें होतें दिल्लीस आल्यावर तेथील एका मशिदीत राहून तो लोकास कुराण पढवू लागला. तेथे या मुल्लाजीची लवकरच चांगली प्रसिद्धि झाली तो मोठा थट्टेखोर असून नानातऱ्हेच्या कोटया करून लोकास हसवीत असे एकदा तो एका गृहस्थाकडे भोजनास गेला असता तेथे पुलावा केलेला होता, तो त्यास फार आवडला. हा पदार्थ त्याने पूर्वी कधी खाल्ला नव्हता. तेव्हा त्याचे नांव काय ? असे त्यानें शेजारच्या इसमास विचारलें. त्याने ‘ पिलाव ’ म्हणून सांगितले तें त्यास कळेना, तेव्हा त्याची थट्टा करण्याकरिता दोप्याजा ( दोन कांदे ) असें त्यास उत्तर मिळालें. पुढें तो कोठेंही भोजनास गेला असता ‘ माझ्यासाठीं दोप्याजा करा, ’ असे सांगत असे. त्यावरून त्यास ‘ मुल्ला दोप्याजा’ असे नाव पडलें अबुल् फज्ल् व फैजी यानीं त्याची विद्वत्ता पाहून त्याच्याशीं मैत्री संपादिली चेहेऱ्यावरून तो मनुष्याचा स्वभाव तेव्हाच ओळखीत असे फैझीने त्यास बादशहाकडे नेलें. त्याचा थट्टेखोर स्वभाव बादशहास फार आवडला, आणि त्यास त्याने आपल्या पदरीं ठेवून घेतले अकबरानें आपल्या नवीन धर्माचें जें प्रार्थनामंदिर बांधिले, त्या मंदिराची सर्व व्यवस्था ह्या मुल्लाकडे सोंपविली. बीरबल व मुल्लाजी याजमध्ये नेहमीं एक प्रकारची चुरस असे, म्हणून त्या दोघांचा तंटा लावून अकबर मजा पाहत बसे भरदरबारात विलक्षण कोटी करून मुल्ला वाटेल त्याचा पाणउतारा करी प्रत्यक्ष बादशहाचीही तो भीड ठेवीत नसे. म्हणून सर्व लोक त्यास पाण्यात पाहत. स्वारीशिकारीत नेहमीं मुल्ला अकबराच्याबरोबर असावयाचा. दक्षिणच्या स्वारींत तो आजारी पडला, तेव्हां त्यास स्वारींतला त्रास सहन होईना. बापाचा शोध त्यास कधीं लागलाच नाहीं, म्हणून तो शेवटीं अत्यंत विव्हळ झाला, आणि सन १६०० ह्या वर्षी नर्मदेच्या कांठीं हंड्या येथें मरण पावला. अकबराने

सर्व फौजेसह त्यास सन्मान देऊन त्याचा अंत्यविधि उरकला. ( See Modern Review, July 1910 ).

**राजा तोडरमल्ल.**—तोडरमल्ल हा अयोध्या प्रांतांत लाहरपुर येथें जन्मला. तो जातीचा खत्री होता पूर्वी शेरशहा सूरपाशीं त्यानें काम केलें होतें. पंजाबांत झेलम जिल्ह्यांत रोटक किल्ला आहे तो शेरशहाच्या हुकुमावरून तोडरमल्लानें बांधिला, त्यावरून त्याचें अप्रतिम कौशल्य शेरशहाच्या नजरेस आलें, आणि त्याच्याच जवळ तो राज्यकारभाराचें व जमीन-महसुलाचें काम शिकला. यावरून तोडरमल्लाच्या हुशारीचें श्रेय शेरशहास आहे, अकबरास नाहीं. [ कानुंगोचा शेरशहा पृ. ४०५ ]. स. १५७४ च्या सुमारास त्यानें अकबराची नोकरी पत्करिली. गुजराथ प्रांत जिंकिल्यावर तेथील जमाबंदीचें काम अकबरानें तोडरमल्लाकडून करवून घेतलें नंतर बंगाल प्रांत जिंकिल्यावर तेथें त्याची नेमणूक झाली. तेथील जमाबंदीचें काम संपल्यावर तो आग्र्यास गेला. तेथें कांहीं दिवस राज्याच्या एकंदर वसुलाचें काम त्यानें केलें. बंगाल, गुजराथ वगैरे ठिकाणीं बंडें होतीं, तीं मोडण्यास तोडरमल्लाची नेमणूक होत असे. स. १५७८ त त्याची वजिराच्या जागीं नेमणूक झाली. पुढें कांहीं दिवसांनीं त्यास बंगालच्या कारभारावर पाठविण्यात आलें. कोणत्याही स्वारींत तो फत्ते करून आल्याशिवाय राहत नसे. स. १५८३ त पुनः आग्र्यास आल्यावर त्यानें जमाबंदीच्या नवीन सुधारणा अंमलात आणल्या, त्या आयेन-अकबरीच्या तिसऱ्या पुस्तकांत दिलेल्या आहेत. पूर्वी राज्याचे हिशेब हिंदी भाषेंत ठेवण्यांत येत असत, ते फारशी भाषेंत ठेवण्याचा प्रचार तोडरमल्लानें पाडिला त्यामुळे हिंदी भाषा मागें पडून फारशी ही दरबारची भाषा झाली, आणि हिंदु लोक सुद्धां फारशी भाषेंत तरबेज होऊं लागले. इतकें कीं, पुढें शंभर वर्षांनीं मुसलमानांस फारशी शिकविण्यासाठीं हिंदूंचीच योजना होत असे. राज्यकर्त्यांच्या बरोबरीनें हिंदूंना हक्क मिळण्याला या फारसी भाषेचा पुष्कळ उपयोग झाला. बीरबल मरण पावल्यावर तोडरमल्लानें मानसिंगाबरोबर अफगाणसरहद्दीवर मोहीम केली. अकबर काश्मिरांत गेला, तेव्हां तोडरमल्ल लाहोरास राहून सर्व कारभार पहात असे. पुढें वृद्धापकाळ झाल्यामुळें गंगेच्या काठीं जाऊन राहण्यासाठीं त्यानें बादशहाची परवानगी मागितली: आणि तो हरिद्वारपर्यंत निघूनही गेला. तेथून त्यास बादशहानें आग्रहानें परत आणलें, आणि सांगितलें, ' गंगातीरीं रिकामें बसण्यापेक्षां लाहोरासच स्वस्थ बसून राहा. ' पुढें थोड्याच दिवसांनी तो ता. ११-११-१५८९ रोजीं लाहोरास मरण पावला.

त्या वेळीं त्याचे वय ८०–९० वर्षांचे होतें. तोडरमल्ल स्वभावानें तापट व आग्रही होता. युद्धकलेच्या व जमाबंदीच्या कामांत त्याची बरोबरी करणारा दुसरा सरदार नव्हता. तो आरंभी लहानसा कारकून असून स्वपराक्रमानें योग्यतेस चढला. अबुल्फज्ल् व तोडरमल्ल यांचे फारसें सख्य नव्हतें, तथापि फज्लनें त्याची फारच वाखाणणी केली आहे. तो पक्का स्वधर्मनिष्ठ असून अकबराच्या नवीन धर्माच्या बाबतींत सामील झाला नाहीं. एकदां अकबराबरोबर स्वारींत असतां त्याचे देव हरवले. देवपूजा केल्याशिवाय तो अन्नग्रहण करीत नसे. कित्येक दिवस त्यानें तोंडांत पाणी सुद्धां घातलें नाहीं. शेवटीं अकबरानें स्वतः जाऊन त्याची समजूत केली, आणि नवीन देव आणविल्यावर त्याची पूजा चालू झाली. ह्या त्याच्या कडक निष्ठेबद्दलच फज्लचें व त्याचें जुळलें नाहीं. अकबरानेंही त्याजबद्दल त्याला दुखविलें नाहीं, आणि त्याच्या गुणाचा मात्र उपयोग करून घेतला.

**राजा बीरबल**—ह्याचें मूळचें नांव महेशदास. हा ब्राह्मण जातीचा भाट, काल्पीचा राहणारा, गरीब पण बुद्धिमान् होता. अकबर राज्यारूढ झाल्यावर फिरत फिरत तो त्याच्या दरबारीं आला. तेथें त्याच्या सुंदर कवनांनीं बादशहाकडे त्याची दाद लागून लवकरच तो त्याचा आवडता झाला. अकबरास त्याचीं हिंदी कवनें फार आवडूं लागलीं, आणि त्यास त्यानें 'कविराय' असा किताब दिला. स. १५७४ त नागरकोटच्या जयचंद राजास अकबरानें कैद करून त्याची जहागीर व 'राजा बीरबल' हा किताब ह्या कवीस दिला. त्याच नांवानें तो पुढें प्रसिद्ध झाला. जयचंदाचा मुलगा बुद्धिचंद त्यानें नागरकोटची जहागीर बीरबलास मिळूं दिली नाहीं. गुजराथच्या स्वारींत बीरबल अकबराबरोबर होता. अनेक रजपूत राजांकडे अकबर त्यास वकील म्हणून पाठवी. रजपूत राजास अकबराकडे शरण आणणें, त्यांच्या मुलींचीं लग्नें बादशाही कुटुंबांत जुळविणें, इत्यादि अनेक महत्त्वाचीं व नाजूक कामें बीरबलास सांगण्यांत येत. तो बहुतेक साधुवृत्तीनें राहून कालक्रमणा करी. हिंदुधर्मातील उत्तमोत्तम तत्त्वें त्यानें अकबराच्या मनावर ठसविलीं, या कारणास्तव दरबारचे मुसलमान सरदार त्याचा द्वेष करीत असत. बीरबलाचें भाषण गमतीदार व बोधपर असे. मरणापूर्वीं थोडे दिवस त्यानें अकबराचा नवीन धर्म स्वीकारिला होता.

**तानसेन**.—सुंदरवनांतील भाटीचा राजा रामचंद बाघेला याजपाशीं तानसेन हा एक गवई होता. हा उत्कृष्ट गवई आहे अशी बातमी अकबरास पोंचल्यावरून त्यानें रामचंदाकडे तानसेनची मागणी केली. रामचंद्राला नाहीं म्हणतां येईना. तानसेन त्याचा मोठा दोस्त होता. त्यास सर्व वाद्यें देऊन रामचंद्रानें अकबराकडे आग्र्यास पोंचतें केलें. त्याचें पहिले गाणें बादशहानें ऐकिलें, त्याच वेळीं त्यानें त्यास दोन लाख रुपये बक्षीस दिले. तेव्हांपासून तानसेन अकबराच्या दरबारीं राहिला. त्यानें अनेक कवने केलीं. अद्यापि तानसेनचीं गाणीं लोक प्रेमानें गातात.

**हकीम हुमाम**.—हकीम फत्ते व हकीम हुमाम, आणि त्यांचा भाऊ कवि नुरुद्दीन हे तिघे बंधु कास्पियन समुद्राच्या कांठीं गिलान येथें राहणारे. त्यांच्या बापाचा तेथें खून झाल्याने ते स. १५७६ त अकबराकडे आले. त्यानें त्यांस आश्रय दिला. पैकीं दोघेही हकीम मोठ्या योग्यतेस चढले. अकबराची त्यांजवर फार मर्जी होती. ते अनेक स्वाऱ्यांत व वांकिलातींत जात असत. स. १५८७ त हकीम हुमाम तुराणच्या शहाकडे अकबराचा वकील म्हणून गेला होता. तो समीप नसला तर अकबरास जेवण गोड लागत नसे. तो स. १५९६ त मरण पावला. अकबराच्या नवरत्नांत त्याचें नाव आहे.

**बदाऊनी**.—मुल्ला अब्दुल कादिर बदाऊनी हा दिल्लीनजीक बदाऊन येथें स. १५४० च्या सुमारास जन्मला. लहानपणीं अनेक विद्वानांपाशीं अध्ययन करून तो हुशार व विद्वान् झाला. त्याचा आवाज उत्तम असून, गायन, ज्योतिष व इतिहास ह्या विषयांचा त्यास मोठा नाद असे. जलालखान कुरची म्हणून अकबराच्या मर्जीतला एक गृहस्थ होता, त्यानें बदाऊनीची बादशहाशीं मुलाकात करून दिली. ह्याच जलालखानानें तानसेनला दरबारीं आणिलें. शेख मुबारिक, फैजी व अबुल्‌फज्ल् ह्यांच्या संगतींत बदाऊनी एकसारखा चाळीस वर्षे होता, तथापि त्यांच्या विचारांचें वारें त्यास लागलें नाहीं. धर्मसमजुतींबद्दल तो त्यांचा मनापासून द्वेष करी. त्यानें संस्कृत शिकून अकबराच्या हुकुमानें समग्र रामायणाचें व महाभारताच्या कांहीं भागांचें फारशींत भाषांतर केलें. पण त्याचा मुख्य ग्रंथ म्हणजे 'मुन्तखाबुत्तवारीख' म्हणजे अकबराच्या कारकिर्दीचा इतिहास होय. ह्या सुंदर ग्रंथाचा इंग्रजींत तर्जुमा झाला असून, बदाऊनी अकबराचा द्वेष्टा असल्यामुळे, इतर ग्रंथांच्या पडताळ्यास

बदाऊनीचा हा मार्मिक ग्रंथ फार उपयोगी पडतो बदाऊनीचा ग्रंथ अकबराचे कारकीर्दीत बाहेर आला नाहीं, पुढे जहांगीरच्या वेळेस प्रसिद्ध झाला स १५९८ च्या सुमारास बदाऊनी मरण पावला अबुल् फज्लवर बादशहाची कृपा असे हे बदाऊनीस सहन होत नसे 'बादशहाची कृपा माझ्यापेक्षा अबुल फज्लवर ज्यास्त आहे. आपल्या मृदुल स्वभावाने, अपरिमित उद्योगाने, कपटप्रचुर वर्तनाने आणि अमर्याद स्तुतीने, फज्लने बादशहाची कृपा संपादन केली. तो बादशहाच्या मनाचा कल पाहून वर्तत असे. परंतु मी साधा व दरबारी वागणुकींत अपरिचित असल्यामुळे मला बादशहाची तब्यत संभाळता येईना मला हे काम फारसे आवडत नाहीं, दुसरें मिळेल तर फार चागले.' हे लिहिणे बरा द्वेषभावाचे दिसते त्या वेळच्या मानान पाहता अबुल फज्ल् मिथ्या स्तुतिपाठक होता असें म्हणता येत नाहीं. स्वतःच्या कर्तबगारीनेच तो उच्च पदास चढला. बदाऊनी आपल्या कामात दक्ष नसे बादशहाच्या परवानगीशिवाय तो वारंवार गैरहजर राही अबुल फज्ल व फैजी त्यास तो मुळींच चाहत नसे, तरी ते दोघे भाऊ त्याच्याशी अखेरपर्यंत फार ममतेने वागले बदाऊनी हा कडवा मुसलमान होता हेंही त्याच्या वैराच एक कारण असेल बदाऊनी हा विद्वान्, बुद्धिमान् व स्पष्टवक्ता होता अकबराजवळ अयोग्य माणसाचा प्रवेश फारसा होत नसे

बदाऊनीस अकबराने महाभारताचे भाषांतर करावयास सांगितले ते काम करण्याची त्याला हौस नव्हती तत्संबंधी त्यान पुढे लिहिल्याप्रमाणे उद्गार काढिले आहेत 'खऱ्या मुसलमानाने असले काम करावे ! मी एक दोन प्रकरणाचे भाषांतर केले त्यातील बालिश व असंबद्ध प्रलाप ऐकूनही सर्व जगताला आश्चर्य वाटेल ! असली वचने कधीं कोणी ऐकिली सुद्धा नसतील ! काय म्हणे, निषिद्ध पदार्थांची यादी ! पण माझें नशीब केवढें बलवत्तर ! माझ्याच कपाळीं असले काम का यावें ' अबुल फज्लने ह्या पुस्तकाची प्रस्तावना लिहिली ! ह्या पापापासून अल्लाच आमचें संरक्षण करो !' बदाऊनीने रामायणाचेंही भाषांतर केलें, त्यास चार वर्षें लागलीं हें पुस्तक त्यास बरेंच आवडलें होतेंसें दिसतें, कारण, ते तयार झाल्यावर त्याची फारच वाहवा झाली. गोव्याच्या एका क्रिस्तभक्तानें अकबराच्या हुकमावरून अनेक ग्रीक ग्रंथांचीं भाषान्तरें फारशी भाषेंत केलीं याशिवाय आणखी पुष्कळ संस्कृत व

दुसऱ्या पुस्तकांचे तर्जुमे अकबरानें त्या भाषेत करविले. रोमच्या पोपाकडूनही कित्येक सुंदर ग्रंथ अकबरानें मिळविले होते.

धर्मसंबंधीं वादविवाद ज्या सभेंत होत, तींत ३८ शेख म्हणजे आरब साधु, ६९ विद्वान् पंडित, १५ वैद्य, व १५३ कवि इतकी मंडळी होती, असें बदाऊनीचें लिहिणें आहे. सन १५७८ सालीं अकबराचें बदाऊनीनें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे. 'हा काळपावेतों बादशहा सरळपणानें वागत होता; सत्यान्वेषणाची त्यास उत्कट इच्छा होती. पण अलीकडे त्याचें शिक्षण बरोबर चालत नाहीं: जवळची मंडळी हलकट व नास्तिक असल्यामुळें, त्यास इस्लामाच्या खरेपणाबद्दल संशय वाटूं लागला आहे. अडचणीवर अडचणी येऊं लागल्या. असें होतां होतां त्याचा सत्य शोधून काढण्याचा मूळचा उद्देश सुटला; आणि उत्कृष्ट स्वधर्माचें मजबूद बंधन तुटून जातांच बादशहा बेपर्वा झाला; आणि पांच सहा वर्षांच्या आंत त्याच्या मनांत मुसलमानी धर्माचा लेशही राहिला नाहीं. तेव्हां सर्वच प्रकार वेगळा झाला. सन १५९५ त बादशहाचीं मतें इतकीं फिरलीं होतीं, कीं मक्केस जाण्याची कोणी परवानगी मागितली असतां त्यानें त्यास देहान्त शासन केलें असतें'

अकबराच्या नवरत्नदरबाराचें एक चित्र बाहेर प्रसिद्ध आहे, त्यांत बदाऊनीचें नांव नाहीं, आणि बहरामखानाचें नांव आहे बहरामाचा अंत कारकीर्दीच्या आरंभींच झाला होता. कवींनीं अकबराच्या दरबारास नवरत्नदरबार असें नांव पूर्वसंप्रदायानुसार दिलें असलें तरी, त्यांत नऊच रत्नें होतीं असें नाहीं. अकबराच्या पदरीं हजारों रत्नें निपजलीं, त्या सर्वांचें वर्णन येथें करणें शक्य नाहीं. एकंदरीत त्या धामधुमीच्या काळांत सुद्धां गुणी व पराक्रमी लोक कसे पुढें येत होते हें वरील चरित्रांवरून दिसून येतें. अशा प्रकारच्या चरित्रांवरून त्या काळच्या घडामोडींची व वस्तुस्थितीची बरीच कल्पना मनांत उभी राहते. मोगल बादशहांचा इतिहास पुष्कळांस ठाऊक आहे, म्हणजे त्यांचीं युद्धें व पराक्रम पुष्कळांस कळतात; परंतु तेवढ्यावरून तत्कालीन अंतःस्थितीचें खरें चित्र मनांत उभें राहत नाहीं. तसें चित्र उत्पन्न व्हावें, तत्कालीन स्थितीची थोडीबहुत वास्तविक कल्पना मनांत यावी, एतदर्थ, अनेक पुरुषांचीं चरित्रें व अनेक घडामोडींची तपशीलवार वर्णनें, थोडासा पाल्हाळ करूनही, मुद्दाम वर दिलीं आहेत. त्यावरून इतिहासांत केवळ राज-

कीय घडामोडींचाच नव्हे, तर मानवी चरित्राच्या सर्वांगांचा समावेश कसा झाला पाहिजे हें कळून येईल

अकबराच्या कारकीर्दीवर इतकें वाङ्मय उपलब्ध आहे, कीं हजार पांचशें पानांचा स्वतंत्र ग्रंथ त्याजवर लिहिला तरी विषय समाप्त होणार नाहीं स्वतंत्र पुस्तकातून व मासिक पुस्तकातून नानाविध प्रश्नाची चर्चा झाली आहे व अजूनही होत आहे इंडियन वर्ल्ड, मॉडर्न रिव्ह्यु, हिंदुस्तान रिव्ह्यु, ईस्ट अँड वेस्ट इत्यादिकांत उपयुक्त चर्चा आली आहे अशा माहितीचा गोषवारा जितका घेतां आला तितका येथें घेतला आहे ऐने-अकबरींत ४१५ मनसबदारांचीं चरित्रें दिलेलीं आहेत त्यांत हिंदु लोक ५१ आहेत बहुतेक मंडळी इराण आरबस्तान वगैरे देशांतन अकबराच्या दरबारीं येत असत, आणि त्यांचा तेथें गौरव होत असे हिंदूंची भरती पुढें शहाजहानाच्या वेळेस बरीच कमी होऊं लागली अकबराच्या मनसबदारात हिन्दुस्तानातले मुसलमानही फारच थोडे होते एकंदरींत त्याच्या वेळेस परदेशी मुसलमानाचा भरणा हिंदुस्तानात अतिशयच झाला अबुल फज्ल म्हणतो, 'दररोज कोणी नवीन इसम येऊन त्यास मनसब मिळाली नाहीं, अथवा बक्षिसें, नोकरी वगैरे मिळून लोकाचा संतोष झाला नाहीं, असा एकही दिवस जात नसे मोगल बादशहाच्या सारखें ऐश्वर्य, अकबरासारखा पुरस्कर्ता, मुसलमानासारखे ताज्या दमाचे व पराक्रमी लोक, असा सर्व योग जमल्यावर त्या काळचा भाग्योदय काय वर्णावा ! त्याची केवळ कल्पनाच केली पाहिजे ' वर जीं चरित्रें दिलीं आहेत, त्याजवरून व विशेषतः अबुल् फज्ल् सारख्याच्या उदाहरणावरून, गुणिजनांची संभावना त्या वेळीं कशी होई, आणि हरएक गुण व कसब नावारूपास येण्यास त्या वेळीं केवढा आश्रय मिळे, ह्याची कल्पना करिता येते हिंदुस्तान देशाची समृद्धि अपूर्व होती, आणि राजा परका असूनही स्वदेशात राहाणारा असला म्हणजे लोकसंग्रहाच्या व गुणोत्कर्षाच्या कामीं त्याजकडून केवढें साह्य मिळे हें अकबराच्या उदाहरणावरून व्यक्त होतें

सर्वसूत्रचालक व सर्वाधिकारी असा एक धनी आपणावर आहे, त्याजकडे धावत जाऊन दाद मागता येते, त्याला आपला गुण दाखवून त्याचें चीज करून घेता येते, अशा प्रकारची भावना प्रत्येक प्रजाजनाच्या मनात उत्पन्न होऊन अकबराच्या वेळेस नवीन मन्वंतर सुरू झालें. नुसत्या हिंदुस्तानातूनच

नव्हे, तर पृथ्वीवरील दूरदूरच्या भागांतून गुणिजन दरबारांत येऊं लागले. त्यांचा तेथें उत्कृष्ट परामर्ष घेतला जाई; आणि त्यांच्या गुणांचा तेथें विकास होई. येणें करून हरएक सद्गुण, कसब व हुन्नर ह्यांचा परिपोष होऊन, मोगल बादशाहीचा जो लौकिक सुरू झाला, तो अद्यापि सर्व जगभर दुमदुमत आहे.

अकबराच्या तीनही राजधान्या आग्रा, सिक्री व लाहोर या त्या वेळच्या लंडनपेक्षां ज्यास्त मोठ्या व सुंदर होत्या. सुरत बंदर तेव्हां भरभराटीस आलें नव्हतें. बनारसला त्या वेळीं राजकीय महत्त्व नसलें तरी तेथील विद्यापीठ फार नामांकित होतें. राजा मानसिंगानें तेथें आपला भव्य वाडा बांधिला आणि त्याच्याच आश्रयानें तुळसीदासानें आपलें सुप्रसिद्ध 'रामचरितमानस' हें काव्य लिहिलें. तुळसीदास अकबराचा समकालीन होता. दक्षिणेंत विजापुरचा सुलतान इब्राहीम आदिलशहा दुसरा (१५८०-१६२६) ह्यानेंही अकबराची कीर्ति ऐकून त्याचेंच अनुकरण पुष्कळसें आपल्या कारभारांत केलें. अकबराप्रमाणेंच त्यानेंही हिंदु-मुसलमानांस समान भावनेनें वागवून लोकांची प्रीति संपादन केली. भाषेच्या संबंधानें तर इब्राहीमनें मराठींतच सर्व सरकारी लेखाण ठेवल्यानें लोकांची मोठी सोय झाली. अकबरानें दरबारी कामकाजाची भाषा फारशी ठेविली.

अकबराच्या तीन दायांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. झैनखानाची आई पीछाजान अनागा, आदमखानाची आई महाम अनागा, आणि अझमखानाची आई जिजी अनागा. ह्या सर्व बायांचा मान मोठा असून त्यांच्या मुलांस मोठमोठीं कामें मिळालीं. त्यांत शेवटच्या बाईवर अकबराची विशेष भक्ति होती. बहरामखान, मुन्यिमखान, आदगाखान, बहादूरखान, ख्वाजाजहान, खानखानान आणि मीर्झा अझम कोका, इतके इसम अकबराचे वजीर होते. रामायणमहाभारतांखेरीज अथर्वणवेद, लीलावती, जातक, हरिवंश, आणि नलदमयंती, ह्या ग्रंथांचीं अकबरानें फारशी भाषांतरें करविलीं. अबुल् फज्ल् व बदाऊनी यांच्या ग्रंथांखेरीज, मासिरीरहिमी, निजामुद्दीनचा तबकाती-अकबरी; आणि पुष्कळ विद्वानांनीं तयार केलेला तारिखी आल्फी, हे फारशी इतिहास अकबराच्या कारकीर्दीचे उपलब्ध आहेत.

# प्रकरण चोविसावें.



## नुरुद्दीन महंमद सलीम ऊर्फ जहांगीर.

स १६०५-१६२७

| | |
|---|---|
| १. राज्यारोहण. | २. जहांगीरचीं बायकामुलें. |
| ३. रजपुतांशीं युद्ध (स. १६०८-१४) | ४ नूर-जहान, इराणी वळण |
| ५ दक्षिणेंतील भानगडी. | ६. जहांगीर बादशहा व इंग्रज लोक |
| ७. अखेरच्या घालमेली (१६२३-२७) | (अ) हॉकिन्स, (आ) सर टी रो. |
| ८. जहांगीरची योग्यता | ९ जहांगीरचा जीवनक्रम |
| १० जहांगीरचीं धर्मसंबंधीं मतं | ११ जहांगीरची राज्यव्यवस्था. |
| १२ जहांगीरच्या स्वारीचा थाट. | |

**१. राज्यारोहण**—सलीम याचा जन्म ता ३० ऑगस्ट १५६९ रोजीं झाला; आणि अकबराच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसानीं, 'जहांगीर' म्हणजे 'जगज्जेता' असे नाव धारण करून आग्रा येथे तो बादशाही तख्तावर विराजमान झाला. अकबर व जहांगीर ह्यांच्या स्वभावात महदंतर होते. अकबराच्या सद्गुणांचा जहांगीरच्या अंगीं लेशही नसून, त्याचे दोष मात्र त्याच्या ठायीं भरपूर उतरले होते शिवाय त्याच्यात आणखी दुर्गुण होते, ते वेगळेच. तो विषयासक्त, निष्ठुर, स्वच्छंदी, स्वार्थसाधु व बालिश असा होता. तथापि अकबरानें बांधून दिलेली राज्यव्यवस्था त्यानें बदलली नाहीं, म्हणून त्याची कारकीर्द एकंदरीत शांततेची व सुखाची गेली जहांगीरच्या वेळेस इंग्लंडांत पहिला जेम्स् व फ्रान्सात तेरावा व चौदावा लुई हे राजे राज्य करीत होते. त्यांच्याशीं तुलना करून पाहिली असता जहांगीर कमी योग्यतेचा ठरत नाहीं.

सिंहासनावर बसल्याबरोबर जहांगीर बादशहानें रयतेच्या सुखाकरितां जीं बारा फर्मानें काढिलीं. तीं त्यानेंच आपल्या हकीकतींत लिहून ठेविलीं आहेत, तीं अशीं:—

(१) जमीनदार लोक आपल्या हद्दींतील रयतेपासून स्टांपाचे व जकातीचे कर घेत असत, ते बंद करावे. (२) प्रवासी लोकांच्या चोऱ्या होत व दरवडे पडत ते बंद करून, त्यांजकरितां रस्त्यांवर ठिकठिकाणीं धर्मशाळा व विहिरी बांधाव्या. (३) व्यापारी लोकांचा माल रस्त्यांत कधींही उघडून पाहूं नये. तसेंच कोणी इसम मरण पावल्यावर त्यास वारस नसल्यास त्याची जिंदगी सरकारांत जमा होत असे, ती प्रघात बंद करून, वारस नच मिळाल्यास, अशी निवारसी जिंदगी लोकोपयोगी कामांत खर्च करावी. (४) राज्यांत मद्य तयार करूं नये व ते विकूं नये. (स्वतः बादशहानें आपल्या मद्यप्राशनाची व तत्संबंधीं घेतलेल्या खबरदारीची हकीकत या लगत दिली आहे.) (५) सरकारी नोकरांनीं किंवा इतरांनीं दुसऱ्याची घरें आपल्या उपयोगासाठीं घेऊं नयेत; आणि राज्यांत गुन्हेगारांचे नाककान कापण्याच्या शिक्षा सर्वथा मना करण्यांत याव्या. (६) जमीनदारांनीं अगर सरकारी नोकरांनी रयतेच्या जमिनी त्यांजपासून आपल्या लागवडीस घेऊं नयेत (७) प्रत्येक मोठमोठ्या शहरीं रोग्यांच्या सोयीसाठीं इस्पितळें बांधून, त्यांच्या औषधपाण्याची तजवीज करण्यांत यावी. (८) माझ्या जन्मदिवसापासून वयाच्या वर्षांइतके दिवस, व प्रत्येक गुरुवार व रविवार ह्या दिवशीं राज्यांत कोणत्याही प्रकारचा पशुवध होऊं नये. (९) दर रविवारीं सूर्योपासना करण्यात यावी (१०) फौजेंतील व खासगीकडील सर्व नोकरांचे पगार सवाईपासून दुपटीपर्यंत वाढविण्यात यावे. (११) वतनदारांचीं सर्व वतनें त्यांजकडे बिनतक्रार चालविण्यात येतील; (१२) किल्ल्यांतून व तुरुंगांतून फार दिवसांचे कैदी पडून राहिले आहेत, ते सोडून द्यावे.

अशा प्रकारच्या आरंभीं केलेल्या कित्येक कृत्यांवरून जहांगीर हा बापासारखाच प्रजापालनदक्ष निघेल असें लोकांस वाटलें बापाच्या वेळचे सर्व अनुभविक कामदार त्यानें कायम ठेविले. जकात घेण्याच्या नियमांत त्यानें अनेक उपयुक्त फेरफार केले; आणि सर्व प्रकारच्या अर्जदारांची बादशहापर्यंत वाटेल तेव्हां दाद लागावी म्हणून सुवर्णघंटेची योजना केली. आपल्या महालांतून एक सोन्याची सांखळी बाहेरपर्यंत त्यानें ठेविली तीस साठ घंटा अडकविलेल्या होत्या. बाहेरून ती सांखळी ओढितांच सर्व घंटा वाजत आणि बादशहाकडे अर्जदाराची ताबडतोब दाद लागे. बाह्यात्कारीं मुसलमानी धर्माविषयीं त्यानें आपली निष्ठा प्रदर्शित केली. त्यामुळें मुसलमानी प्रजेस विशेष समाधान वाटलें.

मद्य, अफू वगैरे मादक पदार्थांचे सेवन करूं नये. असा त्याने कायदा केला ह्या कृत्यांनीं जहांगीरची कारकीर्द सुखावह होईल, असा लोकास भरंवसा वाटला

ह्या कारकीर्दीची हकीकत अनेक पाश्चात्य प्रवाशानीं लिहून ठेविली आहे जहांगीरच्या पूर्वीच्या कालाविषयीं मुसलमान ग्रंथकाराच्या एकतर्फी माहितीवर अवलंबून राहावें लागते, तसा प्रकार ह्या पुढील कालासंबंधाने नाहीं सर टॉमस रो, फादर काट्रू, कॅप्टिन हॉकिन्स वगैरे गृहस्थानीं मोगल बादशहाच्या लिहून ठेविलेल्या हकीकती वाचण्यालायक आहेत

**( २ ) जहांगीरच्या बायका मुलें, शहाजादा खुस्रू.**—सलीमचें वजन ६५१४ तोळे म्हणजे १६२ पौंड होतें त्याचें पहिलें लग्न ता १३ फेब्रुवारी सन १५८५ रोजीं अंबरचा राजा भगवानदास याची मुलगी मानबाई इच्याशीं झालें त्यावेळीं तो १५ वर्षांचा होता इच्यापासून त्याला पहिली मुलगी सुलतान उन्-निसा बेगम ही ता २६-४-१५८६ रोजीं जन्मली ही पुढे ६० वर्षे जिवंत होती. पण इतिहासात नाव घेण्याजोगी तिची कामगिरी नाहीं तिच्या पाठीवर भाऊ झाला, तो खुस्रू त्याचा जन्म लाहोर येथें ता ६-८-१५८७ रोजीं झाला, आणि तो बऱ्हाणपुरास सन १६२१ च्या अखेर मारला गेला हा जन्मास आला तेव्हा त्याच्या आईला म्हणजे मानबाईला शहाबेगम हें मानाचें नांव मिळालें या बाईनें ता १६-५-१६०४ रोजीं अफू खाऊन आत्महत्या केली. सलीमचें दुसरें लग्न १५८० त बिकानेरच्या राजाची मुलगी जोधबाई इच्याशीं झालें. याशिवाय आणखी तेरा बायका त्याच्या लग्नाच्या असल्याचा उल्लेख सापडतो. त्यात एक छोटा तिबेटचा राजा अलीराय याची मुलगी होती त्यातील शेवटची मिहरुन्निसाखानम् ऊर्फ नूरजहान होय जोधबाईचा मुलगा खुर्रम् ऊर्फ शहाजहान याचा जन्म ता ५ जानेवारी १५९२ रोजीं लाहोर येथें झाला. पर्वीजचा जन्म ता. २-१०-१५८९ रोजीं झाला. त्याची आई ख्वाजा हुसनची मुलगी. बिहार बानू बेगम या नावाची एक मुलगी सलीमला सप्टेंबर १५९० त झाली. तिची आई राठोड राजा केशवदासाची मुलगी ती पुढे पुष्कळ दिवस जगली शहर्यार याचा जन्म सन १६०५ त झाला एकंदरीत रजपुताच्या मुली आपल्या जनानखान्यात आणण्याचा सलीमने सडकून प्रयत्न केलेला दिसतो. त्याच्या बायकात आणखी जसलमीरच्या रावळची मुलगी, आणि रामचंद्र बुंदेल्याची मुलगी, या दोन रजपूत आहेत खुस्रू, पर्वीझ,

खुर्रम् व शहर्यार हे चार मुलगे प्रसिद्ध आहेत. वडील खुस्रू याचें व बापाचें कधीं जुळलें नाहीं. पर्वीझ हा मद्यपानांत निमग्न असे. त्या दुर्व्यसनानें मोगल घराण्याचा पुष्कळ नाश झाला. प्रत्यक्ष जहांगीरचा थोरपणा बाहेर न पडण्यासही हाच दुर्गुण कारण झाला. पर्वीझ हा दुर्बुद्ध व गर्विष्ठ होता. दक्षिणेंतील फौजेचें आधिपत्य त्याजकडे असून तो खानखानानच्या हातांत बाहुल्यासारखा वागे.*

खुर्रम् हाच पुढें प्रसिद्धीस आलेला शहाजहान होय. तो मोठा धूर्त व तीव्र बुद्धीचा होता. त्याची महत्त्वाकांक्षा फार जबर असून ती सिद्धीस आण्यास लागणारें प्रसंगानुसार वर्तन, चलाखी, कावेबाजपणा वगैरे गुण त्याच्यांत भरपूर होते. पर्वीझसारखा त्यास मद्यपानाचा नाद नव्हता, तरी त्यास इतर ख्यालीखुशाली आवडे. राज्यपदप्राप्तीवर त्याची सारखी नजर होती. त्यानें राज्यांत पुष्कळ उलाढाली केल्या. शहर्यारचें नांव विशेष महत्त्वाचें नाहीं. कारकीर्दीच्या अखेरीस जे बखेडे झाले, त्यांत त्याचें थोडेसें अंग होतें.

वडील मुलगा खुस्रू याची हकीकत प्रस्तुत विशेष महत्त्वाची आहे. जहांगीर तख्तनशीन झाल्यावर सहा महिन्यांतच खुस्रूनें बापाविरुद्ध बंडाळी चालविली. अकबराच्या दरबारीं रजपूत व मुसलमान असे दोन तट नेहमीं असत. अकबराच्या करड्या नजरेपुढें त्या दोन तटांमधील द्वेषभाव बाहेर दिसत नव्हता. आपल्या पाठीमागें खुस्रूनें राज्यपद घ्यावें अशी अकबराची इच्छा होती. रजपूत पक्षानें त्यास साह्य देऊन जहांगिरास तख्तावरून काढण्याचा विचार चालविला. खुस्रूचा कल ख्रिस्ती धर्माकडे होता. कधीं ना कधीं जहांगीर आपले डोळे काढील किंवा प्राण घेईल अशी त्यास दहशत होती. म्हणून आग्रा सोडून तो पंजाबकडे पळून गेला. तेथें त्यास पुष्कळ लोक येऊन मिळाले. त्यानें लाहोरास वेढा घातला; परंतु किल्ला त्याच्या हस्तगत झाला नाहीं. जहांगीरनें लगेच त्याचा पाठलाग चालविला. बादशाही फौजेपुढें त्याचा निभाव न लागून तो हुमायूनप्रमाणें इराणांत जाण्याचे इराद्यानें पळून जात असतां, जहांगीरच्या लोकांनीं झेलम नदींत त्यास नावेंत पकडून बापासमोर आणिलें. जहांगीरनें त्याच्या साथीदारांस पकडून अत्यंत क्रूर शिक्षा दिल्या. शेंकडों

* बेणी प्रसाद—जहांगीर, पृ. २८.

लोकांस हत्तीच्या पायांखालीं देऊन, व जिवंत सोलून किंवा नदींत बुडवून ठार मारिले दरवाजाबाहेर सुळाची राग उभारून सातशे लोकास त्यांजवर चढविलें त्याचीं दु खे पाहून खुस्रूस शरम वाटून दहशत बसावी, म्हणून जहांगीरनें त्यास त्या सुळाच्या रागासमोरून फिरविलें त्यास जहागीरने जीवदान दिले, तरी त्याला जन्मभर बंदिखान्यात ठेविलें त्याचें बहुतेक आयुष्य याच बंदिखान्यांत गेले. अनाराय नामक रजपूत सरदार खुस्रूवर देखरेख ठेवण्यास नेमिलेला होता नम्रतेने वागून बापाची मर्जी आपण पुनरपि संपादन करूं अशी खुस्रूस आशा होती बंदिखान्यात पडल्यापासून तो सर्वांस आवडूं लागला खुस्रूला दोन बायका होत्या, एक अझमखान कोकाची मुलगी, व दुसरी मीर्झा मुजफ्फर हुसेनची मुलगी त्यास मुलगे तीन व एक मुलगी झाली. पहिला मुलगा बुलंद अख्तार लहानपणींच मेला. दुसरा दावरबक्ष ऊर्फ बुलकी, व तिसरा गर्शास्प मुलीचें नाव होश्मंद बानू बेगम ही दानियालचा मुलगा होशंग त्यास दिलेली होती पर्वीझ त्यास एकच मुलगी असून ती दाराशेखो त्यास दिलेली होती

नूरजहान व तिचा भाऊ आसफ्खान याच्या मनातून खुस्रूची वाट लावावी असे होते. आसफखानाची मुलगी मुम्ताजमहल ही जहागीरचा मुलगा खुर्रम् यास दिलेली होती. तेव्हा खुर्रम यास जहागीरच्या पश्चात् बादशाही तख्त मिळावें अशी खटपट नूरजहान व आसफ्खान यानीं चालविली. एके दिवशीं बादशहा मद्यपानाने गुंग होऊन पडला असता, अनाराय यास काढून त्याच्या ठिकाणीं आसफ्खान यास खुस्रूवर देखरेख ठेवण्यास नेमावें, अशी नूरजहानने बादशहास विनंती केली त्याच रात्रीं अनारायकडे जाऊन, खुस्रूस आपल्या ताब्यात देण्याची बादशहाची आज्ञा झाली आहे, असें आसफ्खान सागूं लागला. अनारायने त्याचें म्हणणे नाकबूल केले 'बादशहानें खुस्रूस माझ्या ताब्यात दिले आहे, त्यास मी बादशहाला परत देईन, दुसऱ्या कोणास देणार नाहीं,' असा सणसणीत जबाब आसफ्खानास मिळाला तेव्हा तो निरुत्तर झाला. दुसऱ्या दिवशीं अनारायने रात्रीं घडलेला प्रकार बादशहास कळविला त्यावर जहांगीरने अनारायची फारच तारीफ केली, आणि अशाच प्रकारें नोकरी बजाविण्याविषयीं त्यास सांगितले पुन सात दिवसांनीं नूरजहाननें बादशहाजवळ ती गोष्ट काढिली त्या वेळीं अनारायास बादशहानें हुकूम

दिला, कीं खुस्रूस आसफखानाच्या स्वाधीन करावें. तेव्हां प्रत्येकाला वाटलें कीं खुस्रूचे दिवस भरले. आसफखान खुस्रूस आपल्या ताब्यांत घेण्यास गेला असतां, त्याची बहीण व इतर बाया यांनीं जनानखान्यांत रडून आकांत केला. त्यांनीं खाणेंपिणें सुद्धां सोडिलें. 'खुस्रूचा वध होईल, तर आपण आत्महत्या करूं,' असें त्यांनीं कळविलें. जहांगीरनें त्यांची नाना प्रकारें समजूत केली, कीं खुस्रूच्या जिवास अपाय होणार नाहीं. त्यानें नूरजहानला त्यांचें समाधान करण्यास पाठविलें. परंतु त्यांनीं शिव्यागाळी करून, नूरजहानची भेट घेतली नाहीं. बादशहाच्या दरबारीं आलेले इंग्रज लोक हा प्रकार लक्षपूर्वक अवलोकन करीत होते. खुस्रूस राज्य प्राप्त झालें, तर तो क्रिस्ती लोकांस मान देईलः खुर्रम् यास तें प्राप्त झालें, तर तो क्रिस्ती लोकांचें नुकसान करीलः असा संभव होता. पुढें कांहीं वर्षांनी जहांगीर बादशहा सर्व लवाजम्यानिशीं मांडवगडास गेलाः निघतांना खुस्रूची भेट घेऊन त्यास त्यानें आपणाबरोबर घेतलें. तेव्हां खुस्रूच्या शत्रूंचीं तोंडें कांहीं दिवस बंद झालीं. रस्त्यांत इंग्रजांचा वकील सर टॉमस रो व खुस्रू यांची भेट झाली. दरबारच्या भानगडी खुस्रूस कांहींच कळत नव्हत्या असें त्या भेटींत दिसून आलें.

कांहीं दिवसांनीं नूरजहानचा खुस्रूवरील राग कमी झाला. खुर्रमनें बादशाहीचा प्रसिद्ध सरदार खानखानान याच्या नातीशीं लग्न लाविलें. आपली भाची मुम्ताज महल ही एक बायको असतां खुर्रमनें दुसरें लग्न केलें, ही गोष्ट नूरजहानला आवडली नाहीं. बादशहाचीही अलीकडे खुस्रूवर मर्जी बसली होती. नूरजहानची पहिल्या नवऱ्यापासून झालेली एक मुलगी होती, ती खुस्रूस देऊन त्याबरोबर सख्य करण्याचा तिनें घाट घातला. हा बेत खुस्रूस आवडला नाहीं. खुस्रूची आपल्या बायकोवर अत्यंत मर्जी होती. त्यास कोणतेंही व्यसन नव्हतें, म्हणून अकबराच्या वेळेपासून त्याजवर सर्व लोकांची व विशेषतः रजपुतांची विशेष भक्ति असे. त्याचा सासरा अझमखान यास अकबराचा नवीन धर्म न आवडून तो मक्केस जाऊन राहिला होता. परंतु त्या पवित्र ठिकाणीं त्याची मुसलमानी धर्मावरील भक्ति उडाली, आणि तो परत येऊन अकबराच्या नवीन धर्मांत सामील झाला. त्याच्या मुलीचा स्वभावही त्याच्याच सारखा होता. तिच्या प्रीतीस्तव खुस्रूनें नूरजहानच्या मुलीशीं लग्न करण्याचें नाकबूल केलें. या त्याच्या नाकबुलीनें त्यानें होऊनच आपला जीव धोक्यांत

घातला त्याची राज्यप्राप्तीची आशाही लयास गेली नूरजहानचें मन दुख-विणें हें काम सामान्य नव्हते खुस्रूच्या बायकोनेही नूरजहानच्या मुलीशीं लग्न करून तिची प्रीति संपादन करण्याविषयीं त्यास पुष्कळ सांगितलें पण त्या पत्नीनिष्ठ राजपुत्रानें तें मानिलें नाहीं

पुढे जेव्हा जहांगीरचा अंतकाळ समीप आलासें वाटून भावी व्यवस्थेबद्दल दरबारीं कलह सुरू झाले, तेव्हा नूरजहान ही आपली मुलगी शहर्यार यास देऊं करून, त्यास राज्य मिळवून देण्याच्या खटपटीस लागली तीनही राजपुत्रांचा नाश करण्याचा तिने उद्योग चालविला त्या वेळेस दक्षिणेंत युद्धप्रसंग चालू होते, ते मोडण्यासाठीं खुर्रमची रवानगी तिकडे झाली मागें बादशहाचा काळ झाल्यास खुस्रू त्याच्याजवळ असूं नये ह्या इरादानें त्यास खुर्रमनें आपणाबरोबर दक्षिणेंत बऱ्हाणपुर येथे नेलें नूरजहाननें त्या गोष्टीस काहीं हरकत केली नाहीं बादशहा आजारी पडल्याची बातमी खुर्रम यास बऱ्हाणपुरास पोंचली. एके दिवशीं आजारीपणाचें ढोंग करून शहाजहान छावणी सोडून बाहेर गेला असता, मागें खानखानानच्या हुकुमानें डिसेंबर १६२१ त खुस्रूचा खून झाला. लगेच परत आल्यावर भावाच्या मृत्यूचें वर्तमान शहाजहानास समजलें, तेव्हां त्यानें आपणास अत्यंत दुःख झालें असें दाखविलें, आणि एकाएकीं पोटदुखीच्या विकारानें खुस्रू मरण पावला अशी हकीकत त्यानें बापास लिहून पाठविली पण त्यानेंच त्यास दग्यानें मारला याविषयीं कोणासही संशय वाटला नाहीं. स. १६२२ च्या मे महिन्यांत खुस्रूचें शव आग्र्यास नेऊन तेथून अलाहबाद येथील खुल्दाबागेत त्याच्या आईशेजारीं पुरण्यांत आलें. तो, बायको व आई यांच्या कबरी तेथें शेजारींच आहेत. येणेंप्रमाणें मोगल घराण्यांतील एका अत्यंत होतकरू व सुशील राजपुत्राचा खून झाला. तेणेंकरून बादशाहीचें फार नुकसान झालें तिकडे जहांगीर दुखण्यांतून बरा झाला, आणि खुस्रूच्या वधाची बातमी त्यास समजली, तेव्हा खुस्रूची बायको व एकुलता एक मुलगा बुलकी यांस त्यानें आपल्याजवळ आणविलें, आणि त्या दुःखाच्या आवेशांत आपल्या पश्चात बुलकीस राज्य मिळावें असें ठरविलें. खुस्रू व दाराशेको यांचे हृदयद्रावक अंत न होता, त्यांस मोगल बादशाहीचें पद मिळालें असतें तर देशाचा भावी इतिहास सर्वस्वी बदलला असता, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. त्या दोघांचाही हिंदूंविषयीं आदर असल्यानें

अकबराच्या धोरणावर हिंदु-मुसलमानांचें ऐक्य होऊन हिंदी राष्ट्रास निराळें वळण लागण्याचा संभव होता. पण भवितव्यता वेगळी होती.

(३.) **रजपुतांशीं युद्ध**, ( स. १६०८-१६८ ).—जयपुर व मारवाड येथील राजांशीं जहांगीरचा स्नेह होता. उदेपुरच्या राजाशीं मात्र त्यास युद्ध करावें लागलें. ह्या युद्धाची संक्षिप्त हकीकत त्या घराण्याच्या इतिहासांत आली आहे. अकबर मरण पावला, त्या वेळेस राणा अमरसिंह उदेपुरास राज्य करीत होता. हा स्वभावानें चैनी व विलासी असल्यामुळे, मोगलांशीं टक्कर देण्याचें काम ढिलें पडलें. ही गोष्ट उदेपुरच्या कित्येक स्वामिभक्त सरदारांस रुचली नाहीं. सालुंब्याचा ठाकूर एके दिवशीं अमरसिंहाच्या महालात शिरला. तेथें त्यानें राण्याचे विलासाचे सर्व प्रकार अवलोकन केले, ते त्यास सहन न होऊन त्यानें तेथील मोठ्या आरशावर दगड मारून तो फोडून टाकिला, आणि राण्याजवळ जाऊन त्यास सिंहासनावरून ओढिलें. नंतर तो भोंवतालच्या सरदारांस म्हणाला, 'सरदार लोक हो, बघतां काय? घोड्यावर स्वार व्हा, आणि प्रतापसिंहाच्या ह्या मुलाची जी लोकामध्ये बदनामी होत आहे, तिजपासून त्याचें संरक्षण करा!' ह्या कृत्यानें राणा अमरसिंह शुद्धीवर आला, आणि त्यानें लागलेंच आपलें आलस्य टाकून युद्धाची कडेकोट तयारी केली. उदेपुरच्या घराण्यानें अद्यापपर्यंत मोगलांचें स्वामित्व कबूल केलें नव्हतें. त्याची खोड मोडण्यासाठीं जहांगीर बादशहानें चांगली तयारी केली. सन १६०८ त बादशहानें आपली फौज वजीर खानखानानचा भाऊ अब्दुल्ला याच्या हाताखालीं देऊन त्यास उदेपुरावर चाल करून जाण्यास सांगितलें. दिवेर* येथें रजपुतांनीं या फौजेचा पराभव केला. पुनः १६१० त अब्दुल्लाची व रजपुतांची राणापुर नामक क्षेत्रांत दुसरी लढाई होऊन रजपुतांस विजय प्राप्त झाला. परंतु ह्या लढाईंत अनेक नामांकित रजपूत सरदार पतन पावले, व भयंकर रक्तपात झाला. ह्या पराभवाचें वर्तमान ऐकून जहांगीर बादशहा फार अस्वस्थ झाला. अमरसिंहाची खोड मोडण्याकरितां चितोड येथें संग्रामसिंह ऊर्फ संग्राजी ह्यास त्यानें गादीवर बसविलें. परंतु मेवाडांतील रणशूर योद्ध्यांच्या शौर्यवीर्यादि गुणांचीं अनेक मूर्तिमंत चिन्हें आपल्या सभोंवार पाहून, त्यास

* दिवेर, खामनेर कोठें आहेत? राणापुर झाबवाजवळ माळव्यांत.

आपल्या विश्वासघाताची शरम वाटली त्याने राज्यत्याग केल्यामुळें पुढे जहांगीरनें त्याची अप्रतिष्ठा केली, तेव्हा त्याने आपल्या पोटात कट्यार भोंसकून प्राणत्याग केला दिल्लीच्या दरबारात पुढे प्रसिद्धीस आलेला महाबतखान ह्या संग्रामजीचा मुलगा होय

सर्व उपाय हरले असे पाहून जहांगीर स्वत फौजेची तयारी करून अजमिरास आला; आणि तेथून शहाजादा पर्वीझ ह्यास त्याने मेवाडात पाठविले त्या वेळीं सामनेरच्या बारींत मोगल व रजपूत याची कडाक्याची लढाई होऊन पुनरपि मोगलांचा पराभव झाला त्या लढाईने मेवाडचे वैभव फार वाढले जहांगीरने पर्वीझ यास परत बोलावून महाबतखानास रजपुतान्यांत ठेविले, आणि मागाहून शहाजादा खुर्रम् यासही तिकडे पाठविलें इकडे राणा अमरसिंह यानें आपला पुत्र कर्ण याजला मोगलाशीं सामना करण्यास पाठविले खुर्रम् त्यानें रजपुतांस जेरीस आणून तह करण्यास लाविल. ( सन १६१३ ) राजपुत्र कर्ण बादशहास शरण गेला, तेव्हा त्यास बादशाही फौजेत मनसबदारी मिळाली, ( सन १६१४ ) जहांगीरने कर्णाला मोठ्या सन्मानाने आणि ममतेने वागविलें. त्याजबद्दलची कच्ची हकीकत बादशहाने आपल्या रोजनिशींत सविस्तर लिहून ठेविली आहे येणेप्रमाणे रजपुतान्यातील युद्धाचा तूर्त शेवट झाला

(८) **नूर-जहान, इराणी वळण,** ( सन १६०६-१६४५ ) ---जहांगीर बादशहाच्या कारकिर्दीत नूरजहानचा वृत्तात विशेष महत्त्वाचा आहे मोगल बादशाहीच्या अमदानींत हिंदुस्थानची भरभराट होती, त्याचा अर्थ, मोठमोठ्या नोकऱ्या, जहागिरी किंवा अधिकाराचीं कामे येथच्या लोकांसच मिळत गेलीं असा नाहीं त्या बाबतींत सरकारचा आश्रय बहुधा परदेशस्थास मिळाला परंतु बादशहा, त्याचे नातेवाईक व परदेशाहून आश्रयाकरितां देशांत आलेलीं अनेक मुसलमान कुटुंबे, त्या देशात येऊन निरनिराळ्या ठिकाणीं कायमचेंच वास्तव्य करून राहूं लागलीं, त्यामुळे अप्रत्यक्ष रीतीने देशातील लोकांचा फायदा पुष्कळ झाला. उद्योगधंदे, कसबे व हुन्नर याची वृद्धि होऊन, कामकरी लोकांस निर्वाहाचे साधन सुलभ झाले. देशात संपत्ति खेळूं लागली, आणि नानाविध कलांस आश्रय मिळून त्या ऊर्जितदशेस आल्या बाहेरून येथें येऊन निर्वाह करणाऱ्या मुसलमानांची संख्या जरी अतोनात वाढली, तरी त्यांच्या गरजांचा व ऐषआरामाचा फायदा येथील लोकांसच मिळाला राज्यकर्ते

परकी व स्वजातीचे पक्षपाती असले, तरी ते येथेंच येऊन राहिल्यामुळे, उभयतांचें हित झालें. त्याच्या चैनीसाठीं येथील लोकास सुस्थितीत ठेवण्याची त्यांस आवश्यकता वाटून, उलट पक्षीं, येथील लोकांस भरपूर काम मिळालें. अशा ह्या परस्परापेक्षेनेंच मुसलमानांचा परका अंमल हिंदी लोकांस तितकासा जाचक झाला नाहीं.

अफगाणांचा पाडाव करण्यासाठी अकबरानें रजपुतांचीं मनें सांभाळिलीं. सुमारें पन्नासपाऊणशे वर्षे ह्या रजपुतांचें व एकंदर हिंदु रीतीभातींचें वजन रियासतींत बरेंच वाढलें. परंतु जहांगीरच्या अखेरीस हा प्रकार बहुतेक बदलला. अनेक शियाधर्मी इराणी कुटुंबे दरबारीं येऊन त्यांचे माहात्म्य वाढलें. बादशहाचा त्यांजवर दाब न बसतां, उलट त्यांनीच बादशहावर व दरबारावर आपला पगडा बसविला. हा प्रकार वाढता वाढता औरंगजेबाच्या वेळेस एतद्देशीयांचें वजन बहुतेक नाहींसें झालें. हाच प्रकार शिल्पकलेंत व बांधकामांतही दिसून येतो, हें अकबराची शिकंदरा येथील कबर व आग्र्याचा ताजमहाल ह्या इमारतींच्या तुलनेवरून व्यक्त होईल. असो. दरबारांत इराणी वळण वाढविणारीं जीं नवीन कुटुंबे ह्या देशांत आलीं त्यांत नूरजहानचें कुटुंब विशेष प्रसिद्ध असून, त्या कुटुंबाच्या मासलेवाईक हकीकतीवरून, इतरांची कल्पना करितां येईल.

खुरासानच्या सुलतानापाशीं ख्वाजा महंमद शरीफ नावाचा वजीर होता. तो शियाधर्मी व विद्वान् असून कवि होता. इराणचा शहा तहमास्प् ह्यानें त्यास यज्द् प्रांताचा कारभार दिला. तो सन १५७७त मरण पावला. त्याचे दोघे भाऊही इराणांत त्याच्यासारखेच मोठमोठ्या अधिकारावर होते. सारांश, इराणच्या रियासतींत हें कुटुंब नामांकित होतें. महंमद शरीफचा एक मुलगा होता त्याचें नांव गियासबेग. हा नूरजहानचा बाप होय. त्यास मीर्झा घ्यासुद्दीन महंमद असेंही म्हणत. पाश्चात्य ग्रंथकार त्यास अयाझ हें नांव देतात. घ्यासबेगची बायको एका थोर कुळांतली होती. बाप मरण पावल्यावर त्यास कष्टदशा प्राप्त झाली, तेव्हा आपले दोन मुलगे व एक मुलगी बरोबर घेऊन बायकोसह तो इराणांतून पळून गेला. रस्त्यात त्यांस दरोडेखोरांनीं लुटलें, तेव्हां फक्त दोन खेचरें त्याजपाशीं राहिलीं, त्यांजवर ते आळीपाळीनें बसत. कंदाहार येथें पोंचल्यावर त्याची बायको (स. १५७८–७९ त) प्रसूत होऊन

मुलगी झाली, तिचे नाव 'मिहरुन्निसा (=स्त्रियांमधील सूर्य), असें ठेविलें. हीच नूरजहान होय तिच्या बापाची स्थिति त्या वेळेस इतकी कष्टप्रद होती, कीं, तिला रस्त्यात सोडून तो तसाच अडचणींतून प्रवास करीत असता, मलीक मसूद नावाच्या एका व्यापाऱ्याची व त्याची गाठ पडली हा व्यापारी अकबराचे ओळखीचा होता त्याचा तांडा हिंदुस्तानांत येत होता, त्याजबरोबर घ्यास-बेग हा इकडे आला मलीक मसूदने त्यास फत्तेपुरशिक्री येथे अकबरास भेटविलें, तेव्हा त्यास बादशहाने आपल्या नोकरीत घेतलें. घ्यासुद्दीन विद्वान्, बहुश्रुत, उद्योगी व दरबारी वर्तनात निष्णात होता तसेच तो उत्कृष्ट पत्रे लिहिणारा व संभाषणात मनोवेधक असल्यामुळे, लवकरच त्याची दरबारात मोठी चहा होऊं लागली स १५९५ त अकबरानें त्यास काबुलच्या दिवाणीवर नेमिलें. नूरजहानची आई गुणवान होती, तशीच मुलगीही निघाली तिला चित्रे व कशीदा काढण्याचा नाद असे ती फारशी भाषेत कवनें करी जहांगीर तख्तावर आल्यावर त्याने घ्यासबेग यास इतिमादुद्दौला हा पदवी दिली. त्याचा मुलगा महंमद शरीफ हा गुप्तकटांत सामील आहे असा संशय आल्यावरून, त्यास जहांगीरने ठार मारून, बापाला कैदेंत ठेविलें. घ्यास-बेग हिंदुस्तानात आला त्याच सुमारास अलीकुली इस्ताज्लू नावाचा एक गृहस्थ इराणांत शहा दुसरा ईस्मईल (१५७६-७८) याजजवळ सफरची म्हणून नोकरीला होता शहा ईस्मईल मरण पावताच तो नोकरी सोडून हिंदुस्तानात मुलतान येथे येऊन खानखानाचे हाताखाली नोकरीस राहिला. त्या वेळीं बादशहाचे हुकमाने खानखाना ठठ्ठावर स्वारी करीत होता त्या स्वारींत अलीकुलीनें विशेष पराक्रम दाखविल्यावरून खानखानाने लाहोर येथे स १५९४ त त्याची बादशहाशीं भेट करविली तदुत्तर लवकरच त्याचें लग्न मिहरुन्निसाशीं झालें त्या वेळीं ती १७ वर्षांची होती अकबराने स १५९९ त त्यास सलीमचे तैनातीस देऊन मेवाडचे स्वारीस पाठविलें त्या स्वारींत त्यानें एक वाघ मारिला, त्यावरून सलीमनें त्यास शेर-अफकून Afkun म्हणजे वाघास फेकणारा असें नाव दिलें जहांगीर गादीवर आल्यावर त्यानें शेर अफ-कून यास बंगाल्यात वरद्वान येथें जहागीर व नोकरी दिली तेथे असता तो बंड-वाल्यास सामील असल्याचें वर्तमान येऊन बादशहानें बंगालचा सुभेदार कुत्बुद्दीन यास हुकूम पाठविला कीं, शेरअफकून यास पकडून आपल्याकडे

पाठवावें. ता. ३०-३-१६०७ रोजीं बरद्वान येथें कुत्बुद्दीननें त्यास पकडण्यासाठीं फौजेचा गराडा घातला. हा अपमान दुःसह होऊन त्यानें नागव्या तलवारी-निशीं कुत्बुद्दीनवर धावून जाऊन त्यास वार केले. त्या दंग्यांत त्यासही वार लागून तो लगोलग ठार झाला. दुसऱ्या दिवशीं कुत्बुद्दीनही मरण पावला. कुत्बुद्दीन जहांगीरचा फार आवडता होता. तो मरण पावल्याबद्दल त्यास अतोनात दुःख झालें. पश्चात् मिहरुन्निसा व तिची मुलगी 'लाडिली बेगम' ह्या आपल्या बापाकडे आगऱ्यास आल्या. कांहीं काळानें अकबराची राणी सुलतान सलीमा बेगम हिच्या तैनातीस मिहरुन्निसेची नेमणूक झाली. स. १६११ च्या मार्चांत वसंतोत्सवप्रसंगांत जहांगीरची नजर तिजवर गेली; आणि पुढील मे महिन्यांत उभयतांचें लग्न लागलें.

अशी ही नूरजहानची पूर्व हकीकत प्रो. बेणीप्रसाद यांनीं पूर्ण तपासानें सिद्ध केली आहे. लहानपणींच तिजवर सलीमची नजर होती व त्यानेंच तिच्या नवऱ्याचा खून करविला वगैरे हकीकती मागाहून रचलेल्या खऱ्या नव्हत, असें आतां सिद्ध झालें आहे.

जहांगीरची पहिली बायको खुस्रूची आई इनें विष खाऊन प्राण दिला, हें मागें आलेंच आहे. तिजवर जहांगीरची मर्जी विशेष होती. जहांगीर म्हणतो 'तिच्या गुणांचें वर्णन किती करावें ! तिची मजवर इतकी प्रीति होती, कीं माझ्या एका केंसावरून तिनें हजार मुलगे ओंवाळून टाकिले असते. तिच्या मृत्यूनें मला इतकें दुःख झालें, कीं मला आपल्या जिवाचा देखील कंटाळा आला. सबंध चार दिवस आणि चार रात्री मीं कांहीं एक खाल्लें नाहीं, कीं प्यालों नाहीं.', अशा या रंगेल बादशहास रंजविणारी ही नवीन राणी प्राप्त झाली. तिला प्रथम नूरमहल म्हणजे 'राजवाड्याची प्रभा' असें नांव जहांगीरनें दिलें, आणि पुढें कांहीं दिवसांनीं नूरजहान बेगम ( जगत्प्रभा राणी ) असें नांव ठेविलें. त्याच नांवानें ती प्रसिद्ध आहे.

ह्या लग्नापासून सर्व कुटुंबाचें भाग्य उदयास आलें. तिचा बाप मुख्य वजीर होऊन त्यास सहा हजारांची मनसब मिळाली. स. १६२२ त प्रथम त्याची आई व पुढें तीन महिन्यांनीं स्वतः घ्यासबेग मरण पावला. तो उदार व धार्मिक होता. कोणीही इसम त्याच्या दारीं येऊन विन्मुख जात नसे. तो कविता करीत असे. राजकीय पत्रव्यवहारांत तो अत्यंत कुशल होता. चांगलें

पत्र असें त्यानेच लिहावें त्याचा समागम मोठा आल्हादकारक असे. त्यास राग येत नसे, आणि घरात बेड्या, चाबूक, किंवा शिव्या ह्याचा उपयोग त्यानें कधीं केला नाही. त्याचे कागदपत्र मोठे व्यवस्थित असत. तथापि तो लांच मात्र सडकून घेत असे. त्याची सुंदर कबर आग्र्यानजीक आहे त्याचा दुसरा मुलगा मीर्झा अबुल् हसन ऊर्फ आसफ्खान हा पुढें फार प्रसिद्धीस आला. आसफ्खानाची मुलगी मुम्ताजमहल ही शहाजहानची बायको तो स. १६४२ त मरण पावला त्याची कबर लाहोरास जहांगीरच्या शेजारीं आहे त्याचा सालाचा पगार चाळीस लाख रुपये असून, शिवाय आणखी जहागिरी होत्या. मरणसमयीं त्याची संपत्ति अडीच कोटि रुपये होती. त्याचा लाहोरचा वाडा दाराशिकोह ह्यास देण्यात आला आसफ्खानाचा मुलगा मीर्झा आबू तालीब ऊर्फ शाइस्ताखान हा औरंगजेबाच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आला. ह्यांशिवाय घ्यासबेगच्या कुटुंबाचा विस्तार अति मोठा असून सर्व प्रांतांत त्यांचे नातेवाईक भरले होते. नूरजहानच्या आणखी दोन बहिणी होत्या सारांश, घियासबेगच्या ह्या कुटुंबाने पन्नास वर्षांवर मोगल बादशाहीचा कच्चा कारभार केला. जहांगीर व शहाजहान दोघेही विलासी असल्यामुळे राज्यातील सर्व कामे बायकांच्या व नातेवाइकांच्या हातात आलीं त्यामुळे रियासतींत अकबराच्या वेळचे हिंदी वळण उत्तरोत्तर कमी होऊन इराणी वळण अतोनात वाढलें. अशा प्रकारचीं अनेक विस्तृत कुटुंबें परदेशातून हिंदुस्तानात येऊन स्थायिक झालीं. त्यांपैकींच पुढील अयोध्येचे वजीर व हैदराबादचे निजाम हे अवशेष उत्तर रियासतींत आपल्या परिचयाचे होतात

स. १६११ पर्यंत नूरजहानचे दिवस एकाद्या सामान्य स्त्रीप्रमाणें गेले. परंतु पुढें ती एकदम सार्वभौम बादशाहीण बनली जहांगीरची तिच्यावर फारच मर्जी बसली तो सर्वथा तिच्या तंत्राने वागूं लागला. स्वभावत च ती रुआबदार व अंमल गाजविणारी बायको होती तिने आपल्या नातेवाईकास एकदम मोठमोठीं कामे दिलीं तिचा बाप मुख्य वजीर झाला ते काम त्यानें सुरेख बजाविले. बादशहाच्या हातातील सत्ता गेली राज्याचा सर्व कारभार नूरमहल पाहूं लागली मानमरातब सर्व तिच्या हातात खेळं लागले बादशाहीण होण्यास तिच्या नावाने खुत्बा वाचणे मात्र बाकी राहिलें होतें. एवंच वनांत टाकून दिलेल्या इराणी अर्भकाच्या हातीं हिंदुस्तानचे सार्वभौमपद गेलें.

चौतीस वर्षांचे थोर वयांत तिनें बादशहावर एवढा पगडा बसविला हें विशेष आहे. दिवसेंदिवस तिचें वजन आणि महत्त्व वाढत गेलें. तिचें मोर्तब झाल्याशिवाय कोणाला जहागीर मिळेनाशी झाली. वाड्याच्या सज्जांत बसून ती अमीरउमरावांस हुकूम फरमावूं लागली. नाण्यांवर आपल्या नांवाशेजारीं बादशहानें तिचेंही नांव घातलें. सर्व फरमानांवर ती बादशहाच्या सहीच्या शेजारीं आपली सही करीत असे. जनानखान्यांत तर तिचा दरारा विशेष होता. एकंदरींत तिचा अधिकार इतका वाढला, कीं बादशहा अगदीं नामशेष झाला. तो लिहितो, 'बायकोची खरी योग्यता मला प्रथम कळत नव्हती. नूरजहानशीं लग्न झाल्यापासून ती मला कळूं लागली. मीं सर्व कारभार तिच्याच हवालीं केला आहे. एकशेर दारू व अदशेर मांस मला दररोज मिळालें म्हणजे पुरे.' तिच्या नांवानें ज्या जहागिरी चालत होत्या, त्यांची योग्यता राज्यातील तीसहजारी मनसबदाराच्या एवढी होती. तिनें आपल्या नातेवाइकांची व ओळखीच्यांची उत्तम तर्तूद करून दिली. तिची दाई दीलाराम म्हणून होती, तिच्या तंत्रानें सर्व कामें चालत. अनेक अल्पवयस्क व पोरक्या पोरींचा नूरजहाननें सांभाळ केला. त्या वेळीं राज्यांत दंगेधोपे नसून सर्वत्र शांतता होती. नूरजहानच्या कारभाराचा बादशहास फारच अभिमान वाटूं लागला. नूरजहानइतकी लायक व्यक्ति त्या कामास दुसरी कोणी मिळणार नाहीं असें त्यास वाटूं लागलें. 'राणीच्या शहाणपणाचें वर्णन करितां यावयाचें नाहीं. कोणत्याही गोष्टींत काहीं अडचण दिसली, कीं नूरजहान ती तेव्हांच दूर करी.' जहांगीर आजारी असला म्हणजे म्हणे, 'वैद्याला काय अक्कल आहे? नूरजहानचें चातुर्य व अनुभव त्यास मुळीच नाहीं.' ती स्वभावाची उदार होती. कोणावर जुलूम करीत नसे. निराश्रित मुलांचा ती सांभाळ करी. सर्व लोक तिची वाखाणणी करूं लागले. बादशहाला तर तिचा उपयोग विशेष झाला. त्याच्या लहरी व जुलमी वर्तनावर तिनें उत्तम दाब ठेवून कामाचा बंदोबस्त केला. दिवसास ती त्याला मद्यपान करूं देत नसे; आणि रात्रीस सुद्धां तें मर्यादेबाहेर जाऊं देत नसे. बादशहानें सर्व लोकांशीं सभ्यतेनें व योग्यतेनें वागावें याबद्दल ती विशेष खबरदारी घेई. व्यसनाच्या नादीं लागून त्याचा पोषाख व रीतभात ती बिघडूं देत नसे. स्वतःच्या अकलेनें व परीक्षेनें, शहाण्या व परोपकारी बापाच्या मदतीनें, आणि नवऱ्याच्या उदार सौजन्यानें, तिनें सर्व राज्यास

एक विशेष प्रकारची शिस्त लावून दिली तेणेंकरून खर्चही कमी लागूं लागला. राज्याची भरभराट ज्यास्त होऊं लागली त्या वेळच्या रीतीस अनुसरून जो न्याय लोकांस मिळावयाचा, तो तात्काळ मिळूं लागला दरबारची शोभा व वैभव वाढविण्यात तिचें चातुर्य विशेष होते. राजवाड्यांतील सामान-सुमान व्यवस्थितपणें लावून सर्व वस्तु जेथच्या तेथें ठेवण्यात ती कुशल होती. ह्या कामीं तिची आवड व कल्पना तारीफ करण्याजोगी होती. स्त्रियाचे अनेक नवीन शृंगार व दागिने तिनें प्रचारात आणिले स्त्रीवर्गाची स्थिति सुधारण्याचे तिने पुष्कळ प्रयत्न केले तिच्या गुणास मोहित झालेल्या बादशहाचें वर्तनही पुष्कळ सुधारलें पूर्वींच्यासारखीं दुष्ट कृत्यें त्याच्या हातून ती होऊं देत नसे सुलताना रझिया इच्याबद्दल इतिहासकाराने लिहिलेला अभिप्राय नूरजहानला लागू पडतो, तो असा कीं, 'तिच्या अंगीं राज्यकर्त्या पुरुषाला अवश्य ते सर्व गुण आहेत अत्यंत कसोशीने तिचें वर्तन तपासूं लागल्यास, ती जात्या बायको होती, या पलीकडे अन्य अवगुण तिच्यात मिळावयाचा नाहीं'

येथवर नूरजहानच्या चागुलपणाचें वर्णन झाले पण कसें झालें तरी ती बायको होती, आणि तिच्यात जबर महत्त्वाकाक्षा वसत असल्यामुळें जहांगीरच्या उतार वयात, पुढें तख्तावर कोणास बसवावें, याजबद्दल तिनें नानातऱ्हेच्या भानगडी व उलाढाली उपस्थित केल्या तेणेंकरून सर्व राज्यात बखेडे उत्पन्न झाले त्या प्रसंगाच्या नूरजहानच्या वर्तनाचा राज्यातील इतर पुरुषाशीं विशेष संबंध असल्यामुळे, ती हकीकत पुढें येईल

(५) **दक्षिणेंतील भानगडी**—अकबर बादशहानें अहमदनगराबर स्वारी केल्यानंतर खानखानान नामक सरदाराची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक झाली होती **मीर्झा अब्दुर्रहीम खानखानान** हा बहरामखानाचा मुलगा दक्षिणच्या कारभारावर होता त्याच्या हातून दक्षिणचा बंदोबस्त योग्य प्रकारे होईना, म्हणून महाबतखान व खानजहान लोदी याम तिकडे पाठवून खानखानान यास जहागीरनें परत बोलाविलें पुढें त्याम निरनिराळ्या ठिकाणीं काम देऊन पुन. दक्षिणेंत पाठविलें शहाजहाननें बापाच्या विरुद्ध बंड केले, त्यात ह्याचें अंग होतें खानखानान १६२६ त लाहोर येथें मरण पावला जहागीरच्या वेळेस खानखानानची बडेजाव विशेष नव्हता प्रसंग पडेल तसा तो वागणारा असल्यामुळें त्याजवर कोणाचा भरंवसा नसे तीस वर्षें तो दक्षिणेंत होता, परंतु शत्रूस सामील

होऊन, त्यानें मोगल बादशहांची कामगिरी विश्वासानें बजाविली नाहीं. मलिकंबराची व त्याची उत्तम दोस्ती होती. ठिकठिकाणीं आपले हेर ठेवून हरएक व्यवहाराची बातमी ठेवण्यांत तो मोठा पटाईत होता. तो विद्वान् असून त्यास भाषाही पुष्कळ येत होत्या.

प्रसिद्ध मुत्सद्दी मलिकंबर अहमदनगरचा उद्धार करीत होता, त्याची हकीकत निजामशाहीचे भागांत दिली आहे, ती येथें संदर्भास घेतली पाहिजे. अंबरनें खानखानानचा पाडाव करून अहमदनगर परत घेतलें. खानखानान बऱ्हाणपुरास परत आला. उत्तरेकडे शहाजादा खुस्रू त्यानें केलेलें बंड मलिकंबरच्या पथ्यावर पडलें. खानखानान हा दक्षिणच्या राजांपासून लांच घेऊन स्वस्थ बसतो, असें जहांगीर यास वाटलें. त्यावरून खानजहान लोदी नामक दुसऱ्या सरदारास त्यानें दक्षिणचें आधिपत्य दिलें. ह्यापलीकडे दुसरी कांहीं तजवीज त्यानें तूर्त केली नाहीं. पुढें सन १६१६ ह्या वर्षी शहाजादा खुर्रम् यास जहांगीर बादशहानें दक्षिण देश जिंकण्याकरितां पुनरपि पाठविलें, आणि आपण आपल्या सर्व इतमामासह स.१०-११-१६१६ रोजीं सुमुहूर्तानें अजमिराहून निघून मांडवगडपर्यंत त्याजबरोबर गेला. स्वतः बादशहा चालून आल्यामुळें लष्करास उत्तेजन आलें. खुर्रम् त्याने चांगलाच पराक्रम गाजविला. त्याच्या अंगीं युद्धचातुर्य विशेष आहे असें दिसून आलें. मलिकंबराचा पराभव होऊन अहमदनगर फिरून मोगलांस मिळालें. वरील प्रसंगीं दक्षिणेंतील मुसलमानांचे तंटे खुर्रम्च्या उपयोगीं पडले. मलिकंबर सुनी होता; विजापुर व गोवळकोंड्याचे सुलतान शियापंथी होते. त्यांनीं मलिकंबरास मदत केली नाहीं. जय प्राप्त झाल्यावर खुर्रम् मांडवगडास ता. १२-१०-१६१७ रोजीं जाऊन बापास भेटला. जहांगीरनें त्याचें स्वागत फारच प्रेमानें केलें, आणि त्यास 'शहाजहान' असें नांव दिलें. पुढें जहांगीर गुजराथेंत आला, आणि तो प्रांतही आपल्या मुलाच्या ताब्यांत देऊन आपण परत आग्ऱ्यास गेला, ( १६१८ ).

दक्षिणची ही व्यवस्था फार दिवस टिकली नाहीं. शहाजहान उत्तरेकडे गेला असतां मलिकंबरानें मोगल फौजेचा मोड करून, ( १६२० ), तो मांडवगडपर्यंत चालून गेला. तेव्हां पुनरपि शहाजहान दक्षिणेंत आला. ह्या प्रसंगीं त्यानें आपला भाऊ खुस्रू यास बरोबर आणिलें. तिकडेच पुढें त्या हुशार राजपुत्राचा शेवट झाला हें वर सांगितलेंच आहे. शहाजहाननें मलिकंबरचा

बंदोबस्त करून बराच मुलूख परत मिळविला परंतु लवकरच दरबारात घोटाळे उत्पन्न झाल्यामुळें, अहमदनगरचा बंदोबस्त तितकाच सोडून त्यास दरबारीं परत यावें लागलें (१६२२)

६. जहांगीर बादशहा आणि इंग्रज लोक (अ) कॅप्टिन हॉकिन्स – सोळाव्या शतकाच्या अखेरीस पूर्वेकडील राज्याविषयीं कांहीं चमत्कारिक बातम्या इंग्लंडांत उठल्या होत्या हिंदुस्तान म्हणून एक देश आहे तेथें कोणी विलक्षण पराक्रमी राजा उत्पन्न होऊन सर्व देशावर राज्य करूं लागला आहे त्याच्याइतका शहाणा पुरुष क्वचित्‌च जन्मास येतो सर्व धर्मांवर त्याची अनुपमेय समान दृष्टि आहे स्त्रियाची सुद्धा येथें वाहवा होते इंग्लंडात त्या वेळी धर्मासंबंधीं जुलूम अत्यंत दु सह झाले असल्यामुळ, पूर्वेकडील ह्या विलक्षण कहाण्यानीं लोकाचे चित्त वेधून गेले अशा राजास एकदा तरी पाहवा, अशी लोकास इच्छा उत्पन्न झाली येथें आल्यावर प्रवाश्यास जे देखावे दृष्टीस पडले, त्यानीं ते थक्क होऊन गेले हिदुस्तानचे लोक हरएक बाबतींत सुधारलेले आहेत, राज्य-कारभारपद्धति त्यास चागली साधली आहे, त्याच्या कित्येक गोष्टी फ्रान्सच्या चौदाव्या लुईने सुद्धा अनुकरण करण्यासारख्या आहेत, अशी त्या प्रवाश्याची खात्री झाली. विशेषत इकडचे लोक रानटी व अज्ञानी असतील, हा त्याचा भ्रम दूर होऊन, इकडे धर्म, भाषा, काव्य, कला, इत्यादिकाची विलक्षण उन्नति झालेली त्यांच्या दृष्टीस पडली

अकबर बादशहानें हिंदुस्तानात भक्कम पायावर स्थापिलेले हें राज्य हस्त-गत करून घेणारा शत्रु त्याच्याच कारकीर्दीत इंग्लंडात उत्पन्न झाला होता, हे त्याच्या स्वप्नींही नसेल स १६०० ह्या वर्षी इंग्लंडात प्रसिद्ध राणी एलिझा-बेथ राज्य करीत असता, पूर्वेकडील देशाशीं व्यापार करण्याच्या निमित्तानें ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना होऊन, जहांगीरच्या वेळेस हिंदुस्तानात पोर्तुगीझ, डच, व इंग्रज अशीं तीन राष्ट्रें आपला व्यापार वाढविण्याच्या कामीं बादशहाची कृपा संपादण्याची खटपट करूं लागलीं पोर्तुगीझ लोक अगोदरच शंभर वर्षांपासून हिंदुस्तानात राहत होते. अकबराची त्याजवर कृपा होती. जहांगीरचाही लोभ त्यानीं संपादिला होता पूर्व समुद्रांतील बेटांत डच लोकांशीं इंग्रजांचा झगडा होऊन त्यानीं सुरतेस आपला तळ देण्याची

खटपट चालविली. सुरत हें फार दिवसांपासून व्यापाराचें ठाणे असून तेथें बंदराच्या सोयी उत्तम होत्या. स. १६०८ त कॅप्टिन हॉकिन्स हा हेक्टर नामक गलबतांतून सुरत बंदरीं आला. इंग्लंडचा राजा पहिला जेम्स याजकडून त्यानें जहांगीर बादशहास पत्र आणिलें होतें. मुकर्रबखान म्हणून त्या वेळेस गुजराथचा सुभेदार होता त्यास हेक्टर जहाजावरील तोफांची बरीच धास्ती वाटली. तो सुरतेस आला, आणि त्यानें हॉकिन्सपासून कांहीं जिन्नस खरेदी केले. सुरतेस पोर्तुगीझ लोक होतेच त्यांनीं मुकर्रबखानास पैसे भरून त्याजवळ इंग्रजांची व त्यांच्या राजाची पुष्कळ नालस्ती केली. ग्रेट ब्रिटन हें बेट अगदीं भिकार व तेथचा त्याचा राजा म्हणजे कोळी लोकांचा नायक होय, अशी त्यांनीं कागाळी केली. त्यांनीं हॉकिन्सचें एक गलबत पकडिलें, पण हेक्टरवर हल्ला करण्याची त्यांची छाती नव्हती. शेवटीं हिंदुस्तानांतील माल खरेदी करून तो हेक्टर जहाजावर भरून हॉकिन्सनें इंग्लंडास पाठविला. हेक्टर निघून जातांच मुकर्रबखान हॉकिन्सपासून घेतलेल्या मालाचे पैसे देईना पुढें आग्र्यापर्यंत सुरक्षित पोंचविण्यासाठीं स्वार व शिपाई बरोबर घेऊन हॉकिन्स बादशहाच्या भेटीस गेला.

जहांगीरच्या दरबारांत फारशी भाषा चालत असे पण हिंदुस्तानी तर सर्वांस समजे. शिवाय जहांगीर व त्याचे बहुतेक कामदार तुर्की भाषाही बोलत. त्याच तुर्की भाषेंत हॉकिन्सशीं बादशहा संभाषण करी. हॉकिन्सला तुर्की येत होतें. लवकरच हॉकिन्सवर जहांगीरची मर्जी बसली त्यानें त्याच्या मागण्या कबूल केल्या, आणि सुरतेस वखार घालण्याची परवानगी दिली. त्यांजवर कोणीं जुलूम करूं नये, व विनाकारण पैसे उपटूं नयेत, असें त्यानें फर्माविलें. हॉकिन्स यास त्यानें चारशें स्वारांची मनसब देऊं केली. त्या मनसबीचें सालाचें उत्पन्न अठ्ठेचाळीस हजार रुपये होतें. हें काम घेऊन आपल्याजवळील एका बाईला ख्रिस्ती करून तिच्याशीं हॉकिन्सनें लग्न लावावें असें बादशहानें सुचविलें. हॉकिन्सनें ती बाई न पत्करितां दुसऱ्या एका बाईशीं लग्न केलें: आणि स्वतः इंग्रजांच्या व्यापाराची वृद्धि करण्याकरितां तो आग्र्यास राहिला. दोन वर्षेपर्यंत सतत त्याचें वाड्यांत जाणें येणें असे. खुशालखान्यांत बादशहाबरोबर तो खानपानास जाई. त्या वेळीं युरोपाविषयीं अनेक प्रकारची माहिती त्यानें बादशहास दिली. हॉकिन्सनें मुकर्रबखानाच्या गैरवर्तनाचें बादशहाकडे गाऱ्हाणें

केलें त्या खानाविरुद्ध पुष्कळ कागाळ्या बादशहाच्या कानावर अगोदरच गेल्या होत्या त्याने लोकापासून पैसे उपटून जुलूम केले होते बादशहाकडे पाठविण्याकरितां म्हणून एका हिंदु स्त्रीस त्याने पकडिलें, आणि शेवटीं तिला स्वत पाशीच ठेवून घेतले. इत्यादि गोष्टी ऐकून बादशहाने त्यास आग्र्यास बोलाविले, आणि त्याजपासन होतं नव्हतं त सारें हिसकावून घेतले तथापि मुकर्रबखानानें पैसे वगैरे भरून आपली सुटका करून घेतली पुढं त्यास पहिले काम पुन मिळून तो गुजराथत आला, आणि तेथ हाकिन्सचा सूड घेण्याचा त्याने संकल्प केला इंग्रजाना व्यापार करण्याची बंदी केल्यास आपण गोव्याहून हिरेमाणकें आणवून देतो असें खानानें बादशहास कळविलें दुसरे अमीरही इंग्रजाविरुद्ध ओरड करूं लागले एक तर असं सुद्धा म्हणाला कीं इंग्रजाना हिंदुस्तानात पाऊल ठेवूं दिल्यास ते लवकरच सर्व देश बळकावून बसतील हें ऐकून जहांगीरची पाचांवर धारण बसली त्यानें पूर्वी दिलेलीं सर्व वचनें परत घेतलीं, आणि इंग्रजास हिंदुस्तानात व्यापार करण्याची मनाई केली तेव्हा सन १६११ मध्ये हॉकिन्स आपल्या बायकोसह आग्र्याहून निघून गेला येणेकरून दोन वर्षांचे त्याचे श्रम फुकट गेले हॉकिन्सच्या हातून पुढ काहीं महत्त्वाची कामे झालीं नाहींत. थोडीं वर्षं व्यापार करून परत जात असता तो ऐर्लंडनजीक समुद्रांत मरण पावला, आणि त्याच्या बायकोनें इंग्लडात दुसरं लग्न केले

मोगल बादशहाच्या वैभवाविषयीं नाना प्रकारच्या गोष्टी हॉकिन्सने स्वदेशच्या लोकास कळविल्या जहांगीरच्या राज्याचा वसूल पन्नास कोटि रुपये आहे, असें जेव्हा त्या लोकानीं ऐकिलें, तेव्हा ते अगदीं थक्क झाले इंग्लंड व स्कॉटलंडचा वसूल त्या वेळेस एक कोटि रुपये होता फ्रान्सचा पराक्रमी राजा चौदावा लुई ह्याच्या राज्याचा वसूल पाच कोटि होता ‘ जहांगीरचा स्वत चा व जनानखान्याचा दररोजचा खासगी खर्च ८० हजार रुपये आहे. वीस कोटि रुपये त्याच्या खजिन्यात नेहमीं शिल्लक असतात, हत्ती, घोडे, उंट, खेचरं, हरणे, ससाणे व गाणारे पक्षी वगैरे किती आहेत याची तर गणतीच नाहीं क्षणमात्रात ५० हजार लोकांची फौज जवळ येऊन उभी राहते, आठ दिवसाचा अवकाश दिला तर तीन लाख फौज गोळा होते एकंदर मनसबदार तीन हजार आहेत बादशहापुढे जाणाऱ्या प्रत्येक इसमास नजराणा करावा लागतो. नवरोजचा सण व बादशहाचा वाढदिवस आले, म्हणजे लोक सुंदर व

बहुमोल वस्तु बादशहास नजर करीत असतात.' इत्यादि गोष्टी ऐकून पाश्चात्यांचीं मनें चकित झालीं, त्यांत नवल नाहीं.

( आ ) **सर टामस रो**, (१५८०–१६४४).—हॉकिन्स गेल्यावर मोगलांच्या दरबारीं इंग्रजांचें वजन राहिलें नाहीं. तरी त्यांनीं सुरतेस पुष्कळ धामधूम केली. ते मोगल अधिकाऱ्यांस विचारीनातसे झाले. मक्का व सुरत यांजमधील मुसलमानांचा व्यापार त्यांनीं बंद केला. सर हेन्री मिडल्टन् नांवाचा एक चलाख इंग्रज व्यापारी सुरतेस आला, पण त्याला तेथें व्यापार करण्याची परवानगी मिळाली नाहीं, म्हणून तांबड्या समुद्रांत जाऊन मोचा येथें जात येत असलेलीं सर्व मुसलमानी गलबतें त्यानें अडविलीं, त्यांस आपला विलायती माल विकत घेण्यास भाग पाडिलें, आणि त्यांजवळचा सर्व माल सुरतेच्या भावानें त्यानें खरेदी केला. तेव्हां सुरतेच्या मोगल व्यापाऱ्यांस धास्ती पडून त्यांनीं इंग्रजांस सुरत येथें वखार घालूं दिली. हें पोर्तुगीझ लोकांस न आवडून त्यांनीं मोगलांस दोष दिला. त्यांची व इंग्रजांची सुरतच्या बंदरांत मोठी कडाक्याची लढाई होऊन पोर्तुगीझ पराभव पावले. आपल्या राज्यांत येऊन हे परस्थ लोक कां लढतात, याची मोगल अंमलदारांनीं चौकशी केली नाहीं. त्यांनीं आपला आब राखणें जरूर होतें. इंग्रजांस जय मिळतांच त्यांजबरोबर मोगल अधिकारी सलोख्यानें वागूं लागले.

अशा गोष्टी चालू असतां सर रो नांवाचा हुशार व नामांकित गृहस्थ ब्रिटिश राजाकडून जहांगीरकडे वकील म्हणून आला, ( १६१५ ). तो हॉकिन्सपेक्षां जास्त वजनदार होता. त्याचा जन्म सन १५८० त झाला असून, त्या वेळीं त्याचें वय ३५ वर्षांचें होतें. त्याजबरोबर सेक्रेटरी, उपाध्याय वगैरे बराच लवाजमा होता. त्यानें मोगल दरबाराचें केलेलें वर्णन फारच मनोरंजक आहे. तो मोठ्या थाटानें सुरत येथें उतरला. बंदरांतील इंग्रजांच्या जहाजांनीं त्यास ४८ तोफांची सलामी दिली. त्याचें स्वागत करण्याकरितां एक लष्करी टोळी ( गार्ड ) तयार ठेविली होती. एका उघड्या शामियान्यांत मोगल अधिकाऱ्यांनीं रोची भेट घेतली; पण लवकरच त्यांनीं त्याजबरोबर दांडगाई सुरू करून त्याच्या पेट्या वगैरे उघडिल्या. बादशहास देण्याकरितां आणिलेले नजराणे त्या पेट्यांत आहेत असें रोनें सांगितलें, तरी त्यांनीं तें मानिलें नाहीं. शहरांत उतरण्यास त्यास जागा व तंबू मिळाले. बऱ्हाणपुरास जाण्यास गाड्या

व पाहरा मिळण्यास एक महिना लागला बऱ्हाणपुर हे दक्षिणचे नाके होते सर्व बाजूंकडून तेथे रस्ते आले होते सुरतेहून बऱ्हाणपुरास उत्तम रस्ता केलेला होता बऱ्हाणपुरास पोंचण्यास रो यास पंधरा दिवस लागले रस्त्यावरील प्रदेश रुक्ष होता मातीच्या भिंतींचीं घरे बाधिलेलीं होतीं रोच्या पसंतीस एकही घर आले नाहीं रस्त्यात रामोशाची वगैरे भीति होती बऱ्हाणपुरास कोतवाल शहराबाहेर त्यास घेण्यास आला उतरण्यास दिलेला बंगला रो यास आवडला नाहीं, म्हणून तो आपल्या तंबूंतच राहिला बऱ्हाणपुरास दक्षिणच्या फौजेची छावणी असून तिजवर शहाजादा पर्वीझ मुख्य होता पर्वीझची व रोची भेट झाली त्याचा थाटही बादशहासारखाच होता तो उंच सज्जांत बसला असून आसनाच्या वर भरगची चादवा उभारला होता खालच्या बाजूस उमराव मंडळींकरिता एक भव्य चौरंग केला असून, त्याच्या सभोवतीं गजाचा कठडा होता बादशहापुढे जमिनीस लवून नमन करावें लागे रो तसे करण्यास खुर्षी नव्हता 'मी वकील आहें तुमचा नोकर नव्हे,' असें बोलून तो थेट पर्वीझपुढे गेला उमराव लोक त्याजपुढे हात जोडून उभे होते रोनें शहाजाद्यास लवून सलाम केला, तेव्हा पर्वीझने उलट सलाम केला रोने आपलें काम काय आहे तें कळविले शहाजाद्याने पुष्कळ प्रश्न विचारिले त्याचीं उत्तरें देण्यास रो सज्जा-पाशीं जाऊं लागला, परंतु सेक्रेटरीने त्यास पुढे जाऊं न देता सागितलें कीं 'इराणचा किंवा तुर्कस्तानचा शहा यास सुद्धा सज्जात जागा मिळायची नाहीं ' हे सर्व रो यास मुळींच आवडलें नाहीं तथापि पर्वीझचा स्वभाव गोड होता त्याने रोच्या मागण्या कबूल केल्या 'तुम्ही पाहिजे तर बऱ्हाणपुरास वखार घाला तुम्हांस आग्र्यास जाण्यास शिबंदी व गाड्या देतों,' असें त्यानें सांगितले रोनें आणिलेले नजराणे त्याने स्वीकारिले मद्याची एक पेटी पाहून तर त्याच्यां तोंडाला पाणी सुटलें. 'तुमच्याशीं कांहीं एकातात बोलावयाचं आहे,' असें रोला सांगून तो निघून आत गेला रोनें बाहेर बराच वेळ वाट पाहिली परंतु पर्वीझ मद्य-पानानें इतका गुंग झाला होता, कीं त्यास कोणी भेटण्याचीं सोय नव्हती शेवटीं रो वाड्यांतून निघून गेला

पुढें रो बऱ्हाणपुर सोडून निघाला. अजमिरास जाण्यास त्यास एक महिना लागला; त्या वेळीं त्यास ताप येत होता रस्त्यांत त्याने मांडवगड, चितोड इत्यादि प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं तारीख २३ डिसेंबर सन १६१५ रोजीं

अजमिरास पोंचला. जहांगीरचा मुक्काम त्या वेळीं अजमीर येथेंच होता. तारीख १० जानेवारी १६१६ रोजीं त्याची बादशहाशीं प्रथम मुलाकात झाली. त्यानें आपल्या भेटीचें इत्थंभूत वर्णन केलें आहे. तो बादशहापुढें जमिनीपर्यंत लवला नाहीं. तीन प्रकारच्या आसनांतून पुढें जातांना प्रत्येक ठिकाणीं त्यास मुजरा करावा लागला. शेवटीं प्रधानमंडळांत त्यास जागा मिळाली. जहांगीरचा दरबार त्यास लंडनच्या नाटकगृहासारखा वाटला. बादशहा उंच सज्जांत बसला असून खालीं कमी जास्तउंचीच्या चौरंगपीठांवर मंडळी बसली होती. जहांगीरनें ह्या इंग्रज वकिलाची मोठ्या आदरानें भेट घेतली. 'इंग्लंडचा राजा माझा भाऊ आहे,' असें त्यानें म्हटलें. जेम्सचें पत्र त्यानें मोठ्या कौतुकानें न्याहाळून पाहिलें. त्यासोबत फारशी भाषांतर होतेंच. एक बाजा, सुऱ्या, चाकू, एक भारी तलवार, एक कशिदा काढिलेला दुपट्टा, आणि एक बगी इतक्या वस्तू रोनें नजर करण्याकरितां आणिल्या होत्या, त्यांचा जहांगीरनें स्वीकार केला. रोबरोबरच्या एका इसमास तो बाजा वाजविण्यास बादशहानें सांगितलें. गाडी बाहेर होती, ती पाहण्यास त्यानें कांहीं लोक पाठविले. रोच्या तब्यतीविषयीं बादशहानें अनेक कुशल प्रश्न विचारिले, आणि ती बरी नाहीं असें ऐकून, फार दिलगिरी प्रदर्शित केली. 'माझे वैद्य तुम्हांस बरे करतील, बरे होईपर्यंत तुम्ही बाहेर पडूं नका, पाहिजे तें मोकळेपणानें मागत जा,' वगैरे सांगून त्यास बादशहानें निरोप दिला. ह्या मुलाखतीनें रो अत्यंत खुष होऊन गेला. इतक्या सन्मानानें बादशहा दुसऱ्या कोणास भेटत नसतो असें त्यास पुढें कळलें.

दरबार आटपल्यावर जहांगीरनें आपला पहिला थाट सोडून दिला. स्वतः जाऊन त्यानें गाडी पाहिली; आंत बसून त्यानें आपल्या नोकरास ती ओढण्यास लाविलें. नंतर त्यानें रोच्या नोकरांकडून दुपट्टा व तलवार इंग्रजी पद्धतीनें स्वतःच्या अंगावर पेहरविली. तलवार उपसून ती परजून पाहिली. 'ह्या वस्तू अगदीं भिकार आहेत, इंग्लंडच्या राजानें कांहीं तरी मोलवान् हिरे माणकें पाठविलीं पाहिजे होतीं,' असें तो पोर्तुगीझ धर्मगुरूंपाशीं बोलला. नंतर पुष्कळ दिवसपर्यंत व्यापाराच्या तडजोडीचें बोलणें चाललें. शहाजादा खुर्रम् ह्यानें त्या कामीं बरीच मेहनत घेतली. जमिनीवर इंग्रज व्यापाऱ्यांपासून जकात घेऊं नये, असें जहांगीरनें फर्माविलें. पण रो यास नुसतें फर्मान नको होतें. दोन राष्ट्रां-

मध्यें शिरस्त्याप्रमाणे कायमचा तहनामा जहांगीरनें सही केलेला त्यास पाहिजे होता, पण असा तह केल्यानें मोगल अधिकाऱ्याचे वर्तन नियंत्रित होईल, इंग्रजाच्या हातून थोड्याशा हलक्या किंमतीच्या नजराण्यापेक्षा त्यास ज्यास्त कांहीं प्राप्ति व्हावयाची नाहीं, आणि त्यांचे सर्व अधिकार जातील, ही गोष्ट रोच्या लक्षात आली नाहीं. मोगल दरबारची अशी चाल होती, कीं बादशहा जे जे शब्द बोले आणि जीं जीं कृत्ये करी तीं सर्व लिहून ठेवण्यात येत, म्हणून एकंदर दिवसाची सर्व कच्ची हकीकत पाहिजे त्यास पाहण्यास मिळे ती गुप्त ठेवण्यांत येत नसे ही बादशाही तवारीख पाहण्यास एक रुपया फी पडे. तो रुपया दिला म्हणजे अत्यंत गुप्त व महत्त्वाच्या गोष्टींचे व्यवहार पाहिजे त्यास कळत बादशहा मरण पावल्यावर त्याच्या कारकिर्दीचा इतिहास या तवारिखीवरून तयार केला जाई हा प्रकार रो यास फारच अनिष्ट वाटला. कांहींच गुप्त राहत नसे अशा प्रकारे दिवस काढीत असता, रो यास दरबारचा कटाळा आला. त्यातील नवेपणा निघून गेल्यावर कंटाळा येणें साहजिक आहे कामगार लोक रो यास वारंवार दाबूं लागले एकदा लोकांनी त्यास लाल कठड्याच्या आत येऊं दिले नाहीं बादशहाकडे तक्रार केल्यावर ती हरकत दूर झाली. एकदा उदेपुरच्या राण्याच्या मुलाची दरबारात मुलाकात झाली त्या राजपुत्रानें बादशहास तीन नमस्कार घातले, तेव्हां बादशहाने त्यास आपल्यानजीक सज्जात बोलावून त्याच्या मस्तकावर हात ठेवला हा प्रकार पाहून रोच्या मनात हेवा उत्पन्न झाला तरी आरंभी बादशहाची रोवर पुष्कळ मर्जी होती एकदा एका गुन्हेगारास बादशहाने रो याजकडे शिक्षा करण्यास पाठविलें, असें करणें म्हणजे बादशहाची मोठी मर्जी आहे असें समजलें जात असे रोनें त्या इसमास स्वतःजवळ नोकर म्हणून ठेवून घेतले

त्याच समयास रोनें जहांगीरास तह करून देण्याची विनंति केली तेव्हां लागलाच जिकडे तिकडे गवगवा झाला दरबारच्या मंडळीचा निश्चयच झाला होता, कीं तह करूं द्यावयाचा नाहीं जहांगीर रोची मागणी कबूल करील अशी त्यास भीति पडली खुर्रम व आसफखान यांनीं दुभाष्यास फितवून ठेविले बोलणें चालत असता ते त्यास खुणा करीत तथापि रोने आपलें म्हणणे बादशहापुढें स्पष्टपणे ठेविलें जहांगीर बोलला ' फर्मान आहे तेवढें पुरे ' रोनें लेखी तहनामा देण्याविषयीं आग्रह केला. जहांगीरने विचारिलें, 'इंग्रज

लोक मला जवाहीर देतील काय ?' रो बोलला, 'जेथें आपण बादशहा आहां त्या हिंदुस्तानांतच रत्नें होतातः आपलींच रत्नें पुनः आपणांस परत आणून देण्यांत अर्थ कोणता ?' जहांगीर पुढे कांहीं बोलला नाहीं. एका सरदाराचा पोर्तुगीझ लोकांकडे कल होता, तो बोलला, 'इंग्रज लोक तरवारी, सुऱ्या, कापड यांवांचून दुसरें कांहीं आणीत नाहींत; पोर्तुगीझ लोक रत्नें, पाच, हिरे वगैरे आणितात.' रोनें पुनः पुनः मागणी करून बादशहा, खुर्रम् व आसफ्खान या सर्वांस कंटाळा आणिला. शेवटीं बादशहानें तहनाम्याचा मसुदा तयार करण्याची रो यास आज्ञा केली. रोनें पडत्या फळाची आज्ञा समजून मसुदा तयार करून आणिला. त्या मसुद्यावरून रोची या कामीं किती योग्यता आहे हें दिसून येतें. मसुद्यांतील कलमें अशीं होतीं, कीं ग्रेट ब्रिटनचा राजा व हिंदुस्तानचा बादशहा यांजमध्यें कायमचा स्नेह असावा. इंग्रजांस वाटेल तेथें व्यापार करण्यास मोकळीक असावी. बादशहाकरितां आणिलेले नजराणे रस्त्यांत अंमलदारांनीं खोलून पाहूं नयेत. इंग्रजांनीं आणिलेला कोणताही माल बादशहाचें नांव सांगून जबरदस्तीनें घेतला जाऊं नये. आयात व निर्यात मालावर एकदां बंदरावर शेकडा ३॥ टक्के केवळ नांवाची जकात घ्यावी. मग दुसरे कोठेंही जकात घेण्यांत येऊं नये. इंग्रज व्यापारी मरण पावल्यावर त्याचा माल बादशहानें सरकारांत घेऊं नये. जे कामदार हीं कलमें पाळणार नाहींत त्यांस शिक्षा व्हावी. बादशहानें इतक्या गोष्टी केल्या, म्हणजे इंग्रजांनीं त्यास लागेल तो माल योग्य दरानें पुरवावा, आणि त्यांनीं बादशहाच्या शत्रूंचा पाडाव करण्यासाठीं त्यास मदत करावी.' हीं कलमें रो यास फारच सौम्य वाटलीं. त्यास त्यांत हरकत घेण्याजोगें कांहीं एक दिसले नाहीं. त्याजवर लागलेंच मोतब होईल असें त्यास वाटले होतें. परंतु कलमें सर्व राज्यांतील लहान मोठ्या कामदारांस जाचणारीं होतीं, हे रोच्या ध्यानांत आलें नव्हतें. नजराण्याच्या लोभानें बादशहानें कदाचित् तह कबूल केला असता, पण खुर्रम् व आसफ्खान अगदीं आडवे पडले.

मध्यंतरीं जहांगीरच्या मुलांत तंटे लागले. त्यांत नूरजहानचें अंग होतें. दरबारची कच्ची हकीकत रो ईस्ट इंडिया कंपनीस लिहून पाठवीत असे. 'आपण समुद्रकांठ सोडून फार आंत गेल्यास आपला निभाव लागणार नाहीं; सर्व हिंदुस्तानांत गडबड उडून जाईल, असा प्रसंग कदाचित् लवकरच येऊन ठेपेल

खुस्रूच्या प्रयत्नांस यश आल्यास, इंग्रजांचा फायदा होईल. क्रिस्ती लोकांवर त्याची भक्ति आहे, आणि तो त्यांस फारच चाहतो, म्हणून क्रिस्त्यांचे चांगले फावेल. पण शहाजादा खुर्रम् बादशहा झाल्यास सर्व पारडे फिरेल. इंग्रजांचा तो उच्छेद करील, क्रिस्ती लोकावर त्याची करडी नजर आहे. तो स्वभावानें अभिमानी, लबाड, जुलमी व प्रसंग पडेल तसा वागणारा आहे' इत्यादि गोष्टी रोनें आपल्या मालकास कळविल्या. रोचे म्हणणे कितपत बरोबर होते हे पुढील हकीकतींवरून व्यक्त झाले.

कांहीं दिवसानीं महंमद रेझा-बेग नांवाचा इराणचा एक वकील जहागीर-कडे आला. त्याचा लवाजमा मोठा होता. उंची हत्यारे घेतलेले पन्नास स्वार, चाळीस बंदूकवाले व दोनशे शिपाई इतके केवळ त्याच्या बंदोबस्ताकरिता होते. त्याने जहागीरची अशी काहीं स्तुति केली, कीं तिला सुमारच नाहीं. त्याने आणिलेले नजराणे पाहून तर रो यास लाजच वाटली. सत्तावीस मौल्य-वान् घोडे, नऊ मोठाली खेचरं, सात उंट भरून मखमल, एक सुंदर पेटी, चाळीस बंदुका, पांच घड्याळे, एका उंटाच्या ओझ्याचा भरजरीचा कपडा, सात रेशमी गालिचे, दोन रत्ने, एकवीस उंट भरतील इतके द्राक्षासव, चौदा उंटे गुलाबपाणी, सात रत्नखचित खंजीर, पाच तशाच तलवारी, आणि सात सुंदर आरसे, इतके सामान त्याने बादशहास नजर म्हणून आणिले होते. इराणचा वकील आल्यावर काहीं दिवसानीं बादशहाची स्वारी सर्व फौज बरोबर घेऊन माडवगडाकडे जाण्यास बाहेर निघाली. अजमीर सोडल्यावर चार महिन्यानीं बादशहा उज्जनीस पोंचला. इराणी वकिलाचा व रोचा स्नेह जडला कारण दोघा-सही मोगलाच्या धरसोडीचा तिरस्कार आला होता. इराणच्या वकिलाचे काम तडीस न जाता त्यास परत जावें लागले. बादशहाने इराणच्या शहास परत दिलेले नजराणे अगदींच हलके होते. महंमद रेझा-बेग हा इतका त्रासून गेला, कीं आसफ्खानाचा निरोप घेतल्याशिवाय आजाराचे निमित्त करून तो तसाच निघून गेला. त्याच संधीस खुर्रम व खुस्रु ह्या दोघाची भेट रोनें घेतली. खुस्रूस दरबारची माहिती काहीं नव्हती असें दिसलें.

मध्यंतरीं रो यास मोगलांचा फारच राग आला. इंग्लंडाहून काहीं नवीन नजराणे येत होते, त्यांच्या पेट्या रस्त्यांत कोणी अडविणार नाहीं, हें बादशहास कळल्यावर त्या त्याने उज्जनी येथें मागितल्या. पेट्या हातीं आल्याबरोबर त्या

जहांगीरनें स्वतः उघडिल्या आणि पाहिजे ते सामान त्यानें घेतलें. रोनें तक्रार केली, तेव्हां जहांगीर बोलला, 'तुमचें नुकसान भरून देऊं.' परंतु मद्यपानाचे नादांत तें काम तसेंच अर्धवट राहिलें. असें होता होता रो लोकांस अप्रिय होऊं लागला. त्याचें तह करण्याचें काम तर मागेंच पडलें. त्यानें कामदारां-विरुद्ध तक्रारी केल्या, त्यामुळें त्यास सर्वच शत्रु झाले. तो स्वतः हे जाणून होता. प्रांतोप्रांतांच्या सुभेदारांस व दुसऱ्या अंमलदारांस रोची भीति वाटण्याचें कारण असें होतें, कीं ते रयतेवर जुलूम करून पैसा काढीत; आणि सर्व जमिनी मक्त्यानें देत. हिंदूंचा तर ते विशेष छळ करीत, आणि त्यांनीं मोठमोठे दंड द्यावे म्हणून त्यांस उलटें टांगीत. या सर्व गोष्टी रो बादशहाच्या कानावर घाली; तेव्हां त्यास चहाडखोर असें समजून सर्व अधिकारी पाण्यांत पाहूं लागले. इतक्यांत एक प्रकार घडून आला, त्यामुळें इंग्रजांचा आशातंतु तुटला. प्राच्य लोकांविषयीं इंग्रजांच्या मनांत विलक्षण अनादरबुद्धि असून ती त्यांस झांकता येत नाहीं. कांहीं आरमारावरचे इंग्रज शिपाई बंदुका घेऊन सुरतेस उतरले. त्यांनी सहज गप्प ठोकिली, कीं आपण सुरतेचा किल्ला घेण्यास चाललों. या म्हणण्यांत कांहीं अर्थ नव्हता; पण तितक्यानेंच मोगलांची गाबरपट्टी उडाली. ती बातमी राज-धानीस कळविण्यात आली. सुरतच्या किल्ल्याची डागडुजी सुरू झाली. इंग्रज लोक गोवें घेणार व इंग्लंडांतून एक मोठें आरमार येत आहे, अशी वदंता उठली होती. रो केव्हां तरी नकळत पळून जाईल, असें बादशहास वाटलें. परंतु कालांतरानें या वदंता खोट्या आहेत. असें सर्वांच्या नजरेस आलें. दुसरी एक चमत्कारिक गोष्ट त्याच सुमारास घडली. जहांगीरची आई मक्केहून परत येत होती. इंग्रज चाच्यांनी तिचें गलबत पकडिलें. तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या गलबतांनीं त्या बाईस सोडविलें. ही बातमी समजतांच दरबारच्या लोकांनीं रोची वाहवा केली. ते असेंही बोलले, कीं इंग्लंडच्या राजानें आपल्या लोकांस चांचेपणाचा धंदा करूं द्यावा हे आश्चर्य आहे.

इतर उपाय हरले असें पाहून रोनें आसफखानास लाचादाखल एक मोठें मोती नजर केलें. त्याचा परिणाम लगेच झाला. आसफखान इंग्रजांशी गोडीनें वागूं लागला. तेव्हां बादशहाकडून द्यावयाच्या रकमा त्यास मिळाल्या. सर्व सरदार इंग्रजांचा माल घेण्यास उद्युक्त झाले. सर्व माल एकदम संपून गेला. आणखी तिप्पट असता तरी खपला असता. शेवटीं आसफखानाचा स्नेह कमी

होत चालला तरी इंग्रज व मोगल याजमध्ये स्नेहभाव होता. शेवटीं रोच्या हातून महत्त्वाचे काम कांहीं सुद्धा झाले नाही, आणि निरुपाय होऊन तो १६१८ त निघून स्वदेशीं गेला रोच्या वकिलातीची व्यापारसंबंधाची बाजू ब्रि रि प्रकरण ९, कलम ५-८ त्यात दिली आहे.

**७ अखेरच्या घालमेली, (१६२३–१६२७)**—सर टॉमस रो निघून गेल्यावर जहांगीर बादशहाने सात वर्षे राज्योपभोग घेतला पण एकंदरीत हे दिवस त्याला फार कष्टप्रद गेले त्याची तब्यत बिघडली, कीं पुढील राज्यव्यवस्थेबद्दल एकदम तंटे सुरू होत या तंटयात सामील होणारीं अनेक माणस होतीं बादशहाचे चार मुलगे, आणि त्याची खटपटी व पराक्रमी बायको नूरजहान ही त्यात मुख्य होतीं शिवाय महाबतखान वगैरे वजनदार सरदार मर्जीप्रमाण, आज एका पक्षास, तर उद्या दुसऱ्या पक्षास जाऊन मिळत. यापुढची कारकीर्दीची हकीकत म्हणजे या मंडळींने केलेल्या खटपटी होत सर्वांत वडील मुलगा खुस्रु बिचारा गरीब होता, त्याची गोष्ट मागे येऊन गेलीच आहे. आरंभापासून खुस्रु व पर्वीझ याचा पाडाव करण्याचे खुर्रमूचे बेत चालले होते पर्वीझच्या हातून दक्षिणचा बंदोबस्त होत नाहीं, असं त्याने बापाच्या मनात भरविले त्यास परत बोलावून सन १६१६त दक्षिणचे आधिपत्य बादशहान खुर्रम यास दिले, आणि पर्वीझ याजकडे बंगालचा कारभार सोपविला जहांगीरच्या मनात खानखानान यासही दक्षिणेतून परत बोलवावे असं होतें, परंतु तो बलाढ्य सरदार बंड करील तर आपणास जड जाईल अशा समजुतीनं कांहीं युक्ति करून त्याचा बंदोबस्त करण्याचा बादशहाचा विचार होता खानखानान यास एक पोषाख पाठवावयाचा आहे, असे बादशहाने त्या सरदाराच्या एका नातलग बाईस कळविले त्या वेळेस ती बाई रागाऊनच बोलली, 'हा पोषाख विषयुक्त असेल, तो खानखानान वापरणार नाहीं आजपर्यंत दोन वेळा तुम्हीं त्यास विष देण्याचा प्रयत्न केला, पण त्या धूर्त माणसास तुमचे कपट कळून आले' जहांगीरने तिची पुष्कळ खात्री केली, आणि 'मी स्वत तो पोषाख घालून दाखवितो' असेंहि सांगितले, तरी त्या बाईने त्याचे म्हणणे ऐकिले नाहीं. अखेरीस खानखानानचा बंदोबस्त करण्यास स्वत दक्षिणेस जाण्याचा बादशहानं विचार ठरविला. तो मांडवगडापर्यंत मोठ्या थाटानं गेला, हे मागे सांगितलेच आहे परंतु मांडवगडास पोंचल्यावर त्यास दुसऱ्याच भानगडींत पडावे लागले.

नूरजहानचा भाऊ आसफ्खान याची मुलगी मुम्ताज-महल ही शहाजहानास दिलेली होती. ह्या संबंधामुळें शहाजहानवर नूरजहानची मर्जी असून त्यासच पुढें बादशाही पद मिळावें अशी तिची आरंभीं खटपट चालू होती. परंतु शहाजहान आपल्या तंत्रानें वागणारा नाहीं असे पाहून, शेरखानापासून नूरजहानला झालेली एक मुलगी होती तीं खुस्रूस देऊन, त्याजला राज्य मिळवून देण्याचा विचार तिच्या मनांत आला. शहाजहान दक्षिणेंत गेल्यावर त्यानें खानखानानच्या नातीशीं लग्न करून त्या बलाढ्य सरदाराची दोस्ती संपादन केली. ही गोष्ट नूरजहानला वाईट वाटली. शहाजहान व खानखानान एक झाले म्हणजे त्यांजपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं, आणि आपले स्वतःचें महत्त्व ठेवावयाचें असल्यास, आपली मुलगी खुस्रूस दिली पाहिजे, असा विचार मनांत आणून तिनें खुस्रूस आपला बेत कळविला. खुस्रूच्या लग्नाची गोष्ट मागें आलीच आहे. त्याचे आपल्या बायकोवर उत्कृष्ट प्रेम होतें, म्हणून त्यानें सात्विकपणास जागून राज्यावर लाथ मारिली, आणि नूरजहानचें बोलणें झिडकारून लाविलें, तेव्हां नूरजहान विचारांत पडली. माण्डवगडाहून परत आल्यावर जहांगीर लाहोरास गेला. इतःपर लाहोर हेंच त्यानें आपलें मुख्य ठाणें केलें. उन्हाळ्याच्या दिवसांत तो काश्मिरात जाई. व्यसनासक्त झाल्यामुळें त्याच्यांत फारसें त्राण राहिलें नव्हतें. तो केवळ नूरजहानच्या मुठींत राहून कसे तरी दिवस लोटीत होता. त्याच्या सर्व पुत्रांत शहाजहानच काय तो धूर्त असून पाहिजे ती खटपट करून राज्य मिळविण्यास झटत होता. खुस्रूनें लग्न करण्याचें नाकबूल केल्याबर सर्वांत धाकटा पुत्र शहर्यार यास नूरजहाननें आपली मुलगी देण्याची व जहांगिरच्या पश्चात् त्याजकडेच राज्य चालविण्याची खटपट सुरू केली. त्यामुळें अर्थात् इतर तीनही शहाजाद्यांशीं ती वांकडी झाली. तिघांचाही नाश करण्याचा तिनें घाट घातला. जहांगीर आतां फार दिवस वांचत नाहीं हें तिला कळत होतें. इकडे तिचा भाऊ आसफ्खान शहाजहानचा सासरा असल्यामुळें त्या बहीणभावांचे हेतु भिन्न होऊन त्यांचेंही वांकडें आलें. आसफ्खानानें शहाजहानच्या वतीनें खटपट सुरू केली. मुख्य चढाओढ फक्त नूरजहान व शहाजहान यांजमध्यें होती. कारण, दोघेंही पाणीदार व अधिकारलोलुप असल्यानें त्यांचें एकत्र नांदणें शक्य नव्हतें.

ह्या भांडणांत महाबतखान व खानखानान हे सामील झाले खानखानाननें दक्षिणेंत अनेक अनन्वित कृत्यें केलीं होतीं त्यानें शहाजहानचा पक्ष उचलिला. महाबतखान हा जातीचा रजपूत होता त्याच्या हाताखालीं उत्तम रजपूत फौज होती केवढेही प्रसंग आले तरी जहांगीरशीं राजनिष्ठ राहून त्यानें आपला रजपुती बाणा सोडिला नाहीं खुस्रू हा उभय पक्षाच्या आड येत असल्यामुळें शहाजहान त्यास दक्षिणेंत घेऊन गेला तेव्हां त्यास कोणी हरकत केली नाहीं तिकडे त्याचा स १६२१ च्या डिसेंबरांत खून झाला हे मागें आलेंच आहे जहांगीरची तब्यत विशेष बिघडली होती, ती बरी झाली व त्यास खुस्रूच्या मृत्यूची वार्ता कळली, तेव्हां खुस्रूचा मुलगा बुलकी यास जवळ आणून त्यानें त्यास गादीचा हक्कदार नेमिलें, हे पाहून नूरजहान अस्वस्थ झाली बुलकी एकटा आहे, त्याचा समाचार सहज घेता येईल, प्रस्तुत शहाजहानचा बंदोबस्त करावा, असा तिचा मानस होता शहाजहानला दक्षिणेंतून काढण्याची तिनं एक युक्ति केली इराणच्या शहानें कंदाहार काबीज केलें होतें (१६२१), तें जाऊन परत घेण्याचा बादशहाकडून तिनें शहाजहानास हुकूम पाठविला शहाजहाननें कळविलें, कीं 'दक्षिणेंत बंडें फार आहेत, तर ह्या संधीस मला येता येत नाहीं ' तेव्हां नूरजहाननें दुसराच बेत करून कंदाहार परत घेण्याचें काम शहर्यार यास दिलें शहाजहानच्या हाताखालच्या मोठमोठ्या सरदारास आपल्या फौजा घेऊन शहर्यार यास मिळण्याचा हुकूम झाला, तेव्हां शहाजहान निकरावर आला स १६२२ च्या पावसाळ्यांत तो मांडवगडास येऊन राहिला, पण त्यास नूरजहानशीं लढाई करितां येईना आसफखानाचें त्यास आतून साह्य होतेंच त्यानें एक भयंकर युक्ति योजिली ती तडीस गेली असती, तर शहाजहानास सगळे सरदार येऊन मिळाले असते अलीकडे बादशहाचें ठाणें लाहोरास होतें, परंतु बादशाही खजिना आग्र्यास होता, तो उठवून लाहोरास न्यावा असें आसफखानानें बादशहास सुचविलें खजिना बाहेर काढिला, म्हणजे शहाजहाननें एकदम येऊन तो काबीज करावा असा तो घाट होता शहाजहान लोभी व महत्त्वाकांक्षी होता प्रत्यक्ष बापाची चोरी करण्यास तो मागेंपुढें पाहाणारा नव्हता त्यास ही युक्ति पसंत पडून तीप्रमाणें वागण्याचा त्याचा निश्चय झाला

आसफखानानें तिजोरी उठविण्याबद्दल बादशहाचा हुकूम आग्र्याच्या

खजिनदारास आणून पोंचविला. त्यास तो हुकूम चमत्कारिक भासला. विनाकारण खर्च होऊन, दगा होण्याचा संभव आहे असें त्यानें परत कळविलें. पण आसफखानानें ती सबब ऐकिली नाहीं. उंट भरून खजिना बाहेर पडणार, इतक्यात शहाजहान त्वरा करून दक्षिणेंतून येत आहे, ही वार्ता खजिनदारास समजली, तेव्हां एकदम त्याच्या डोळ्यांत उजेड पडला. त्यानें क्षणांत सर्व घाट ताडिला, व उंटावरून खजिना उतरून तो परत किल्ल्यांत भरिला. शहाजहाननें आग्र्याचा किल्ला काबीज करण्याचे होते तेवढे प्रयत्न केले, पण ते सिद्धीस गेले नाहींत. इतक्यात जहांगीर लाहोर सोडून दिल्लीस येत आहे असें त्यास कळलें, तेव्हां बापाशींच युद्ध करण्याशिवाय दुसरा मार्ग त्यास उरला नव्हता. त्या कृत्यानें जहांगीरच्या डोळ्यातील झोप चांगलीच उडाली. खजिना लुटण्याची वार्ता आकाशांतल्या कुऱ्हाडीप्रमाणें त्याजवर येऊन आदळली. त्यानें सर्व बाजूंकडून फौजा मागविल्या. काबूलचा सुभेदार महाबतखान, बंगालचा कारभारी पर्वीझ् वगैरे सर्व त्यास येऊन मिळाले. आग्र्यानजीक यमुनेच्या कांठीं बिलोचपुरा येथें स. १६२३ च्या एप्रिलात बापलेकांची निकराची लढाई झाली. शहाजहानास जय मिळण्याचा योग आला होता. त्याचा मुख्य साह्यकर्ता रजपूत सरदार प्रसिद्ध रायरायन विक्रमजित यानें जाऊन जहांगीरास पकडिलें. पण त्यांत तोच मारला गेल्यामुळें त्याचे सर्व लोक पळाले, आणि शहाजहानलाही पळून जाण्याशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं. तो थोड्या स्वारांनिशीं निसटून मेवाडच्या डोंगरांत गेला. पुढें काही दिवसांनीं बापलेकांचा पुनः समेट झाला. शहाजहाननें धुळींत बापासमोर साष्टांग नमस्कार घातला, आणि पुनः असें दुष्कृत्य न करण्याची शपथ वाहिली. शेवटीं जहांगीरनें त्यास क्षमा केली. तथापि थोड्याच दिवसांत शहाजहाननें पुनः बंडाळी मांडिली. शहाजादा पर्वीझवर बादशहाची विशेष मर्जी होती. त्यानें महाबतखानास सेनापति केलें, तेव्हां पर्वीझचें वजन सहन न होऊन शहाजहाननें बंड केलें. खानखानान यास महाबतखानाचा हेवा वाटून तो शहाजहानास मिळाला. ते दोघे बऱ्हाणपुराकडे गेले. पर्वीझ् व महाबतखान यांनीं त्यांचा पाठलाग चालविला. इतक्यांत खानखानाननें शहाजहानास पकडून देऊन स्वतःचा बचाव करण्याचा विचार चालविला. पण हा बेत घडून येण्यापूर्वींच तो शहाजहानास समजून आला, आणि तो स्वराज्य सोडून दूर पळाला, तेव्हां खानखानान उघडपणें पर्वीझ्

यास जाऊन मिळाला शहाजहान कोणीकडे गेला, त्याचा पुष्कळ दिवस पत्ताच लागला नाहीं कित्येक महिन्यानीं तो एकदम बंगाल्यात प्रकट झाला बऱ्हाणपुराहून तो विजापुर गोवळकोंड्यावरून तेलगणातून ओढ्या प्रातात व तेथून बंगाल्यात गेला बरोबर बायको मुम्ताज महल् व तिघे मुलगे दारा, शुजा व औरंगजेब हे होते शहाजहानची चपळाई पाहून अलाउद्दीन व मलीक काफूर याच्या त्वरेची लोकास आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं बंगालची राजधानी डाका येथे तो एकाएकी आला, तेव्हा तेथील अधिकारी घाबरून काशीस पळून गेला शहाजहानने सर्व बंगाल प्रात उध्वस्त केला, व लोकाची संपत्ति हिरावून घेतली त्याने इतका छळ माडिला, कीं त्यास लोक चळचळा कापू लागले

पर्वीझ् व महाबतखान तयारींत होतेच ते दक्षिणेतून अलाहबादच्या रस्त्याने ते काशीस गेले तेथं एक लढाई होऊन शहाजहानचा पराजय झाला या प्रसंगीं रजपूत–मुसलमानाचे वाकडे होते, तेच शहाजहानच्या पराभवास कारण झाले रजपुताच्या पराक्रमामुळे शहाजहानास जय मिळण्याचा योग आला होता, इतक्यात त्याचे मुसलमान साथीदार अलिप्त राहिले त्यामुळे रजपुतास पाठबळ न राहून ते रणागण सोडून पळाले तेव्हा शहाजहान पुन नशिबाची परीक्षा पाहण्याकरिता चार हजार स्वारानिशीं दक्षिणेत गेला खानखानान, जाधवराव व उदाराम हे त्याचे साथीदार त्यास सोडन वादशहाचे नोकर बनले. तेव्हा नाइलाज म्हणून शहाजहानने बापास पत्र लिहून क्षमा मागितली. त्या पत्राचा जबाब मे १६२६ ला आला कीं, 'रोहटस व अशीरगड हे दोन किल्ले तुमचे ताब्यात आहेत ते आमच्या हवालीं करा, आणि दारा व औरंगजेब यास आमचे जवळ ओलीस पाठवा' या गोष्टी मान्य करून शहाजहानने हे दोन मुलगे लाहोरास पाठविले जून महिन्यात नूरजहानने त्यास आपल्या ताब्यात घेतले. पुढे शहाजहान बायकोस घेऊन नाशकास राहिला या वेळीं रजपूत व मुसलमान याच्या तंट्यानींच सर्व राज्याचा विध्वस व्हावयाचा होता अकबराने हे दोन पक्ष एकमेकावर दाब म्हणून मुद्दाम कायम राखिले होते त्याच्या वेळेस मुसलमानाचे अंग जहांगीरच्या पक्षास होते, आणि रजपूत लोक खुस्रूच्या पक्षास होते जहांगीर तख्तावर आल्यावर त्याने लष्करी ठरीव पद्धत म्हणून ठेविली नाहीं स्वत ची लहर किंवा नूरजहानचा दपटशा याच्या जोरावर कसा तरी कारभार चालला होता, तरी त्याचा कल मुसलमानाकडे

असे; पण खुस्रूच्या बंडानंतर तो रजपुतांकडेही कांहींसा वळला होता. त्यामुळें सैन्यांत दोन पक्ष होते. महाबतखान रजपूत असून खानखानान हा रजपुतांचा पाडाव करण्यास टपला होता. महाबतखानास हे कळून आल्यावर त्यानें खानखानान ह्यास अटकेत ठेविलें, तरी त्याने आपल्या खटपटी सोडिल्या नाहींत. त्यानें महाबतखान व पर्वीझ यांचे भांडण लाविलें. नूरजहान व आसफखान यांचे महाबतखानाच्या नाशाचे बेत चालू होतेच. ते सिद्धीस जाऊन त्या जरपूत सरदाराचे दिवस भरले जहांगीरने खानखानान यास लाहोरास पाठवून महाबतखानाचे सेनापतीचें काम काढून घेतलें, आणि त्याच्या जागीं खानजहान नामक दुसऱ्या एका अफगाण सरदाराची नेमणूक केली. या कृत्यावरून जहांगीरच्या राज्यकारभाराचें धोरण दिसून येतें. अकबरानें अफगाणांचा पाडाव करण्याकरितां रजपुतांस पुढें आणिलें. ह्या पद्धतीचे परिणाम पुढील कार्किर्दीत दिसून येतील.

महाबतखानाची कंबर खचली. जहांगिरास म्हातारचळ लागला असून खानखानान व नूरजहान ह्यांनीं आपला नाश केला हें त्याला माहीत होतें. तो आपल्या स्वतःच्या किल्ल्यांत जाऊन आपली राजनिष्ठा व्यक्त करण्याची संधि पाहत स्वस्थ बसला. पण नूरजहान एवढ्यानें निश्चिंत झाली नाहीं. तिनें त्यास ओढ्या प्रांतांत निघून जाण्याविषयीं आज्ञा केली. निराश होऊन त्यानें पांच हजार रजपूत जमा केले आणि लाहोरास जाऊन बादशहास भेटण्याचा निश्चय केला. आसफखान व नूरजहान ह्यांस त्याची प्रत्येक हालचाल कळत होती. त्यांना रजपुतांची भीति फार होती. महाबतखान बादशहाचें मन आपणांकडे वळवील असे त्यांस वाटत होतें, म्हणून जहांगीरकडून त्यांनीं महाबतखानास असें कळविलें, कीं ‘ तुम्हीं आपल्या अपराधाचा जबाब देण्यास एकटेच यावें, बरोबर फौज आणूं नये.’ महाबतखनास ह्यांतील इंगित कळलें. त्याचा एक जांवई तरुण व साहसी होता, त्यास त्यानें बादशहाकडे आपल्यातर्फे बोलणें करण्यास पाठविलें. जांवई आला ही गोष्ट नूरजहाननें बादशहास कळविली नाहीं, आणि मधल्यामध्यें हुकूम सोडून महाबतखानाचा सूड घेण्याचा विचार चालविला. महाबतखानाचा जांवई जेव्हां बादशहाच्या छावणीजवळ जाऊन पोंचला, तेव्हां तिने त्यास हत्तीवरून उतरवून वीर्योत्तेजक सर्व कपडे काढण्यास लाविलें आणि हलकट चिंध्या घालण्यास दिल्या. नंतर त्यास काठ्यांनीं

बडवून एका रोडक्या तट्टावर पृष्ठमुख बसविलें, आणि अशा रीतीनें फौजेतून त्याची धिंड काढिली हे वर्तमान ऐकून महाबतखानाचें पित्त खवळलें, पण त्याचें प्रसंगावधान गेलें नाहीं हे सर्व नूरजहानचेंच कृत्य होय, हे तो जाणून होता महाबतखानाचेंचसें काय, पण वरच्यासारख्या कृत्यांनीं बहुतेकांचीं मनें तिच्याविषयीं बिथरलीं हे इंगित जाणून त्याप्रमाणें महाबतखान वागत होता बादशाही फौज लाहोर सोडून काबुलास जात होती होड्याच्या पुलावरून झेलम नदी उतरून लोक पलीकडे चालले होते उजाडण्याचे सुमारास बहुतेक फौज, व सर्व सामानसुमान नदीपार होऊन जहांगीर बायकामुलांसह पलीकडच्या बाजूस निजला होता महाबतखान नजीक आहे, हे माहीत असताही आसफखानानें बादशहाचा बंदोबस्त बरोबर ठेविला नव्हता ही संधि साधून महाबतखानानें ताबडतोब येऊन आपल्या रजपूत लोकांनिशीं बादशहास वेढून आपल्या ताब्यात घेतलें त्या वेळीं जो घोटाळा उडाला, तो काहीं विचारूं नये दोनशें लोक बरोबर घेऊन महाबतखान बादशहाच्या तंबूंत शिरला एक नोकर बाहेर येऊन म्हणाला, 'काय महाबतखान, काय ही अमर्यादा ! तुमच्या धाडसास सीमा आहे काय ? जरा येथें थांबा, बादशहास हे वृत्त कळवून तुमची खोडच मोडितो !' ह्याच नोकरानें त्या वेळच्या घालमेलींची सुरेख हकीकत लिहून ठेविली आहे महाबतखानानें उत्तर केलें नाहीं त्याच्या नोकरांनीं फळ्याची पडदी फोडिली, तेव्हा बादशहा बाहेर येऊन बसला महाबतखान अदबीनें पुढें जाऊन बोलला, 'आसफखानाच्या तडाक्यातून सुटणें मला अशक्य झालें आहे माझी फजिती होऊन मरण येणार असें पाहून, नाइलाजास्तव असें धाडस व मर्यादोल्लंघन करून मी आपणास शरण आलों आहें मरणाची किंवा इतर शिक्षा मला देणें आपल्या मतें योग्य असेल, तर आपण तसें एकदम फर्मान करा ती मी आपल्यासमोर भोगावी इतकीच ह्या दासाची इच्छा आहे' बादशहास उत्तर देण्यास सवडच मिळाली नाहीं महाबतखानाचे लोक आत घुसले आणि बादशहा त्याच्या ताब्यात आला प्रथमत तो रागानें लाल झाला, पण क्षणार्धांत आपलें मन आवरून त्यानें पुढील सोंगाची बतावणी इतकी उत्तम सुरू केली, कीं त्यामुळेंच अंतीं त्याची सुटका झाली तो सर्वस्वी खानाच्या स्वाधीन झाला खानानेंही त्यास त्याच्या योग्यतेनुरूप वागविलें अंत करणातून तर बादशहास नूरजहानच्या जाचातून सुटल्याबद्दल समाधानच वाटलें कारण, त्यानें महाबतखानास तसें

बोलून सुद्धां दाखविलें. मद्य व अफीण यांच्या सेवनांत त्यास कशाचीही काळजी किंवा दुःख वाटत नव्हतें. परंतु नूरजहानची स्थिति मात्र जवळचें भक्ष्य दुसऱ्यानें हिसकून घेतलेल्या वाघिणीप्रमाणें झाली. ती नदी उतरून पलीकडे गेली. तिलासुद्धां एकदम पकडिले नाहीं, याजबद्दल महाबतखानास पुढें पश्चात्ताप झाला. खान बादशहास घेऊन शहर्यारच्या वाड्यांत जाऊन राहिला. नूरजहान नदी उतरून पलीकडे गेल्यावर तिनें आपले सर्व सरदार एकत्र जमवून त्यांजला उद्देशून भाषण केलें, कीं 'तुमच्या निष्काळजीपणानें व अव्यवस्थेनें असा प्रकार घडून आला. कोणाच्या ध्यानीं मनीं नाहीं अशी गोष्ट बनली; आतां तुम्हांला आपल्या वर्तनाची लज्जा वाटत नाहीं काय? हे नुकसान भरून काढण्यास तुम्हींच झटलें पाहिजे.' इकडे पूल मोडला, व उतारावर नदी उतरून बंडखोर खानाशीं लढाई करण्याचा त्या सरदारांनीं विचार केला. तो उतार वाईट होता, व सर्वच धांदल उडाली. वर सांगितलेला गृहस्थ म्हणतो, 'मीं नदीची एक शाखा उतरून दुसरीचे कांठीं नशीबाचे खेळ पहात उभा असतां, राणीचा कामदार येऊन बोलला, 'बेगमसाहेब विचारतात, ही वेळ उशीर किंवा हयगय करण्याची आहे काय? चला पुढें तडाख्यासरसे. वाट काय पाहतां?' राणीसुद्धां त्याच गर्दींत हजर होती. हत्तीवर बसून ती कशीबशी पलीकडच्या कांठावर गेली. तेथें रजपूत लोक तिला अडविण्याकरितां उभे होते. तिच्या हौद्यांत बसलेल्या दासीला एक बाण लागला, तो राणीनें ओढून काढितांना तिचें अंग रक्तानें भरून गेलें, तरी ती डगमगली नाहीं. ती स्वतः छातीची असून कुशल व अचूक नेम मारणारी बायको होती. तिनें स्वतः अनेक वाघ मारिले होते. वाघ मारण्याच्या तिच्या हौसेची जहांगीरनें आपल्या वर्णनांत फारच तारीफ केली आहे. तथापि ह्या प्रसंगीं तिचें कांहींच न चालतां फौजेसह पराभव पावून ती परत फिरली. रजपुतांनीं तिला नेऊन बंदींत ठेविलें. आसफ़खान पळून महाबतखानास जाऊन मिळाला., इकडे बादशहा महाबतखानाशीं फारच गोडीनें वागूं लागला. त्यानें त्याजवर इतकी मेहेरबानी दाखविली, कीं महाबतखानाचे मनांत बादशहाविषयीं मुळींच वहीम राहिला नाहीं. वास्तविकरीत्या नूरजहानचाच नाश करण्याचा त्याचा विचार होता. तिनें सर्व राज्यांत अंदाधुंदी माजविली होती. सर्व लोक तिजविरुद्ध ओरडत होते. तेव्हां सुटका करून

घेण्याचा शेवटचा उपाय तिने केला बादशहाला एकवार डोळ्यांनीं पाहण्याची तिने परवानगी मागितली, ती मोठ्या सकटाने महाबतखानाने दिली. भेट झाल्यावर तिने जहांगिरास आपणाकडे वळविले तिला बंदींतून मोकळे करण्याविषयीं बादशहाने महाबतखानाची विनंति केली त्याच्याने 'नाहीं' म्हणवेना त्याला वाटले, की बादशहा आपणाला आता कधीं सोडणार नाहीं कदाचित् बायकोचा जीव घेणे त्याला अप्रशस्त वाटले असेल, असे समजून तिला खानाने सोडून दिले मोकळी झाल्यावर नूरजहानने आपले बेत चालविले बादशहाचे बर्तन दिसण्यात तरी अगदीं साधे होते नरजहान जे जे बादशहाशी अंतस्थपणे बोले ते ते सर्व तो खानास कळवी. महाबतखानाचा जीव घेण्याचा तिचा विचार आहे हे सुद्धा बादशहाने त्यास कळविले तरी महाबतखान बेफिकीर राहिला. त्याचे कित्येक शूर साथीदार पडले होते नुरजहान त्याजविरुद्ध खटपट करीतच होती

रजपूत व मुसलमान ह्याजमधील दुफळी दिवसींदिवस वाढत चालली. म्हणून अफगाण व मोगल ह्याचा मिलाफ करून तिने त्यास रजपुताचा सूड घेण्यास प्रवृत्त केले, खरोखर मोगल सरदार ह्यात सामील होते कीं काय हा प्रश्नच आहे आपली सर्व फौज एके ठिकाणीं जमवून तिची पाहाणी करावी अशी युक्ति तिने बादशहाचे मार्फत अंमलात आणिली त्या प्रसंगीं तिने आपल्या पक्षाचे पुष्कळ लोक जमा केले सर्व फौज एकत्र जमली 'तुम्ही आपली रजपूत फौज घेऊन बाजूला रहा, नाहीं तर विनाकारण त्याची व मुसलमानाची झटापट होऊन रक्तपात होईल,' असे बादशहाने महाबतखानास कळविले त्या सरदाराने ती गोष्ट कबूल केली हा मोठा चमत्कार आहे शेवटी बादशहाजवळ थोडेच लोक राहिले फौजेची तपासणी करण्यास गेला असता राणीच्या स्वारानी बादशहास गराडा घालून त्याला आपले ताब्यात घेतले येणेप्रमाणे युक्तिमान् राणीच्या साह्याने बादशहा बंदींतून मुक्त झाला परंतु महाबतखानाच पारिपत्य त्यास एकदम करिता येण्याजोगे नव्हते शहाजहानला पकडून आणण्याची त्याला आज्ञा झाली, तसच आसफखानास सोडून देणे त्यास भाग पडले शहाजहानवर चालून जाण्यास प्रथम त्याने नाखुषी दर्शविली, पण नूरजहानने दरडावल्याबरोबर त्याच्याने नाहीं म्हणवेना तो दोन हजार लोकांनिशीं निघून आश्रयार्थ उदेपूरच्या राण्याकडे गेला. नूरजहानने राण्याकडून

त्यास परत मागितल्यामुळें तो दक्षिणेंत जाऊन बंडखोरीनें शहाजहानास मिळाला. त्याच संधीस शहाजादा पर्वीझ् मद्यातिरेकानें एकाएकीं मरण पावला, ( नोव्हेंबर स. १६२६ ), नाहीं तर महाबतखान त्यासच जाऊन मिळाला असता. पर्वीझ् यास शहाजहानने विषप्रयोग केला असेंही कित्येकांचें म्हणणें आहे.

जहांगीरच्या कारकिर्दीस २२ वें व वयास ६० वें वर्ष लागलें. नूरजहानच्या हातीं सर्व सत्ता होती. शहाजहानची फौज वाढत होती. महाबतखानानें बापास कैद केल्याचें वर्तमान ऐकून तो स. १६२६ च्या पावसाळ्यात नाशिक त्रिंबकवरून सैन्य जमवीत अजमीरपावेतों गेला. तेथें त्यास कांहींच पाठबळ मिळेना, तेव्हां जसलमीरवरून तो आजारी असतांच ठठ्ठा येथें गेला. तेथच्या किल्लेदाराने त्यास आश्रय दिला नाहीं. तेव्हा इराणकडे निघून जाण्याचा विचार करीत असतां पर्वीझ् मरण पावल्याची बातमी त्यास कळली. तेव्हा परत गुजराथेंतून बागलाणांत व तेथून तो नाशकास आला, आणि तेथें जड सामान ठेवून तो १६२७ चे आरंभीं जुन्नरास येऊन राहिला. येथेंच महाबतखानही येऊन त्यास सामिल झाला. जुन्नरास या दोघांचा मुक्काम स. १६२७ चे उणे-पुरें एक वर्ष होता. ( सनदापत्रें पृ. ७० ).

लाहोर येथें ता. ११ मार्च सन १६२७ रोजीं जहांगीरनें आपला बाविसावा नवरोजचा समारंभ केला, पण त्यात नेहमीचा थाट झाला नाहीं. त्याची तब्येत बरी नव्हती, म्हणून लगेच तो हवाफेर करण्यासाठीं काश्मिरास गेला. रस्त्याच्या श्रमानें तो ज्यास्तच थकला. आता आपले दिवस भरत आले, असें त्यास वाटूं लागलें. अन्नावरील वांछा उडाली. चाळीस वर्षें सेवन करीत असलेली अफूसुद्धा त्यास नकोशी झाली. एखाददुसरा मद्याचा प्याला असला की पुरे. बरोबर नूर-जहान होती. तसेंच मुलगा शहर्यार व नातु दावरबक्ष हेही बरोबर होते. या वेडसर शहर्यारला हाताशीं धरून, आपण राज्यकारभार करावा, अशी नूर-जहानची इच्छा होती. इतक्यांत दुर्दैवानें शहर्यारही आजारी पडला, आणि बापाची परवानगी घेऊन, लगेच काश्मिरांतून लाहोरास औषध घेण्याकरितां आला. बरोबर दावरबक्ष आला. त्याजवर देखरेख ठेवण्यास इरादतखान या नांवाच्या आपल्या एका भरंवशाच्या सरदारास नूरजहाननें सांगितलें. उन्हाळा संपल्यावर जहांगीर काश्मीर सोडून, परत येण्यास निघाला. रस्त्यांत त्यास

शिकारीची हुक्की येऊन, एका डोंगराच्या पायथ्याशीं शिकार करीत असता, एक शिकारी डोंगरावरून घसरून बादशहा उभा होता, त्या ठिकाणीं येऊन धाडकन् मरून पडला या य कश्चित गोष्टीचा परिणाम जहांगीरच्या दुर्बल मनावर विलक्षण झाला त्याला वाटे, 'मृत्युच, त्या माणसाच्या रूपाने मला नेण्यासाठीं आला आहे' त्या धास्तीनें तो अगदीं खंगला त्याचा दमा व खोकला अतिशय वाढला, आणि रस्त्यातच ता. २८ ऑक्टोबर रोजीं तो मरण पावला सहाव्या दिवशीं त्याचें शव लाहोरास येऊन पोंचलें आपल्या पश्चात बुलाकीनें तख्तावर बसावें असें त्यानें सांगितलें होतें

क्षणमात्रात नूरजहानची सत्ता गेली नवऱ्याच्या वृद्धापकाळामुळे तिला मिळत असलेला मान त्याच्या शरीरातील प्राणाबरोबरच नाहींसा झाला तिनें जरी अनेक खटपटी केल्या, तरी राज्यकारभाराचें धोरण तिच्यात नव्हतें. स्वार्थ व सूड यांच्या योगानें ती अगदीं अंध झाली होती शहर्यारयाचा पक्ष घेऊन, महाबतखानास तिनें शहाजहानकडे जाऊं दिलें ही मोठी चूक होय कदाचित तिचे कांहीं अंतस्थ हेतु असून ते इतिहासकारास समजण्याजोगे नसतील शहाजहान तिच्याविषयीं लुब्ध होता, असा अंदेश सर टॉमस् रो ह्यास होता. महाबतखानाच्या मुलावरही तिची प्रीति होती असें म्हणतात. पर्वीझ् व जहांगीर ह्यास विषप्रयोग केल्याचा आरोप कित्येकांनीं तिच्यावर घातला आहे जहांगीरच्या मृत्यूनें जिकडे तिकडे एकदम गडबड सुरू झाली शहाजहान बापाविरुद्ध बंड करून अवघड जागीं जुन्नरास लपून राहिला होता अगोदरच जहांगीरनें त्यास 'बदौलत' (दौलतीस नालायक) ठरविलें होतें शहर्यार लाहोरास होता आसफखान व इरादतखान हे दोघे प्रमुख सरदार जहांगीरजवळ हजर होते इरादतखान हा इराणातला एक सय्यद असून आसफखानाच्या वशिल्यानेच वाढला होता आसफ्‌ची मनापासून इच्छा, जावई शहाजहानास राज्य मिळावें अशी होता नूरजहानचा खटपटी स्वभाव आसफखानास न आवडून, ह्यापुढें तरी तिची खटपट चालूं द्यावयाची नाहीं, असा विचार ठरवून, जहांगीर मृत्यु पावताच त्यानें इरादतखानाशीं खलबत केलें लाहोर येथें शहर्यार एकदम बादशाही पद धारण करील, शहाजहानास दक्षिणेतून येण्यास निदान दोन महिन्याचा तरी अवधि पाहिजे, शहर्यारला एकदम कैद करावें, तर तेंही धोक्याचें होईल, अशा गोष्टी मनात आणून, तूर्त खुस्रूचा मुलगा

दावरबक्ष ऊर्फ बुलकी ह्याच्या नांवानें खुत्बा वाचवून, त्याजला त्यांनी बादशाही पद दिलें, आणि त्याच्या हुकमानें शहर्यार ह्यास अटकेंत ठेविलें. हा सर्व प्रकार त्यांनीं इतक्या तातडतोब केला, कीं नूरजहानला प्रथम त्याची वर्दीसुद्धां लागली नाहीं. वास्तविक दावरबक्षास देखील हें पसंत पडलें नाहीं. नूरजहाननें काहीं तरी खटपट केली असती, परंतु नवऱ्याचें शव टाकून तिला दूर जातां येईना, आणि मृतकामुळें ती अडकून पडल्यासारखी झाली. तिनें आसफ्खानास वारंवार भेटीस बोलाविलें, पण खान तिच्या भेटीला गेलाच नाहीं इकडे त्यानें बनारसीदास नावाचा एक भरंवशाचा मनुष्य आपली अंगठी देऊन, शहाजहानाकडे पाठविला, आणि त्यास तातडतोबीनें आग्र्यास बोलाविलें. लेखी पत्र असें त्यानें मुद्दामच दिलें नाहीं. पुढें जहांगीरचें प्रेत लाहोरास आलें. तेथें आसफखानानें नूरजहानवर जाप्ता ठेवून, तिला कोणी भेटूं नये, असा बंदोबस्त केला. इकडे दानियालचा मुलगा बायसंघर आसफखानास चुकवून, अगोदरच लाहोरास आला. त्यानें शहर्यार ह्यास मदत करून, त्याजकडून लाहोरचा किल्ला व खजिना ताब्यांत घेवविला, आणि दोघांनीं मिळून आसफ्खानावर चाल केली. लढाई होऊन, शहर्यारचा पराभव झाला: आणि तो जाऊन जनानखान्यात लपून बसला. पुढें त्यास व इतर सर्व राजपुत्रांस आसफखानानें कैदेंत ठेविलें. बायसंघर मात्र पळून अफगाणिस्तानात गेला.

बनारसीदास वीस दिवसांनीं शहाजहानकडे येऊन पोंचला. प्रथम त्यानें महाबतखानाची गाठ घेतली. मग दोघानीं जाऊन शहाजहानास झोपेंतून जागें केलें, आणि जहांगीरच्या मृत्यूचा व पुढील सर्व प्रकार त्यास कळविला. शहाजहानला दुःख तर झालेंच. पण विलंब न करिता सुमुहूर्त पाहून, त्यानें आग्र्याकडे कूच केलें. तो प्रथम अहंमदाबादेस गेला. तेथून सर्व राजपुत्रांस मारून टाकण्याविषयीं त्यानें आसफखानास हुकूम लिहून पाठविला. ता. २१ जानेवारी १६२८ रोजीं हा हुकूम खानास पोंचला, आणि २३ जानेवारीस लाहोर येथें आसफ्खानानें त्यास ठार मारिलें. येणेंप्रमाणें शहर्यार, खुस्रुचे मुलगे दावरबक्ष व गर्शास्प, आणि दानियालचे मुलगे तहमुरास व होशंग ह्या पांच दुर्दैवी राजपुत्राचा वध झाला. पुढें शहाजहान अहंमदाबाद सोडून अजमिरास आला. तेथें शेख चिस्तीच्या दर्ग्याचें त्यानें दर्शन घेतलें. तेथपासून हळूहळू बहुतेक सरदार त्यास येऊन मिळूं लागले. ता. २४ जानेवारी रोजीं शहाजहान आग्र्यास

पोंचला दुसऱ्या दिवशी आग्ऱ्याचा किल्लेदार कासिमखान ह्यानें किल्ला व खजिना शहाजहानचे हवाली केला त्याचदिवशीं शहरात शहाजहानच्या स्वारीची हत्तीवर मिरवणूक निघाली नवीन बादशहा पाहून लोकांनीं आपले डोळे तृप्त करून घेतले ता '' फेब्रुवारी रोजीं यथाविधि राज्यारोहणसमारंभ होऊन खुत्बा वाचण्यात आला मारलेल्या राजपुत्रांचीं शवें लाहोरच्या बागात पुरून शिरें शहाजहानकडे पाठविण्यात आलीं. एवंच बादशाही तख्त मिळविताना शहाजहानास स्वबाधवान्च्या रक्तरूपा कर्दमातून आक्रमण करावें लागलें

८ **जहांगीरची योग्यता**—'दुर्व्यसनें असूनही जहागीर साठ वर्षेपर्यंत जगला, ह्यावरून त्याची प्रकृति निकोप होती तो वेडा नव्हता तो अक्कलवान असून बापानें घालून दिलेलें वळण पुढे चालविण्याचें त्यास शहाणपण होतें युद्धाचें काम हातीं घेतलें म्हणजे मग तो ते झटून शेवटास नेई त्याचा मन क्षोभ झालेला नसला म्हणजे तो न्यायाचें कामही अगदी चोख करी' (लेन्पूल) अकबराच्या सुव्यवस्थेत ढवळाढवळ न केल्यामुळें जहागीर बादशहास पुष्कळ स्वास्थ्य मिळू शकलें त्याच्या अंगीं कित्येक चागले गुण होते, पण मद्यपानाच्या नादामुळें त्याच्या गुणाचा प्रकाश पडण्यास सवड मिळाली नाही, आणि दुर्गुण मात्र पदोपदीं व्यक्त झाले युद्धकलेत तो बराच प्रवीण होता. त्यास स्तुति आवडत असे छानछोकीची त्यास फार हौस होती अंगावर उंची पोषाख व जडजवाहीर घालून तो बहुधा बाहेर पडे खाण्यापिण्यात तर मुळीच नियम नव्हता. आत्मसंयमन म्हणजे काय व मर्यादेत राहून स्वतःचा बोज कसा राखावा, हे त्यास मुळींच कळत नव्हतें प्राण गेला तरी आपला शब्द बदलावयाचा नाहीं, असा आग्रह त्याच्या ठिकाणीं नव्हता आरंभीं त्याचा स्वभाव फार क्रूर होता, पण राज्याचें ओझें अंगावर पडल्यावर तो बराच निवळला त्याचा मोठा दुर्गुण म्हणजे मद्यपान होय ह्या मद्यपानाविषयीं त्यानें आत्मचरित्रात पुष्कळ मजकूर लिहिला आहे तो लिहितो, 'तेव्हापासून मीं मद्यपान करूं लागलो, दिवसेंदिवस ते वाढत गेलें. शेवटीं मी फार तीव्र मद्याचें सेवन करीं नऊ वर्षांच्या अवधींत मी दररोज वीस प्याले पिऊं लागलो, पैकीं चौदा दिवसास व सहा रात्रीं पीत असें शेवटीं माझ्या एका विश्वासु वैद्यानें ह्या व्यसनाबद्दल माझी चांगली कानउघाडणी केली त्याचा उपदेश फार चांगला होता सर्वांस जीव प्यारा आहे म्हणून मी आपली संवय कमी करून दर-

रोज सहा प्याले पीत असे; पंधरा वर्षांत त्यापेक्षां कमी जास्त कधीं प्यालों नाहीं.' मात्र कमी झालेल्या मद्याच्या बदल्यांत अफूचें सेवन तो करूं लागला. मद्यपानापासूनच त्याचे दोघे भाऊ मृत्युमुखीं पडले. स्वतः जहांगीर मद्य-सेवन करीत असे, तरी इतरांनीं तसें न करण्याबद्दल त्यानें सक्त नियम केले होते. एकदा ह्या नियमांचें उल्लंघन चमत्कारिक रीतीनें घडलें. इराणचा वकील आला होता, त्यास मेजवानी देण्यांत आली. त्या वेळेस बादशहानें जवळच्या सर्व मंडळींस दारू पिण्यास सांगितलें. दरबारबक्षीकडे सर्व व्यवस्था होती. त्यानें सर्वांचे प्याले दारूनें भरले. रीतीप्रमाणें दारू पिणाऱ्या सर्व मंडळींचीं नावें तवारिखींत नमूद झालीं. स्वतः बादशहा एवढा गुंग झाला होता, कीं आपण दारू पिण्याचा हुकूम दिला, हे त्याच्या ध्यानांत राहिलें नाहीं. दुसरे दिवशीं दरबारात कोणी एकानें आदल्या रात्रीं दारू प्याल्याचा उल्लेख केला. त्याबरोबर बादशहा रागानें लाल झाला. दारू पिण्याचा हुकूम कोणी दिला म्हणून त्यानें विचारलें. सर्वांनीं बक्षीचें नांव घेतलें. त्याबरोबर मागाहून गुन्हेगाराचीं नांवें वाचण्यांत आलीं, तेव्हां सर्वांस त्यानें आपणांसमोर उभे केले. कित्येकांस जबर दंड केले. कित्येकांस भरदरबारांत चाबकांनीं मारिलें. ह्या मारानें कित्येक अगदीं मरणोन्मुख होऊन पडले. तेव्हां जहांगीरनें लोकांकडून त्यास लाथांनीं तुडविलें. एक इसम तर भरदरबारात मरण पावला. बऱ्याच लोकांस तेथून उचलून न्यावें लागलें. इराणच्या वकिलास तो कांहीं बोलला नाहीं. गुन्हेगाराच्या तर्फेनें एक शब्दसुद्धां बोलण्याची कोणाची छाती नव्हती. ही गोष्ट मनास उद्वेग करणारी आहे खरी, पण तिजवरून बादशहाचा सद्धेतु व्यक्त होतो, यात संशय नाहीं. त्यानें आपल्या नाण्यांवर दारूच्या प्याल्याचें चित्र खोदविलेलें होतें.

अंगीं अनेक दुर्गुण असतांही त्याच्या ठिकाणीं कित्येक नांवाजण्याजोगे गुण होते. मनोनिग्रह नसल्यामुळें त्याचे दुर्गुण वाढले. विलास व लहर यांच्या अमलांत जें काय त्याच्या हातून घडे, त्याशिवाय जाणून बुजून तो वाईट कृत्य करीत नसे. 'न्यायशृंखला' नांवाची जी सोन्याची सांखळी त्यानें कारकिर्दीच्या आरंभींच तयार करविली होती, ती साठ फूट लांब असून तीस सोन्याच्या साठ घंटा होत्या. ती त्याच्या बसण्याच्या खोलीपर्यंत नेलेली होती. तिच्या योगानें सर्वांस वाटेल तेव्हां बादशहाची भेट घेतां येत असे. जहांगीरनें सर्व प्रकारच्या विद्येस चांगले उत्तेजन दिलें. दर रविवारीं तो गरिबांस दानधर्म

करीत असे शिल्पकला व इतर कसबे ह्याची त्यास आवड होती सृष्टिसौंदर्य, बाग-बगीचे, व फुलाचे ताटवे त्यास अत्यंत रमणीय वाटत एकाद्या सुंदर प्रदेशात त्याचें मन रमले, म्हणजे त्यास कशाचेच भान राहात नसे काश्मिरास जात असता त्याची फौज एकदा नदीकिनाऱ्यावरून चालली होती तेथे सुंदर व चित्र-विचित्र रंगाची फुलें अतोनात उगवलेली त्याच्या दृष्टीस पडली तो म्हणतो, 'मी आपल्या सर्व लोकास त्या फुलाचे गुच्छ करून आपापल्या पागोट्यात खोव-ण्यास सागितले, तेणेकरून एक नवीन चालता फुलबाग तयार झाला दुसऱ्या एका ठिकाणी इतकी सुंदर फुले उगवली होती, की त्यावरून दृष्टि परत फिरविण शक्य नव्हते हवाही उत्तम सुटली होती मी त्या वेळेस मद्य-प्राशन करून चैन केली हा प्रवास मला अत्यत सुखकर वाटला ' साराश, सृष्टिसौदर्यापासून मनास आल्हाद करून घेण्याचा मोगलाचा स्वभाव जहागीरच्या ठिकाणी उतरला होता 'काश्मीर देश फार आल्हाददायक आहे पावसाळ्यात व उन्हाळ्यात तेथील शोभा अप्रतिम असते मी तो देश प्रत्यक्ष पाहिला, तेव्हा मला वाटले होते त्यापेक्षा तो अतिशयच रमणीय दिसला काश्मिरात केशर विपुल उत्पन्न होते, तितके दुसरे कोठेही होत नाही केशराचे मळे दोन दोन मैल लाबीचे असून ते दुरून फारच शोभिवत दिसतात त्याचा वास इतका तीव्र असतो की, त्याने डोके दुखू लागते पण काश्मीरच्या लोकास हा विकार होत नाही जमिनीचा पृष्ठभाग गालिचा आथरल्याप्रमाणे सुंदर दिसतो '

जहागीर चागला शिकारी होता मर्दुमकीचे खेळ त्यास आवडत मित्राशी तो अत्यंत प्रेमभावाने वागे, पण त्याच्या स्वार्थासाठी तो रयतेच्या कल्याणात अंतर पाडीत नसे प्रोफेसर डॉसन त्यानें जहागीरच्या योग्यतेविषयी पुढील अभिप्राय दिला आहे 'जहागीरच्या आत्मचरित्रावरून त्याची योग्यता सामान्य नव्हती असे दिसते आपल्या अंगचे दुर्गुण व व्यंग त्याने स्पष्टपणें कबूल केली आहेत केवळ आत्मचरित्र वाचले म्हणजे त्याची बुद्धिमत्ता व योग्यता त्या-विषयी वाचणाराचा ग्रह फारच चागला होतो जवाहीर, फुले, कलाकौशल्य, सृष्टिशोभा याची त्यास फार आवड असून तो शिकार करण्यांत तरबेज होता मद्याच्या धुंदीत तो नसे तेव्हा न्याय व औदार्य हे गुण उत्तम प्रकारे व्यक्त करी परंतु गादीवर येण्यापूर्वी बाटलीच्या नादात त्याने अनेक क्रूर कृत्यें केल्याचा पुरावा आहे '

जहांगीरविषयीं ब्लॉकमनचा अभिप्राय पुढील आशयाचा आहे. 'जहांगीरची योग्यता ठरविणें विशेष कठीण नाहीं मी व माझें ह्या पलीकडचा विचार त्यास फारसा शिवला नाहीं. त्याने लिहविलेले आत्मचरित्र वाचिले असता, त्याचा मूर्ख व बालिश स्वभाव पदोपदीं दृष्टीस पडतो. त्याला भुरळ पाडून, त्याजवर छाप बसविणारा कोणी भेटला, कीं तो त्याच्या तंत्राने चाले. लहर हीच त्याची नीति. अंतःकारणात दयेचा पाझर होता. पण लहरी स्वभावामुळे तो पाझर बाहेर आला नाहीं. पुष्कळदा निःशस्त्र मनुष्याची व वाघाची कुस्ती लावून, तो मजा पाहत बसे. माणसांना हत्तीच्या पायांखालीं तुडवून, तो आपली करमणूक करून घेई. तथापि जुन्या नोकराना किंवा नातेवाइकांना त्यानें बिलकुल दुखविले नाहीं. शहाजहान व औरंगजेब ह्यांनी जसे एकूणएक नातेवाईक मारून टाकिले, तसा प्रकार जहांगीरनें केला नाहीं. प्रसंगविशेषीं तो दया दाखवी, परंतु आपल्या हातांत बरें वाईट करण्याची केवढी सत्ता आहे, हा विचार त्याच्या मनात कधीं आला नाहीं. एखादें चांगले काम मुद्धां तो भलत्याच उद्देशानें करी. गांवातले गरीब लोक जमवून आणून, त्यांस दानधर्म करी, पण तो कशाकरितां ? तर करमणूक होऊन वेळ जावा म्हणून, लोकाचें दुःख निवारण करण्याकरिता नव्हे ! अडचण आली म्हणजे देवास नवस वगैरे करण्यात वाटेल तेवढा उदार, पण पुढे ते नवस पाळील तर शपथ. त्याचें आत्मचरित्र अगदीं सोप्या भाषेंत लिहिलेले आहे: पण त्यात सर्व खानपानाच्या, शिकारीच्या आणि नेमणुकांच्या क्षुल्लक हकीकती भरलेल्या आहेत. एखादा उदात्त विचार किंवा स्वतःचा एखादा अनुभव ह्यापैकीं कोठें कांहीं सापडावयाचें नाहीं. एकाही विद्वानाचें किंवा सुंदर पुस्तकाचें नांव त्यांत नाहीं.त्याच्या थोरपणाचें निदर्शक असें एकही वाक्य त्यांत नाहीं. शिकारींत त्यानें सतराहजार प्राणी मारिले. त्याची नावनिशीवार यादी त्यानें दिली आहे.

' जहांगीरचा मद्यपानाचा नाद विलक्षण होता. शहाजहानचा वाढदिवस होता, त्या दिवशीं त्याचे वजन केल्यावर जहांगीर त्यास म्हणतो, ' बाबा, तूं अजून मद्यास कधीं स्पर्श केला नाहीं. तुला आतां मुले झालीं, म्हणून सणावारी वगैरे मद्य घेण्याची मी तुला परवानगी देतो. मी पंधरा वर्षांचा असताच दारू पिऊं लागलों. हळूहळू ही माझी चटक वाढून माझी प्रकृति बिघडली. हकीम हुमामनें मला सांगितले, हें व्यसन मीं सोडिलें नाहीं, तर मी लवकरच मरेन. तेव्हां-

पासून मी तें अगदीं मर्यादित ठेविलें आहे मी अफूचेंही सेवन करितो माझें वय हल्लीं शेचाळीस वर्षांचें आहे, आणि मला दररोज चौदा रती अफू लागते ह्या मद्यपानानें सर्व बादशाही कुटुंबाचा नाश झाला विशेषत जहांगीरच्या वेळेस बादशहानेंच त्यांत पुढाकार घेतल्यामुळें सर्व दरबार दारूबाज बनला जहांगीरनें केलेलीं त्याची वर्णनें ऐकून अंगावर रोमांच उभे राहतात हिंदु सरदारसुद्धां दारूबाज बनले अंबरचे भावसिंग, जगत्सिंग, महासिंग हे सर्व ह्या व्यसनाला बळी पडले थोर मंडळींच्या ह्या वर्तनाचा परिणाम सामान्य जनसमूहावरही पुष्कळ झाला प्रांतोप्रांतीं हें व्यसन आणि तदंगभूत गुन्हे व अनाचार अतोनात वाढले, त्यामुळें राज्यकारभारांतही घोटाळे माजले

जहांगिरास राज्यकारभारांत मन घालण्याची बिलकुल हौस नव्हती तो म्हणतो, 'कोणत्याही विषयाच्या बारीक तपशिलांत शिरणें बादशहास शोभत नाहीं ' उलट पक्षीं, शांतपणें बारीक तपशील समजून घेणें हेंच राजाच्या थोरपणाचें लक्षण होय, असें अकबर समजत होता जहांगीरच्या अंगीं नांव घेण्यासारखा एकही गुण नव्हता म्हणूनच त्याच्या कारकिर्दीत सार्वजनिक महत्त्वाची गोष्ट कांहींच घडली नाहीं अकबरानें रानटी लोकांस कामास लावण्याकरितां त्यांची एक पलटण बनविली, अशा प्रकारची जहांगीरची एकही गोष्ट नमूद करण्याजोगी नाहीं. अकबरानें सारखी तीस वर्षें खटपट करून शेंकडों वर्षें चालत आलेला उलमाचा व सदरचा अधिकार नाहींसा केला, आणि धर्मगुरूंचें थोतांड मोडिलें त्याचा पुढें उपयोग करून, धर्माच्या बाबतींत कायमची व्यवस्था करणें जरूर होतें, पण तशी कांहींएक गोष्ट जहांगीरनें केली नाहीं त्याच्या उलट युरोपियन लोकांनीं आपल्या धर्मसुधारणा किती नेटानें केल्या, तें इतिहास सांगतच आहे

स्वतःच्या धर्मसमजुतींसंबंधानेंही जहांगीर अगदीं बेफिकीर होता अकबरानें स्वतः विचार करून आपला कांहीं एक निश्चित पंथ ठरविला, पण जहांगीरला एवढा विचार करण्याची ताकदच नव्हती म्हणून लहर लागेल त्याप्रमाणें, क्षणांत हिंदु, तर क्षणांत पारशी, क्षणांत मुसलमान, तर क्षणांत ख्रिस्ती, अशी त्याची धरसोड चाले त्याजपाशीं सर्व कांहीं ढोंग चालत ढोंग हेंच त्याचें दैवत असें म्हटलें तरी चालेल ग्रहांवर त्याचा विश्वास होता ग्रहणाची किंवा ग्रहांच्या युतींची त्यास पराकाष्ठेची भीति वाटे अशा वेळीं तो जनानखान्यांत वगैरे कोठतरी अगदीं कोपऱ्यांत लपून बसे अकबराच्या वेळेपासून

ज्योतिपराय नावाचा एक हिंदु ज्योतिषी दरबारात नेहमी हजर असे. जहांगीरच्या वेळेस जो ज्योतिपराय होता, त्याचीं भविष्यें तंतोतंत उतरत. त्याजबद्दल सर्व दरबारास मोठा अचंबा वाटे. पण ज्योतिपरायास प्रश्न विचारल्याबरोबर जहांगीरच्या अंगात कापरें भरे. जहांगीरनें त्या ज्योतिष्याची एकदां सुवर्णतुलाही केली होती. आपण बादशहा आहों, म्हणून आपणास देव मुक्ति दिल्याशिवाय राहणारच नाहीं असा त्याचा समज होता. त्याच्या आत्मचरित्राच्या आरंभीं ईशवंदनाचें किंवा प्रस्तावनेचें नावसुद्धा नाहीं. महंमद पैगंबराचें नाव तर सर्व पुस्तकात कोठेंही नाहीं. कित्येक प्रसंगीं तर कोणत्याही मुसलमानास ते टाळता आले नसते.

'अकबरानें चालू केलेले हिंदु आचारविचार सलीमनेंही पुढे चालविले. दीपावलीपूजा, व गाईंना शृंगार घालून त्यांची मिरवणूक काढणें ह्या गोष्टी जहांगीर करी. शिवरात्रीच्या दिवशीं जोगी लोकास याज्ञान बोलावून त्याजबरोबर उपाहार करी. राखीबंधनविधि तो पाळीत असे. कारकिर्दीच्या आठव्या वर्षीं जहांगीरनें शिकंदरा येथें जाऊन बापाचें श्राद्ध केलें. कोणाही हिंदूला मुसलमान होण्याबद्दल जुलूम करूं नये, असें त्यानें फर्माविलें. हे सर्व प्रकार तो मनाची खात्री होऊन करीत होता असें नाहीं; तर केवळ लहरीखातर वेळ पडेल तसें तो आचरण करी. कारण, अनेक वेळा देवळें व मूर्ती फोडणें व पुजाऱ्यास ठार मारणें, इत्यादि क्रूर प्रकारही जहांगीरच्या हातून कधीं कधीं घडले आहेत. आपल्या मुली काफर हिंदूंना देणें त्यास बिलकुल पसंत नसे. पारशी धर्मातील कित्येक विधि जहांगीर पाळीत असे. अकबराच्या नातवंडापासून राजघराण्यातील सर्व मुलांचीं नावें पारशी चालीचीं ठेवण्यात येऊं लागलीं. महंमद ह्या नांवाचा किंवा पैगंबराच्या कुटुंबातील नावाचा अकबरास मोठा तिटकारा असे. सूर्य व अग्नि ह्या देवतास जहांगीर पूज्य मानी. परंतु अकबराचे विधि त्यानें मनापासून पाळिले नाहीत. एकंदरीत धर्मसंबंधातही जहांगीर अनिश्चित होता. त्यास स्वतःचें ठरीव मत म्हणून काहीं नव्हतेंच.' (Blochmann, Calcutta Review, 1869.)

**९. जहांगीरचा जीवनक्रम.**---जहांगीरचा रोजचा वर्तनक्रम अकबराच्यासारखाच होता. झरोका, दरबार, व धुशालखाना हे तीन मुख्य प्रकार कायमचे होते. बादशहास वारंवार लोकांच्या दृष्टीस पडावें लागे. तो जिवंत आहे अशी

लोकाची खात्री झाला नाहीं, तर बंड होण्याचा संभव असे दररोज सकाळी जहांगीरचें दर्शन घेण्याकरिता झरोक्यापुढील मैदानात लोकाचा गर्दी जमे दुपारीं लष्करी व इतर खेळ होत त्या सर्व गोष्टींत जहांगीर व अकबर ह्याजमध्ये भेद इतकाच होता, कीं जहांगीरचा स्वभाव क्रूर असल्यामुळे तो एकदम एखाद्यास ठार मारून टाकीत असे परंतु दुसऱ्याचा जीव घेणे म्हणजे अकबराच्या जिवावर येई हत्तीच्या पायाखालीं गुन्हेगार लोकास तुडवून जहांगीर मजा पाहात स्वस्थ बसे वाघाची व निःशस्त्र मनुष्याची झोंबी लावी व्यभिचार बंद करण्याकरिता अकबराने पुष्कळ इलाज केले जहांगीरच्या दरबारात गाणारणी व नाचणारणी याचा सुळसुळाट झाला अकबर शांत वृत्तीचा असून नेहमीं विद्वान् मंडळीच्या समागमात कालक्षेप करी जहांगीर हा मद्यपान, खुषमस्करी, व निरर्थक गप्पा ह्यात आपला वेळ घालवी अकबराच्या सभा रात्री वादविवादात निघून जात. जहांगीर आपल्या रात्रा विलासात घालवून पूर्ण धुंदीत आला म्हणजे बसल्या ठिकाणींच रात्रभर पडून राही हॉकिन्सने असे लिहिले आहे, कीं 'सकाळीं सूर्योदयाबरोबर उठून तो माळ घेऊन नामस्मरण करितो नंतर झरोक्याजवळ येऊन लोकास दर्शन देतो पुढील दोन तास तो निजतो निजून उठल्यावर भोजन करून नंतर जनानखान्यात वायकामध्ये बसतो पुन दुपारपासून तीन-चार वाजेपर्यंत झरोक्याजवळ येऊन तमाशे, खेळ वगैरे पाहात बसतो पुढे दरबारात जाऊन सिंहासनावर बसतो तेथें लहान थोर सर्व मंडळी हजर असते मोठमोठे लोक लाल कठड्याच्या चौरंगी पाटावर बसतात आणि इतर त्याच्या खालीं बसतात बादशहाच्या उजव्या बाजूस एक अधिकारी चाळीस लोक बरोबर घेऊन लोकास शिक्षा करण्याकरिता उभा असतो त्याचेजवळ दोऱ्या, कुऱ्हाडी, चाबूक वगैरे साहित्य असत दरबारात बादशहा सर्वांच्या फिर्यादी ऐकतो व इन्साफ करितो दरबार आटपल्यावर तो नमाज पढण्यास मशीदींत जातो नमाज आटोपल्यावर पुन भोजन होते त्याच वेळेस मद्यप्राशनास सुरुवात होते भोजनोत्तर घुशालखान्यात मंडळी जमते ह्या ठिकाणी तो मद्याचे पाच पेले ओकतो वैद्य त्याला जास्त पिऊ देत नाहींत नंतर तो झोंपी जातो आणि सर्व लोक घरोघर जातात दोन तास झाल्यावर रात्री एक वाजण्याच्या सुमारास नोकर त्यास जागे करून आणखी थोडेसे खावयास देतात ते आटोपल्यावर तो पुन रात्रभर निजून राहतो संध्याकाळच भोजन झाल्यावर तो फारसा शुद्धीवर असत

नाहीं. त्या वेळेसमुद्धा तो ज्या ज्या चेष्टा करितो, त्या सर्व दरबारलेखक तवारिखींत नमूद करितात. अगदीं क्षुल्लक व गुप्त गोष्टीसुद्धा ह्या तवारिखींत दाखल होतात.' वरील प्रकार घडत असताच सरकारी कामें बादशहा पाहात असे.

बादशहाचा वाढदिवस मोठ्या समारंभानें साजरा केला जात असे. सोन्याच्या मोठ्या ताजव्यात सहा वेळ बादशहाची तुला करण्यात येई. सोनें, चांदी, मोत्यें रेशमी कापड, धान्य, लोणी इत्यादि सहा पदार्थांनी त्याचें वजन केलें जाई, आणि त्या वस्तु गरीबास वाटून देत. जहांगीरच्या वजनाचा उल्लेख एकदा साडेसहाहजार तोळे व दुसऱ्या वेळीं नऊहजार तोळे, अशा प्रकारचा आढळतो. दुपारीं दरबारापुढें सर्व हत्ती समारंभानें बाहेर काढीत. हत्तीचे कळप असून प्रत्येकावर एक नायक हत्ती मुख्य असे. ह्या नायक हत्तीबरोबर चार नायिका हत्तिणी व आठ किंवा दहा दुसरे हत्ती असत. त्यांचें सर्व सामान सोन्याचांदीचें असून त्याजवर भरगच्ची निशाणें फडकत असत. अशा हत्तींच्या बारा टोळ्या बादशहास सलामी देऊन निघून जात. सर्वांतील मुख्य नायक हत्ती फारच सुंदर व बाधेसूद होता त्याच्या अंगावरील सामानास हिरेमाणकें जडवलेलीं होतीं इंग्रज वकील सर टॉमस रो यास हा हत्तीचा देखावा पाहून अत्यंत मौज वाटली. वाढदिवसाच्या सायंकाळीं मोठा खाना होत असे. अशा प्रसंगीं बादशहा आपल्या मंडळीस मद्यप्राशन करण्याची मोकळीक देई. मग खाण्यापिण्यात मंडळी अगदीं दंग होऊन जाई. बादशहा सोन्याचांदीच्या नाण्याचा गरीब लोकांवर एकसारखा वर्षाव करीत असे. सोन्याचांदीचे बदाम तो आपल्या सरदारमंडळींत फेंकी, त्या वेळेस ते वेंचून घेण्यासाठीं लोकांची मोठी धादल उडत असे.

सरदार लोकही बादशहास मेजवान्या करीत. तारीख ३१ मार्च सन १६१६ रोजीं आसफ़खानानें मेजवानी दिली वाड्यापासून आसफ़खानाचा बंगला एक मैल दूर होता, तेथपर्यंत सर्व रस्त्यावर रेशमी कपड्याची बिछाईत करण्यात आली होती. मेजवानी आणि पोशाक एवढ्याचा खर्च पंधरा लाख रुपये झाला. शिकारीविषयीं जहांगीरनें लिहिलें आहे, कीं 'मीं आपल्या हातानें एकंदर १७१६८ प्राणी मारिले: ह्यापैकीं ८६ वाघ, ९ रानडुकरें, १३७२ हरणें, व बाकीचे पक्षी होते. काबूलचा इतिहास समजण्यासाठीं मीं बाबरचें आत्मचरित्र वाचलें. त्यांतील चार भाग दुसऱ्याच्या हातचे होते ते मी स्वतः लिहून त्यात

घातले आणि शेवटीं तुर्की भाषेंत काही मजकर ज्यास्त वाढविला मी हिंदुस्थानात वाढलो होता, तरी तुर्की भाषा लिहिण्यावाचण्यात मी कमी नव्हतो' सन १६२१ त त्याने आपल्या नावाची प्रसिद्ध मोहोर पाडिली तिच्या एका बाजूस आठास दारूचा प्याला लाविलेल्या बादशहाचें चित्र असून, दुसऱ्या बाजूस सिहराशींत आलेला सूर्य काढिला आहे मुसलमान लोक नाण्यावरसुद्धा कधीं प्रतिमा काढावयाचे नाहींत, मद्य तर त्याच्या धर्मात वर्ज्य आहे त्या कारणामुळे या जहांगीरच्या नाण्यास महत्त्व आहे त्याच वर्षीं दुसरे नाणें पाडिल, त्यावर मद्याच्या प्याल्याऐवजीं बादशहाचे हातात पुस्तक आहे.

अशा प्रकारचें जहांगीर बादशहाचें चरित्र आहे प्राच्य आणि पाश्चात्य राजपुरुषांची तुलना करिताना उभयताचें स्थितिवैचित्र्य ध्यानात टेविलें पाहिजे पाश्चात्य ग्रंथकार जहांगीर यास जुलमी व विलासी बादशहा असें म्हणतात परंतु सीझर नावाचे जे रोमन बादशहा झाले, त्याहून जहांगीर ज्यास्त खुनशी, क्रूर किंवा जुलमी होता असें नाहीं म्हणून सीझराबद्दल पूज्यबुद्धि दाखविणारानीं जहांगिरास नावे टेवण्याची जरूर नाहीं ज्याच्या अंगीं इंग्रज गृहस्थाच्या अंगचे सर्व विशिष्ट गुण पूर्णपणें वास करीत होते, अशा सर टामस रोनें अनेक प्रसंगीं जहांगीरची तुलना तत्कालीन इंग्लंडच्या पहिल्या जेम्स राजाशीं केली आहे त्यात तो इंग्रज राजा, रो यासही विशेष चागला वाटलेला नाहीं व्हीलर म्हणतो, 'जहांगीरच्यासारखें लहरी व हट्टी वर्तन जेम्सच्या हातूनसुद्धा घडलें हें इतिहासज्ञास अवगत आहे' वास्तविकरीत्या पाश्चात्य आणि प्राच्य राजाची तुलनाच करिता येत नाहीं दोहोंमध्ये अत्यंत स्थितिवैचित्र्य आहे जहांगीर कितीही वाईट, अप्रबुद्ध व क्रूर असला, तरी पहिल्या जेम्सपेक्षा तो जास्त तिरस्कारार्ह नाहीं त्याची राणी नूरजहान व इंग्लंडची राणी एलिझाबेथ ह्या दोघींच्याही कर्तृत्वशक्तींत पुष्कळ साम्य आहे पहिलीचे हेतु तडीस गेले नाहींत, व दुसरीचे तडीस गेले इतकाच भेद नूरजहानच्या तोडीची दुसरी समकालीन स्त्री जगाच्या इतिहासात सापडत नाही तिच्याशीं तुलना करण्याचें मनात आणण्यासमुद्धा एलिझाबेथकडेच गेलें पाहिजे नूरजहानच्या वेळेस सर्व आशियातच काय पण सर्व पृथ्वीमध्येसुद्धा ती स्त्री महान् होती ह्यात संशय नाहीं.'

१० **जहांगीरची धर्मसंबंधीं मतें.**—जहांगीर बादशहा बाह्यत मुसल-

मानी धर्मावर आपली निष्ठा दाखवीत असे. पण वस्तुत. त्याची मतें पुष्कळ भिन्न होतीं. पूर्वी लोकास खुष करण्याकरिता अकबरानें स्थापिलेल्या धर्माबद्दल त्यानें आपला तिरस्कार व्यक्त केला, आणि त्याच सबबीवर त्यानें बापाविरुद्ध बंड करून विद्वान् अबुल फज्लचा खून केला. 'इस्लामाचें तारण करीन' अशी त्यानें प्रथम शपथ घेतली, तेव्हाच त्यास बादशाही तख्त प्राप्त झालें. अकबराचा ओढा रजपुतांकडे होता, त्याप्रमाणें जहांगीरचा ओढा मुसलमानाकडे होता. असें होतें, तरी त्याचा नेहमीचा वर्तनक्रम इस्लामाशीं विरुद्ध होता. डुकराचें मांस, मद्यप्राशन, पुरुष, बायका व जनावरें ह्यांचीं चित्रें व प्रतिमा इत्यादि इस्लामविरोधी विषयावर त्याची विशेष आसक्ति होती. तो रोजे म्हणजे मुसलमानी उपास पाळीत नसे. बऱ्याच प्रसंगीं त्याची किरती धर्माविषयीं आवड दिसून येत असे. बाह्य वर्तनात त्याची श्रद्धा किरती धर्मावर अकबरापेक्षांही ज्यास्त दिसून येई. पोर्तुगीझ लोकांनीं वाटेल तेथें आपलीं मंदिरें बांधावीं, शाळा घालाव्या, पाहिजे त्यास किस्ती करावें, अशी त्यास जहांगीरनें मोकळीक दिली. आपला भाऊ दानियाल याच्या मुलास त्यानें किस्ती धर्म शिकण्यास पाठविलें. किस्ती पाद्र्यांचे उपदेश तो इतके ऐके, कीं हा किरतीच झाला असें त्यास वाटे.

ह्या कामीं जी मर्यादा अकबरानें उल्लंघिली नाही, ती जहांगीरनें ओलांडिली. त्याचे पुतणे किस्ती झाले. त्या प्रसंगी हत्तीवर बसवून त्यास त्यानें शहरात मिरविलें. ह्या त्याच्या कृत्यानें सर्व लोक चकित झाले. परंतु त्याची किस्ती धर्माकडे इतकी प्रवृत्ति कां, हे पुढे कळून आलें. किस्ती धर्मात उपवास करावे लागत नाहीत, डुकराचें मांस आणि मद्य हीं वर्ज्य नाहींत. ह्या गोष्टी जहांगिरास आवडत होत्या. त्याचे पुतणे किस्ती झाले, ते केवळ पोर्तुगीझ बायका मिळविण्याच्या उद्देशानें झाले. जहांगीरनेंही आपल्या जनानखान्याकरिता पोर्तुगीझ बायका मागण्यास आपल्या पुतण्यांस सांगितलें होतें. ही मागणी ऐकून ते पाद्री चिडून गेले, आणि आपला हेतु सफल झाला नाही असें पाहून, त्या शहाजाद्यांनीं आपले क्रूस फेकून दिले आणि पुनरपि मुसलमानी धर्म स्वीकारिला.

ह्या गोष्टींवरून प्रसिद्ध इतिहासकार व्हीलर यानें एक चमत्कारिक सिद्धांत काढिला आहे. 'किस्ती धर्मात एकापेक्षां ज्यास्त बायका करितां येत नाहींत

म्हणूनच ख्रिस्त्याचे अव्याहत परिश्रम चालले असताही हिंदुस्थानातील लोक स्वधर्मत्याग करून ख्रिस्ती धर्मात शिरत नाहीत ते मुसलमान होतात, पण ख्रिस्ती होत नाहीत ' परकीयांनी आम्हाविषयीं असे तर्क बांधणे आश्चर्यकारक नाही धर्मत्याग करणे अशा सामाजिक फायद्यावर अवलंबून असते, तर इतर बाबतात वर्तनस्वातंत्र्य मिळविण्याच्या आशेने, एकच बायको करण्याची अडचण पत्करूनही, पुष्कळ लोक ख्रिस्ती झाले असते एकंदरीत धर्मांतराची कारणे पुष्कळ निराळी आहेत दिल्लीच्या राजपुत्रास ख्रिस्ती बायका मिळाल्या नसत्या असे नाही पण एकदा लग्न केल्यावर, ते फिरून मुसलमान होऊन आणखी बायका करणार नाहीत कशावरून ' त्या राजपुत्रास अस्सल गोऱ्या पोर्तुगीझ मुली पाहिजे होत्या जातिभ्रष्ट पोर्तुगीझ मुली मिळण्यास अडचण पडली नसती

जहांगीर बादशहाचा जप करण्याची जी माळ होती, तीस आठ पदर होते प्रत्येक पदरात मोत्याचे व हिरेमाणकाचे चारशे मणी होते त्या खोलींत तो प्रार्थना करीत बसे, तेथे येशू ख्रिस्त व मेरी याचे दगडी पुतळे ठेविलेले होते फारशी लोकाचा नवरोज सण जहांगीरच्या दरबारीं मोठ्या समारंभाने पाळला जाई त्या प्रसंगीं दरबारचा थाट विशेष भपक्याचा असे अकबराप्रमाणे कधीं कधीं धर्मसंबधीं वादविवाद जहांगीर करवीत असे पण अशा प्रसंगीं वादविवादापेक्षा मद्यपानातच बादशहाचे लक्ष विशेष असे आग्ऱ्यास जेसुईट पंथी ख्रिस्ती लोकाचे एक प्रार्थनामंदिर होते त्या ठिकाणी ख्रिस्ती धर्माचे शिक्षण लोकास देण्यात येई ह्या लोकास अकबराने करून दिलेल्या नेमणुका जहांगीरने चालविल्या इतकेच नाही तर त्याने अन्य मदतही त्यास पुष्कळ केली शहाजहानाने मात्र पुढे ख्रिस्ती लोकाचा छळ फार केला, आग्रा व लाहोर येथील मंदिरे नाहीशीं केलीं आणि त्याच्या नेमणुकाही बंद केल्या

एकंदरीत जहांगिरास धर्माची फारशी पर्वा नव्हती त्याच्या विलासास जेणेकरून व्यत्यय होईल असा धर्म त्यास नको होता एकदा त्याने सभा भरवून असा प्रश्न केला, कीं 'कोणत्या धर्मात खाण्यापिण्याविषयीं निर्बंध नाहीं ?' 'ख्रिस्ती धर्मात निर्बंध नाही,' असा जबाब मिळाल्यावर तो बोलला, 'तर मग आपणा सर्वांस ख्रिस्ती धर्म स्वीकारणे भाग आहे ' त्याचप्रमाणे हिंदूंच्या मुली आपण कराव्या, परंतु आपल्या त्यास देऊं नये असे त्याचे ठाम मत बनले होते

**११. जहांगीरची राज्यव्यवस्था.**—ह्या सदराखालींही विशेष मजकूर देता येण्याजोगा नाहीं. अकबराच्या पद्धतींत त्यानें विशेष फेरबदल केला नाहीं. अकबरानें अंतःकरण दयाळु असल्यामुळें सौम्य उपचारांनीं तो रयतेवर अंमल करीत असे. जहांगीराच्या स्वाभाविक क्रौर्यामुळें क्षुल्लक अपराध्यांस कित्येक वेळां कडक व तऱ्हेवाईक शिक्षा करण्यांत येत. एकदां त्यानें आपल्या एका पुतण्यास सिंहाच्या तोंडावर हात ठेवण्यास सांगितलें. त्यानें तसें केलें नाहीं, म्हणून त्यास जन्मभर अंधारकोठडींत कोंडून ठेविलें. नूरजहानच्या एका दासीनें कांहीं यत्किंचित चुकी केली, म्हणून त्यानें तिला जमिनींत गळ्यापर्यंत पुरलें. तेथें तीन दिवस व दोन रात्रीपर्यंत ती जगल्यास तिला माफी द्यावयाची होती. पण ती इतका वेळ जगली नाहीं. एकदां शंभर रामोशी धरून बादशहासमोर आणिले. त्याच्या मुख्यास त्यानें कुत्र्यांकडून खावविलें, तेरा असामींचीं डोकीं उडविलीं, आणि बाकीच्यांच्या टोळ्या करून त्यांस अजमीरच्या निरनिराळ्या रस्त्यांवर ठार मारविलें. शिक्षा वगैरे करण्यांत अमुक एक नियम ठरविलेले असत असें नाहीं. बादशहा करील ती पूर्वदिशा, आणि बादशहाची इच्छा हाच कायदा असा प्रकार असे. प्रांतांवरील अधिकाऱ्यांस स्वतंत्र राजाचे अधिकार दिलेले असत. बादशहा हाच सर्व जमिनीचा मालक असे. मोलवान् व चमत्कारिक वस्तु वारंवार नजर करून लोक बादशहाची प्रीति संपादन करीत असत. निर्वंश झालेल्या इसमाची संपत्ति सरकार खजिन्यांत जमा होई.

जमालुद्दीन हुसेन या नांवाचा पाटण्याचा सुभेदार हुमायून व अकबर यांच्या वेळेपासून कामावर होता. त्यास पांचहजारांची मनसबदारी असून सर टॉमस रोच्या वेळेस वृद्धापकाळांत नेमणूक घेऊन तो स्वस्थ बसला होता. त्याचा व रोचा चांगला स्नेह असून, क्रिस्ती लोकांवर त्याची विशेष भक्ति होती. रो यास त्यानें एक वडी मेजवानीही दिली. त्या जमालुद्दीननें मोगलांच्या राज्यव्यवस्थेविषयीं रो यास खालीं लिहिल्याप्रमाणें हकीकत सांगितली. 'लोक दास्यस्थितींत आहेत; कायदेकानू नाहींत; राज्याचा विस्तार अतोनात झाला आहे; राज्याचा वसूल वाढत्या प्रमाणावर आहे. नजराणे, दंड, परापहार इत्यादिकांनीं त्याच्यांत विशेष भर पडत आहे. एकट्या बहार प्रांतांतून बादशहास सालीना अकरा लाख रुपये मिळतात. ह्याहून जास्त

राहील ते सुभेदारास मिळते त्यास प्रत्येक घोड्याच्या खर्चाबद्दल सालीना दोनशे रुपये सरकारातून मिळतात मी पाच हजाराचा मनसबदार असून मजजवळ खरोखर पंधराशे घोडे मात्र तयार आहेत बाकीचे सर्व कागदावरच त्यावरून त्या वेळच्या स्थितीची बरीच अटकळ करिता येते तथापि ह्या हकीकतीच्या सत्यतेविषयी इतिहासकाराचा मतभेद आहे तरी रो निघून गेल्या-नंतर, स्वत जहांगीर गुजराथेत जाऊन तेथून उज्जनीच्या रस्त्याने आग्र्यावरून दिल्लीस गेला, तेव्हा प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टीवरून आत्मचरित्रात जी खालील हकीकत त्याने नमूद केली आहे, ती बरीच भरंवसेलायक दिसते

'गुजराथेत चोर व रामोशी याचा उपद्रव फार आहे कित्येक वेळा एका दिवसात मी दोन दोन तीन तीनशे लोक पकडून फाशी दिले आहेत, तरी त्याचा बंदोबस्त माझ्याने झाला नाही सभोवार अरण्य माजलेली आहेत वीस हजार लोक लावून त्यातून मला रस्ता करावा लागला परत येत असता मी उज्जनीस गेलो तेथे एका मोगल गृहस्थावर खटला चालला होता तो आपल्या बागात शहरच्या बायका बोलावून आणी, आणि त्यास दारू पाजून व गळा दाबून त्याचे दागदागिने काढून घेई त्याचे घर शोधिले, तेव्हा त्यात दागि-न्याचे सातशे जोड सापडले मी त्याजला डाग देऊन कापून काढिले तेथून आग्र्याला गेलो आग्रा येथे शहाजादा खुस्रूच व माझे पुन सख्य झाले दिल्लीस गेल्यावर कनोज येथे बंड झाल्याची बातमी आली ते मोडण्यासाठी मी फौज पाठविली तीत हजार बंडवाले मारले गेले दहा हजारांची शिरे दिल्लीस आणिली. मोठमोठ्या रस्त्यावरून दहा हजार लोकास झाडावर उलटे टांगिले वरचेवर कत्तली होत आहेत, तरी ह्या हिंदुस्थानात बंडाचे निर्मूलन होत नाही माझ्या वडिलांच्या व माझ्या कारकिर्दीत मिळून पाच लाख लोक मारले गेले नाहीत असा सुभाच नाही कोणी तरी लबाड पुढे येऊन बंडाचा उद्भव करितो हिंदुस्थानात पूर्ण शांतता वसत आहे असे कधी झालेच नाही ' ह्या लिहिण्यात पुष्कळ सत्य दिसते शेतकरी लोकाना बंडावा केला म्हणजे तो मोडण्यास अकबरासही जड जात असे दरोडेखोराचा बंदोबस्त मोगलाच्या हातून कधी झालाच नाही, असे तत्कालीन प्रवासी सागतात

सन १६१३ त सुरत येथे ईस्ट इंडिया कंपनीची वखार स्थापन झाली तंबा-कूचा प्रचार हिंदुस्थानात जहांगीरच्या वेळेस झाला असे सागतात

१२. **जहांगीरच्या स्वारीचा थाट.**—नोव्हेंबर सन १६१६ ह्या वर्षी जहांगीर बादशहाची स्वारी राजवाडा सोडून छावणीत राहण्याकरिता म्हणून बाहेर पडली. वाड्यापासून चारपाच मैलांवर ह्या छावणीचा मुक्काम होता. दोनतीन हजार उत्तम व चपळ घोडे, आठनऊशे हत्ती, शिवाय खेचरे व असंख्य मजूर स्वारीचे सामान नेण्यास लागले. मोठमोठे तंबू, भोजनाचे व इतर सामान, स्नानाकरिता गंगेचे पाणी इत्यादि सर्व गोष्टींची बादशहास दर ठिकाणी घरच्याप्रमाणे जरूर असे. अशा एका स्वारीत रो स्वतः होता, त्याने पुढील चित्तवेधक हकीकत लिहून ठेविली आहे.

'स्वारी सकाळी निघावयाची होती. जहांगीर झरोक्यात येऊन बसला. पाठीमागे पडद्यात त्याच्या दोन बायका होत्या त्या थोड्याबहुत रोच्या दृष्टीस पडल्या. तेव्हा त्यास मोठी मौज वाटली. सर्व सरदार दरबारांत जमले. रो जाऊन त्यांजमध्ये बसला. इकडे जनानखाना हत्तीवर चढत होता. त्याजकरिता पन्नास हत्ती राखून ठेविलेले होते. त्यांच्या पाठीवर मोठमोठे हौदे असून सभोवार किनखापी पडदे होते. नंतर बादशहा निघाला, त्या वेळी सर्व लोकांनी मोठा जयघोष केला. त्याने कानठळयाच बसल्या. जिन्याच्या पायथ्याशी बादशहाची दृष्ट काढण्यात आली. त्याचा पोशाख फारच उंची होता. अंगांत भव्य जरीचा झगा घातला असून, सर्वांगावर हिऱ्यामोत्यांची रेलचेल होती. नोकरांनी येऊन त्याची ढालतलवार बांधिली, आणि धनुष्यबाण लटकावून दिले. नंतर तो चार घोड्याच्या गाडींत बसला. त्याची गाडी हाकणारा इंग्रज असून त्याचाही पोशाख रत्नखचित होता. बादशहाच्या दोन बाजूंस दोन नोकर चवऱ्या वारीत होते. सवापुढे वाद्ये चालली होती. भरगच्ची सामान घातलेले नऊ घोडे रिकामे चालले होते. त्यांच्या पाठीमागे काही सुंदर पालख्या होत्या. पालख्या गेल्यावर निळागर्ती वर्गी आली. तीत नूरजहान बसली होती. तिच्यामागे बादशहाचे दोघ धाकटे मुलगे येत होते. मागाहून शृंगारलेले वीस हत्ती चालले होते. त्यांच्यामागे सरदार मंडळी पायी चालली होती. सर्व रस्त्यावर सहाशे हत्तीचा पाहरा लागला होता. प्रत्येक हत्तीवर निशाण व बंदुका होत्या. रस्ते पाण्याने भिजविले होते. कोणास बादशहास भेटण्याचे असेल, तर फार लांबपासून पायी चालत यावे लागे. स्वारी निघताना जहांगीर आपला मुलगा खुस्रु यास भेटला, आणि त्याने त्यास आपणांबरोबर घेतले.

'जेथे मुक्काम होता तेथे सर्वांकरिता तंबू लाविलेले होते त्यांत बादशहाच्या तंबूची शोभा काही अवर्णनीय होती सभोंवार अर्धा मैल परिघाच्या वर्तुळाकार कनाता लाविल्या होत्या त्याच्यावरील दिंडीदरवाजा फार शोभिवंत दिसत होता वाड्याप्रमाणे दरबारची वगैरे सर्व व्यवस्था तबूतही केलेली होती जनानखान्याकरिता पाठीमागून निराळा रस्ता होता दरवाज्यांतून आत शिरल्यावर रस्त्याच्या दोन्ही बाजूस सरदार लोक रांगेने उभे होते, त्यामधून बादशहाची स्वारी गेली हरएक बाबतींत तंबूतली व्यवस्था अगदी राजवाड्यातल्या सारखीच होती इतर मंडळींचेही तंबू लागले होते ह्या सर्व स्वारीच्या थाटाने एक नवीन शहरच वसले होते असे दिसे त्याचा विस्तार वीस चौरस मैल होता बादशहाचे तंबू लाल असून इतर मंडळींचे फक्त, हिरवे असे होते स्वारीच्या मुक्कामावर राजधानीतल्याप्रमाणे मोठमोठे रस्ते काढलेले असून दुतर्फा दुकानांच्या रांगा होत्या कपची व्यवस्था कशी लावावयाची त्याचे नकाशे ठरलेले असून, कोणाचा मुक्काम कोठे आहे हे पाहिजे त्यास कळण्याची सोय होती ऐने-अकबरीत असे कित्येक नकाशे दिलेले आहेत दररोज स्वारीचा मुक्काम उठून थोडे मैल पुढे जात असे पण व्यवस्थेमध्ये कोणत्याही प्रकारचा घोटाळा होत नसे सर्व सामानाचे तीनचार जोड होते एकंदर मुक्कामाची तयारी चार तासात होई

'स्वारीत नेहमीच मौज असे असे नाही रस्त्यात चोराचा व दरोडेखोराचा उपद्रव फार असे आणि क्षणोक्षणी शेकडो लोकांची डोकी उडविली जात. वाड्यातल्याप्रमाणे स्वारीत असताना बादशहाजवळ फारसे लोक जात नसत सकाळचा झरोका कधी चुकला नाही दरबार भरत नसे बहुतेक वेळ शिकारीत निघून जाई सायंकाळी घुशालखाना चालू असे आणि तेथे निवडक मंडळीस बोलावणे येई पुढे स्वारी रजपुतान्यातून माळव्याकडे चालली, तेव्हा चोराच्या योगाने सर्वांचेच हाल झाले अन्नपाणीसुद्धा वेळेवर मिळण्याची कित्येक वेळा मारामार पडे त्यात विशेषतः गरीब लोकांचे फार हाल होत सन १६१७ च्या फेब्रुवारी महिन्यात जहांगीर उज्जनीस पोंचला' असा जहांगीरच्या स्वारीचा थाट होता.

---

# प्रकरण पंचविसावें



## शहाबुद्दीन महंमद खुर्रम्, ऊर्फ शहाजहान

### स. १६२७-१६५८

१. कार्किर्दीतील महत्त्वाच्या गोष्टीः—

(अ) राज्यारोहण. (आ) खानजहान लोदी, (१६२९).

(इ) निजामशाहीचा पाडाव, (१६३६). (ई) रजपूत राजांशीं संबंध.

(उ) पोर्तुगीझांचा पाडाव, (१६३२). (ऊ) बल्क्कंदाहारच्या स्वाऱ्या.

२. शहाजहानचीं बायकामुलें. ३. औरंगजेबाचा पूर्वायुःक्रम.

४. राज्यपदाकरितां राजपुत्रांचा झगडा. ५. योग्यता व राज्यव्यवस्था.

६. शिल्पकलेचा उत्कर्ष, ताजमहाल वगैरे.

**१. कार्किर्दीतील महत्त्वाच्या गोष्टी. (अ) राज्यारोहण.**—ह्या कार्किर्दीच्या बरेवाईटपणासंबंधानें निरनिराळ्या इतिहासकारांत जो मतभेद आहे, त्याची एकवाक्यता होणें शक्य नाहीं. पहिल्या इंग्रज ग्रंथकारांत एल्फि-न्स्टन व व्हीलर हे प्रसिद्ध आहेत. व्हीलरची विवेचनसरणी चटकदार आहे. निरनिराळ्या दृष्टींनीं एखाद्या प्रश्नाचा विचार करण्यांत तो हुशार आहे. अतएव ऐतिहासिकदृष्ट्या त्याचा ग्रंथ वाचनीय व उपयुक्त आहे. परंतु ह्या ग्रंथकारास एतद्देशीयांचा चांगुलपणा सहन होत नसल्यामुळें, सामान्यतः मुसल-मान ग्रंथकारांवर व प्रसंगविशेषीं मुसलमानांची तरफदारी करणाऱ्या एल्फिन्स्टन वगैरेसारख्या इंग्रज ग्रंथकारांवरही वाक्प्रहार करण्याची संधि त्यानें वायां जाऊं दिलेली नाहीं. एतद्देशीयांची नालस्ती करण्याचा त्यानें विडाच उचललेला आहे असा भास होतो. शहाजहान बादशहाविषयीं अनेक ग्रंथकारांनीं आदरोद्गार काढिले आहेत. ताजमहालसारख्या त्यानें बांधविलेल्या इमारती आजमितीस-सुद्धां सर्व जगतास चकित करून सोडीत आहेत. परंतु त्या बादशहाचें स्त्रैणत्व व्हीलरच्या डोक्यांत घोळत असल्यामुळें, त्या सुंदर इमारतीसही त्यानें स्त्रैण

ठरवून दूषणे दिलीं आहेत असो तात्पर्य इतकेंच, कीं शहाजहानच्या कर्तबगारीबद्दल निश्चयात्मक मत देता येत नाहीं

शहाजहानचा जन्म ५-१-१५९२ रोजीं होऊन ३६ वे वर्षी त्यास सिंहासन-प्राप्ति झाली प्रतिपक्ष्याचा संहार करून त्याने बादशाहीपद कसें मिळविलें हे मागील प्रकरणात सांगितलेंच आहे आरोहणप्रसंगीं त्यानें जो मोठा उत्सव केला तो अदृष्टपूर्व होता त्या समारंभाच्या वेळीं दीड कोट रुपये खर्च झाला त्या वेळेस त्यानें मक्का व मदीना येथील मंदिरास मौल्यवान् नजराणे दिले पैगंबराच्या कबरेसन्निध ठेवण्याकरिता त्यानें एक रत्नजडित दिवा पाठविला तो अंबरचा केलेला असून अठरा शेर वजनाचा होता त्याजवर अनेक हिरे बसविलेले होते त्यात गोवळकोंड्याहून आणिलेला जो एक मोठा हिरा होता, त्याची किंमत दीड लाख रुपये होती आरंभीं जो हा अवाढव्य खर्च झाला, तो कोणास गैर वाटला नाहीं. कारण, या कारकिर्दीत एकदरीत स्वास्थ्य होतें आणि युद्धसंग्रामात फारसा खर्च झाला नाहीं पूर्वी बादशहाची तुला निरनिराळ्या धातूंनी करण्यात येत असे त्याशिवाय शहाजहाननें असा परिपाठ पाडिला, कीं रत्नांनी भरलेला भांडीं त्याच्या मस्तकाभोंवतीं ओंवाळून त्याजवरून तीं उधळावीत मग जवळचे लोक तीं वेचून घेत

मुसलमान लोक प्रार्थना करितात, त्याचीं चार आसनें आहेत, कयाम, रुकू, सिज्दा, आणि कोदा कयाम म्हणजे उभें राहून, रुकू म्हणजे वाकून, सिज्दा म्हणजे जमिनीवर गुडघे, हात व डोकें टेकून, आणि कोदा म्हणजे नुसते गुडघे टेकून. ख्रिस्ती व ज्यू धर्मांत सिज्दा नाहीं सिज्दा फक्त मुसलमानांत आहे सिज्दा ज्या ठिकाणीं करावयाचा त्यास 'मस्जीद' म्हणतात हा सिज्दा फक्त देवासाठीं करावयाचा, कोणाही माणसास करावयाचा नाहीं, असा मुसलमानी धर्माचा निर्बंध आहे अकबरानें धर्मात नवीन फेरफार केले, त्यात दरबारात आपणापुढे येणाऱ्या मंडळींनीं सिज्दा केला पाहिजे, जमिनीवर हात, गुडघे व डोकें टेकून बादशहास वंदन केलें पाहिजे असें त्यानें फर्माविलें ही गोष्ट [illegible]क मुसलमानास रुचली नाहीं तथापि हळूहळू तो प्रघात रूढ [illegible]गेला. फक्त मुख्य काजी मात्र बादशहापुढें सिज्दा करीत नसे जहांगीरनें हा सिज्दा करण्याचा प्रघात जोरानें चालविला, परंतु शहाजहाननें बादशहापुढे सिज्दा करण्याची चाल राज्यारोहणाच्याच दिवशीं बंद केली आणि

मुसलमानी धर्मास अनुकूल असे आणखी कित्येक फेरफार केले. तेव्हांपासून पुनरपि जे अस्सल मुसलमानी वळण वाढत गेलें त्याचेंच हे एक उदाहरण होय. (Blochmann, Calcutta Review, 1869.)

शहाजहाननें तीस वर्षे राज्य केलें. कारकिर्दीचे आद्यंत लढाया व क्रूर कर्मे ह्यांनीं भरलेले आहेत. बादशाही पद मिळविण्यास त्यास युद्ध करावें लागलें, तसेंच त्याजपासून तें हिरावून घेण्यास त्याच्या मुलांनींही युद्ध केलें. मधील काल शांततेचा गेला. ह्या शांततेमध्यें शहाजहाननें आपला कालक्षेप कसा केला हें विशेषतः पुढे सांगावयाचें आहे. गादीवर आल्याबरोबर आसफ्खान व महाबतखान ह्यास त्यानें मोठमोठ्या देणग्या व पदव्या दिल्या. आणि मित्र व आश्रित मंडळींचे पगार वाढविले शहाजहानच्या वेळेस इंग्लंडांत पहिल्या चार्लस राजाचा वध होऊन क्रॉम्वेल कारभार पाहूं लागला होता फ्रान्स देशात तेरावा व चौदावा लुई हे राजे राज्य करीत होते

( आ ) **खानजहान लोदी,** ( १६२८–१६२९ )--शहाजहान राज्यारूढ झाल्याबरोबर उझबेक लोकांनीं काबूलवर हल्ला केला· आणि अबुल् फज्लचा खून करणारा राजा वीरसिंहदेव ह्यानेंही बुंदेलखंडात बंड केलें. तथापि दोघांचाही बादशाही फौजेनें लगेच बंदोबस्त केला. पण आरंभाची महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे खानजहान लोदीचें बंड होय हा दौलतखान लोदीचा मुलगा. त्याचें मूळचें नाव पीरखान प्रथम तो दानियालजवळ नोकरीस होता. जहांगीरच्या वेळेस तो प्रसिद्धीस आला, आणि जहांगीरनेंच त्यास खानजहान ही पदवी दिली. महाबतखानास दक्षिणेंतून परत बोलाविल्यावर शहाजादा पर्वीझच्या मदतीस त्याची दक्षिणेत नेमणूक झाली होती, ( स १६०९ ). जहांगीरच्या उत्तर कारकिर्दीत दक्षिणेंतील कारभारांत ढवळाढवळ करून त्यानें आपलें महत्त्व वाढविलें. तो सुनी अफगाण होता. मलिकंबरही सुनीच होता. खानजहाननें मलीकशीं सख्य केलें, आणि पूर्वी शहाजहाननें जिंकिलेला निजामशाहीचा बहुतेक मुलूख मलिकंबरास परत दिला. जहांगीर मरण पावल्यावर शहाजहान दिल्लीस गेला, त्या वेळेस त्यानें खानास आपणा[illegible]बोलाविलें, पण तो गेला नाहीं. पुढें शहाजहाननें महाबतखानास दक्षिणची सुभेदारी देऊन खानजहान यास माळवा प्रांताचें काम दिलें. तेथून त्यास दिल्लीत बोलावून बादशहानें त्याचा चांगला सत्कार केला पण लवकरच खानास असा संशय

आला, की बादशहा आपणास पकडण्याच्या विचारात आहे त्यावरून त्यानं पळून जाऊन बंड करण्याचा निश्चय केला पण त्याच्या पाठीमागे दोन बायका व तीन मुलं इतका परिवार होता ह्या वेळेस त्या स्त्रियांनी आपणास एका खोलीत कोंडून घेऊन, कोणास कळूं न देता आपला नाश करून घेतला, आणि नवऱ्याला काळजींतून मुक्त केलं त्यामुळे लोदी फार कष्टी होऊन त्यानें आपल्या मृत बायकांस शोकाश्रूंनी स्नान घातलें, आणि त्यास थडगें बांधून पुढें मुलांस बरोबर घेऊन तो शहराबाहेर पळून गेला त्या वेळीं त्याच्या जिवास जीव देणारे असे दोन हजार लोक त्याजबरोबर होते पाठीवर आलेल्या बादशाही फौजेस दाद न देतां तो बुंदेलखंड व गोंडवण ह्या प्रांतांतून दक्षिणेत आला तेथें शहाजी भोंसले त्यास मिळाला

ह्या बंडाची बातमी ऐकून शहाजहानास धास्ती पडली दक्षिण देश काबीज करण्याचे कामी आजपर्यंत बादशहाचें पुष्कळ सामर्थ्य खर्च झालें होतें खान-जहानच्या बंडानें दक्षिणच्या युद्धाला पुनः पहिला दिवस प्राप्त झाला निजाम-शाहीचे मोठमोठे सरदार त्यास अनुकूल झाले होते विजापुर व गोंवळकोंडें येथील राजे त्यास मिळाल्यास केवळ दक्षिण देश हातचा जाईल इतकेंच नाही, तर हें काहूर कदाचित् दिल्लीवरही चालून येईल तेव्हां स्वतः कंबर बांधून आरंभींच त्याचा बंदोबस्त करण्याचा विचार करून शहाजहान मोठ्या फौजे-निशीं दक्षिणेत आला, (सन १६२९) बऱ्हाणपुरास येऊन त्यानें आपल्या फौजेच्या तीन टोळ्या करून तीन हुषार सरदारांच्या हाताखालीं दिल्या त्यांत अजीमखानाच्या फौजेनें चांगलाच पराक्रम केला त्यानें खानजहानचा अशा वेगानें पाठलाग केला कीं त्यास कोठेंच थारा मिळेना त्याची वाताहात झालेली पाहून शहाजी व इतर सरदार शहाजहानास येऊन मिळाले शहाजीस बादशाही फौजेंत पांच हजाराची मनसबदारी मिळाली इतर सरदारांसही शहाजहानानें देणग्या देऊन खुष केलें खानजहान पळून विजापुरास गेला तेथें महंमद आदिलशहा आपणास आश्रय देईल असें त्यास वाटत होतें पण तसें झालें नाहीं महंमद अत्यंत शांतताप्रिय होता शहाजहानशीं वैर बांधिलें तर आप-लाच नाश होईल, हें त्यास कळून होतें शिवाय खानजहानकडूनही त्यास कांहीं विशेष प्राप्ति होण्याजोगी नव्हती तेथून तो मूर्तुजा निजाम-शहाकडे गेला पण त्यानेंही त्यास आश्रय न दिल्यामुळे, बादशाही फौजेस

चुकवून तो परत बुंदेलखंडांत शिरला. तेथेही त्यास मदत न मिळतां कलिंजर किल्ल्यानजीक बादशाही फौजेशीं लढून तो समरांगणी मारला गेला. त्याच्या पाठलागाचा व वधाचा वृत्तान्त अत्यंत हृदयद्रावक आहे.

( इ ) **निजामशाहीचा पाडाव,** ( १६२९–१६३७ ).—लोदींचा पाडाव झाल्यावर शहाजहान बादशहा लगेच दिल्लीस परत गेला नाहीं. एकवार निजामशाहीचा संपूर्ण नाश करण्याचा त्यानें विचार केला. ह्या स्वारीची हकीकत मागें निजामशाहीच्या इतिहासांत आली आहे. दक्षिणेंत दुष्काळ पडल्यामुळें शहाजहानचें एक वर्ष फुकट गेलें. सन १६३० त अजीमखानानें दौलताबादचा मजबूत किल्ला काबीज केला. निजामशहाच्या मदतीस विजापूरचा आदिलशहा आला, म्हणून बादशहानें आसफखानास विजापूरावर पाठविलें. सन १६३२ त दक्षिणचा सर्व कारभार महाबतखानास सांगून बादशहा आग्र्यास गेला. महाबतखानानें फत्तेखान वगैरे निजामशाहीच्या सरदारांशीं लढून अहमदनगर काबीज केलें, आणि निजामशहास कैद करून ग्वाल्हेरीस पाठविलें. परंतु विजापूरच्या शहाचा मोड झाला नाहीं. शहाजादा शुजा हा महाबतखानाबरोबर दक्षिणेंत होता. दोघांचाही परिंड्याच्या हल्ल्यात पराभव होऊन ते बऱ्हाणपुरास परत गेले. तेथून बादशहानें त्यास परत बोलाविलें. इकडे शहाजी भोसले यास निजामशाहीचा उद्धार करण्यास ही संधि चांगली वाटली. त्यानें त्या राज्याचा बंदोबस्त इतका चांगला केला, कीं स्वतः जाऊन युद्ध केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें वाटून, बादशहा १६३५ त पुनः दक्षिणेंत आला. त्यानें आपल्या फौजेच्या दोन टोळ्या केल्या. पैकीं एक खान डौरानच्या हाताखालीं विजापुरावर पाठविली. विजापूरचा सरदार रणदुल्लाखान ह्यानें बादशाही फौजेस पुष्कळ त्रास दिला, तरी अखेरीस विजापूरच्या सुलतानास तह करणें भाग पडलें. याचप्रमाणें शहाजीचा सर्वत्र मोड होऊन, तो शहाजहानास शरण गेला आणि अहमदनगरचा मुलूख कायमचा मोगलांच्या ताब्यात गेला. ( १६३६ ).

( ई ) **रजपूत राजांशीं संबंध.**—शहाजहानच्या वेळेस उदेपुरास राणा जगत्सिंह गादीवर होता. त्याचा बाप राणा कर्ण ह्यानें जहांगीरच्या विरुद्ध शहाजहानास मदत केली होती. जयपुरास राजा जयसिंह राज्य करीत होता. तसेंच जोधपुरास राजा गजसिंह व अमरसिंह हे राज्यावर असून त्याचें व

शहाजहानचे वाकडे होते. गजसिंहावर जहांगीर बादशहाची मर्जी होती. शहाजहानच्या विरुद्ध त्याने खुस्रु व जहांगीर यास मदत केल्यामुळे शहाजहानचा त्याजवर विशेष डोळा होता. गुजराथेत लढत असता, गजसिंह सन १६३८ त मारला गेला, आणि त्याचा वडील मुलगा अमरसिंह दरबारी असल्यामुळे दुसरा मुलगा जसवंतसिंह जोधपूरच्या गादीवर बसला. हा जसवंतसिंह औरंगजेबाबरोबर पुष्कळ वर्षे दक्षिणेत होता. एकंदरीत राजपुतांची मदत शहाजहानास फारशी नव्हती. अकबराच्या दराऱ्यामुळे ते त्यास वश झाले खरे, परंतु जहांगीर व शहाजहान यास त्यांनी कधीच दाद दिली नाही. त्यास बादशहाकडून मोठमोठ्या नेमणुका झाल्या, तरी बादशहाविरुद्ध चाल असलेल्या दंग्यात सामील होण्यास ते चुकत नसत. बादशहाबद्दल त्यांच्या मनात भक्ति किंवा पूज्यबुद्धि उत्पन्न झाली नाही. ही स्थिति बादशहाच्या फौजेत असलेल्या राजपुतांची होती. बाहेरचे राजपुत राजे त्याहून उद्दाम होते. मजबूद डोंगरी किल्ल्यात त्यांचे राहणे असल्यामुळे मोगल फौजेसच त्यांची भीति वाटे. त्यांच्यामध्ये आपसात फूट असल्याने ते दबून होते, नाही तर प्रत्यक्ष मोगल बादशाही त्यांनी उडवून दिली असती. बादशहास तरी राजपुतांचे हे दुबळेपण माहीत असल्यामुळे त्यांच्यातील वैर ज्यास्त माजवून ते आपला निभाव लावून घेत. गजसिंहाचा वडील मुलगा अमरसिंह बादशाही फौजेत नोकर होता. तो हुकमत पाळण्यात कुचराई करी. एकदा रजा घेतल्याशिवायच तो पंधरा दिवस कोठे जाऊन राहिला. परत आल्यावर शहाजहान त्यास टाकून बोलला. तेव्हा अमरसिंहाने सांगितले, 'शिकारीस गेलो होतो.' त्यावर शहाजहानने त्याजला दंड करून तो वसूल करण्याची आपल्या बक्षीस आज्ञा केली. अमरसिंहाने आपल्या छावणीत त्या बक्षास पाय ठेवू दिला नाही. तेव्हा बादशहाने त्यास दरबारात बोलाविले. अमरसिंह अस्तनीत कट्यार घालून दरबारात आला. बक्षी बादशहाशी काही बोलत होता, इतक्यात अमरसिंहाने बादशहाशी बोलण्याच्या निमित्ताने जवळ जाऊन लगेच त्याने बक्षीस कापून काढिले; आणि तो सभोंवारच्या लोकास मारू लागला. बादशहा घाबरून जनानखान्यात पळाला. त्याबरोबर अमरसिंहास इतर लोकांनी पकडून ठार मारिले. तेव्हा त्याचे लोक फार चवताळले. त्यांनी बादशहास घाबरवून अमरसिंहाचे प्रेत आपल्या ताब्यात घेतले. अमरसिंहाच्या

तेरा बायका त्याच्या शवाबरोबर मेली गेल्या. सारांश राजपुत लोकांची शहाजहान बादशहावर छाप कशी पडली, हे ह्या गोष्टींवरून स्पष्ट दिसते. राजपुत व मुसलमान यांजमधील तंटे ह्या कारकिर्दीत विशेष वाढले. पूर्वी मोगल व अफगाण ह्यांजमध्ये असलेला द्वेषभाव ह्या वेळी बहुतेक नाहीसा झाला होता. मात्र आता हरएक बाबतीत राजपुत व मुसलमान एकमेकांचा पाडाव करण्यास झटूं लागले.

**(उ) पोर्तुगीझ लोकांचा पाडाव,*** (स. १६३२).—हिंदुस्थानात युरोपियन लोकांचा प्रवेश न होऊं देण्याचे कामी शहाजहानची विशेष खबरदारी होती. क्रिस्ती धर्माविषयी जहांगीरची आदरबुद्धि शहाजहानास खपत नसे. शहाजहानची बायको मुम्ताजमहल ही फार लावण्यवती असून बादशहा तिच्या म्हणण्याप्रमाणे वागत असे. नूरजहानचे वेड जहांगीर यास होते, त्याचप्रमाणे शहाजहानास मुम्ताजमहलचे वेड होते. ती अस्सल तुर्क जातीची असून मुसलमानी धर्माची अभिमानी होती. ह्या दोन बायांच्या व त्यांच्या आप्तांच्या द्वारे दरबारात इराणी वळण वाढत गेले. मुम्ताजमहल क्रिस्ती धर्माचा द्वेष करी. तशात पोर्तुगीझ लोकांचा तिरस्कार करण्यास तिला एक विशेष कारण झाले होते. जहांगीरच्या कारकिर्दीत क्रिस्ती धर्माची प्रवृत्ति चालू असता तिच्या दोन मुलीस पाद्री लोकांनी क्रिस्ती केले, अशी जी एक आख्यायिका आहे त्याची ज्यास्त माहिती मिळत नाही. व्हीलर सांगतो, की तरुण मुसलमानी स्त्रियास पडद्यात राहणे जिवावरचे वाटत असल्यामुळे, जेणेकरून त्यास मोकळे फिरण्यास सांपडेल, ती गोष्ट करण्यास त्या नेहमी तत्पर असत; क्रिस्ती धर्मातील मोकळे आचरण त्यास प्रिय वाटून, त्यांनी तो धर्म स्वीकारिला. ही कल्पना कितपत खरी असेल ह्याचा ज्याचा त्याने विचार करावा.

पोर्तुगीझ लोकांशी शहाजहानचे वाकडे पडण्यास आणखी विशेष कारण झाले होते. अकबर व जहांगीर या बादशहांचा वेळ दक्षिणेत गेल्यामुळे, बंगाल्यांतील पोर्तुगीझ लोकांकडे लक्ष देण्यास त्यास फुरसत झाली नाही. बंगालच्या उपसागरांत चित्तगांवचे चांचे लोक जहाजास फार उपद्रव देत असत. तो पोर्तुगीझ लोकांनी बंद करावा ह्या शर्तीवर, जहांगीरने त्यास हुगळी बंदरात वखारी घालण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणे हुगळीस पोर्तुगीझ लोकांनी वखार

* ह्या लोकांची सविस्तर हकीकत ब्रिटिश रियासतीत दिली आहे.

घातली परंतु त्यांनीं आपली शर्त पाळली नाहीं. चांचे लोकांचा बंदोबस्त न करितां त्याजशीं हुगळीच्या पोर्तुगीझ व्यापाऱ्यांनीं सख्य केलें, आणि त्याजबद्दल चांचे लोक त्यास आपल्या प्राप्तीचा हिस्सा देऊं लागले. ते चांचे लोक जहाजांतून प्रवास करणाऱ्या लोकांस पकडून आणून गुलाम म्हणून विकात. हुगळी बंदरात त्या गुलामास पोर्तुगीज लोक विकत घेत. कित्येकांस ते ख्रिस्ती करीत, आणि बाकीच्यास शहरोशहरीं नेऊन विकीत. हीं दुष्ट कृत्यें बंद करण्याचा शहाजहानचा मुळपासून विचार होता. पण जहांगीरच्या वेळेस हातीं सत्ता नसल्यामुळें तें काम तसेंच राहिलें. व्यापाराची परवानगी घेऊन लोकांस बाटवून ख्रिस्ती करणें किंवा त्यास गुलाम म्हणून विकणें, त्या गोष्टी मुसलमानी रियासतीत क्षणभर दुर्लक्ष सहन होण्याजोग्या नव्हत्या. जहांगीरच्या कारकिर्दीत शहाजहान बंड करून बंगाल्यात पळला. तेव्हां हुगळी येथील पोर्तुगीज लोकांचा त्यानें मदत मागितली. ती त्यांनीं दिली नाहीं. इतकेंच नाहीं तर शहाजहानचे विरुद्ध त्यांनी बादशाही फौजेस मदत दिली. हे वैमनस्य शहाजहानच्या मनात होतें. खानजहान लोदीचें बंड संपल्यावर शहाजहानने पोर्तुगीज लोकांस असा निरोप पाठविला, कीं गुलाम म्हणून पकडलेले लोक आपल्या स्वाधीन करावे. ही सरळ व न्याय्य मागणी पोर्तुगीज लोकांनीं अमान्य केली. त्याजबद्दल त्यास चांगली शिक्षा झाली. बादशहानें त्याजबद्दल मागचा सर्व राग पुरता उगवून घेतला. सन १६३२ त त्यानें हुगळीवर फौज पाठवून तेथील सर्व लोक व त्यांची मालमत्ता जप्त करून आग्र्यास नेली. त्यांतील सुंदर व तरुण स्त्रियास बादशहानें आपल्या जनानखान्यात ठेविलें. बाकीच्यास दरबारातील मंडळींच्या हवाली केलें, आणि मुलास मुसलमानी धर्मांत घेतलें. पुरुषांना कित्येक दिवस हत्तीच्या पायाखाली देण्याची धमकी दाखविली व मुसलमान होण्यास सांगितलें. नोकरीच्या किंवा बक्षिसाच्या लालुचीनें त्यांच्यापैकीं बहुतेक मुसलमान झाले. पुष्कळांची कत्तल झाली. मुम्ताजमहल अगोदरच मरण पावली होती, नाहीं तर त्या सर्वांचा क्रूरपणानें वध झाला असता. पोर्तुगीज लोकांचें हुगळी येथील ठाणें मोडिलें, तरी बंगालच्या उपसागरांतील चांचे लोकांचा उपद्रव बंद झाला नाहीं. चितगांव येथील पोर्तुगीज लोक समुद्रात लुटालूट करीत. औरंगजेबाच्या हातांत दिल्लीपतींचें राज्यसूत्र आल्यावर त्यानें शायिस्ताखान यास बंगालचा सुभेदार नेमून, त्यास पोर्तुगीझ लोकांची पुंडाई

बंद करण्याचा सक्त हुकूम दिला. त्याअन्वयें शायिस्ताखानानें पोर्तुगीझ लोकांस बंगाल प्रांतांतून घालवून लाविलें.

(ऊ) **बल्खकंदाहारच्या स्वाऱ्या,** ( १६३८—५३ ).—शहाजहान बादशहा दक्षिणेंत आला होता, तो स. १६३७त परत आग्र्यास पोंचला. मध्यंतरीं त्याच्या फौजेस कांहीं कामें पडलीं, त्यांपैकीं एकांत तीस यश आलें. कंदाहार प्रांत जहांगीरच्या कारकीर्दींत इराणच्या शहानें काबीज केला होता. तो परत घेण्याकरितां शहाजहानची फौज झगडत होती. अलीमर्दानखान नामक इराणच्या सरदाराच्या ताब्यांत कंदाहारचा किल्ला होता त्यास इराणच्या शहानें इतक्या वाईट रीतीनें वागविलें, कीं त्या सरदारानें तो किल्ला शहाजहानच्या हवालीं करून मोंगलांच्या दरबारीं नोकरी पत्करिली. ह्या अलीमर्दानखानानें पुढें पुष्कळ नावाजण्याजोग्या कामगिऱ्या बजाविल्या. दिल्ली शहरास ज्या पाटानें पाण्याचा पुरवठा झाला आहे, तो त्यानें बांधिला; त्यास अद्यापि अलीमर्दानचा कालवा असें म्हणतात. तो चांदणीचौकांतून वाहात जातो. उदेपूरचा राणा जगतसिंह आपल्या चौदा हजार फौजेनिशीं ह्या स्वारींत होता. बाबर बादशहाचा अंमल त्या प्रांतावर होता. पुढें कित्येक प्रसंगीं तेथील मोंगल अंमलदार स्वतंत्र होते. शहाजहानच्या वेळेस तो प्रांत हातचा गेला होता. तो परत जिंकून तयमूरची राजधानी आपल्या ताब्यांत घ्यावी म्हणजे बल्ख येथें तंटे सुरू असल्यामुळें आपलें काम लौकर सिद्धीस जाईल, असें शहाजहानास वाटलें; परंतु हा त्याचा भ्रम होता. हिंदुस्थानची फौज दूरच्या प्रदेशांत राहण्यास अत्यंत नाखुष होती. तेथें जाऊन लुटीचा किंवा कांहीं एक फायदा तीस होण्याजोगा नव्हता. नुसता मेहनतीचा वसूल होणाची मारामार. सन १६४५ च्या जून महिन्यांत फौज रवाना झाली. ऑक्टोबरांत राजा जगतसिंह काबुलाहून तिच्या मदतीस गेला. त्यानीं रस्ता केल्यावर सन १६४६ च्या जून महिन्यांत बादशहानें मुरादबक्षास पन्नास हजार फौज देऊन पाठविलें. बरोबर अलीमर्दानखान होता. हिंदुस्थानची श्रीमंत व भपकेबाज फौज पाहून तिकडील रानटी लोकांचे डोळे दिपून गेले. विशेष लढाई केल्याशिवाय प्रांत ताब्यांत आला. परंतु तो ताब्यांत ठेवण्याचें काम कठिण होतें. मुरादास तेथें राहणें गोड वाटेना; आणि तो एकाएकीं निघून परत आला; तेव्हां शहाजहाननें आपला वजीर सादुल्लाखान ह्यास घाईघाईनें तिकडे पाठविलें. त्यानें जाऊन

थोडीशी व्यवस्था केली, आणि आपण हिवाळ्यामुळे काबुलास परत आला. स. १६४७ च्या आरंभी बादशहाने दक्षिणेतून व बंगाल्यातून पुष्कळ पैसा आणून, अफगाणिस्थानात रवाना केला आणि औरंगजेबास ताबडतोब दक्षिणेतून बोलाविले. ता. २० जानेवारी १६४७ रोजी तो लाहोरास येऊन बादशहास भेटला आणि लगेच पेशावरावरून काबुलास गेला. अलीमर्दानखान त्याचा मुख्य सरदार होता. औरंगजेबास नानातऱ्हेच्या अडचणी आल्या, तरी त्यास न जुमानता, मोठ्या शहाणपणाने व शौर्याने त्याने बापाची कामगिरी तडीस नेली. स्वतः शहाजहान काबुलास जाऊन राहिला. ता. ७ जून सन १६४७ रोजी ऊझबेक लोकांशी खडाजंगीची लढाई झाली. तींत औरंगजेबास जय मिळाला, तरी शत्रूचा पाडाव झाला नाहीं. पहाडी लोकांचा पाडाव करणें मुष्किलीचे होते. मोगल फौजेचे अतिशय हाल होऊं लागले. अशा स्थितींत वल्क येथे राहण्यापासून कांहीं एक फायदा नाहीं, असें औरंगजेबानें बापास लिहून पाठविलें. तेव्हा तेथील अधिकारी नजरमहंमद याजबरोबर कसाबसा तह करून ऑक्टोबर महिन्यांत तो काबुलास परत आला. जयसिंगाचे राजपुत सवांत मागें होते, त्यांचे फारच हाल झाले. याप्रमाणे चार कोटींचा व्यर्थ खर्च करून आणि पुष्कळ लोक व जनावरें नाहींशीं होऊन बादशहाला स्वारी परत आणावी लागली. औरंगजेबाचें अपूर्व धाडस मात्र ह्या स्वारींत आशियांतील सर्व मुसलमानांच्या नजरेस आलें. आणि त्यास युद्धकलेचा उत्कृष्ट अनुभव मिळून फौजेंतील लोकांची ओळख झाली. ती राज्यप्राप्तीच्या युद्धांत पुढें त्यास फार उपयोगी पडली.

सन १६४८ त इराणी लोकांनीं कंदाहार पुनः घेतलें. औरंगजेबास तें परत घेण्याचा हुकूम झाला. परंतु त्यास कंदाहारावर जाण्यास विलंब लागला. सन १६४९ त वढ्यास सुरवात झाली. पुढें औरंगजेबानें कंदाहार घेण्याचा सतत तीन वर्षे प्रयत्न केला. परंतु त्यांत त्यास यश न आल्यामुळें त्याची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक झाली. पुढें शहाजादा दाराशेखो त्यानें बापास विनंति करून कंदाहार घेण्याचें काम आपणाकडे मागून घेतलें, परंतु इराणच्या फौजेनें त्या किल्ल्याचा बचाव इतक्या निकरानें केला, कीं सन १६५३ साली दाराशेखो ह्यास वेढा उठवून हिंदुस्थानांत परत यावें लागलें. सारांश, इतःपर कंदाहार मोगलांच्या ताब्यांतून कायमचें गेलें, आणि काबूलच्या पलीकडे बादशाही सत्ता फारशी उरली नाहीं.

२. **शहाजहानच्या बायका मुलें.**—इराणी राजवंशांतील पुरुष मीर्झा-मुजफर हुसेन, याची मुलगी कंदाहार महल ही शहाजहानची पहिली बायको. तिचें लग्न सन १६१२ त झालें त्या वेळीं शहाजहान १९ वर्षांचा होता. कंदाहार महलपासून त्याला एक मुलगी झाली, तिचें नाव परेझबानू बेगम. पुढें तीन वर्षांनीं शहाजहानचें लग्न मुम्ताजमहलशीं झालें. मोगल बादशाहींत राज्यकारभार चालविणारी शेवटची पराक्रमी राणी मुम्ताजमहल होय. ही आसफखानाची मुलगी, शहाजहानपेक्षा चौदा महिन्यांनीं लहान असून, पाच वर्षे तिचें लग्न ठरून राहिलें होतें, तें तारीख १३ एप्रिल स. १६१२ रोजीं जहांगीरनें केलें. ह्या लग्नाची कांहीं चमत्कारिक हकीकत कित्येक ठिकाणीं आढळते ती अशी. पूर्वी मोगल बादशहाच्या वेळेस स्त्रियांचे मेळे भरविण्याची चाल होती, त्या कांहीं तरी तऱ्हेवाईक व मौजेच्या चिजा विक्रीसाठीं घेऊन येतात, आणि जे पुष्कळ किंमत देतील त्यास त्या चिजा विकतात. मोगल बादशहाच्या वेळेस जे मेळे भरत, तेथें बादशहा व शहाजादे यांच्याशिवाय इतरांस जाण्याची बंदी असे. जहांगीर बादशहानें अशा प्रकारचा एक मेळा भरविला, आणि सर्व रूपवती स्त्रियांस तेथें बोलाविलें. आपल्या जिनसाबद्दल त्या जी किंमत मागतील, ती दिली पाहिजे, असा त्या दिवशीं बादशहानें हुकूम फिरविला होता. त्या मेळ्यांत बापाबरोबर शहाजहानहा गेला होता. तेथें आसफखानाची लावण्य-वती मुलगी अर्जुमंद बानू इचें सौंदर्य पाहून तो शहाजादा मोहित झाला. त्या वेळीं अर्जुमंद बानूचें लग्न जमालखान नामक सरदाराशीं ठरलें होतें. अर्जु-मंद बानूनें हिऱ्यासारखा कापून तयार केलेला साखरेचा खडा पुढें करताच शहाजहाननें त्याची किंमत काय म्हणून विचारलें. तिनें एकदम सवालक्ष रुपये किंमत मागितली. तिच्या रूपास मोहित झालेल्या शहाजाद्यानें ती रक्कम देऊन तो खडा विकत घेतला. या वेळीं दोघांचें बोलणें होऊन संकेत ठरला, व सायंकाळीं ती शहाजहाननें पाठविलेल्या वाहनांत बसून त्याच्या मंदिरांत गेली. तेथें तीन दिवस राहिल्यामुळें जमालखानानें तिजविषयीं आपला रोष प्रदर्शित केला. त्याच्या ह्या वर्तणुकीवरून संताप येऊन, तिनें लगेच त्याजविषयीं शहाजहानकडे कागाळी केली. त्यावर शहाजहाननें हुकूम फर्माविला, कीं जमालखानास हत्तीच्या पायाखालीं देऊन ठार करावें. ही दुःखदायक वार्ता ऐकून जमालखान तावडतोब शहाजहानकडे जाऊन म्हणाला, 'ख्राविंद, मा

आपल्या बायकोविषयीं अनादर केला, तो ती आपणाकडे राहिली म्हणून नव्हे, तर जिच्यावर आपली मजा गेली, तिजविषयीं मी आदर दाखविणे अत्यंत अनुचित होय " अशा उत्तरानें जमालखानाने आपला जीव वाचविला व शहाजहानास संतुष्ट केलें लगेच त्यास पाच हजाराची मनसब शहाजहानने देवाविली, आणि त्या दिवसापासून अर्जुमंद बानू शहाजहानकडे येऊन राहिली ह्या हकीकतीत काय तथ्य असेल त असो

नूरजहानचे शहाणपण व सौंदर्य, आणि ग्यासबेगचे तारतम्य व प्रामाणिकपणा, हे गुण अर्जुमद बानूच्या अगा पुष्कळ अशीं वसत होते आपल्या सद्गुणानीं स्त्रीरत्न हे यथार्थ नाव तिला मिळाल पतिसमागमात तिचीं वीस वर्ष गेलीं तितक्या काळात तिने बादशहाचे सार लक्ष आपल्याकडे वेधून घेतले होते तेरा वेळा प्रसूत झाल्यावर चवदाव्या खेपेस प्रसूतिविकाराने ती सन १६३१ त ता ७ जून रोजीं बऱ्हाणपुर येथ मरण पावली त्या समयीं आपल्या प्रियकर पतीपासन तिने दोन गोष्टी मागून घेतल्या आपल्या पश्चात् पतीने लग्न करूं नये, आणि आपल्या अपर्व प्रीतीचे स्मारक बादशहान करावे तिला अशी भीति होती, कीं बादशहाला आणखी मुल झाल्यास ती आपल्या मुलाशीं भाडतील दुर्दवकरून तिच्याच मुलानीं भाडून बादशहाचा विध्वस केला ! बादशहाने मात्र ह्या प्रिय पत्नीस दिलेलीं वचने तडीस नेलीं पुढे आमरण तो अविवाहित राहिला, आणि ताजमहाल नावाची जगद्विख्यात इमारत त्यान आपल्या प्रियपत्नीच्या स्मरणार्थ बाधिली

मुम्ताजमहल्पासून शहाजहान बादशहास आठ मुलगे व सहा मुली अशीं चौदा मुलं झाली, त्यापैकीं आठ लहानपणीच मरण पावलीं त्याची यादी येणेंप्रमाणें —

(१) मुलगी मिहरुन्निसा, ज आग्रा, १६१३, अजमीर येथे तीन वर्षानीं मृत्यु, (२) मुलगी जहानारा बेगम, ज १६१४, मृ १६८१, (३) मुलगा दाराशुकोह, ज अजमीर, १६१५, मृ १६५९ (४) मुलगा शहाशुजा, ज अजमीर, १६१६, मृ १६६०, (५) रोशनारा बेगम, ज बऱ्हाणपुर, १६१७, मृ १६७१, (६) औरंगजेब, ज १६१८ ता २४ ऑक्टोबर, मृ १७०७, (७) मुलगा उमेदबक्ष, ज सरहिद, १६२०, मृ बऱ्हाणपुर येथे दोन वर्षानीं, (८) मुलगी सुरय्याबानू बेगम, ज १६२१, सात वर्षानीं मृत्यु, (९) मुलगा, नाव ठेवण्या-

पूर्वीच मृत, म. १६२३; (१०) मुरादबक्ष, ज. रोटस, १६२४, मृ. १६६१; (११) लुत्फुल्ला ज. १६२६ व (१२) दौलतअफजा, ज १६२८. दोघेही एक वर्षानें मेले. (१३) मुलगी, ज १६३०, उपजताक्षणीं मृत्यु (१४) गौहरारा बेगम, ज बऱ्हाणपुर १६३१ हिच्या प्रसूतिसमयीं आई मेली त्या मुलांचीं सर्व नांवें फारशी चालीचीं आहेत, मुसलमानी नाहींत.

शहाजहानच्या उत्तर कारकिर्दीचा इतिहास म्हणजे त्या त्याच्या अपत्यांचे झगडे होत. वडील पुत्र दारा हा बुद्धिमान, थोर मनाचा व उदार होता. धर्मशास्त्र व तत्वज्ञान ह्या विषयांचा त्यानें बराच अभ्यास केला असून, पाश्चात्य शास्त्रांचीही त्यास बरीच ओळख होती. युरोपियन लोकांवर त्याची विशेष मेहेरनजर असे इमारतींच्या कामावर व तोफखान्यावर त्यानें पुष्कळ युरोपियन लोक नेमिले होते. /परंतु त्याचा स्वभाव काहींसा भोळा व गर्विष्ठ होता तो आपल्या मनांतील विचार पाहिजे त्याच्याजवळ मोकळेपणानें सांगे अनेक वेळां त्याचें बोलणें लोकास दुःसह होत असे. मुसलमानी धर्माविषयीं त्याच्या मनांत बराच द्वेषबुद्धि वसत होती आणि क्रिस्ती व हिंदु या धर्मांकडे त्याचा ओढा पुष्कळ होता. एक फ्रेंच पाद्री व हिंदु साधु असे त्याचे दोन गुरु होते. कवींद्राचार्य नावाचा पंडित त्याचा संस्कृत–शिक्षक होता. त्याजकडून महाभारत, उपनिषदें वगैरे अनेक संस्कृत ग्रंथांचीं त्यानें फारशींत भाषांतरें करविलीं. त्यानें 'सर्व धर्मांची एकवाक्यता' या नावाचें स्वतः एक पुस्तक लिहिलें होतें त्याच्या स्वतःच्या हातचीं लिहिलेलीं सहा पुस्तकें खुदाबक्ष संग्रहांत पाटणा येथें आहेत स्तुतिप्रिय असल्यामुळें लोकांनीं केलेली खुशामत तो खरी समजे स्तुति करणारे लोक मनापासून आपला द्वेष करितात हें त्यास कळत नसे तो अविचारी असून, त्याला स्वपराक्रमाची मोठी घमेंड होती. म्हणून अकबराचे काहीं गुण त्याच्या अंगीं असूनहि अकबराची योग्यता त्यास कधींच आली नसती. लोकांवर छाप बसवून त्याजकडून राज्याच्या फायद्याचें काम घेण्याचें शहाणपण त्यास नव्हतें. आपणासारखा शहाणा त्रैलोक्यांत कोणी नाहीं, असें त्यास वाटे. तसेंच त्याचा क्रोध अगदीं अनावर असे. दाराच्या दोन बायका होत्या. एक शहाजादा पर्वीझची मुलगी नादिर-बेगम व दुसरी मीर्झा रुस्तमची मुलगी, (लग्न सन १६३३). सुलेमान व शिपिरशेखो हे दोन मुलगे त्यास होते

दुसरा मुलगा शुजा हा शूर व कर्तृत्ववान होता; परंतु जवळच्या मंडळींवर

त्याचा भरवसा नव्हता. दिल्लीच्या दरबारी आपले हेर ठेवून तो नेहमीं बातमी काढीत असे. जशवतसिंह वगैरे बलिष्ठ हिंदु राजांशी त्यानें आतून सख्य बांधिलें होतें. इराणच्या शहाशीं त्याचा पत्रव्यवहार चालू होता. इराणी लोकांस संतुष्ट करण्याकरितां त्यानें शियापंथ स्वीकारिला, आणि सुन्नी धर्माचा तो द्वेष करूं लागला. त्याच्या एका दुर्गुणामुळें त्याच्या सर्व गुणांवर पाणी पडलें. तो अत्यंत व्यसनी होता. सर्व काळ नानातऱ्हेच्या विलासांत तो निमग्न असे.

औरंगजेब सर्व कुटुंबांत अत्यंत धूर्त व चाणाक्ष होता. कापट्य व दूरदृष्टि हे गुण त्याच्या अंगीं पूर्णपणें वास करीत होते. त्याची बुद्धि विशाल व तीव्र असून, त्यास मनुष्याची पारख उत्तम होती. धर्मप्रेमाच्या मिषानें त्यानें आपली महत्त्वाकांक्षा झांकून टाकिली होती. दिल्लीची गादी बळकाविण्याचे विचार पूर्वीपासून त्याच्या मनांत घोळत होते. परंतु आपला कोणास संशय येऊं नये, म्हणून संसार असार आहे, राज्याची दगदग आपणास नको, इत्यादि पोकळ गप्पा तो बाह्यात्कारीं सांगत असे. दागदागिने अंगावर न घालितां तो नेहमीं साधा व शुभ्र पोषाख घाली. त्याच्या शरीराचा बांधा सडपातळ असून, हा खरोखरीच स्वतःविषयीं बेपरवा आहे असें लोकांस वाटे. त्याची वृत्ति उदास असे. बहुशः तो जवळ नेहमीं कुराणाचें पुस्तक बाळगी. प्रत्यक्ष शहाजहान बादशहासही त्यानें भुरळ पाडिली होती. औरंगजेबाच्या गुणांची शहाजहान वारंवार तारीफ करीत असे. दारानें मात्र औरंगजेबाचें कपट पूर्णपणें ओळखिलें होतें. दरबारच्या मंडळींशीं दाराशुकोह फार उद्दामपणानें वागत असे, आणि पुष्कळदां त्याचा पाणउतारा करी. परंतु औरंगजेबानें, गोडीनें व गरीबीनें वागून, सर्वांची प्रीति संपादन केली होती. त्यामुळें आरंभापासून त्याचीं गुप्त कारस्थानें बहुधा बाहेर फुटत नसत. कामदार लोकांशीं इतकें गरीबीनें वागूं नये, आपला बोज आपण कायम ठेवावा असें बापानेंही त्यास सांगितलें; परंतु राज्य प्राप्त होईपर्यंत त्यानें आपला गरीबीचा क्रम कधीं बदलिला नाहीं.

चौथा पुत्र मुराद हा शूर, परंतु भोळा व मूर्ख होता. तो कोणतीही गोष्ट गुप्त ठेवीत नसे. त्यास शिकारीचा नाद विशेष होता. 'खाना, पीना, और लटना' यांशिवाय इतर व्यवसाय त्यास अगदीं तुच्छ वाटत. सुन्नी धर्माविषयीं त्यास विशेष आस्था होती. त्याच्या धाडसास शहाणपणाची जोड मिळाली असती, तर तो अद्वितीय पुरुष झाला असता.

वडील कन्या जहान्-आरा (जगाला भूषविणारी) ऊर्फ बेगमसाहेब ही सुस्वरूप व आनंदवृत्तीची बाई होती. बादशहाची तिजवर बहाल मर्जी असे. त्याच्या भोजनाचे पदार्थ तिच्या देखरेखीखाली तयार होत. दरबारातील प्रत्येक उलाढालीत तो तिचें मत घेत असे. त्यामुळें दरबारांत तिचें वजन पुष्कळ वाढलें होतें. तिची नेमणूक मोठी असून, सरदार लोकांकडून वारंवार देणग्या मिळाल्यामुळें तिजपाशीं अपार संपत्ति जमली होती. दाराची सर्व भिस्त तिच्यावर होती, आणि तिचें त्यास पूर्ण पाठबळ होतें. बादशहाच्या घराण्याशीं शरीरसंबंध ठेवण्याइतकें उच्च घराणें दुसरें नसल्यामुळें, अलीकडील पोकळ डौलाच्या काळांत ह्या मुलींची लग्नें होतनाशीं झालीं. शिवाय अमली बादशाही बायको गळ्यात अडकवून तिच्या हुकमतीत राहणें कोणासही आवडणारें नव्हतें. आणखी असें की, प्रसंगविशेषीं नवऱ्याच्या जिवावर, प्रत्यक्ष राज्यावरही आपला हक्क सांगण्यास त्या कमी करणाऱ्या नव्हत्या. परंतु 'आपण गादीवर बसल्यावर तुझें लग्न करून देऊं,' असें दारानें आपल्या ह्या बहिणीस वचन दिलें होतें. शहाजहानची ह्या मुलीवर वाईट दृष्टि होती, असाही बोभाटा त्या वेळेस झालेला होता. एवढ्या थोर व ऐषआरामांत वाढलेल्या ह्या मुलीविषयीं लोकांच्या तोंडी बरी वाईट चर्चा चालणें साहजिक आहे. आई मेल्यावर तीस पस्तीस वर्षें सर्व जनानखान्यावर तिचाच ताबा होता. बादशहाच्या खानपानावर तिची सक्त नजर असे. बाप कैदेंत असतानासुद्धां ती त्याजपाशीं नेहमीं राहात असे. तिच्या नावाची एक भव्य धर्मशाळा दिल्लींत आहे. दिल्लीशहराबाहेर एका साधूच्या कबरेनजीक तिची कबर आहे. आपल्या कबरस्थानावर डामडौलाची मशीद बांधूं नये, अशी तिची इच्छा होती. त्याप्रमाणें ती कबर अगदीं साधी आहे.

धाकटी रोशन्-आरा (प्रकाशयित्री) बेगम ही आपल्या बहिणीइतकी सुस्वरूप व शहाणी नव्हती. तरी पण ती उलाढाली करण्यांत कांहीं कमी होती असें नाहीं. तिचा सर्व ओढा औरंगजेबाकडे होता. म्हणून दारा व बेगमसाहेब याजबद्दल तिचें उघड वैर होतें. दरबारांत तिला मान नव्हता, आणि तिला पैशांचेंही पाठबळ नव्हतें. परंतु जनानखान्यांत असल्यामुळें बेगमसाहेबाचीं कारस्थानें तीस कळत व ती ती औरंगजेबास कळवी.

शहाजहान बादशहा आपल्या मुलाचे गुण ओळखून होता. त्यानें आपल्या

मुलांविषयीं लिहून ठेवलेला अभिप्राय चुकीचा नाहीं —'दारा हा बुद्धिमान् सरदार आहे, आणि राज्याच्या अधिकारास योग्य अशी त्याची प्रौढी आहे परंतु कोणाचाही उत्कर्ष त्यास सहन होत नाहीं. यामुळे चांगल्यास वाईट व वाइटास चांगला असा तो आहे शुजा हा शुद्ध मद्यपी आहे, आणि मुराद खादाड व विषयी आहे. औरंगजेबाचा हातोटी व बुद्धिमत्ता मोठी आहे, आणि राज्यकारभाराचे गाडे ओटण्यास हा फार योग्य आहे परंतु हा कपटानें भरलेला आहे, यास्तव त्यास विश्वासु असा बहुधा कोणीच मिळावयाचा नाहीं' असा शहाजहानचा अभिप्राय होता थोडक्यात त्या मुलांचे वर्णन करावयाचें असल्यास, गर्विष्ठ, विषयी, कपटी, आणि मूर्ख हीं चार विशेषणे चौघास दिल्यास शोभण्यासारखीं आहेत आपले मुलगे एकमेकावर उठून खून करण्यासही मागेंपुढें पाहणार नाहींत अशी खात्री असल्यामुळे, पुढें होणारे अनर्थ टाळण्याकरिता शहाजहानने नाना तऱ्हेचे बेत मनात आणिले सर्वांचीं लग्नकार्ये होऊन मुलेंबाळेंसुद्धा झाली होती सर्वांस कैद करून ग्वालेरच्या किल्ल्यात ठेवावें असाही विचार त्याच्या मनात आला परंतु आता हे थोर झाले असून आपले हिताहित त्यास कळत आहे असे मनात आणून, बादशहानें त्यांचा राज्याचे कामी उपयोग करून घेण्याच्या इरायानें, त्यास दूरदूरच्या प्रांतीं अधिकार देऊन पाठविले दारा यास स्वतः जवळ ठेविलें सुजास बंगाल प्रांताचा कारभार दिला औरंगजेबास दक्षिणेंत पाठविलें, आणि मुरादची रवानगी गुजराथेंत केली या व्यवस्थेनें त्यांची सत्ता व स्वतंत्रता वाढेल हे शहाजहानच्या लक्षात राहिलें नाहीं मोगल घराण्यात गादीच्या वारसाचा प्रश्न नेहमीच बिकट असून जे गोंधळ झाले, त्याचा बंदोबस्त कधींच झाला नाहीं

**२. औरंगजेबाचा पूर्वायुष्यक्रम**—जहांगीर बादशहा मलिकंबरचा बंदोबस्त करून परत आग्र्यास जात असता, शहाजहानची बायको मुम्ताजमहल गुजराथच्या पंचमहाल जिल्ह्यात दोहद येथे ता २४ ऑक्टोबर स १६१८ रोजीं प्रसूत होऊन मुलगा झाला, तोच औरंगजेब होय त्या दोहद गावाबद्दल औरंगजेबास अगदीं मरेपर्यंत मोठें प्रेम वाटत असे

शहाजहान आपल्या बायकोस नेहमीं आपल्याबरोबर नेई बापाचें व त्याचें वितुष्ट पडून तो सर्व देशभर रानोमाळ भटकत होता, तेव्हांसुद्धा बायको व सर्व मुलें त्याच्याबरोबर होतीं पुढें तो बापास शरण गेला, तेव्हा दारा व औरंगजेब

हे दोघे शहाजहानचे ओलिस म्हणून, जहांगीरनें आपणाजवळ लाहोर येथे ठेवून घेतले. ( जून १६२६ ) ते तेथें नूरजहानच्या ताब्यात होते. पुढें जहांगीर वारल्यावर शहाजहान आग्र्यास येऊन सिंहासनारूढ झाला. तेव्हां आसफखानानें ह्या दोघां मुलास आग्र्यास आणिले. त्या प्रसंगीं आपले मुलगे परत भेटल्याबद्दल त्यांच्या आईस प्रेमाचें अतिशय भरतें आलें. स. १६२८ ता. २६ फेब्रुवारी रोजीं औरंगजेबाच्या रोजच्या खर्चाकरिता ५०० रुपये बांधून देण्यात आले.

त्याच वेळीं त्याच्या शिक्षणास सुरुवात झाली. पुढें प्रसिद्धीस आलेला सादुल्लाखान हा त्याचा पहिला शिक्षक होता. नंतर गिलानचा मीरमहंमद हाशीम हा औरंगजेब गादीवर बसेपर्यंत त्याजपाशीं शिक्षक म्हणून होता. औरंगजेबाची बुद्धि तरतरीत असून हरएक गोष्ट तो तावडतोब शिकत असे. त्याला पुष्कळ ग्रंथ व कवनें तोंडपाठ येत होतीं. आरबी, फारशी, हिंदुस्थानी ह्या भाषा त्यास उत्तम येत असून, हिंदी चांगली समजत होती. मध्यआशियांतील स्वारींत तो तेथची तुर्की भाषा शिकला. त्याचें अक्षर सुंदर होतें. मोगल बादशाहींत मुलांचीं अक्षरें घटविण्याची मेहनत विशेष करीत असत. औरंगजेबाचा धर्मग्रंथाचा अभ्यास दांडगा होता. दक्षिणच्या कारभारावर असतां, ठिकठिकाणच्या एकएक फकीर व विद्वान लोकांची त्यानें गांठ घेतली होती. कला मात्र तो कांहीं एक शिकला नाहीं. चित्रकला, गायन इत्यादिकास त्यानें पुढें रजाच दिली.

सन १६३३ च्या ता. २८ मे रोजीं आग्रा येथें यमुनेच्या वाळवंटात औरंगजेब घोड्यावर बसून हत्तींच्या टकरा पाहत असतां, एक मस्त हत्ती त्याजवर चाल करून आला, त्याबरोबर हातांतील भाला औरंगजेबानें हत्तीच्या सोंडेवर मारिला, तेव्हां हत्तीनें सोंडेचा एक तडाखा औरंगजेबाच्या घोड्यावर मारून त्यास खालीं पाडिलें. औरंगजेबानें लगेच उठून पायींपायींच पुनः हत्तीवर चाल केली. इतक्यात लोकांनीं धावत येऊन त्यास सोडविलें. त्याचा बाप शहाजहान किल्ल्यांतील अटारीवरून हा सर्व प्रकार पाहत होता. त्यास मुलाच्या ह्या शौर्याचें मोठें कौतुक वाटून, व त्याच्या जिवावरचें संकट टळलें असें समजून त्यानें लगेच बहादूर हा किताब व पुष्कळ बक्षिसें त्यास दिलीं. पुढें तीन दिवसांनीं समारंभाचा दिवस आला, तेव्हां त्याची सुवर्णतुला केली; आणि दोन लाख रुपये बक्षीस दिले. स. १६३४ त तो बापाबरोबर काश्मिरात गेला होता. त्याच वर्षाच्या अखेरीस त्यास बापानें दहा हजारांची मनसब देऊन दक्षिणच्या

कारभारावर पाठविण्याचें ठरविलें, आणि अनुभवासाठीं म्हणूनच स. १६३५ च्या सेप्टेंबरांत बुंदेल्यावरील स्वारींत मोठमोठ्या सरदारांच्या हाताखालीं त्यास देऊन त्याची रवानगी केली. हरएक बाबत औरंगजेबास विचारून व त्यास नीट समजावून नंतर ती अंमलांत आणावी असा त्या सरदारास बादशहाचा हुकूम होता. ही स्वारी चार महिन्यांत आटपली. मोगलांनीं बुंदेल्याची राजधानी ओर्च्छा काबीज केली, आणि राजा झुजारचा पाठलाग करून त्यास ठार मारिलें व त्याच्या बायका जनानखान्यांत नेल्या. तथापि हे बुंदेले सर्वस्वीं शरण आले नाहींत. कांहीं दिवसांनीं चंपतराय व त्याचा मुलगा छत्रसाल हे पराक्रमी निघाले. त्याची गोष्ट अन्यत्र येईल.

ता. १४ जुलै स. १६३६ रोजी औरंगजेबाची नेमणूक दक्षिणच्या कारभारावर झाली. पुढें अहमदनगरचें राज्य खालसा होऊन विजापूर गोवळकोंड्याचे सुलतान बादशहास शरण आले. या प्रसंगीं कुतुबानीं एक कोटि उत्पन्नाचा प्रांत व दोन कोटींचा ऐवज बादशहास मिळाला. नंतर औरंगजेबानें बागलाण प्रांत जिंकला. आठ वर्षें औरंगजेब दक्षिणच्या कारभारावर होता. तेवढ्या अवधींत तो चार वेळां आग्र्यास जाऊन बापास भेटला. त्याच्या गैरहजिरींत दक्षिणचा कारभार शाइस्तेखान पाहात असे. अहमदनगरच्या मुलखाची व्यवस्था लावणें व बागलाण प्रांत जिंकणें हीं दोन मोठीं कामें त्यानें या आठ वर्षांत केलीं.

ता. ७ मे स. १६३७ रोजी औरंगजेबाचें लग्न शहानवाजखानाची मुलगी दिलरास बानू बेगम हिच्याशीं झालें. इराणच्या राजकुटुंबांतील पुष्कळ पुरुष दिल्लीस मोगलांच्या पदरीं येऊन राहत असत, आणि तिकडील थोर कुलांशीं संबंध जोडून, आपल्या कुटुंबाचें महत्त्व वाढविण्याविषयीं दिल्लीचे बादशहा नेहमीं आतुर असत. मीर्झा मुजफर हुसेन नावाचा एक इराणी राजपुत्र अकबराचे नोकरींत होता. त्याचा धाकटा भाऊ मीर्झा रुस्तम ह्यानें जहांगीरपाशीं नोकरी केली. मीर्झा मुजफरची मुलगी शहाजहानास दिलेली होती, आणि रुस्तमच्या दोन मुली शहाजादा परवीझ व सुजा यांस दिलेल्या होत्या. रुस्तमचा मुलगा शहानवाजखान हा शहाजहानपाशीं मोठ्या हुद्द्याचा गृहस्थ होता. त्याची मुलगी दिलरास बानू बेगम औरंगजेबास करावयाची असा ठराव होऊन पुढें तें लग्न लवकरच झालें. पुढच्या वर्षी तिचीच बहीण शहाजादा मुराद यास

दिली. शहानवाजखानाची नात (मुलाची मुलगी) अजरम बानू ही पुढें औरंगजेबाचा मुलगा कामबक्ष यास देण्यात आली.

लग्न ठरलें तेंव्हां औरंगजेब दक्षिणेंत होता त्यास शहाजहानने मोठ्या ममतेचें पत्र पाठवून ताबडतोब आग्र्यास बोलाविलें. त्याप्रमाणें ता. १५ एप्रिल सन १६३७ रोजीं तो आग्र्यास दाखल झाला. दुसरे दिवशीं तो बापास भेटला; आणि ता. ८ मेचा मुहूर्त ज्योतिष्याच्या सल्ल्यानें लग्नासाठीं कायम करण्यांत आला ता. ७ रोजीं 'हेन्नाबंदी'चा म्हणजे नवऱ्यामुलाचे हातपाय हेन्नानें (मेंदीनें) रंगविण्याचा विधि झाला हत्तीवरून वधूकडून हा हेन्ना आला होता. हा विधि हिंदूंच्या हळदीसारखा आहे. हेन्नाबरोबर दागदागिने, पोषाख व बहुमोल नजराणेही आले होते हेन्नाचा विधि आटोपल्यावर वराचा दरबार झाला त्या वेळीं गाणें बजावणें चालू होतें. सर्व नजराणे मोठमोठ्या ताटांत घालून मांडलेले होते. बाहेर दारूकाम सुरू होतें रात्रीं मोठी मेजवानी झाली. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं लग्नसमारंभ झाला सूर्योदयापूर्वी चार तास म्हणजे पहाटे दोन वाजता विवाहकाल निश्चित झाला होता त्यापूर्वी बराच वेळ वराची स्वारी आग्र्याच्या किल्ल्यांत जाऊन, बापास वंदन करून वधूच्या घरीं जावयास निघाली. भाई मुराद व आसफखान हे नेहमीं वराबरोबर असत वरघोड्याची स्वारी फार मोठी होती सासऱ्यानें जावयाचा सत्कार उत्तम केला. शहाजहान बोटीतून एन वेळेस आला. नंतर लग्न लागलें वरानें वधूस चार लाखांचा ऐवज दिला. म्हणजे पुढेंमागें काडी मोडल्यास ही रक्कम तिला मिळावयाची होती. ता १४ मे रोजीं परत पोषाखाचा दरबार होऊन, सरकारांतून लोकांस पोषाख देण्यांत आले ह्या समारंभानंतर आग्र्यास तीन महिने राहून, औरंगजेब ता ४ सप्टेंबर रोजीं दक्षिणेंत आपल्या कारभारावर निघून गेला. हा कारभार त्यानें आठ वर्षें केला हें मागें आलेंच आहे

सन १६४४ त औरंगजेबाची चित्तवृत्ति एकदम विरक्त होऊन तो फकीर बनला. ह्याचीं कारणें अनेक सांगतात. बऱ्हाणपुर येथें त्याची मावशी होती, तिच्या भेटीस औरंगजेब गेला असता, हिराबाई म्हणून एक सुंदर तरुण स्त्री तिच्यापाशीं गाणारीण म्हणून होती, तिच्यावर औरंगजेबाचें मन बसलें. पुढें मोठ्या प्रयासानें औरंगजेबानें तिला मावशीच्या नवऱ्यापासून मागवून आपणापाशीं आणिलें. परंतु पुढें लवकरच ती मरण पावल्यामुळें तो विरक्त झाला.

दुसरें कारण असें आहे, कीं दाराशीं औरंगजेब मोठ्या चुरशीनें वागत असे अशा कारणानीं बापानें त्यास दक्षिणच्या कारभारावरून दूर करून रागानें त्याच्या नेमणुका वगैरे सर्व बंद केल्या तेव्हा आग्र्यास येऊन तो मोठ्या दु खानें दिवस कढूं लागला त्याच वेळीं त्याची बहीण जहानारा भाजली होती, ती बरी झाल्यावर तिनें बापाजवळ रदबदली करून त्याच्या नेमणुका पुन चालू करविल्या पुढें तारीख १६ फेब्रुवारी १६४५ रोजीं त्याची गुजराथच्या सुभ्यावर नेमणूक होऊन ती जानेवारी सन १६४७ पर्यंत चालली नंतर त्यास मध्यआशियातील स्वारीवर जावें लागलें गुजराथेंत दरवडेखोराचा उपद्रव अतिशय चालू होता म्हणून ज्यास्त फौज ठेवून व ठिकठिकाणीं बंदोबस्त करून त्यानें दरवडे साफ बंद केले ती त्याची चांगली कामगिरी ऐकून बापानें त्यास सालाचा साठ लाख रुपये तनखा करून दिला, आणि गुजराथचा कारभार शायिस्तेखानाच्या हवालीं करून कंदाहारच्या स्वारीकरितां लवकर निघून ये, असें त्यास लिहिलें त्याप्रमाणें २० जानेवारी १६४९ रोजीं तो लाहोरास जाऊन बापास भेटला

सन १६४९-५२ पर्यंत औरंगजेब मुलतानच्या सुभ्यावर होता ता १७ आगस्ट १६५२ रोजीं त्याची नेमणूक पुनरपि दक्षिणच्या सुभ्यावर झाली तेव्हापासूनच्या पांच वर्षांत मोठ्या धूर्ततेचें व सावधगिरीचें वर्तन ठेवून राज्यकारभारांतील हरएक बाबतीचा व लोकांचा अनुभव त्यानें मिळविला रात्रंदिवस श्रम करून फौज सुधारिली तेणेकरून शहाजहान आजारी पडला, त्यावेळीं इतर भावांच्या मानानें पुढील उपक्रमाविषयीं औरंगजेबाची तयारी परिपूर्ण होती

शहाजहानचें वय होत गेलें, तसतसें राज्यकारभाराकडे त्याचें दुर्लक्ष होऊन दाराच्या हातीं सर्व राज्यसूत्रें आलीं पैशाची व्यवस्था मात्र बादशहानें स्वत च्या हातीं ठेविली होती इतर मुलांनीं राज्यपद मिळविण्याच्या आशेनें आपआपल्या फौजा वाढविण्यास सुरुवात केली प्रांतांतील वसूल ते पाहिजे तसा खर्च करूं लागले सर्वांत औरंगजेबानें रचिलेला व्यूह फार खोल व भयंकर होता. दक्षिणेंत असतां मीर जुम्ला नामक एका कर्तृत्ववान पुरुषाशीं त्याची गांठ पडली

**मीर-जुम्ला**--याची हकीकत मागें गोवळकोंडा प्रकरणीं दिली आहे तिचें अनुसंधान ठेवावें हा जातीचा इराणी असून एका तेल्याचा मुलगा होता तो एका व्यापाऱ्याबरोबर हिंदुस्थानांत आला त्याचा इराणी बाणा त्याच्या

फार उपयोगी पडला; आणि त्यानें पुष्कळ वर्षे दक्षिणेंत राहून आपलें वजन वाढविलें. प्रथम त्यानें दिल्लीस बादशाही फौजेंत नोकरी धरिली; तेथें तो पुष्कळ वाढला. परंतु दाराचें व त्याचें वाकडें आल्यामुळें दिल्ली सोडून तो गोवळकोंड्यास गेला. तेथें त्यास प्रथम महसुलाचें काम मिळालें. त्याशिवाय त्याचा खासगी व्यापार चालूच होता. त्या योगानें त्यानें अपार संपत्ति मिळविली. पुढें गोवळकोंड्याच्या सुलतानास हस्तन्हेचे पदार्थ नजर करून त्यानें तेथली वजिरी मिळविली. गोवळकोंड्यास हिऱ्याच्या खाणी काढून त्यानें अपार पैसा संपादिला. हळू हळू त्यानें आपली फौज वाढविली, आणि सुलतानावर आपला वचक बसविला. लवकरच त्याच्याविषयीं कुत्बशहाच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला. शहाची मातुश्री व मीर-जुम्ला याजमध्यें फाजील स्नेह असल्याची शहास खबर कळल्यावरून, त्यानें त्यास कर्नाटकांत नवीन जिंकिलेल्या मुलखाच्या बंदोबस्तास पाठविलें. तिकडे गेल्यावर त्याच्या द्रव्यलोभास सीमाच राहिली नाहीं. हिऱ्याच्या खाणी खोदून, त्यानें उत्तमोत्तम हिरे स्वतःकरितां ठेविले, आणि कचरा सांपडेल तो सुलतानाकडे पाठविला. गोव्याच्या पोर्तुगीझ लोकांस हिरे देऊन त्याचें साह्य घेतलें. आणि तोफखान्यावर कुशल पोर्तुगीझ लोक ठेविले. हिंदूंचीं देवळें लुटून, व त्यास मारहाण करून धन मिळविलें. पाश्चात्य जव्हेरी टॅव्हर्नियर हा सन १६५२ त मीर-जुम्ला यास पेन्नार नदीच्या कांठीं गंडीकोट येथें भेटला होता. त्या वेळेस मीर-जुम्लानें गंडीकोट नुकतेंच काबीज केलें होतें. तेथील सोन्याचांदीच्या मूर्ती त्यानें घेऊन वितळविल्या. दहा फूट उंचीच्या सहा पितळेच्या मूर्ती त्यानें आटविण्याची खटपट चालवून त्याच्या तोफा करण्याचा त्याचा मनोदय होता; पण त्या वितळतना. ब्राह्मण मंत्रांनीं मूर्ति भारतात म्हणून त्या वितळत नाहींत, अशा समजुतीवर त्यानें अनेक ब्राह्मणास फाशीं चढविण्याची धमकी दिली, तरी त्या वितळल्या नाहींत. शेवटीं फ्रेंच कारागिरांनीं एक तोफ ओतली. पण ती उडवीत असतां फुटली. टॅव्हर्नियर म्हणतो, 'मीर-जुम्ला यास खरे हिरे मिळालेच नाहींत. बेरंगी खडे मात्र पुष्कळ सांपडले.' कर्नाटकचा कारभार त्यानें मन मानेल तसा केला. त्या त्याच्या कृत्यांनीं कुत्बशहास जास्तच त्वेष आला. आणि त्याचा मुलगा महंमद अमीर यास त्यानें वाईट रीतीनें वागविलें. तो प्रकार कुत्बशाहीच्या इतिहासांत आला आहे. मीर-जुम्ला यास परत बोलावून त्याचा नाश

करावा असे कुत्बशहाच्या मनांत आले परंतु ही बातमी शहाच्या आईनें मीर-जुम्ला यास कळविली त्यावर त्याने पुढील मजकुराचे पत्र औरंगजेबास लिहिलें ' हिंदुस्थानातील अत्यंत धनाढ्य राज्य घशात टाकण्याचा समय आला आहे मी मोगलाची नोकरी केली असून, त्याचेच हित साधण्याकरिता गोवळकोंड्याच्या राणीशी माझे संधान आहे कर्नाटकची फौज माझ्या मुठीत आहे माझा मुलगा महंमद अमीनखान ह्याच्या हाती गोवळकोंड्याची फौज आहे अशा संधीस तुम्ही गोवळकोंड्यावर स्वारी केल्यास राज्य तुमचे झाले म्हणून समजा ' हे पत्र वाचून औरंगजेबास अत्यानंद झाला. शियाधर्मी कुत्बशहाचा पाडाव करण्याची ही संधि त्यास आयतीच मिळाली गोवळकोंडे ताब्यात आल्यास सर्व हिंदुस्थानचे स्वामित्व बळकावण्यास त्यास विलंब लागणारा नव्हता. हा बेत सिद्धीस नेण्यास त्या दोघा कपटपटु पुरुषानी चमत्कारिक युक्ति केली. शहाजहान बादशहाचा वकील म्हणून औरंगजेबाने काही महत्त्वाच्या कामाची तडजोड करण्याच्या मिषाने भागानगरास जावे, आणि शहास भेटून एकदम कैद करावें असे ठरल ह्या कामी मीर-जुम्लाचा मुलगा औरंगजेबास मदत करणार होता त्याप्रमाणे औरंगजेब दौलताबाद सोडन भागानगरास गेला वाटेत त्याने अशी कंडी उठविली, की 'मी आपला मुलगा महंमद याचे शुजाच्या मुलीशी लग्न करण्याकरिता बगाल्यात जात आहे ' सुलतानच्या पदरी एक इमानी सरदार होता, त्याने आपल्या धन्यास वेळींच सावध केल्यामुळे, सुलतानाची ह्या पेचातून सुटका झाली तो जीव बचावून गोवळकोंड्याच्या किल्ल्यात पळून गेला तेव्हा औरंगजेब बुचकळ्यात पडला. मीर-जुम्ला त्यास येऊन मिळाला, (२० मार्च १६५६) दोघानी मिळून गोवळकोंड्यास वेढा दिला. इतक्यात दिल्लीहून बादशहाचा हुकूम आल्यामुळे औरंगजेबास वेढा उठवून परत जावे लागले वेढ्याचे काम २० फेब्रुवारी ते ३० मार्च पर्यंत चालले.

या वेळेस बादशहापाशीं दारा सर्व कारभार पहात होता. औरंगजेबाचे वरील खेळ पाहून त्यास धास्ती पडली गोवळकोंडा काबीज होताच बादशाही पद मिळविण्यास औरंगजेबास प्रयास पडावयाचे नाहीत, हे दारा जाणून होता. म्हणून गोवळकोंड्याहून एकदम परत यावें असा बादशाकडून सक्तीचा हुकूम मिळवून तो दाराने औरंगजेबाकडे पाठविला अजून योग्य संधि आली नाहीं, असें पाहून त्या कावेबाज औरंगजेबानें हा हुकूम पाळण्यास काकूं केलें नाहीं.

मुसलमानानें मुसलमानाशीं लढणें युक्त नाहीं, असें सांगून तो ता. ४-१०-१६५७ रोजीं परत गेला. त्यापूर्वी त्याने पुढील कलमाचा तह गोवळकोंड्याच्या शहापासून करून घेतला:—(१) कुत्बशहानें लढाईचा सर्व खर्च द्यावा:(२) आपली मुलगी औरंगजेबाचा पुत्र महंमद यास देऊन त्यास आपल्या पश्चात् कुत्बशाहीच्या तख्तावर बसवावें, आणि रामगड परगणा तीस आंदण द्यावा; (३) आपल्या राज्यांतील सर्व नाणीं शहाजहानच्या नांवानें पाडावीं: आणि (४) मीर-जुम्ला यास आपली सर्व फौज व दौलत घेऊन मर्जीस वाटेल तिकडे जाण्यास मोकळीक द्यावी. हीं कलमें कुत्बशहानें कबूल केलीं. शिवाय औरंगजेबास युद्धाचा खर्च मीर-जुम्लानें दिला. तिकडे आग्र्यास दाराचा कारभार पुष्कळ मंडळीस दुःसह झाला होता. त्याच्या हातांतली सत्ता वाढली असून युरोपियन लोकांशिवाय दुसऱ्या कोणावर त्याचा भरंवसा नव्हता. रजपूत राजाशीं तो फारच उद्दामपणानें वागे. महाबतखानास त्यानें दुखविलें, तेव्हां त्या बाणेदार वृद्ध सरदारानें लढण्याची तयारी केली. शहाजहानची पांचावर धारण बसली. त्यानें दारास स्वस्थ बसविलें. त्याचप्रमाणें दारानें जयसिंहाचा अपमान केला. 'तूं केवळ गवई, तुला दुसरें काय येतें?'. असे शब्द तो जयसिंहास बोलला. तो रजपूत सरदार हे शब्द कधीं विसरला नाहीं. मोठमोठ्या कामदारांस दारानें ठार मारल्याचा गवगवा झाला. त्यांनीं आपला पक्ष स्वीकारावा एतदर्थ त्यानें नाना उपाय केले. दक्षिणेंत औरंगजेब व मीर-जुम्ला हे स्नेही बनले असून, दोघांचेही दाराशीं वैर होतें. मीर-जुम्ला यानें शहाजहान बादशहास हिरे वगैरे पाठवून संतुष्ट केलें. त्यांतच कोहिनूर हिरा होता असें म्हणतात. पुढें शहाजहाननें मीर-जुम्ला यास फौज घेऊन विजापुरचें राज्य जिंकण्याची परवानगी दिली. औरंगजेबानें आपला प्रदेश सोडून जाऊं नये अशी दारानें तजवीज केली होती. परंतु औरंगजेबाचें व मीर-जुम्लाचें एकमत होण्यास विलंब लागला नाहीं. औरंगजेब त्यास म्हणाला, 'दारा दुष्ट असून, बादशहास गुलामाप्रमाणें वागवितो. आम्हां इतर मुलांशीं पितृत्वाचें नातें बादशहानें सोडून दिलें आहे. तर तुम्हीच मला पितृस्थानीं आहां.' ह्या भाषणास तो शूर सरदार भाळला; आणि त्यानें औरंगजेबाच्या साह्याचे होतील तितके प्रयत्न करण्याचें कबूल केलें. नंतर मीर-जुम्ला विजापुरच्या मुलखांत शिरला, आणि बेदरच्या किल्ल्यास वेढा दिला. औरंगजेब औरंगाबाद येथें स्वस्थ राहिला. खिडकी शहरास औरंगाबाद हें नांव त्यानें ह्याच वेळेस दिलें.

**४ राज्यपदाकरितां चार भावांचा झगडा**—अशा प्रकारे बादशहाचे चारही पुत्र आपापला पक्ष जोरात आणण्याचा प्रयत्न करीत असता, तारीख ६ सेप्टेंबर सन १६५७ रोजीं शहाजहान बादशहा अपस्मार वायूने एकाएकीं आजारी पडला विद्युल्लतेप्रमाणे ती बातमी सर्व राज्यात हा हा म्हणता पसरली संपूर्ण मोगल बादशाहींत राज्याच्या भावी व्यवस्थेविषयीं चळवळी सुरू झाल्या पुष्कळाचा समज बादशहा मरण पावला असाच झाला त्याच्या सर्व पुत्रानीं युद्धाची तयारी केली दरबारात त्याचीं पत्रे खेळू लागलीं दाराने आपली फौज अतोनात वाढविली त्याजबरोबर सामना करण्याकरिता शुजाने बंगाल्यात कडे-कोट तयारी चालविली बंगाल प्रांत सर्व राज्यात सधन होता शुजाने नाना उपाय करून अपार संपत्ति मिळविली होती तो जय्यत तयारीनिशीं दिल्लीवर चालून आला. रिकिबींत पाय ठेविताना त्यान शपथ वाहिली, कीं 'मारीन किंवा मरेन' दाराने बादशहास विषप्रयोग करून ठार मारिलें. अशी त्याने बाहेर कंडी पिकविली, आणि त्याला शासन करण्याच्या हेतूने आपण त्वरेने चालून आलो असें लोकात पसरविलें परंतु तो येऊन पोचण्यापूर्वीच बादशहाची प्रकृति सुधारत चालली तो येत आहे असें बादशहास कळताच, त्यान त्यास पुढें न येण्याविषयीं पत्र पाठविलें 'मी आता चागला बरा झालो, दाराचें काहीं कपट नाहीं,' वगैरे मजकुराचे पत्र बादशहाने शुजास पाठविलें परंतु हे पत्र लबाडीचें आहे, बादशहा खरोखरी फार आजारी आहे, अशी शुजास त्याच्या बातमीदाराकडून बातमी कळल्यामुळे तो मागे फिरला नाहीं दाराने त्याजवर फौज पाठविली तिजवर दाराचा वडील मुलगा सुलेमान हा मुख्य होता त्या फौजेत अफगाण व रजपूत असे दोन जातींचे लोक होते अफगाण लोकाचा पुढारी दलीलखान असून रजपुताचा मुख्य जयसिंह होता शुजाच्या फौजेत शिया धर्मी लोक असल्यामुळे त्याजबरोबर सामना करण्यास सुलेमानचे सुनी अफगाण लोक तरारले होते जयसिंह दाराने केलेला अपमान विसरला नव्हता म्हणून शुजाचा पाडाव करण्याची त्याची इच्छा नव्हती शिवाय कोणीकडून लढाईवर प्रकरण आणूं नये अशी शहाजहानचीही त्यास ताकीद होती जयसिंहाने त्यास पुढे न येण्याविषयीं सामोपचाराचे पत्र लिहिलें शुजाने जबाब पाठविला, कीं 'तुम्ही म्हणता त्यापेक्षा मी जाण्यास तयार आहें परंतु मी अगोदर परत फिरल्यास भिऊन पळालों असें लोक म्हणतील याकरितां

बादशाही फौजेनें प्रथम परत जावें.' असे करण्यांत शुजाचा हेतु लबाडीचा आहे हें जयसिंह समजून होता; तरी तो सावधगिरी ठेवून परत फिरला. इतक्यांत शुजानें त्या फौजेवर मागून एकाएकीं येऊन छापा घातला. जयसिंह तयारीनें होताच. ता. १४ फेब्रुवारी स. १६५८ रोजीं बनारसच्या समोर बहादूरपुर येथें त्यानें शुजाच्या फौजेवर असा निकराचा हल्ला केला, कीं त्यास बंगाल्यांत पळून जाणें भाग पडलें. त्याच्या उत्कृष्ट सैन्याची दाणादाण झाली. पुष्कळ लोक युद्धसामुग्रीसह जयसिंहाच्या हातीं पडले. मोंगीरपर्यंत जयसिंहानें शुजाचा पाठलाग केला.

इकडे असा प्रकार चालू असतां दक्षिणेंत औरंगजेब स्वस्थ बसला नव्हता. आरंभीं आपण स्वस्थ बसून परभारें सर्व भावांचा नाश व्हावा, असें त्यानें आपलें वर्तन ठेविलें. मुराद गुजराथेंतून दिल्लीवर जाण्याच्या तयारींत आहे असें त्यास कळलें. तेव्हां औरंगजेबानें त्यास खालील आशयाचें पत्र लिहिलें.'मुरादसाहेब, मला राज्याचा किती कंटाळा आहे हें तुम्हांस माहीत आहेच. फकीर बनून या नाशवंत देहाचें सार्थक करून घ्यावें, असें माझ्या मनांत आहे. दारा व शुजा हे राज्याच्या अगदीं नालायक आहेत. दारा यास आपल्या धर्माचा अभिमान मुळींच वाटत नाहीं. शुजाही पाखंडी आहे. इराणचा शियाधर्म त्यास आवडतो. खऱ्या मुसलमानी धर्माचा अभिमान काय तो तुम्हांसच आहे. म्हणून राज्यभार वाहण्यास तुमच्यासारखा लायक मनुष्य मला दुसरा दिसत नाहीं. कसेंही करून हें राज्य तुम्हांस मिळवून द्यावें, एवढीच माझी इच्छा आहे. तसें झाल्यावर माझा एक मनोदय आहे,तो मात्र तुम्हीं पूर्ण केला पाहिजे. मक्केस जाऊन पैगंबराच्या चरणापाशीं कालक्रमण करण्यास तुम्हीं मला मोकळीक द्यावी.' ही मसलत कशी तडीस न्यावयाची याजबद्दलही औरंगजेबानें मुराद यास आपला अभिप्राय कळविला. पत्र पोंचतांच तो बेअक्कल मुराद औरंगजेबाच्या कपटजालांत पूर्णपणें सांपडला. त्याच्या अनेक हितचिंतकांनीं औरंगजेबाच्या विश्वासघातकी वर्तनाचें पुष्कळ स्पष्टीकरण केलें; पण तें त्यास रुचलें नाहीं. 'मी तुम्हांस आपल्या पित्याप्रमाणें समजतों,' असा मुरादनें औरंगजेबास जबाब लिहिला. औरंगजेबानें सैन्याची जमवाजमव करून मीर-जुम्ला यास विजापुरांतून परत बोलाविलें. परंतु मीर-जुम्ला याचीं बायकामाणसें दिल्लीस दाराचे ताब्यांत ओलीस म्हणून दिलेलीं होतीं. तेव्हां त्यास उघडपणें औरंगजेबास मिळतां येईना.

म्हणून त्या उभयतांनीं एक विलक्षण युक्ति केली मीर-जुम्लाच्या फौजेतील मंडळींकडून बंड करवून त्यास पकडून औरंगजेबाचे स्वाधीन केलें औरंगजेबाने त्यास औरंगाबादचे किल्ल्यावर कैदेत ठेविले हें वर्तमान दिल्लीस समजल्यावर दारास वाईट वाटले पण बिचारा करतो काय? इतकी तजवीज झाल्यावर औरंगजेब मुराद यास मिळण्याकरितां दक्षिण देश सोडून निघाला. निघतेवेळीं त्याने कुराणाचें पुस्तक हृदयाशीं लावून सर्वांसमक्ष पुन: एकदा आपल्या कपटपर्ण उद्देशाचे प्रदर्शन केलें आणि बोलला, 'दाराने ह्या कुराणाचा अपमान केला आहे, तो मी भरून काढणार.' शहाजहान मरण पावला आहे असें त्याने सर्वांस जाहीर केले मुरादास तो पत्रें पाठवी, त्यात 'तुम्ही माझे सर्वस्वी धनी आहा, असे तो सागे तो आपली फौज घेऊन निघाला. त्याची व मुरादच्या फौजेची माळव्यांत देपाळपुर येथें भेट झाली प्रथमदर्शनीं हत्तीवरून उतरून त्याने मुरादपुढें साष्टाग नमस्कार घातला त्या दिवसापासून मुराद यास तो बादशहाप्रमाणे मान देऊं लागला प्रत्येक बाबतींत तो मुरादचा हुकूम विचारीत असे एकत्र झालेल्या दोनही फौजा रजपुतान्यांतून पुढे चालल्या

हे वर्तमान ऐकून दाराची पाचावर धारण बसली त्याचा मुलगा सुलेमान ह्यानें शुजाचा पराजय केला, तेव्हा त्यास अत्यानंद झाला होता, पण ह्या वेळीं तो घाबरला 'शहाजहान जिवंत आहे, त्याचा हुकूम तोडून तुम्हीं पुढें याल तर सांभाळून राहा.' असें दारानें त्या दोघा भावांस लिहून पाठविलें, पण त्यांनीं तें जुमानिलें नाहीं शहाजहान जिवंत आहे, हें ऐकून मुराद कचरूं लागला. पण दाराचें सागणें खोटें आहे, अशी त्याची औरंगजेबानें खात्री केली, आणि जरी जिवंत असला तरी हरकत नाहीं आपण त्यापुढे जाऊन क्षमा मागूं व दाराची खोड मोडूं पण आता परत गेल्यास दारा राज्यपद बळकावील, आणि आपणा सर्वांचा सूड घेईल, इत्यादि गोष्टी सांगून त्यानें मुरादची समजूत केली. त्या योगें मुरादास धीर आला तशात बाहेर सर्व लोकांचा समज शहाजहान मेला असाच झाला होता आग्रा येथें शहाजहान लोकाच्या दृष्टीस पडला. तरी तें बादशहाचें भूत आहे असें लोकांस वाटे दोघे मुलगे दिल्लीवर चालून येत आहेत असें ऐकून, बादशहानें त्याजवर आपली फौज पाठविली. तो स्वतः फौजेबरोबर येऊन आपण जिवंत आहों अशी लोकांची खातरी करणार होता.

तसें झालें असतें, तर मुरादानें औरंगजेबास सोडिलें असतें. पण दरबारांत औरंगजेबाचे कित्येक साथीदार होते, त्यांनीं बादशहास बाहेर येऊं दिलें नाहीं. खलीलखान म्हणून औरंगजेबाचा एक स्नेही होता. त्याच्या बायकोवर बादशहाची दृष्टी असल्याबद्दल बोभाटा असून तो हें वैर उगविण्याच्या बेतांत होता. त्यानें शहाजहानास कळविलें, की ' आपली तब्यत अगदीं अशक्त झाली आहे. फौजेबरोबर प्रवास करण्यांत आपला निभाव लागणार नाहीं; तुम्ही स्वतः गेल्यानें मुलांच्या मनांतील अंदेशा जाणार तर नाहींच,पण ते उद्धटपणें प्रत्यक्ष बादशहाशीं लढण्यासही मागेंपुढें पाहणार नाहींत. खलीलखानानें आपली बायको व बेगमसाहेब त्यांच्या मार्फतीनें शहाजहानास आग्र्यास ठेवून घेतलें. अर्थात् दाराही बापास सोडून बाहेर आला नाहीं. सुलेमान शुजाचा पाठलाग करीत होता, तोही वेळेवर परत येऊं शकला नाहीं तेव्हां दारानें कासिमखान यास मुसलमानी फौजेचें व जशवंतसिंह यास रजपूत फौजेचें आधिपत्य देऊन आपल्या भावावर पाठविलें. कासिमखानाचें दाराशीं नीट नसून तो अंतस्थपणें औरंगजेबास मिळण्यास उत्सुक होता. औरंगजेब व मुराद यांची फौज मांडवगडाहून उज्जनीकडे येत होती. त्याचा रस्ता एका मोठ्या खिंडींतून असून दोनही बाजूंस मोठमोठे पर्वत होते. बादशाही फौजेनें ही खिंड अडविली असती, तर बंडखोर शहाजाद्यांची फौज पुढें येऊं शकली नसती. उज्जनीच्या दक्षिणेस दहा मैल धरमतपुर म्हणजे हल्लींचें फत्याबाद येथें उभय सैन्यांची गांठ पडली, (ता. १५ एप्रिल सन १६५८ ). कासिमखानानें ऐन लढाईच्या प्रसंगीं माघार घेतली; तेव्हां एकट्या जशवंतसिंहाच्या रजपुतांवर सगळें लढणें पडलें. शिवाय औरंगजेबाच्या फौजेस विश्रांति घेण्यास कासिमखानानें सवड दिली. बहुतेक रजपूत लोक आपल्या ब्रीदास अनुसरून रणांगणीं पतन पावले. तेव्हां जशवंतसिंह शत्रूची फळी फोडून आपल्या राज्यांत जोधपुराकडे निघून गेला. या प्रसंगीं औरंगजेबास तोफा व सामानसुमान अतिशय मिळालें कासिमखान औरंगजेबाच्या मुनी फौजेशीं लढेना, याचें कारण तो स्वतः सुनी अगाण होता असें म्हणतात.

हें पराजयाचें वर्तमान ऐकून दारा रागानें वेडा झाला. त्यानें आपल्या फौजेच्या अधिपतींवर दात ओठ खाल्ले मीर-जुम्लास त्यानें वाक्प्रहार केला. ' तो दुष्ट आपली फौज घेऊन औरंगजेबास मिळाला नसता, तर आज हा प्रसंग येताना,' असें दारा म्हणाला. त्याची बायकामुलें ठार मारण्याचा दारानें हुकूम

सोडिला या योगाने मीर-जुम्ला आयताच औरगजेबास मिळेल असे सागून शहाजहानने तो हुकूम रद्द करविला मुराद व औरगजेब विजयोत्सव करीत आग्र्याकडे येऊं लागले दाराचे शत्रु व औरंगजेबाचे मित्र भराभर त्यास जाऊन मिळाले शहाजहान गर्भगळित झाला वृद्धावस्था, तब्यतीची अस्वस्थता, मुलाचे तंटे निवारण करण्याचे असामर्थ्य, इत्यादि विवचनानीं तो विव्हळ होऊन केवळ मृत्युवश होऊन पडला. आणि तशा संकटावस्थेत काही सुचेनासे होऊन, त्यान सर्व राज्यकारभाराची अनियंत्रित लगाम दाराच्या स्वाधीन केली तेणेंकरून त्याने आपल्या कुलाचा एकदम नाश करून घेतला लोकास त्याने सागितले, कीं 'इत पर दाराचे हुकूम पाळावे' ह्या प्रकाराने सर्वच गोधळ झाला शहाजहान-बद्दल पुष्कळाच मनात प्रेमबुद्धि होती पण दाराचा दरारा त्यास सहन होत नव्हता अशा प्रसंगीं दारा डगमगला नाहीं त्यान एकदम एक लाख फौज जमविली, बादशाही खजिना खुला करून लोकास खुष केले. त्याचप्रमाणे फौजत पुष्कळ युरोपियन लोकाची भरती केली येणप्रमाणे तो मोठ्या वेगान आपल्या भावावर चालून आला परतु त्याचे सल्लागार विश्वासघातकी होते. त्याचा दुय्यम खलीलखान हा त्याचा नाश करण्याची संधि पाहत होता फौजेत शिस्त बरोबर नव्हती कवाइत शिकून तयार झालेली फौज सुलेमानबरोबर बंगाल्यात होती दाराच्या हाताखालचे सर्व लोक बिथरले होते, तरी रजपुत आपल्या इमानास जागत होते रजपुताचा मुख्य रामसिह होता सुलेमानच्या येण्याची दाराने काहीं वेळ वाट पाहिली, शेवटीं वेळ निघेनासा होऊन तो तसाच डोळे-झाक करून पुढे चालला चंबळ नदीच्या काठीं त्याच्या फौजेनें तळ दिला दुसऱ्या बाजूस बडखोर फौज उतरली औरंगजेबाने संधि सापडताच आपल्या सर्व लोकास नदीपलीकडे जाण्याची इशारत दिली इतक्यावरच तो स्वस्थ बसला नाहीं बुंदेलखंडचा राजा चंपतराय याजशीं त्यान संधान बाधिले ह्या चंपतरायाची हकीकत पुढ औरंगजेबाच्या कार्किर्दीत येणार आहे. शहाजहाननें चंपतरायास जिकण्याचे पुष्कळ प्रयत्न केले पण ते सर्व फुकट गेले होते चंपत-रायाने ह्या प्रसंगीं औरगजेबास आपल्या मुलखातून जाण्यास वाट दिली त्या-बरोबर दारास फसवून रात्रीच्या वेळीं औरंगजेबाची फौज चंपतरायाच्या हद्दींत चंबळ नदी उतरून पलीकडे गेली दारास ही बातमी समजताच त्याने औरंग-जेबास अडविण्यासाठीं खलीलखानास पाठविले खलीलखानाच्या विश्वासघातास

सीमाच नव्हती. त्यानें औरंगजेबास स्वस्थपणें नदीअलीकडे येऊं दिलें, आणि परत येऊन दारास कळविलें, कीं तो मजबूद ठाणें धरून बसला आहे. शेवटीं दाराच्या फौजेवर बंडखोर फौजेनें हल्ला केला. त्यात सुद्धा औरंगजेब व खलील-खान त्यानीं सर्व गोष्टी ठरवून ठेविल्या होत्या. दारा बिचारा भोळा; तो खलील-खानाच्या भूलथापा ऐकत स्वस्थ राहिला लढाईचें तोंड लागलें, तेव्हां दारा व औरंगजेब, खलीलखान व महंमद, आणि रामसिंह व मुराद, अशा सरदाराचा सामना झाला त्या प्रसंगीं दाराने असा काहीं विलक्षण पराक्रम केला, कीं औरंगजेब त्याच्या हातात कैदी होऊन पडावयाचा, परंतु इतक्यांत खलील-खानानें आपण संकटात आहों असें दाखवून दारास आपल्या मदतीस बोला-विलें आपलें काम टाकून दारा त्याच्या मदतीस गेला. तेणेंकरून सर्व पारडें फिरलें तिकडे मुराद आणि रामसिंह यांच्या सामन्यांत मुरादच्या हत्तीनें रामसिंहास पकडून ठार मारिलें. त्यासरसे सर्व रजपूत रणांगण सोडून गेले. तरी दाराची अजून सरशी होती. इतक्यांत खलीलखानानें त्यास सांगितलें, 'शत्रूची दाणादाण उडाली आहे, तर आता हत्तीवरून उतरून घोड्यावरून त्याचा पाठलाग करा ' हा गुरुमंत्र त्या बिचाऱ्यानें तावडतोब अमलांत आणिला. मग काय विचारावयाचें आहे? दाराचे लोक आपला धनी मेला, असें समजून सैरावैरा पळून गेले: आणि त्या धांदलींत खलीलखान तीसहजार फौज घेऊन औरंगजेबास जाऊन मिळाला ही चंबळ नदीवरील सामूगडची लढाई तारीख २९ मे सन १६५८ रोजी सकाळीं सात वाजतां सुरू झाली: आणि सायंकाळीं पांच वाजतां दारा आग्र्याकडे पळून गेला. सामूगड आग्र्याच्या दक्षिणेस असून त्यास हल्लीं फत्याबाद हें नाव आहे दारा आग्रा येथें थांबला नाहीं. तो तडक दिल्लीस गेला. तेथच्या अधिकाऱ्यानें त्यास किल्ल्यात घेतलें नाहीं, म्हणून तो लाहोरास जाऊन तेथें फौजेची जमवाजमव करूं लागला. बापानें त्यास दहा उंट भरून मोहोरा व रुपये पाठविले.

त्या विजयानें औरंगजेबाच्या मनातील राज्यप्राप्तीची हाव तृप्त होण्याचा संभव दिसूं लागला खलीलुल्लाखानास तो मुरादापुढें घेऊन जाऊन बोलला, 'आजचा जय मिळण्यास मुख्य कारण तुमचें धाडस व ह्या शूर मित्राचें इमान होय. जय मिळाल्याबद्दल मीं परमेश्वराची प्रार्थना केलीच आहे. आतां मी आपल्या धन्यापुढें साष्टांग नमस्कार घालितों. ह्या इमानी खलीलुल्लाखानावर

तुम्ही सर्व विश्वास टाका तुम्हास राज्यपद प्राप्त होण्यास आणखी एका विजयाची जरूर आहे तेवढे झाले म्हणजे मी ईश्वरसेवेत कालक्षेप करण्यास मोकळा होईन ' असे तो बोलला, तरी त्याचे अंतर्यामी निराळाच प्रकार चालला होता मुरादची गुह्य व्यंगे आपणास कळावीं. एतदर्थ त्याने खलीलुल्लाखानास त्याजपाशीं ठेविले सर्व राज्यातील अधिकाऱ्यास औरंगजेब रात्रदिवस पत्रे पाठवून पुढील घाट ठरवीत होता मुलेमानबरोबर दलीलखान व जयसिंह हे सरदार बंगाल्याकडे होते त्या दोघासही औरंगजेबाने पत्रे पाठवून सुलेमान यास कैद करावे अगर ठार मारावे असे सुचविले परंतु ते दोघेही सरदार इमानी असल्यामुळे त्याच्याने ती गोष्ट झाली नाहीं उलट त्यानीं सुलेमान यास दाराच्या पराभवाचे वर्तमान सागून त्यास काश्मिराकडे पळून जाण्यास सागितले आणि आपण राजधानीकडे परत आले सामूगडची लढाई झाल्यावर औरंगजेब व मुराद आग्र्यास गेले आणि शहराबाहेर बागात आपली छावणी ठेवून त्यानीं बादशहाकडे खालील निरोप पाठविला 'तुमच्या मुलानीं राज्य घेण्याकरिता किंवा तुमची अवज्ञा करण्याकरिता हें युद्ध केले आहे असे नाहीं आपला बाप बादशहा याचा मान कसा ठेवावा, हे त्यास चागले समजते दाराने तुम्हाला ठार मारिले असे ऐकल्यावरून, त्याचा सूड घेण्याकरिता त्यास ही उठाठेव करावी लागली ईशकृपेने आपण जिवत आहा ही आनंदाची गोष्ट आहे तर आपल्या मुलामध्ये इमानी व नितीनिष्ठ कोण आणि लबाड कोण याचा निर्णय आपणच केला पाहिजे ' शहाजहान काहीं कमी कपटी नव्हता त्याने वरच्या इतकेच लबाडीचे उत्तर आपल्या मुलास पाठविले औरंगजेब व मुराद याजवर माझी खरी प्रीति आहे त्याच्या अवज्ञेने ती कमी झाली नाही तर त्यानीं आपल्या फौजेस रजा देऊन, माझ्याजवळ यावे व क्षमा मागावी, म्हणजे माझी कृपा केवढी आहे हे त्यास कळून येईल ' पण औरंगजेब काहीं भोळा नव्हता त्याची बहीण रोशनारा हिने त्यास कळविले, कीं 'तुम्ही राजवाड्यात याल तर तातार स्त्रियाच्या हातून तुमचा खून होईल ' औरंगजेबानेही कपटास कपट लढविले बापाच्या भेटीस जाण्याचे जाहीर करून ती गोष्ट त्याने हळूहळू लाबणीवर टाकिली। तेवढ्या अवकाशात दरबारचे सर्व लोक त्याने वश करून घेतले, आणि आपला मुलगा महंमद याजकरवीं राजवाड्यास वेढा घातला शहाजहानने वाड्याच्या शिखरावरून खालचा प्रकार पाहिला महमदाने वाड्यास तोफा लाविलेल्या

त्याच्या दृष्टीस पडल्या. औरंगजेबानें बापाच्या मनांतील संशयनिवृत्ति करण्याकरितां निरोप पाठविला, कीं मी आजारी आहे, बरा झाल्यावर आपल्या भेटीस येईन, तोंवर मी आपल्या तर्फे महंमद यास आपणाकडे जाऊन क्षमा मागण्यास सांगितलें आहे. शहाजहाननें नातवाची भेट घेतली त्याजला त्यानें भारी किंमतीचे नजराणे दिले. त्या योगें औरंगजेबास फसविण्याचा त्याचा इरादा होता. महंमद वाड्यांत शिरला. सहज वश होण्याजोगे होते तेवढे लोक त्यानें आपणाकडे करून घेतले. अनेकांस तलवारीनें कापून काढिलें. त्यांत राजवाड्यांतील पुष्कळ नोकर प्राणास मुकले. पुढें बादशहासमीप तो गेला. तेथें तार्तार बायांचा खडा पहारा उभा होता. महंमदानें न डगमगतां खालील मजकूर बादशहास कळविला. 'तुमची आतां वृद्धावस्था झाली, म्हणून तुम्ही राज्य करण्यास नालायक आहां. आतां तुम्ही जनानखाना बरोबर घेऊन बागांत जाऊन राहा, आणि राहिलेलें आयुष्य शांतपणें घालवा. तुम्हांस मोकळ्या हवेंत राहूं देण्यास आम्ही तयार आहों, परंतु तक्तावर बसण्यास तुम्ही योग्य नाहीं. तें तुम्हीं आतां आपल्या मुलाच्या हवालीं केलें पाहिजे.' तार्तार बायांनीं गिल्ला केला, पण महंमद त्यांजला हार जाणारा नव्हता. शहाजहानच्याभोंवतीं बायकांचा पहारा होता. त्यानें पुन्हा एकवार महंमदास आपल्या भेटीस बोलावलें, आणि त्यास म्हणाला, 'बाबा रे माझ्या मुलांनीं माझें राज्य हिराऊन घेतलें. आतां माझी भिस्त तुझ्यावर आहे. हें राज्य तूंच घे. तूंच बादशहा होऊन या वृद्ध आजोबाचा बोज राख. तुझ्या हातांत फौज आहे. आग्रा तुझ्या ताब्यांत आहे. औरंगजेबाचा पक्ष तूं सोडून दे. ज्यानें आपल्या बापाचा अपमान केला, तो आपल्या मुलाचाही मान ठेवणार नाहीं.' महंमदानें क्षणभर विचार केला. आजोबापेक्षां त्यास बापाची भीति जास्त होती. म्हणून तो त्या लालुचीस भुलला नाहीं. वृद्ध आजोबाकडून त्यानें सर्व राजवाड्याच्या किल्ल्या बलात्कारानें आपणाकडे घेतल्या. तेव्हांपासून औरंगजेब सर्व राज्याचा धनी झाला. त्यानें जिकडे तिकडे आपले पहारे बसविले. आग्र्याच्या किल्ल्यांतच त्यास औरंगजेबानें कैदेंत ठेविलें. इतःपर शहाजहानचें वर्तन बाहेरच्या लोकांस कळेनासें झालें. ही त्या बादशहाची स्थिति पाहून दरबारच्या कित्येक मंडळीस त्याचा कळवळा आला. पण शहाजहाननें लिहिलेलें एक पत्र बाहेर काढून औरंगजेबानें लोकांचें सांत्वन केलें. तें पत्र खरें होतें की बनावट होतें, हें कधींही कळून आलें नाहीं. तें दाराच्या

नावचें होतें त्यात असा मजकूर होता, की 'मुराद व औरंगजेब हे वाटेंत यावयाचे आहेत त्या दोघांनाही ठार करण्याची मीं तजवीज केला आहे तर तुम्हीं एकदम निघून आग्र्यास यावें औरंगजेब वाड्यास वेढा घालीत असता त्यास हें पत्र देण्यात आलें शहाजहानानें असें पत्र लिहिणें असंभवनीय नाहीं, किंवा औरंगजेबाची तरी ही लबाडी नसेल असेंही म्हणता येणार नाहीं दोघेही जशास तसेंच होते कसेंही असलें तरी त्याचा परिणाम व्हावयाचा तो झाला शहाजहानास सर्व लोक दूषण देऊं लागले, आणि असा गुप्त बेत पकडिल्याबद्दल औरंगजेबाची वाखाणणी करूं लागले

शहाजहान किल्ल्यात राहिल्यामुळे औरंगजेबानें तूर्त आपलें वास्तव्य दाराच्या वाड्यात केलें पुढें त्या दोघा भावांनी आपल्या मर्जीप्रमाणें सर्व राज्याची व्यवस्था केली राज्यांतील मोठमोठ्या जागा त्यानीं आपल्या आप्त मंडळीस दिल्या त्याचा मामा आसफखानाचा मुलगा शायिस्ताखान यास त्यानें आग्र्याचा सुभेदार नेमिलें, प्रत्येक हुकूम दोघांच्या नावानें सुटूं लागला आपल्या साह्यकर्त्यास त्यानीं मोठमोठीं इनामें दिलीं ह्याप्रमाणें सर्वत्र व्यवस्था झाल्यावर दाराचा पाठलाग करण्याचा त्यानीं विचार चालविला मुरादच्या स्नेह्यानीं त्यास सांगितलें, की तुम्ही औरंगजेबाबरोबर आग्रा सोडून बाहेर जाऊं नये तुमची येथेंच फार जरूर आहे तुमचा घात करण्याचा विचार औरंगजेबानें केला आहे, असें आम्हांस खात्रीलायक समजतें परंतु त्या वेड्या पोरानें तो उपदेश ऐकला नाहीं औरंगजेबानें त्यास अगदीं भारून टाकिलें होतें तो भावाबरोबर दिल्लीकडे गेला त्यांच्या फौजेचा तळ मथुरा येथें पडला यमुनेच्या दोन काठावर दोघा शहाजाद्यांच्या फौजा उतरल्या मध्यें पूल असून त्यावरून दोघामध्यें व्यवहार चालत असे पूर्वीच्या सुलतानानीं मथुरा येथें टेकडीवर एक भव्य मशीद बांधिली होती त्या मशिदीसमोर मुरादचा राज्यारोहणविधि करण्याची कडेकोट तयारी चालली औरंगजेब दररोज सकाळीं व सायंकाळीं मुरादास जाऊन भेटे, त्या वेळीं राज्याभिषेकाशिवाय दुसरी गोष्ट तो बोलत नसे पण कांहींना कांहीं सबब सांगून हा समारंभ उरकण्याचें काम त्यानें लांबणीवर टाकिलें मुराद स्वस्थपणें वाट पाहत होता ह्या अवकाशात त्या दोन फौजात विलक्षण तफावत दिसून येत होती मुरादचें सैन्य नाना प्रकारचे विलास करण्यांत निमग्न होतें सर्व अमल-

दार खाऊन पिऊन आनंद करीत होते. परंतु औरंगजेबाकडे निराळा प्रकार दिसत होता. परमेश्वराची आराधना करून ईश्वरभजनीं लीन झालेल्या आपल्या धन्याचें कल्याण इच्छिण्यात, त्याच्या लोकांचा वेळ जाई. ' औरंगजेबच बादशहा होईल तर किती चांगलें होईल ! ' अशा चिंतनांत ते निमग्न असत. शेवटीं मुरादच्या राज्याभिषेकाचा दिवस मुकर झाला. मशिदीपुढें तयार केलेल्या एका भव्य रंगपीठावर आरोहण करून राज्यांतील मुख्य काजी,-सरन्यायाधीश, याच्या हस्तें बादशाही पोशाख तो स्वीकारणार होता. समारंभाच्या विलक्षण थाटानें मुरादचे डोळे इतके दिपून गेले, कीं ह्यांत कांहीं कपट असेल अशी त्यास शंका सुद्धां आली नाहीं. समारंभाचे आदले दिवशीं औरंगजेबानें आपण आजारी असल्याचें ढोंग केलें, आणि मुरादास शकुन पाहण्यासाठीं आपल्या तंबूंत बोलाविलें. शहा अब्बास नावाचा मुरादचा एक विश्वासु नोकर होता, त्यानें मुराद यास नानाप्रकारें समजावून सांगितलें, कीं ' तुम्ही ह्या वेळीं औरंगजेबाकडे जाऊं नये. ' त्यानें तें ऐकिलें नाहीं. त्याजबरोबर शहा अब्बासही गेला. रस्त्यांत पुष्कळांनीं मुरादचा निषेध केला, पण त्या सर्वांचा त्यानें धिक्कार केला. औरंगजेबाच्या छावणींत गेल्यावर मुख्य काजीनें त्यास सन्मानपूर्वक आंत आणिलें. त्या प्रसंगीं औरंगजेबानें मुरादचा असा विलक्षण सत्कार केला, कीं कांहीं पुसूं नये. मेजवानीची तयारी झाली. ह्या प्रसंगीं मोकळे मनानें मद्यपान करण्याची औरंगजेबानें सर्वांस परवानगी दिली. औरंगजेब स्वतः कधीं मद्यास शिवत नसे, आणि दुसऱ्यास तसें करूं देत नसे. मुराद व औरंगजेब असे दोघेच एका तंबूंत भोजनास बसले. मुरादच्या सर्व साथीदारास औरंगजेबाच्या मंडळींनीं दुसऱ्या तंबूंत मेजवानीस नेलें. शहा अब्बासनें मात्र मुराद यास सोडिलें नाहीं. भोजनोत्तर नानातऱ्हेचे खेळ वगैरे झाले. औरंगजेबानें मद्यास स्पर्श केला नाहीं. मुरादनें मात्र कांहीं सुमार ठेविला नाहीं. तो बेशुद्ध पडला, तेव्हां शहा अब्बासनें त्यास जवळच्या तंबूंत नेलें, आणि त्यास बिछान्यावर निजवून आपण पायथ्याशीं बसला. इतक्यांत औरंगजेब आपला लहान मुलगा अज्जम यास हातांत घेऊन मुरादच्या तंबूंत आला, आणि त्या मुलास रंजविण्याच्या मिषानें मुरादजवळचा खंजीर, त्यास जागे केल्याशिवाय, घेऊन येण्यास त्या मुलास सांगितलें. मुलानें तें काम केलें. लगेच औरंगजेबाचे सहा पहारेकरी बिड्या घेऊन तंबूंत शिरले. मुराद जागा होऊन ओरडूं लागला.

शिपायांनीं त्याचें तोंड दाबून त्यास पकडिलें. औरंगजेब झटदिशीं पुढें होऊन मोठ्या गंभीर स्वरानें म्हणाला "मुसलमानी कायद्याप्रमाणें मद्यप्राशन करणारा मनुष्य पातकी होय. तो राज्य करण्याच्या लायक नाहीं. मुराद यास बेड्या घालून घेऊन चला." मुराद व शहा अब्बास यास निरनिराळ्या हत्तींवर बांधून ते लोक घेऊन गेले. (जून २३ स. १६५८). मुरादनें 'कुराणावर हात ठेवून तूं शपथा घेतल्या त्या ह्याच काय !' एवढेच शब्द उच्चारिले. मुराद कैद झाल्याचें वर्तमान पुष्कळ वेळ कोणास कळलें सुद्धां नाहीं. औरंगजेबाच्या तंबूंत वाद्यांचा गजर चालूच होता. दुसऱ्या दिवशीं मशिदीसमोरच्या मैदानांत मुरादचा राज्याभिषेकविधि पाहण्याकरितां सर्व लष्कर जमा झालें. सर्व लोक मुरादची मार्गप्रतीक्षा करीत होते. औरंगजेबाच्या निवडक स्वारांनीं सभोंवार वेढा घातला. इतक्यांत 'औरंगजेब बादशहाचा जयजयकार असो' असे चोपदाराचे शब्द सर्वांस ऐकू आले. लष्करच्या लोकांनींही तेच शब्द पुनः पुनः उच्चारिले. त्यासरसा औरंगजेब समोर येऊन क्षणभर सिंहासनावर बसला, आणि लगेच निघून गेला. त्याजबद्दल कोणीं तक्रार सुद्धां केली नाहीं. मुरादच्या कित्येक लोकांनीं गवगवा केला. त्यास औरंगजेबानें लगेच जागच्याजागीं बसविलें. पुढें त्यानें मुरादास ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत कैदेंत टाकिलें. काहीं काळ लोटून दारा व शुजा ह्यांची वाट लाविल्यावर मुरादवर औरंगजेबानें खुनाचा आरोप आणिला आणि त्यास साप चाववून ठार मारिलें. (२६ डिसेंबर, स. १६५९). ह्या प्रसंगीं राज्याच्या मुख्य काजीनें अशी तक्रार केली, कीं शहाजहान जिवंत असल्यामुळें औरंगजेबाचा राज्याभिषेकविधि झालेला नाहीं, आणि हा विधि झाला नसल्यानें त्यास खुनाच्या खटल्याचा निकाल करण्याचा अधिकार नाहीं. औरंगजेबानें सर्व उलमास जमवून त्या काजीस कामावरून दूर केलें, आणि आपला उद्देश तडीस नेला. पुढें ता. २१ जुलै, सन १६५८ रोजीं औरंगजेबानें दिल्लीस राज्यारोहण केलें. बाप जिवंत असेपर्यंत तो कधीं आग्र्यास गेला नाहीं.

इकडे मुरादास कैद केल्यावर औरंगजेब दारावर चालून गेला. दारा पंजाबांत फौज जमवून राहिला होता. औरंगजेब येतांच दाराची फौज पळून गेली. तेव्हां हुमायूनप्रमाणें इराणांत पळून जाण्याचा दाराचा विचार होता. पण मुलतान व काबूल येथील सुभेदार औरंगजेबाचे पक्षपाती असल्यामुळें त्यास निकडे

रस्ता मिळाला नाहीं. सिंधुनदीवरील बक्कर किल्ल्याचा अधिकारी एवढाच कायतो दाराचा एक स्नेही होता. सक्करजवळ बेटांत बक्कर किल्ला आहे. तेथें दारास आश्रय मिळाला. ह्या वेळीं दारा काबूलचा सुभेदार महाबतखान याजकडे गेला असता तर त्याचा फायदा झाला असता, असें अनेकांचें मत आहे. महाबतखानाचें औरंगजेबाशीं वाकडें होतें. त्याजकडे गेला असता तर इराणांतूनही दारास मदत मिळण्याचा संभव होता. दारा सिंधप्रांतांत गेल्याचें ऐकून औरंगजेबास बरें वाटलें. त्यानें मीर बाबा नांवाच्या सरदारास मोठी फौज देऊन दाराचा पाठलाग करण्यास पाठविलें, आणि आपण उतावळीनें आग्र्यास परत आला; कारण बंगाल्यांतून शुजा आग्र्यावर चाल करून येत होता. शिवाय मुराद व शहाजहान यास मुक्त करण्याची खटपट आग्र्यास चालू आहे, असें त्यास कळलें. परत येत असतां रस्त्यांत राजा जयसिंह दहा हजार रजपूत फौज घेऊन येत असलेला त्यास आढळला. सुलेमानास सोडून हा औरंगजेबास मिळण्यासाठीं येत होता. पण औरंगजेब थोड्या लोकांनिशीं एकटाच भटकत आहे असें पाहून जयसिंगास वाटलें, कीं दारानें पराभव केल्यामुळें हा पळून जात आहे. तर अशा प्रसंगीं औरंगजेबाचा खून करून बादशहास कैदेंतून मुक्त केल्यास आपली मोठी वाहवा होईल. औरंगजेबानें त्याचा उद्देश तेव्हांच ताडिला आणि प्रसंगावधान ठेवून खातरी करून हें संकट टाळण्याचा त्यानें धिम्मेपणानें निश्चय केला. जयसिंहास मोठ्या अदबीनें भेटून औरंगजेब म्हणाला, 'आपल्या दर्शनानें मला अत्यानंद होत आहे. दाराचा संपूर्ण नाश झाला आहे, तर त्याजकडे आतां तुम्हीं जाण्याचें कारण नाहीं. माझ्या बरोबर चला. आपण शुजाचा समाचार घेऊं.' असें म्हणून आपल्या गळ्यांतील मोत्याचा हार काढून औरंगजेबानें जयसिंहाच्या गळ्यांत घातला. त्याबरोबर जयसिंह आपला बेत सोडून औरंगजेबाची आज्ञा उठविण्यास तयार झाला. जयसिंहास औरंगजेबानें लाहोरची सुभेदारी देऊन तेथल्या बंदोबस्तास पाठवून दिलें. आग्र्यास पोंचल्यावर औरंगजेबास महंमद व मीर-जुम्ला हे आपआपल्या फौजांसह येऊन मिळाले. मीर-जुम्ला औरंगाबाद सोडून नवीन फौज जमवीत इकडे आला होता; आणि दारा पळून गेल्यानें त्याच्या बायकामुलांचीही सुटका झाली होती.

औरंगजेब वर सांगितल्याप्रमाणें सर्व फौज घेऊन अलाहबादकडे गेला. फत्तेपुरच्या पश्चिमेस तीस मैलांवर काजवा येथें सुलेमान फौजबंद राहिला आहे असें

त्यास आटळले ती जागा फारच मजबूद होती शत्रूस जवळ येण्यास अन्नपाणी मिळण्याचाही संभव नव्हता शुजा तर आपली जागा सोडून पुढे येईना असे पाहून मीर जुम्लाने एक कपटयुक्ति केली शत्रु आपल्या ताब्यात येत नाही, तर उद्ईक आपण निघून जाणार अशी त्याने कंडी पिकविली आणि तदनुसार औरंगजेबाच्या छावणीत सर्व सामसूम केले एक दिवा सुद्धा पेटविला नाही तंबू पाडिले आणि आग्र्यास जाण्याकरिता सर्व सामान रवाना केले इतक्यात शुजा पुढे येऊन पाहू लागला, तो त्यास वाटले, की औरंगजेबाचे मोठे सैन्य निघून गेले असून हे केवळ पिछाडीचे काहीं लोक मागे राहिले आहेत असे समजून त्याने आपले लोक औरंगजेबावर हल्ला करण्याकरिता एकदम पुढे आणिले परंतु हे सर्व कपट होते औरंगजेबाची सर्व फौज तयारीनच होती तिने शुजाच्या फौजेचा तेव्हाच फडशा उडविला काजवा येथे जी लढाई झाली, तिच्यासारख्या रक्तपाताच्या भयंकर लढाया हिंदुस्थानच्या इतिहासात थोड्याच झाल्या असतील शुजाचे लोक फितविण्याबद्दल औरंगजेबाने हाते तितके प्रयत्न केले, पण त्याचा काहीं उपयोग झाला नाही दोघांचाही लढण्याचा हेतु राज्यपदप्राप्तीचा सुनी व शिया असे धर्मवैरही दोही पक्षांत पूर्णपणे जागृत होते दोहीकडचे मुसलमान कट्या वैराने लढले दोघा भावांचे हत्ती समोरासमोर आले एकाएकीं औरंगजेब परत फिरला शुजा त्याचे पाठीस लागला हही सर्व औरंगजेबाचे कपटच ज्या रस्त्याने औरंगजेब चालला, त्यावर एक खाडा खोदून तो त्याने झाडाच्या फांद्या व गवत वगैरेंनीं झाकून ठेविला शुजा त्या वाटेने येताच त्याचा हत्ती त्या खाड्यात पडला परंतु शुजा बचावून घोड्यावर बसला तरी त्याच्या लोकांस वाटले, कीं आपला धनी मेला आणि ते चार दिशांस चार, पळून गेले येणे-करून औरंगजेबास जय मिळाला काजवा येथील लढाई तारीख ७ जानेवारी सन १६५९ रोजीं झाली

इकडे औरंगजेब पळूं लागला, ही बातमी आग्र्यास पोचली राजा जसवंत-सिंह उज्जनी येथील आपल्या पराभवाचा वचपा काढण्याची संधि पाहतच होता त्याच्या पत्नीने त्या पराभवाबद्दल त्यास मोठे दूषण दिले, आणि आपण अग्नींत उडी टाकून आत्महत्या करण्यास तयार झाली तेव्हा औरंगजेबाची पुरी खोड मोडण्याचे वचन देऊन त्याने तिचे समाधान केले पुढे औरंगजेब जेव्हा अलाहबादेकडे गेला, तेव्हा जसवंतसिंह जोधपुर सोडून औरंगजेबाच्या

पाटीवर गेला. आणि त्याच्या फौजेस लुटून काजव्याची लढाई सुरू असतांच आपण आग्र्यास आला. तेथे शहाजहानास सोडवून तख्तावर बसविण्याचा जसवंतसिंहाचा विचार होता आग्र्याचा सुभेदार शायिस्ताखान व इतर मोठ-मोठे अधिकारी यांची पुरी खात्री झाली होती, की काजवा येथील लढाईत औरंगजेब मरण पावला जसवंतसिंह येतो असे ऐकून आग्र्याच्या लोकांची गाळण आली इतक्यांत औरंगजेब विजयी होऊन येत आहे. असे जसवंत-सिंहास समजल्यावरून तो आपली लूट घेऊन जोधपुरास परत गेला. तिकडे औरंगजेब अत्यंत चिंताक्रांत होऊन आग्र्याच्या बंदोबस्ताकरितां तावडतोब परत आला. शुजाचा पाठलाग करण्याचे काम त्यास सोडून द्यावे लागले. त्या कामावर त्याने मीर-जुम्ला व आपला मुलगा महंमद या दोघांची नेमणूक केली. पण दोघांचाही त्यास भरंवसा नव्हता मीर-जुम्लाने एका धन्यास सोडिले, तेव्हा तो दुसऱ्यास सोडणार नाही कशावरून.या भीतीस्तव त्याने मीर-जुम्लाचा मुलगा महंमद अमीनखान यास आपणाजवळ ओलीस म्हणून ठेवून घेतले. शिवाय औरंगजेबाचा मुलगा महंमद याने अलीकडे मोठमोठी कामे केली असल्यामुळे तोही चढून गेला होता. सबब गोवळकोंड्याच्या राजाची मुलगी महंमदाची बायको हिला त्याने स्वतःजवळ ओलीस म्हणून ठेवून, व मीर-जुम्ला यास मुख्य सेनापतीचे काम देऊन शुजाच्या बंदोबस्तास पाठविले. इतका बंदोबस्त केला तरी महंमद शुजास जाऊन मिळाला. शुजा मोंगीरनजीक तळ देऊन कडेकोट बंदोबस्ताने राहिला होता. त्याच ठिकाणी शेरखानाने हुमायुनास अडविले होते. शुजाच्या मुलीशी महंमदाचे लग्न ठरले होते. महंमदाची बायको औरंग-जेबाने अडकवून ठेविल्यामुळे तो बापावर रागावला होता तो शुजाच्या मुलीशी लग्न करून उघडपणे त्यास जाऊन मिळाला. त्यामुळे आणखी बरेच लोक शुजाच्या पक्षास मिळाले. हे वर्तमान ऐकून औरंगजेबास धास्ती पडली. पण मीर-जुम्ला याने त्या गोष्टीचा चांगला बंदोबस्त केला. महंमदास पस्तावा झाला. औरंगजेबाने गोडगोड पत्र पाठवून त्यास बंदोबस्ताने दिल्लीस नेले. रस्त्याने त्याने काश्मिरास पळून जाण्याचा प्रयत्न केला, पण त्याजवरील पहारा मजबूद होता, म्हणून ते साधले नाही शेवटी त्यास ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत औरंगजेबाने कैद करून ठेविले. तेथे तो शूर राजपुत्र सन १६७६ त मरण पावला. मीर-जुम्ला याने शुजाचा पाठलाग केला. तो डाक्का येथे पळाला. तेथून

पोर्तुगीझ लोकांच्या जहाजांतून तो आराकानच्या राजाकडे गेला राजाने आरंभी शुजाचा सत्कार केला, पण उत्तरोत्तर दोघामध्ये वितुष्ट आले आराकानच्या राजानें शुजाच्या मुलींची मागणी केली बुद्धधर्मी मूर्तिपूजकाला मुसलमानाची मुलगी देणे शुजाच्या जिवावर आले तेव्हा शुजानें बंड करून आराकानचें राज्य बळकावण्याचा बेत केला हा बेत बाहेर फुटल्यामुळे राजानें आपली फौज शुजावर पाठविली तेव्हा शुजा पराभव पावून ब्रह्मदेशाच्या अरण्यात पळून गेला तिकडेही त्याचा पाठलाग होऊन तो मारला गेला वास्तविक त्याचा अंत कसा झाला हे बरोबर समजत नाहीं त्याच्या वडील मुलीशीं आराकानच्या राजाने जबरीनं लग्न लाविलं त्या राजाच्या आईच्या मनांत शुजाच्या मुलाबरोबर लग्न लावावयाचें होतें त्यातच आराकानच्या मुसलमानास चिथवून बुद्धधर्मी राजाचा पाडाव करण्याचा शुजाचा बेत होता, तोही उघडकीस येऊन राजानें शुजाच्या सर्व कुटुंबाचा क्रूरतेनें वध केला शुजाच्या ज्या मुलीशीं राजानें लग्न केलें, तिला सुद्धा गरोदर असता उपासमार करून राजानें ठार मारिलें, अशी हकीकत कळते औरंगजेबानें तख्तनशीन झाल्यावर शायिस्ताखानास बंगालचा सुभेदार नेमून आराकानच्या राजाची पुरी खोड मोडली. साराश, शहाजादा शुजा याचा अत शोचनीय झाला

शहाजहानचा वडील पुत्र दारा याचा शेवट शुजाच्यापेक्षाही जास्त हृदयद्रावक झाला शुजाचा पराभव करून औरंगजेबानें मोठ्या समारंभानें दिल्ली शहरात प्रवेश केला, आणि राजवाड्यात दरबार भरवून आपल्या नावाचें नाणें पाडविलें लगेच दाराकडे त्यास लक्ष द्यावें लागलें दारा बक्कर किल्ल्यात होता हें मागें सांगितलेंच आहे मीर बाबा नावाच्या सरदारास औरंगजेबानें दाराच्या पाठीवर ठेविलें होतें. बक्कर येथें दारानें फौजेची भरती केली आणि युरोपियन लोक सुद्धा नोकरीस ठेविले बक्करहून निघून दारा कच्छ प्रातातून गुजराथेत आला त्या वेळीं अहंमदाबाद येथें औरंगजेब व मुराद त्या दोघांचा सासरा शहानवाजखान हा सुभेदारीचें काम पाहत होता दारा अहंमदाबादेस आला, तेव्हा मुरादची बायको तेथें होती तिच्या सागण्यावरून शहानवाजखानाने दारास आश्रय दिला असें म्हणतात. अहमदाबादेस दारानें चागला बंदोबस्त केला व जशवंतसिंहाशीं संधान बाधून त्यास आपलासा करून घेतले. इतक्यात जयसिंहानें जशवंतसिंहास पत्र पाठवून दाराचा पक्ष सोडण्याबद्दल विनंति

केली. तसें न केल्यास औरंगजेब सर्व रजपुतांचा संहार करील अशी त्यानें त्यास दहशत घातली आपणाला पडता काळ आला असता ज्याचे ग्रह जोरावर असतील त्याचा पक्ष स्वीकारण्यांत आपलें कल्याण आहे, असा बुद्धिवाद सांगून हे रजपूत राजे तटस्थ राहिले. जशवंतसिंहाच्या भरंशावर दारा अहंमदाबाद सोडून अजमिरास गेला पण जशवंतसिंह त्यास मिळाला नाहीं. तिकडून औरंगजेब फौजेसह अजमिराकडे आला, आणि उभयतांमध्यें लढाईचें तोंड लागलें. दारा परत गुजराथेंत आला असता: परंतु ते दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें त्यास येतां येईना. त्याजबरोबर शहानवाजखान होता, परंतु तो औरंगजेबास सामील होता. तो पुढें लवकरच मारला गेला. असा प्रकार चालू असतां उभयतां बंधूंची लढाई अजमीरच्या दक्षिणेस देवरा येथें तारीख १२ व १३ मार्च सन १६५९ रोजीं झाली. औरंगजेबानें दाराच्या फौजेत इतकी फितुरी करून ठेविली होती, कीं दाराचे लोक तोफांचे केवळ वायबार काढीत. जयसिंहानें दारा यास रणभूमीवरून पळून जाण्यास सांगितलें. तेव्हा दारा पळ काढून गुजराथेंत आला. त्या वेळीं त्याची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली होती. अहंमदाबादेस जो इसम आपल्या वतीचा म्हणून दारानें नेमिला होता, तोच औरंगजेबाच्या फितवणीनें दारावर फिरला. त्यानें दारास आश्रय दिला नाहीं. त्या प्रसंगीं प्रसिद्ध युरोपियन प्रवासी बर्नियर दारास एका धर्मशाळेंत भेटला. त्याबरोबर तो तीन दिवस होता. दाराच्या त्या वेळच्या कष्टप्रद स्थितीची बर्नियरनें लिहून ठेविलेली हकीकत अत्यंत हृदयद्रावक आहे. दाराच्या बायकामुलांस निजावयास एक लहानशी राहुटी असून तिचे दोर बर्नियरच्या गाडीस बांधिले होते. अहंमदाबादचा सुभेदार आपणास आश्रय देत नाहीं असें पत्र आलें, तेव्हां बायकामुलांनीं रडून आकांत केला. बिचारा दारा तर अगदीं बेहोष होऊन गेला. उन्हाळा इतका प्रखर होता, कीं जनावरें पटापट मरत. त्याला या वेळीं इतक्या यातना सोसाव्या लागल्या, कीं मरण सुद्धां याहून बरें असें त्यास वाटलें. एका कोळ्याच्या साह्यानें तो कच्छच्या राजाकडे गेला. त्या राजानें प्रथम त्याचा चांगला सत्कार केला; पण औरंगजेबानें त्याजकडे कारस्थान सुरू केल्यामुळें हा आपला घात करील असें दारास भय पडून, तो त्या राजास सोडून ठठ्ठाबक्करकडे जाण्यास निघाला. परंतु त्या किल्ल्यास बहादूरखान ऊर्फ मीर बाबा वेढा घालून बसला आहे असें पाहून, तो बोलन घांटा-

जवळच्या जीवनखान नामक पठाण गृहस्थाकडे गेला रस्त्यात त्याची आवडती बायको, पर्वीझ्ची मुलगी, मरण पावली त्या गृहस्थाचा दाराने पूर्वी दोन वेळा प्राण वाचविला होता जीवनखानाने दारा . व धन लुटून घेऊन, त्यास बक्कर येथे मीर बाबाकडे पाठविले त्या सरदाराने त्यास दिल्लीस औरंगजेबाकडे रवाना केले औरंगजेबाने दाराची दिल्लीच्या प्रत्येक रस्त्यातून धिंड काढिली. त्या वेळी त्याची ती दुर्दशा पाहून सर्व शहर शोकसागरात बुडून गेले ह्या प्रसगी पठाण जीवनखानाच्या ताब्यात दारा यास औरगजेबाने दिले होत वरील कृत्यान लोक आपणावर उठतील अशी औरंगजेबास भीति पडून दाराचे काय करावे ह्याबद्दल कित्येकाचा विचार त्याने घेतला. जीवनखान व दानिष्मंदखान ह्याचे म्हणणे त्यास जन्मभर कैदेत ठेवावे असे होते पण रोशनारा व शाहिस्ताखान ह्यानी निक्षून सागितल, की त्यास ठार मारावे त्याप्रमाण त्याने त्यास ठार मारण्याचा निश्चय केला, आणि तारीख ३० आगस्ट सन १६५९ रोजी मारे-कऱ्याकडून औरंगजेबाने दाराचा वध करविला त्या वेळी त्याचे कापून आणि-लेले शिर पाहून औरगजेबास परम संतोष झाला कित्येकाच्या मते दारा ख्रिस्ती धर्म स्वीकारून मग मरण पावला तो नेहमी असे म्हणे, की 'महमदाने माझा घात केला ईशपुत्र क्रिस्त मला तारील ' बर्नियर म्हणतो, 'दाराचा असा शेवट झालेला ऐकून जिकडे तिकडे लोक मोठ्या दु खाने विलाप करूं लागले जणू काय आपलाच कोणी आप्त गेला, अशा प्रकारे पुरुष, बायका, मुले सर्व शोक-सागरात बुडून गेली ' पूर्वी खुस्रूचा व हल्ली दाराचा असा अकाली अंत झाला, तसा न होता ते बादशाही पदावर आले असते तर हिंदुस्थानचा भावी इतिहास पुष्कळसा बदलला असता

दाराच्या मृत्यूनंतर लवकरच त्याचा मुलगा सुलेमान ह्यास काश्मीरच्या राजाने औरंगजेबाच्या स्वाधीन केले औरंगजेबाने त्यास एकान्तात कोंडून ठेविले. अशा लोकास उघडपणे मिरविल्याने स्वत चाच नाश व्हावयाचा, हे आता औरंगजेबास चागले कळून चुकले होते. म्हणून राजवाड्यातच त्याची मिरव-णूक काढून त्यास ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर पाठवून दिले ग्वाल्हेरचा किल्ला त्या वेळी अशा राजकीय कैद्याचे कारागृह होते 'तुला ठार मारणार नाही' असे औरंगजेबाने सुलेमान यास वचन दिले होते पण ते न पाळता सन १६६० त त्याने त्याचा व त्याच्या भावाचा ग्वाल्हेरच्या किल्ल्यातच खून करविला. त्या

खुनाबरोबरच शहाजहानच्या मुलांत राज्यप्राप्तीच्या अनिवार लोभामुळे सुरू झालेल्या युद्धाचाही शेवट झाला. हें युद्ध स.१६५७पासून १६६१ पर्यंत चाललें.

औरंगजेबास राज्य प्राप्त झाल्याने मोगल बादशाहींत नवीन मन्वंतर सुरू झालें. दरबारात सुनी धर्माची पुनरपि स्थापना झाली. मुसलमानी कायदे सुरू होऊन मुफ्ती नावाचे धर्माधिकारी सर्व राज्यांत नेमण्यात आले. हिंदूंचें वजन लयास गेलें. त्या योगें रजपूत व मराठे यांजशीं बादशहाचें वैर पडून त्यातच अखेरीस दिल्लीच्या बादशाहीचा अंत झाला. शहाजहान पदच्युत झाल्यावर आठ वर्षे जिवंत होता. तो स. १६६६त ता. २२ जानेवारीस मरण पावला. औरंगजेबानें त्यास नेमणूक करून देऊन त्याचा चागला सन्मान ठेविला होता. ह्या पुढें राज्यकारभारात जरी त्याचें अंग नव्हतें, तरी कुटुंबातील वृद्ध माणसाप्रमाणें राजवाड्यात त्याचा अधिकार व दरारा कायम होता. शहाजहानास औरंगजेबानें आग्र्याच्या किल्ल्यात बंदोबस्तानें ठेविलें होतें. चोपदारांचा नाईक अकबरखान हा बादशहाच्या पाहऱ्यावर मुख्य होता. जहान-आरा त्याजपाशीं राहून बापाची शुश्रूषा उत्कृष्ट ठेवीत असे. काहीं काम लागल्यास औरंगजेब बापास पत्र पाठवीत असे. तो बापास प्रत्यक्ष कधींच भेटला नाहीं. औरंगजेबाच्या एका पत्रांत खालील मजकूर आहे. 'प्रजेवर ममता ठेवून तिचा प्रतिपाल करणें हें आपलें कर्तव्यकर्म जो राजा तडीस नेतो, त्याजवरच परमेश्वराची कृपा असते, हें आपणाला ठाऊक असेलच. राज्य करणें हें बिकट काम गरीब माणसाच्या हातून निभणारें नाहीं. राज्य करणें म्हणजे लोकाचा प्रतिपाल करणें. मनास वाटेल तसें वागणें किंवा चैन करणें नव्हे.' आपल्या भावांचा नाश केल्याबद्दल हें औरंगजेबानें स्वपक्षाचें समर्थन केलें आहे.

९. **शहाजहानची योग्यता व राज्यव्यवस्था.**—शहाजहानास राज्याची दगदग विशेष नको होती, तरी त्यास सर्व कामांचा अनुभव असून, त्याच्या अंगीं कर्तबगारी होती. तरुणपणीं शौर्य, मुत्सद्दीपणा, राज्यकारभार इत्यादि गोष्टींत त्यानें चांगलें नाव मिळविलें होतें. राज्यावर आल्यावर जरी त्यानें सर्व कारभार मुलांवर व कामदारांवर सोपविला, तरी तसाच प्रसंग आला असतां, स्वतः कोणतेंही काम अंगावर घेऊन तडीस नेण्यास तो असमर्थ नव्हता. परंतु वयाबरोबरच त्याचें मन दुर्बल होत गेलें, आणि सन १६५८ त त्याच्या मुलांनीं राज्यांत दंगा केला तो त्याला दाबून टाकिता आला नाहीं.

मारवाडच्या उदयसिंहाची मुलगी जगदगोशायिनी जहांगीरची बायको होती, तिचा मुलगा शहाजहान राज्यावर येण्यापूर्वीच्या व नंतरच्या त्याच्या आयुक्रमात मोठें जमीनअस्मानाचें अंतर आहे आरंभीं तो खुनशी व खटपटी होता, पण राज्यपदारूढ झाल्यावर त्याचा निष्ठुर स्वभाव पार नाहींसा झाला दया, ममता, मनाचा थोरपणा, न्यायप्रियता इत्यादि गुण त्याच्या ठिकाणीं प्रगट झाले त्याचें ऐश्वर्य, विलास व थाट दुसऱ्या कोणत्याही बादशहास साधला नाहीं. त्याजवर प्रजा फार संतुष्ट होती

सर टॉमस रोनें शहाजहानच्या स्वभावाची थोडीशी माहिती दिली आहे तो म्हणतो, 'शहाजहानचा चर्या नेहमीं स्थिर असे त्याची गंभीरता कोणत्याही प्रसगीं ढळत नसे तसेंच कारणाशिवाय त्यास सहसा कधींही हसूं येत नसे त्याच्यापुढें जे लोक जात, त्याजविषयीं तो आदर किंवा अनादर एकदम व्यक्त करीत नसे परंतु त्याच्यांत गर्व व इतराविषयीं तिरस्कारबुद्धि हे गुण पदोपदीं दिसून येत' हें वर्णन तो पंचवीस वर्षांचा होता तेव्हाचें आहे तो इतराविषयीं बेपर्वा, वर्तनांत गर्विष्ठ, स्थिर वृत्तीचा, व शांत स्वभावाचा होता युद्धकलेंत त्याचें प्रावीण्य विशेष होतें राज्यकारभारांत तो बराच कुशल होता पुष्कळ लोक त्याची खुशामत करीत, अनेकांस त्याजबद्दल मत्सर वाटे परंतु त्याजवर लोकांची प्रीति कधीं फारशी बसली नाहीं जहांगीरच्या मरणसमयीं गादीविषयीं जे तंटे झाले, त्यांत भाऊ, बाप व नूरजहान ह्या सर्वांशीं त्याला कलह करावे लागले एकंदरींत त्यानें कधीं लोकांवर जुलूम केला नाहीं जसजसें वय होत गेलें, तसतशी त्याच्या स्वभावांत जास्त दया उत्पन्न होत गेली शेवटीं शेवटीं तो आपल्या कामदारांस फार प्रिय झाला होता त्याचें बोलणें फारसें खुबीचें नसून वादविवादांत बहुश तो हरत असे शहाजहानच्या दरबारचा डामडौल मोठ्या भपक्याचा होता त्याची कारकीर्द एकंदरींत फार शांततेंत गेली त्याला विद्येची अभिरुचि नसून विद्वान् लोकांविषयीं त्याच्या मनांत विशेष पूज्यबुद्धि नसे तो नेहमीं रंगेल व विलासांत निमग्न असे नाच, तमाशे, नाटकें यांचा त्यास फार शोक होता काटरू नावाच्या ख्रिस्ती गृहस्थानें त्याच्या कारकीर्दीचा सविस्तर इतिहास लिहिला आहे, त्यांत त्यानें असें लिहिलें आहे, कीं जनानखान्याच्या सुखविलासांत गर्क होऊन राहिल्यामुळें तो आपला तरुणपणचा शौर्याचा बाणा विसरून गेला. कविताश्रवण, संगीत, नृत्य, नाटक

इत्यादि विषयांकरितां दररोज त्याचे नेमलेले तास असत, आणि अशा प्रकारच्या करमणुकींत त्याचा सर्व दिवस निघून जाई. जो कोणी विलासाचे व सुखोपभोगाचे नवीन नवीन प्रकार दाखवून देई, त्याची बादशहाजवळ मोठी चहा होई. घाणेरडे व अश्लील तमाशे त्यास फार आवडत. तो पैशाचा लोभी होता, आणि नानाप्रकारचे खर्च होऊनही त्याचे खजिने नेहमी भरपूर असत. इतर बाबतींत शहाजहानची राहणी बापासारखीच होती. दररोज सकाळीं सूर्योपासना करण्याकरिता तो झरोक्याजवळ येई त्या वेळेस सर्व दरबारी मंडळी त्याचे दर्शन घेई. दुपारीं तो पुनः मर्दानी खेळ पाहण्यास त्या ठिकाणी येई. सायंकाळीं वाद्य सुरू झाल्यावर तो जनानखान्यांत परत जाई.

धर्मसंबंधांत शहाजहानचा स्वभाव मुळींच आग्रही नव्हता. आरंभीं त्याचा कल मुसलमानी धर्माकडे विशेष होता. अकबरानें सुरू केलेलें सौरवर्ष त्यानें बदलून चांद्रवर्ष सुरू केलें. आरंभीं क्रिस्ती लोकास त्यानें छळिलें, परंतु शेवटीं अकबराप्रमाणें त्याच्या कृत्यांत हिंदु आचारविचारांची छटा दिसूं लागली. त्यानें प्राचीन हिंदु राजाप्रमाणें मयूरासन नावाचें सिंहासन तयार करवून तें उपयोगांत आणिलें. नवीन इमारती बांधणें झाल्यास मनुष्याचा बळी देऊन मग त्याचा पाया घालण्याची हिंदु लोकांची चाल शहाजहाननें स्वीकारिली, आणि कित्येक लोकास ठार मारून त्यांच्या रक्तानें दिल्ली शहराचा पाया त्यानें शुद्ध केला. अशा अनेक कृत्यांनीं शहाजहानचा हिंदुधर्माकडचा कल वेळोवेळीं दृश्य होत असे. हिंदु आईच्या पोटीं जन्म झाल्यामुळें हिंदु धर्माविषयीं त्यास आदर वाटणें स्वाभाविक आहे. त्याचा मुलगा औरंगजेब हा तुर्क आईच्या पोटीं जन्मला, तो हिंदूंचा द्वेष्टा निघाला.

मोगल बादशाहींत जनानखान्याचें प्रस्थ मोठें होतें. बाबरपासून अकबरपर्यंत जी हकीकत वर आली आहे, तिजवरून त्या घराण्यातील बाया किती हुशार होत्या आणि रियासतींत त्यांचें वजन केवढें होतें, हें कळून आलेंच असेल. अकबराची रजपूत बायको, जहांगीरची नूरजहान, व शहाजहानची मुमताजमहल ह्यांनीं आपल्या नवऱ्यांस बहुधा आपल्या मुठींत ठेविलें होतें. नूरजहानच्या वेळेपासून हिंदी चालीरीतींचें महत्त्व मागें पडून, रियासतींत अस्सल इराणी बाणा सुरू झाला; त्या योगें हिंदु रयतेचीं मनें अस्वस्थ होऊन,

त्यातच शेवटीं त्या रियासतीचा नाश झाला. त्या कारभारात शहाजहानच्या मुलीचा बराच भाग आहे

मोगल रियासतींत जनानखान्याचें महत्त्व विलक्षण असे शहाजहान हा केवळ जनानखान्याचा बदा होता असे म्हटलें तरी चालेल जनानखान्यास महल अशी संज्ञा होती घुसलखाना व झरोका याजमध्ये जनानखाना होता त्यास अनेक चौक व अनेक दालनें होतीं प्रत्येक चौकापुढें बाग व कारंजीं होतीं जनानखान्यात एकदर दोन हजार स्त्रिया होत्या त्यात वृद्ध प्रतीहारी व बायका याशिवाय दुसऱ्या कोणाचा प्रवेश होत नसे बादशहाचा मात्र येथें यथेच्छ संचार असे जनानखान्यात हरहमेश नानाप्रकारच्या भानगडी व गुप्त बेत चालत बादशहासभोंवतीं शंभर तार्तार बायाचा खडा पहारा असे. त्या पहारेकरी बायावर जी बाई मुख्य असे, तिचा तनखा अमिरासारखा होता. आत राहणाऱ्या बायकाचे तीन वर्ग असत राण्या, राजकन्या, आणि वेश्या प्रत्येक बाईची यथायोग्य नेमणूक पृथकपणे बाधून दिलेली असे राण्या व राजकन्या याचे भोजन मुख्य मुदपाकखान्यात तयार होई या स्त्रियास बेगम अशी संज्ञा असे वेश्याना आपला भोजनखर्च आपल्या पगारातून करावा लागे सर्वांचे पोशाख बहुतेक सारखेच असत प्रत्येक बाईजवळ नोकर लोकाचा मोठा परिवार असे प्रत्येकीजवळ नाचणारणी, गाणारणी वगैरे असत केव्हा केव्हा सव मिळून बादशहापुढे नृत्य, गायन वगैरे करीत पट्टराणीचा सर्व जनानखान्यावर कडक अंमल असे जनानखान्याच्या व्यवस्थेकरिता दरबारातल्याप्रमाणेच वजीर, खजानदीस वगैरे हुद्याच्या निरनिराळ्या अधिकारिणी नेमिलेल्या असत केव्हा केव्हा त्या बायाचेंच वजन सर्व राज्यातील कोनाकोपऱ्यातही दिसन येत असे राजाच्या वजिराशीं त्याचा पत्रव्यवहार चाले. जनानखान्यातलें बादशहाचें मंत्रिमंडळ म्हणून वेगळेंच असे प्रत्येक सरदार आपल्या वर्ताच्या एखाद्या बाईचा जनानखान्यात प्रवेश करवीत असे. त्या योगें त्याच्या पक्षास पुष्टि येऊन आंतील गुप्त बातम्या कळत बहुतकरून सरदार लोक आपल्या मुली जनानखान्यात ठेवीत त्या मुलींना तरी आपल्या बापाविषयीं सर्व हकीकत बादशहास कळवावी लागे हा जनानखान्याची व्यवस्था फार दिवस चालत आलेली होती जनानखान्याचा खर्चही फार मोठा होता बायामंडळींचे मेळे भरविण्याची चाल पूर्वी होती, तिचा उल्लेख मागे आलेलाच आहे

आग्र्याच्या किल्ल्यांत शहाजहानचा सर्व थाट पूर्वीसारखा होता. मिष्टान्नें, गाणें, वजावणें वगैरे सर्व गोष्टी त्यास मिळत होत्या. कित्येक वेळां विद्वान् मुल्ला मंडळी जमवून तो धर्मावर वादविवाद करीत बसे. अनेक भानगडीच्या कामांत व प्रश्नात औरंगजेब त्याची सल्ला घेई. फक्त त्यास किल्ल्याच्या बाहेर जाण्याची परवानगी नव्हती. मरणसमयीं त्याचें वय ७४ वर्षांचें होतें. औरंगजेबानें आपल्या बहिणीचे हाल यत्किंचित केले नाहींत. जहान-आरा त्याच्याशीं उघड वैर करीत असतां, शहाजहानच्या मृत्यूनंतरही तिचा सर्व इतमाम त्यानें पूर्वीप्रमाणेंच चालू ठेविला. ती स. १६८१ त मरण पावली.

शहाजहानचा प्रेमळ स्वभाव खालील गोष्टीवरून व्यक्त होतो ता. २६ मार्च स. १६४४ रोजीं रात्रीं आग्र्याच्या किल्ल्यात जहान्-आरा बापाच्या महालांतून आपल्या जागेत येत असतां वाटेंतील मेणबत्तीच्या दिव्यास तिचा झगा लागून तो पेटला. त्या वेळीं बरोबर चार दासी होत्या जहान्-आराचे कपडे पेटतांच त्या तिच्या अंगावर पडल्या पण त्यामुळें उलट त्याचे मात्र कपडे पेटले. ह्या अपघातानें जहान-आरा सर्वस्वी भाजून गेली. हें पाहून तिचा बाप अगदीं विव्हळ झाला बायको मरण पावल्यापासून ही वडील मुलगीच त्यास सर्वस्वी जपत असे. तिच्या ह्या दुखण्यांत तो सर्व वेळ तिजजवळ बसून होता. आपल्या हातानें तिच्या जखमा धुऊन मलम वगैरे लावी. तसेंच जरूरीचें काम असल्याशिवाय तिला सोडून जात नसे. दरबारात सुद्धां फक्त अर्धा पाव घटका बसून परत येई. मोठमोठे नामांकित वैद्य त्यानें बोलावून आणिले. दररोज मोठा दानधर्म करून तिचें आरोग्यचिंतन त्यानें सुरू केलें दररोज रात्रीं एक हजाराची थैली तिच्या उशाखालीं ठेवून ती सकाळीं गरिबास वांटी. तिनें बरें व्हावें म्हणून पुष्कळ कैदी इसमांस त्यानें बंदींतून सोडिलें, आणि लोकांकडील कर्जाची सातलाख बाकी सोडून दिली. मध्यरात्रपर्यंत स्वतः परमेश्वरप्रार्थना करीत तो जागत बसे. हें दुखणें चार महिने चाललें. बहुतेक आशा सुटली होती. तिच्याबरोबर भाजलेल्या दासींपैकीं दोघी तर मृत्युमुखीं पडल्याच. इराणच्या शहाचा एक कुशळ हकीम धन्याच्या जाचाला कंटाळून त्याच वेळीं शहाजहानकडे आला असून. त्याच्या औषधोपचारानें बराच गुण पडला. तिला बरी होण्यास सहा महिने लागले. सुरत येथील इंग्रज सर्जन गेब्रियल बॉउटन यास मुलीच्या उपचारासाठीं शहाजहाननें मुद्दाम बोलावून आग्र्यास

आणिले होते, असे इंग्रज लेखक सांगतात (ब्रि रि पृ २६७) ता २५ नोव्हेंबर रोजी तिच्या ह्या सुटकेबद्दल मोठा आनंदोत्सव करण्यात आला बापाने मुलीला दहा लाखांची संपत्ति बक्षीस दिली त्याशिवाय लोकानाही पुष्कळ द्रव्य नजराण्यादाखल दिले दोन लाखाची खैरात भिकाऱ्यास मिळाली औरंगजेबावर बापाची इतराजी झालेली होती, ती जहान-आराने मध्यस्थी करून मोडिली, आणि त्याच्या नेमणुका पुनरपि चालू केल्या या सर्व प्रकारावरून असे दिसते, कीं एकंदरीत शहाजहानची योग्यता चांगली किंवा वाईट निक्षून सांगता येण्याजोगी नाहीं म्हणजे त्याच्यात अकबराप्रमाणे विशेष चांगुलपणा असा काहीं नव्हता, तरी वाईट गुणही त्याच्यात नव्हते लोक एकदरीने सुखी होते

**शहाजहानची राज्यव्यवस्था** —शहाजहानची कारकिर्द शांततेची झाली हे मागे सांगितलेच आहे त्याने तीन वर्षे राज्य केले त्या कारकिर्दीच्या आरंभीं व अखेरीस दोन मोठीं युद्धे झालीं मधलीं तीस वर्षे विशेष स्मरणीय आहेत ह्या वेळीं शहाजहानच्या मुख्य वजिरीचे काम दोन गृहस्थानी केले. गादीवर बसल्यापासून शहाजहानचा सासरा आसफखान हा त्याचा मुख्य वजीर होता तो सन १६४० त वारला तेव्हापर्यंत त्याने वजिरीचे काम केले नंतर सादुल्लाखान अल्लामी हा वजीर झाला तो मूळचा हिंदु असून मुसलमान झाला होता कंदाहार व बल्क् येथील स्वाऱ्यात सादुल्लाखानाने व औरंगजेबाने विशेष पराक्रम केले त्यास स १६५५ त दाराने विष घालून ठार मारिले सादुल्लाखानाची कीर्ति फार मोठी होती त्याच्यासारखे हुशार व प्रामाणिक प्रधान हिंदुस्थानच्या इतिहासात फारसे झाले नाहींत औरंगजेबाने सुद्धा त्याची फार तारीफ केली आहे 'या पुरुषाचा सर्वांनीं कित्ता घ्यावा,' असे औरंगजेबाने लिहिले आहे शहाजहानच्या कारकिर्दीत सर्व कामात हा पुढारी असे त्याचा राज्यकारभार सुरळीत चालण्यास मुख्यत्वेकरून हे दोन पुरुष कारण होत स्वत बादशहा फारसे काम पाहत नसे, तरी चांगली माणसे निवडून त्याच्या हातीं सर्व अधिकार दिल्याने रयतेस त्रास झाला नाहीं

अलीमर्दानखान नावाचा दुसरा एक हुशार मुत्सद्दी शहाजहानजवळ होता आसफखानाप्रमाणेंच दरबारीं इराणी वळण वाढविण्यात तो प्रमुख होता कंदाहारचा किल्ला अकबराने इराणच्या शहापासून जिंकून घेतला होता, तो जहांगीरच्या कारकिर्दीत इराणच्या शहाने परत घेतला पुढे शहाजहान तख्तावर

आल्यावर अलीमर्दानखान नामक इराणचा सरदार कंदाहारच्या बंदोबस्तास होता, त्याजला पैसे वगैरे भरून शहाजहानने आपणाकडे वश करून घेतलें, आणि त्याच्या मार्फत पुनरपि सन १६३७ त कंदाहार किल्ला काबीज केला. पुढच्या वर्षी अलीमर्दानखानाची बादशहानें लाहोर येथें भेट घेतली; आणि त्यास मोठी मनसब दिली. पुढें कांहीं दिवस अलीमर्दानखान काश्मीरच्या कारभारावर होता; आणि नंतर पंजाब प्रांतही त्याच्याच ताब्यांत देण्यांत आला. सालोसाल शहाजहान पंजाबांत व काश्मीरांत जाई, तेव्हां त्याची सर्व तजवीज अलीमर्दानखान ठेवीत असे. अलीमर्दानखानानें रावी नदीला वर एक लांब फांटा फोडून लाहोरपर्यंत शेतीच्या वगैरे उपयोगासाठीं एक मोठा कालवा आणिला, आणि तसाच दुसरा कालवा दिल्लीस आणिला. मध्यआशिया व इराणकडील कारस्थानांत ह्या खानाचा उपयोग शहाजहानास फारच झाला. तो सन १६५७ त मरण पावला. त्यास 'अमीरुल–उमरा' हा किताब होता. त्यास सालाचें उत्पन्न तीस लाख रुपये होतें. त्याच्या मृत्यूनें बादशहास अतोनात दुःख झालें. लाहोर येथें त्याची कबर आहे.

शहाजहान एके ठिकाणीं फार दिवस राहत नसे. थंडीच्या दिवसांत आग्र्यास व उन्हाळ्यांत काश्मिरांत राही. शहाजहानच्या कार्किर्दीच्या बरेवाईटपणाविषयीं पाश्चात्य व एतद्देशीय ग्रंथकारांचा अत्यंत मतभेद आहे, त्याचा उल्लेख मागें केलाच आहे. राजा बहारमल्ल म्हणतो, ('शहाजहानच्या वेळेस जमिनीची सुपीकता फार वाढली. ज्या प्रदेशाचें उत्पन्न अकबराच्या वेळेस तीन लाख होतें,' त्याचेंच उत्पन्न शहाजहानच्या अंमलांत दहा लाख झालें. राज्याचा विस्तार अतोनात असून, फिर्यादींची संख्या इतकी थोडी होती, कीं आठवड्यांतून एक दिवस न्यायाच्या कामास पुरत असे. त्यासाठीं बुधवार नेमिलेला होता, आणि त्या दिवशीं सुद्धां फार झाले तर वीस फिर्यादी येत. प्रांतोप्रांतीं न्यायाचीं कोर्टें असून त्यांजवर अपील करण्याचे नियम असत. म्हणून खास बादशहाकडे फक्त स्वतःच्या कुटुंबांतले तंटे, व धर्मसंबंधी कलह एवढे येत.') एकंदर माहितीवरून असें कळतें, कीं शहाजहानच्या कार्किर्दीत राज्याची भरभराट झाली तशी पूर्वी कधीं झाली नव्हती. दरबारचें वैभव तर अतोनात वाढलें. कलाकौशल्याच्या व इतर कामांत शहाजहाननें मनस्वी खर्च केला. शहाजहानच्या कार्किर्दीचें वर्णन मुसलमान, क्रिस्ती आणि हिंदु अशा निरनिराळ्या ग्रंथकारांनीं

केले आहे जमिनीच्या साऱ्याची उदार आणि शहाणपणाची पद्धति, न्यायाचा निष्पक्षपात, राज्याच्या हिशेबाची बादशहा स्वत करीत असलेली तपासणी, व बादशहाच्या चांगुलपणाने उत्पन्न झालेले लोकांचे सौख्य, इत्यादि विषयाची तारीफ करण्यात एका हिंदु ग्रंथकाराने मुसलमान व क्रिस्ती ग्रंथकारासहि मागें टाकिलें आहे. टॅव्हर्नियर लिहितो, 'शहाजहान हा राजाप्रमाणे आपल्या रयतेवर अंमल गाजवीत नाही, तर जसा बाप आपल्या मुलाबाळाशीं व सर्व कुटुंबाशी वर्ततो, त्याप्रमाणें हा आपल्या प्रजेवर प्रीति करितो त्याच्या दिवाणी खात्याचा बंदोबस्त तारीफ करण्याजोगा आहे सर्व लोक बहुधा संभावितपणानें वागतात इतर मुसलमान राजाप्रमाणे हा आपल्या रयतेवर खोटे आरोप आणीत नाही, अथवा डामडौलाने वागणाऱ्या पैसेवाल्याच्या द्रव्यावर डोळाही ठेवीत नाहीं, तेणेंकरून सर्व लोक निर्धास्त आहेत '(खाफीखान लिहितो, ' अकबर हा मोठा योद्धा व कायदे करणारा होता, म्हणून तो श्रेष्ठ असेल तर असो, परंतु आपल्या मुलखाचा व महसुलाचा बंदोबस्त करून राज्यातील प्रत्येक खात्याची व्यवस्था बांधून देण्यात शहाजहानची बरोबरी करणारा दुसरा राजा आजवर झालाच नाहीं ')दुष्काळात अन्नगृहे उघडून, तो रयतेस उपाशीं मरूं देत नसे कित्येक हिंदु लोकास व कवींस बादशहाचा आश्रय देण्याचा प्रघात ह्याही वेळेस चालू राहिला शहाजहानने जगन्नाथ पंडितराय या संस्कृत कवीस आश्रय दिला; आणि त्यास 'कविराय' ही पदवी दिली त्यास दाराशेखाने आपल्या पदरीं बाळगिले होते तानसेनचा मुलगा विलास ह्याचा जावई लालखान म्हणून होता, त्यास 'गुणसमुद्र' हा किताब बादशहानें दिला होता जगन्नाथराय व दीरंगखान ह्यांचे दरबारात रुपयांनीं वजन करून, प्रत्येकास साडेचार हजार रुपये बक्षीस दिले जगन्नाथराय स १६७४ त मथुरा येथे मरण पावला आसफखान, इरादखान, महाबतखान, अलीमर्दानखान, शहानवाजखान इत्यादि मंडळींनीं दरबारात इराणी वळणच सर्वत्र वाढविलें इराणच्या घराण्यातील अनेक राजपुत्र व इतर पुरुष हिंदुस्थानात नोकरींत होते त्यांच्याशी विवाहसंबंध वगैरे होऊन येथील मुसलमानात बाहेरचा अस्सल इराणी बाणा वाटत गेला इराणातून व मध्यआशियातून पुष्कळ मोठमोठीं कुटुंबें बायकामुलांसुद्धा इकडे येत अशाचीं कित्येक चित्रे फारसी इतिहासातून दिलेलीं आहेत, त्याजवरून तत्कालीन पेहरावाची व रीतरिवाजाची बरीच माहिती मिळते,

एकंदरींत शहाजहानसारखा वैभवशाली बादशहा हिंदुस्थानांत झाला नाहीं. त्याचा परिवार व त्याच्या घराण्यांतील नेमणुकी लोक, त्याच्या देणग्या व त्याच्या दरबारचा अपूर्व थाट, ह्या गोष्टी पूर्वीच्या बादशहांचे वेळेस जरी पुष्कळ होत्या, तथापि ह्या वेळेस त्यांचा अगदीं कळस झाला. या खर्चामुळें लोकांवर त्याची ज्यास्त सक्ती होत नसेः आणि त्याच्या खजिन्यांत पैशाची टंचाई पडत नसे.(त्यानें आपलीं सर्व मोठमोठीं कामें इतक्या काटकसरीनें केलीं, कीं सर्व लढायांचे व राज्यकारभारसंबंधीं इतर खर्च भागवून, तसेंच बहुमोल मयूरासनाचे व ताजमहाल वगैरेचे अवाढव्य खर्च करून, आणि सर्व फौजेचा पगार वेळच्या वेळेस देऊनही त्याच्या खजिन्यात मरणसमयीं कमींत कमी चोवीस कोटी रुपये शिल्लक होते.) शिवाय सोन्याचांदीचे अपार दागिने व जवाहिरही होतें तें वेगळेंच. वर लिहिलेली सर्व भरभराट बादशहाच्या राजधानी शहरांतच होती असें नाहीं. अतिदूरच्या प्रांतांतील शहरांची शोभाही त्या वेळच्या प्रवासी लोकांनीं वर्णिली आहे. ज्या प्रांतात तीं शहरें आहेत, ते प्रांत सुपीक व धान्यानें भरलेले असत असें सांगतात. सर्व राज्यांमध्ये अवघड व डोंगराळ रस्त्यांतून दरवडे व खून होत असत, ते शहाजहाननें पुष्कळ कमी केले. या बंदोबस्तामुळें शहाजहानची कीर्ति फार झाली. शहाजहाननें केलेला बंदोबस्त जरी हल्लींप्रमाणें नव्हता, तरी त्या वेळच्या मानानें तो विशेष चांगला होता यांत संशय नाहीं.

/ शहाजहानच्या राज्याचे बावीस सुभे होते. त्या सर्वांचा वसूल आरंभीं सुमारें बावीस कोटी रुपये होताः व तो पुढे छत्तीस कोटींपर्यंत वाढला. जागीर आणि खालसा असे जमिनीचे दोन प्रकार असत. खालसा म्हणजे खास सरकारची. तिचें उत्पन्न कुळाकडून सरकारास मिळे. जागिरीची जमीन लोकांस इनाम म्हणून अगर फौजेच्या वगैरे खर्चाकरितां तोडून दिलेली असे. तोडरमल्लाची महसुलाची पद्धत पूर्वीं दक्षिणेंत सर्वत्र लागू झाली नव्हती. शहाजहाननें जमिनीची मापणी संपवून ती पद्धत सर्व दक्षिण देशास लागू केली. अकबराच्या वेळेपासून जमिनीच्या महसुलांत विशेष फरक एवढाच झाला होता, कीं सरकारचें उत्पन्न कमी झालेलें पत्करलें, पण तें जमा करण्यास सरकारास दगदग व खर्च फार पडूं नये. मोगल बादशाहींत पूर्वीच्या मानानें सरकारचा वसूल बराच कमी झाला, तरी पण तो गोळा करण्याचा खर्चही

कमी झाल्यामुळे सरकाराचे नुकसान झाले नाहीं. शहाजहानच्या कार्किर्दीत कंदाहार प्रांत हातचा गेला, तरी अहंमदनगर वगैरे नवीन मुलूख पुष्कळ मिळाले, आणि झालेले नुकसान भरून आले

या कार्किर्दीच्या भरभराटीचे वर्णन अतिशयोक्तीचे नाहीं मोठमोठालीं ओसाड पडलेलीं शहरे, धुळीस मिळालेले राजवाडे, बुजून गेलेले पाण्याचे नळ, तसेच जंगलातील मोठमोठे तलाव व धरणे, राजमार्गावरील अद्याप शाबूद असलेले पूल, विहिरी, व धर्मशाळा, वगैरे जी आपणास आज प्रत्यक्ष दिसतात, त्यावरून त्या वेळच्या विलक्षण वैभवाची चांगली अटकळ होते

शहाजहानच्या राज्यव्यवस्थेविषयीं ओवेनचा अभिप्राय खालीं लिहिल्याप्रमाणे आहे ' शहाजहानच्या कार्किर्दीत मोगल बादशाहीच्या भरभराटीचा कळस झाला. बादशाहीच्या जुन्या प्रांतात शहाजहानच्या वेळेस जी शांतता, सुव्यवस्था, व भरभराट वास करीत होती, तशी तेथे पूर्वीं कधीं नव्हती राजपुतान्यातील मांडलिक राजे बादशहाचे हुकूम झेलण्यास ह्या वेळच्या इतके पूर्वीं कधीं तत्पर नव्हते. दरबारचा थाट, बादशहाची सत्ता, संपत्ति, व सन्मान ह्याजमध्ये शहाजहानची बरोबरी करणारा दुसरा मोगल बादशहा झाला नाहीं शहाजहानच्या वेळेस मोगल बादशाहीचा लौकिक सर्व पृथ्वीवर पसरला होता, तसा पूर्वी कधीं नव्हता हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रांत पुनरपि जिंकून घेण्याचा त्याने आरंभीं प्रयत्न केला पण अशा दूरच्या प्रांताचे संरक्षण करण्यास त्रास व खर्च अतोनात होतो, असे पाहून आपल्या हातून व्यवस्था न होण्याजोगे प्रांत त्याने खुशाल सोडून दिले दक्षिणेत त्याचा अंमल कायमचा बसला अहंमदनगरचे राज्य जिंकण्याचे वडिलानीं सुरू केलेलें काम तडीस नेऊन विजापुर व गोवळकोंडा येथील राज्याचे मांडलिकत्व त्याने संपादिले इतके करून तो स्वस्थ बसला नाहीं जरेने व आजाराने निःसत्त्व होईपर्यंत राज्यकारभारातून त्याने आपले लक्ष काढिले नाहीं योग्य कामदारांची नेमणूक करण्यात शहाजहान बादशहास चांगलेच यश आले त्याचा वजीर सादुल्लाखान, याजविषयीं प्रत्यक्ष एल्फिन्स्टनने असे उद्गार काढिले आहेत, कीं ' हिंदुस्थानामध्यें आजपर्यंत जर एखादा अत्यंत हुशार व सचोटीचा मुत्सद्दी निपजला असेल, तर तो सादुल्लाखान होय ' बादशहाने मुलास मोठमोठे अधिकार दिल्यामुळे ते जरी अखेरीस त्याच्यावर उठले, तरी ते सर्व

पराक्रमी असून चारही दिशांस पराक्रम गाजवून पुष्कळ वर्षेपर्यंत परशत्रूं-पासून राज्याचा बंदोवस्त करण्यांत आपला देह झिजवीत होते.'

६. **शिल्पकलेचा उत्कर्ष, ताजमहाल वगैरे.**—भारतवर्षाच्या ऐतिहासिक आयुर्मर्यादेंत दिल्ली राजधानीचीं नानाविध रूपांतरें झालीं आहेत. पूर्वीच्या मुसलमानांनीं दिल्लीचे निरनिराळे भाग कसे स्थापिले हे मागें सांगितलें आहे. हल्लींचें दिल्ली शहर यमुनेच्या तीरावर शहाजहान बादशहानें बांधिलें आणि त्यास शहाजहानाबाद हें नाव दिलें. हे शहर बांधण्याचें काम दहा वर्षें चाललें होतें. मुसलमान इतिहासकार शहाजहानाबाद हेंच नांव वापरितात. ह्या शहराच्या संपत्तीचें व वैभवाचें वर्णन अनेक प्राच्य व पाश्चात्य लेखकांनीं केलेलें आहे. तें यमुनेच्या पश्चिम तीरावर असून किल्ल्याचे तटाभोंवतीं रुंद खंदक आहे. विद्या, व्यापार, राजकारण, नोकरी, चैन, जिज्ञासा इत्यादि अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन पृथ्वीच्या दूरदूरच्या भागांतून नानाप्रकारचे लोक दिल्लीस येऊन राहत असत. तेथील मुख्य बाजार जो चांदणीचौक त्यांत सर्व देशांत उत्पन्न झालेल्या जिनसाचा सौदा व हिंदुस्थानांतील एकंदर संपत्तीचा विनिमय चालू असे. तटाच्या बाहेर दूरपर्यंत अनेक मोठमोठे बाग व वाडे असून प्राचीन राजधान्यांचे अवशेष निरनिराळ्या जागीं दिसून येत. जुम्मा-मशीद, मोती-मशीद, दिवाणी-आम, दिवाणी-खास, घुसलखाना वगैरे शहाजहानच्या इमारती प्रेक्षणीय आहेत. (' शहाजहानच्या वाड्यासारखा वाडा सर्व पृथ्वींत नाहीं.') असें शिल्पशास्त्रज्ञ फर्ग्युसन याचें मत आहे. वाड्याच्या भिंतींवर सुंदर रंगीत चित्रें काढिलेलीं आहेत. वाड्यासभोंवार ६० फूट उंचीचा तट आहे व त्याचा घेर दीड मैल आहे; आणि आंतील सर्व भागांत नळाचें पाणी उत्कृष्ट रीतीनें खेळविलेलें आहे. अशा ह्या सुंदर ठिकाणीं शहाजहान विलास करी; आणि बहुधा उन्हाळ्याच्या दिवसांत काश्मिरात वगैरे जाई. त्या वेळीं स्वारीच्या मुक्कामाचे तंबू वगैरे लावण्याचें काम दोन महिने आगाऊ चालू असे. दरसाल दोन मोठे उत्सव होत, एक राज्यारोहणाचा दिवस व दुसरा बादशहाचा वाढदिवस. त्या वेळीं सुवर्णतुला व इतर सर्व विधी मोठ्या थाटाचे होत. दिल्लीच्या तटाचा घेर ७ मैल असून त्यास ७ मोठालीं प्रवेशद्वारें होतीं.

आग्रा शहर म्हणजे मोगलाच्या तातार छावणीची हुबेहुब प्रतिमा आहे. मोठ्या

उघड्या पटांगणाच्या समोर मध्यभागीं सर्वांस दिसेल अशा प्रकारची बादशहाची बैठक, त्याच्या पाठीमागे कौन्सिल हॉल, त्याच्या पाठीमागे जनानखाना व स्नानगृहे, इत्यादि भाग आहेत प्रथम सिकंदर लोदीने आग्रा येथे कधी कधीं येऊन राहण्याचा प्रघात सुरू केला त्या वेळीं बियाना प्रातात आग्रा हे लहानसे गाव होते दिल्लीशहर अस्वच्छ वाटल्यामुळे आग्रा येथे यमुनेच्या पूर्व तीरावर अकबरानें प्रथम वास्तव्य केले शिवाय आग्रा हे राज्याच्या मध्य ठिकाणीं असल्यामुळे चहूंकडे देखरेख ठेवण्यास दिल्लीपेक्षा ज्यास्त सोयकर होते आग्रा येथून पूर्वेस, उत्तरेस व दक्षिणेस तीन मोठाले रस्ते जात असत यमुनेच्या पश्चिम किनाऱ्यावरील जागा मोकळी व जास्त सोयीची वाटल्यामुळे अकबराने तेथे नवीन इमारती बाधिल्या तेथील लाल दगडाचा तट स. १५६६त अकबराने बाधिला आग्र्याचे पहिले नाव अकबराबाद असे होते जहागीर यास आग्र्याची उष्णता दु सह वाटून तो आपला वेळ बहुधा लाहोर व काश्मीर या ठिकाणीं काढीत असे. शहाजहानने आग्रा सोडून दिल्लीची नवीन रचना केली. तथापि ताजमहाल बाधून आग्र्याचे नाव त्याने अजरामर करून ठेविले. औरंगजेब बहुधा लष्कर घेऊन एकसारखा फिरतीवर असे.(मंडेल्स्लोनें ( सन १६३८ ) आग्र्याचे उत्कृष्ट वर्णन दिले आहे (शहरात प्रवाश्यासाठीं ऐशीं धर्मशाळा असून त्या बहुतेक तीन मजली होत्या ) बादशहापाशीं अपार संपत्ति असून तिजवर विशेष सक्तीचा पहारा होता ही संपत्ति निदान तीस कोटी पौंड म्हणजे साडेचार अब्ज रुपये असावी असा मंडेल्स्लोचा अंदाज आहे आग्र्याची लोकसंख्या ६ लाख होती.)

**ताजमहाल**—हिंदुस्थान रिव्ह्यूच्या स १९०५ ऑगस्टच्या अंकात प्रो. जदुनाथ सरकार यानीं ताजमहालसंबंधीं खालील मजकूर प्रसिद्ध केला आहे

'सन १६०७ त शहाजहान पंधरा वर्षांचा असता, जहागीरने त्याचा निका अर्जुमंदबानू इच्याशीं ठरविला पुढे पाच वर्षांनीं म्हणजे सन १६१२ त हें लग्न झालें शहाजहानपेक्षा मुम्ताज महल् चौदा महिन्यानीं लहान होती ही बाई नवऱ्याच्या सहवासात एकुणीस वर्षें सुखानें संसार करून, आणि चौदा मुलास जन्म देऊन, बऱ्हाणपुर येथें मंगळवार ता. ७ जून, स १६३१ रोजीं प्रसूतीच्या वेदनानीं मरण पावली त्या वेदना तीस तास चालल्या होत्या तिच्या मृत्यूनें शहाजहान इतका शोकग्रस्त झाला, कीं आठ दिवसात त्यानें कांहीं एक काम

केलें नाहीं; किंवा तो दरबारास आला नाही. राज्यभार डोक्यावर नसता तर आपण फकीर झालों असतों असे तो म्हणे. रंगीत वस्त्र, दागदागिने व अत्तरें वगैरे विलासाच्या पदार्थांचा त्यानें त्याग केला. राज्यारोहणाच्या वाढदिवशीं व इतर समारंभांचे प्रसंगीं त्यानें वाद्यें वगैरे वाजविण्याची बंदी केली. त्याची दाढी एकदम पांढरी दिसूं लागली. बायकोच्या कबरेजवळ जाऊन राज्य नको, जीव सुद्धां नको, असें म्हणत तो ढळढळां रडे. जनानखान्यांत गेला तर लगेच रडत परत येई. त्यास आणखी दोन बायका होत्या, एक मुजफ्फर-हुसेनची मुलगी, व दुसरी शहानवाजखानाची मुलगी. पहिलीचे लग्न मुम्ताजचे लग्नापूर्वी दोन वर्षे, आणि दुसरीचें मागाहून पाच वर्षांनीं झालें होतें. परंतु हीं लग्नें केवळ राजकीय हेतूंनीं झाली होतीं, त्यात प्रीतीचा अंश फारसा नव्हता. मुम्ताज-महल्च्या प्रीतीनें त्याचें सर्व अंतःकरण व्यापलेलें होतें. त्यांत दुसऱ्यास जागा नव्हती. कोठेंही प्रवासांत किंवा सुखांत असला, तरी मुम्ताज नेहेमीं त्याच्या बरोबर असावयाची. तीस तो कधींच दूर ठेवीत नसे.

खुदाबक्ष पुस्तकसंग्रहांतील कासीमअली आफ्रिडी (स. १७७१–१८२७) च्या आत्मचरित्रांत असा मजकूर आहे, कीं शेवटची मुलगी गर्भांत असता, मुम्ताज-महल्ला तिच्या रडण्याचा आवाज ऐकूं आला. तो ऐकून तिला वाटलें, आपण ह्या बाळंतपणांतून जगत नाही. हें तिनें बादशहास बोलावून, डोळ्यात अश्रु आणून, कळकळीने कळविलें. ती म्हणाली, 'गर्भांतील मुलाचें रडणें आईने ऐकिलें म्हणजे आई जगत नसते असें म्हणतात. म्हणून माझा मृत्यु आतां समीप आला आहे. माझ्या हातून आगळीक झाली असेल, तर क्षमा करा. आजपर्यंत सर्व सुखदुःखात मी आपली वांटेकरीण होतें; पण आतां आपली संगत सोडून मला एकटीलाच निघून जाणें प्राप्त आहे. आपणाजवळ शेवटच्या मी दोन गोष्टी मागून घेतें, कृपाकरून देतों म्हणा.' बादशहानें होय म्हटल्याबरोबर मुम्ताज बोलली, 'देवानें आपणास पुष्कळ मुलें दिलीं आहेत. आपला नांवलौकिक चालविण्यास तीं पुरे आहेत. तर सावत्र संबंधामुळे घरांत तंटे वाढूं नयेत, म्हणून आता आपण पुनः लग्न करूं नये. दुसरी विनंति अशी, कीं आपल्या उभयताच्या प्रीतीचें स्मारक यावच्चंद्रदिवाकरौ राहवे, म्हणून अशी एक अलौकिक कबर बांधा कीं जगांत पूर्वी कधीं तशी झाली नाहीं आणि पुढें कधीं होणार नाहीं.' इतकें बोलणें झाल्यावर ती पुढें प्रसूत होऊन लगेच मरण पावली. त्या वेळीं मुलगी

झाली तिचें नाव गौहर-आरा वरील गोष्ट सागोसागीची आहे तींत तथ्य किती आहे हे सागता येत नाहीं मात्र ती आग्र्यास त्या वेळीं सर्वतोमुखीं होती अबदुल हकीम लाहोरीच्या पादशहानाम्यात अथवा खाफीखानाच्या पुस्तकात त्याबद्दल एक अक्षर नाहीं पादशहानाम्यात खालील उतारा आहे —

मुम्ताजमहल् इला कळून चुकले कीं आता आपण जगत नाहीं, तेव्हा तिने जहान्-आरास पाठवून बादशहास आपणाकडे बोलाविले तो लगेच मोठ्या काळजीने धावत आला तिने मुलाचा साभाळ करण्याविषयीं बादशहास विनंति केली आणि आपण परलोकवास पत्करिला नंतर बऱ्हाणपुरच्या समोर तापीनदीच्या काठीं एका बागेत प्रथम तिचे दफन झालें पण पुढील डिसेबर ता १ रोजी, तिचे शव आग्र्यास नेण्यात आलें बरोबर शहाजादा शुजा होता ता.२९ डिसेबर रोजीं तो मातुश्रीचें प्रेत घेऊन आग्र्यास पोंचला.

आग्र्याचे दक्षिणेस एक जागा पाहून ती मानसिगाचा नातू राजा जयसिंग याजकडून बादशहाने खरेदी केली आणि इमारतीच्या कामात निष्णात असलेल्या अनेक लोकाकडून एका सुंदर इमारतीचे नकाशे मागविले त्यापैकीं एक बादशहानें पसंत केला आणि प्रथम त्याचा लाकडी नमुना तयार करविला. नमुन्याप्रमाणे स १६३१ च्या आरंभीं इमारतीची सुरुवात झाली, ती स १६४३ च्या जानेवारींत पुरी झाली मकामतखान व अब्दुलकरीम हे दाघे त्या कामावर मुख्य देखरेख करीत होते त्या इमारतीस पन्नास लाख रुपये खर्च झाला. आफ्रिडी म्हणतो, इमारतीचा खर्च ९ कोटी १७ लाख झाला, आणि खालील गृहस्थ निरनिराळीं कामें पाहत होते —

‘१ अमानतखान शिराजी ( कंदाहारचा ) २ आग्र्याचा मास्तर इसा गवंडी. ३ दिल्लीचा मास्तर पिरा सुतार. ४–६ बनु हार, झातमल्ल, व जोरावर, दिल्लीचे पाथरवट ७ इस्माईलखान रूमी, वरील घुमट व त्याची पराची बनविणार. ८ रामलाल काश्मिरी बागवान. त्याच ग्रंथात एकंदर वीस उत्तमोत्तम दगडाची नावें दिलेलीं असून त्याचा उपयोग या इमारतीस केला आहे ता. २८ जानेवारी स. १६४३ रोजीं मुम्ताजमहल्च्या बाराव्या मृत्युदिवशीं बादशहा ताजमहालात गेला, आणि एक लाख रुपयाचे उत्पन्नाचीं तीस गावे ताजमहालाच्या खर्चाकडे व सभोंवारच्या सराया, दुकानें, बाग व त्यात राहणारे साधु याच्या खर्चासाठीं, लावून दिलीं.’

ताजमहालची इमारत आपल्या अप्रतिम सौंदर्यानें जगांतील सर्व इमारतींत प्रथमपद पावली आहे. ह्या इमारतीचें वर्णन शब्दांनीं करणें एक तर अगदीं अशक्य आहे; आणि दुसरें असें कीं आजपर्यंत अनेक ग्रंथकारांनीं त्या इमारतीच्या वर्णनावर आपली लेखणी चालविली आहे. ही इमारत आग्र्यापासून दीड कोशावर यमुना नदीच्या पश्चिम तीरावर आहे. ती बांधण्याच्या कामीं वीस हजार मनुष्यें खपत होतीं. हिंदुस्थानांत शिल्पशास्त्र त्या वेळेस किती उत्कृष्ट स्थितींत होतें, याची उत्तम साक्ष ही इमारत देते. तिच्या एकंदर स्वरूपावर जनानी झांक मारते, असें मार्मिक शिल्पज्ञ म्हणतात. वेठीचे मजूर पकडून बादशहानें ताजमहालचें काम करविलें, असा एक आरोप बादशहावर केलेला आहे तो खरा दिसत नाहीं. कारण, ज्या जागेवर ताजमहालची इमारत आहे, ती जागा प्रथम जयसिंगाची असून, जयसिंग ती बादशहास फुकट देत होता, परंतु प्रियकर बायकोच्या पवित्र स्मारकास कोणाचेंही फुकट साह्य घ्यायचें नाहीं, असा बादशहानें आपला निश्चय व्यक्त करून जयसिंगास पुरेपूर मोल देऊन जागा विकत घेतली. इतकी कसोशी करणारा बादशहा गरीब लोकांची मजुरी फुकट घेईल हें संभवत नाहीं. शिवाय ताजमहालचा खर्च पन्नास लाख रुपयेच झाला आहे, तो त्या वेळच्या मानानें कमी नसून बादशहाच्या ऐपतीबाहेर नव्हता.

सिकंदरा येथें अकबराची सुंदर कबर आहे. तें गावही सिकंदर लोदीनेंच वसविलें. बारदारी म्हणून जी इमारत तेथें आहे, ती सिकंदरनें स. १४९५ त बांधिली. सिकंदरा येथें अकबराचें दफन झालें, त्या ठिकाणीं एक सुंदर व टुमदार कबर जहांगीरनें बांधिली. ह्या इमारतीचें सर्व काम स. १६१३ चे सुमारास पुरें झालें. त्याजवर दररोज तीन हजार मजूर काम करीत होते; आणि त्यास पंधरा लक्ष रुपये खर्च झाला असें म्हणतात. त्याच्या प्रवेशदरवाजाची उंची सत्तर फुटांपेक्षा ज्यास्त आहे. मुख्य इमारतीस पांच मजले आहेत. त्यांतील अनेक सुंदर कामांची कल्पना वाचकांस शब्दांनीं देणें शक्य नाहीं. ती प्रत्यक्षच पाहिली पाहिजे. स. १६११ पासून आजपर्यंत हजारों लोकांनीं ह्या इमारतीचें वर्णन केलें आहे. मुसलमानी इमारतींचे दोन प्रकार असून त्यांपैकीं अकबराची ही कबर जुन्या चालीची व आग्र्याचा ताजमहाल नव्या चालीचा समजतात. (ह्या दोन चालींचे भेदाभेद मनमोहन चक्रवर्ती यांनीं 'इंडियन वर्ल्ड' मासिकाच्या ऑक्टोबर स. १९०५ च्या अंकांत स्पष्ट करून

सांगितले आहेत ) जुन्या चालींत हिंदु व जैन तऱ्हाचें मिश्रण पुष्कळ आहे. पुढे जहांगीरच्या नंतर हिंदु व जैन तऱ्हाचें मिश्रण कमी होऊन पर्शियन म्हणजे शुद्ध मुसलमानी वळण वाढत गेलें

नूरजहानचा बाप इतिमाद-उद्दौला अस्सल इराणी वळणांत वाढलेला असून नूरजहानचे लग्न झाल्यापासून बांधकामात सुद्धा इराणी वळणाचें माहात्म्य वाढत गेलें सिकंद्रा येथील अकबराची कबर, इतिमादुद्दौल्याची आग्र्याच्या जवळची कबर व आग्रा येथील शहाजहानचा ताजमहाल ह्या तिहींची अनेक बाबतींत मार्मिक तुलना करून, श्रीयुत चक्रवर्ती ह्यांनीं त्या तिहींच्या बांधणीतले भेद स्पष्ट करून सांगितले आहेत अकबराच्या कबरेस लाल दगड लावलेला असून, ताजमहालास शुभ्र आरसपान वापरलेला आहे अकबराच्या कबरेंत जंगी व भव्य स्वरूपाची कल्पना मनात येते, इतिमाद्-उद्दौल्याच्या कबरेंत थोडासा भव्यपणा व थोडेसें सौंदर्य आहे, परंतु ताजमहालात नुसतें सौंदर्य, म्हणजे गायनातील सप्तसुरांच्या उत्कृष्ट मिश्रणाप्रमाणें, शिल्पकामाच्या हरएक उपांगाचें उत्कृष्ट मिश्रण आहे ऐतिहासिक रीत्या अकबराच्या कबरेचें महत्त्व विशेष आहे त्यात शिल्पकलेची वाट व प्रगति दिसून येते पण ताजमहालात त्या कलेची सीमा होऊन, पुढील वाढ खुंटलेली दिसते ह्या विषयाचा ज्यास्त विचार तत्संबंधी विशिष्ट पुस्तकात सांपडेल

**मयूरसिंहासन**—अकबरापासून बादशहाच्या जव्हेरखान्यात पुष्कळ रत्नसंचय झाला होता शहाजहानचें मनात आलें, कीं हा रत्न लोकांचे नजरेस पडण्याची सोय नसली, तर तीं नुसतीं बाळगून त्याचा उपयोग तरी काय? असें म्हणून त्यानें सर्व रत्नें आपणापुढें आणवून त्यांपैकीं सुमारें ८६ लाख किंमतीचीं चांगलीं चांगलीं रत्नें निवडून काढिलीं, आणि १ लक्ष तोळे सोनें ( किंमत १४ लाख रुपये ) खरेदी करून कसबी सोनार कामावर बसविले, आणि बेबादलखान याच्या देखरेखीखालीं नवीन मयूरासन तयार करविलें तें काम सात वर्षे चाललें त्याची लांबी सव्वातीन यार्ड, रुंदी अडीच यार्ड, व उंची पांच यार्ड होती ह्या सिंहासनात तीं सर्व रत्नें गोंवून देण्यात आलीं त्यास द्वादश कोन व तितकेच खांब होते वर एक लहानसें झाड करवून प्रत्येक खांबाच्या शिखरावर दोन दोन मोर बसविलेले होते एवढ्याच वरून त्यास मयूरासन नाव पडलें तें मयूरावर बसविलेलें नव्हतें. वर जाण्यास तीन

[illegible] पायऱ्या असून, अकरा बाजू कठडे बसवून बंद केलेल्या होत्या. बारावी बाजू प्रवेशाची असून उघडी होती. आंतल्या बाजूस एका पारशी [illegible] कोरविलेली होती. ह्या सिंहासनास लागलेल्या साहित्याची किंमत एक कोट रुपये असून, त्याशिवाय मजुरीखर्च काय झाला असेल तो निराळा. ता. १२ मार्च स. १६३५ रोजीं ह्या मयूरसिंहासनावर शहाजहाननें प्रथम आरोहण केलें.

मोगल बादशहांच्या संपत्तीचा अंदाज मॉडर्न रिव्ह्यूमध्यें प्रो. सरकार यांनीं फारशी ग्रंथांच्या आधारें दिलेला आहे. स. १६४८ त राज्याचा वसूल सुमारें वीस कोटी असून, त्यांपैकीं तीन कोटी बादशहाच्या खासगीसाठीं खर्च होत असे. शहाजहाननें पहिल्या वीस वर्षांत ९॥ कोट रुपये दानधर्म व देणगी-मध्यें खर्चिले. तेवढ्या अवधींत २॥ कोट रुपये इमारतींत खर्च झाले, त्याचा तपशील दिलेला आहे. बादशहाचे जव्हेरखान्यांत ५ कोटींचा ऐवज होता, व सुमारें २ कोटींचें जवाहीर राजपुत्र व इतर मंडळी यांजपाशीं होतें. वरील ५ कोटींपैकीं २ कोटी ऐवजाचे दागिने बादशहाचे अंगावर नेहमीं घालण्याचे होते. शहाजहानच्या मंत्र जपण्याच्या दोन माळा होत्या, त्यांची किंमत २० लाख रुपये होती. ही संपत्ति आजच्या मानानें थोडी दिसते. पण त्या वेळच्या मानानें तिची किंमत पुष्कळ होती. एका रुपयास दोन शिलिंग तीन पेन्स इतका भाव त्या वेळीं येई; आणि बाजारांत हल्लीं एक रुपयास जो जिन्नस मिळतो त्यापेक्षां निदान सातपट ज्यास्त त्या वेळीं मिळत असे.

---

# प्रकरण सत्विसावें



## मूहिउद्दीन महंमद औरंगजेब

### स १६५८—१७०७



**१. राज्यारोहण व परिस्थिति**—मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणें शहाजहान बादशहाचा तृतीय पुत्र औरंगजेब याची अनिवार महत्त्वाकांक्षा सफल होऊन, जुलै सन १६५८ त, म्हणजे इंग्लंडात ऑलिव्हर क्रॉम्वेल मरण पावला त्यापूर्वीं थोडे दिवस, त्यानें आपल्या नावाची द्वाही फिरविली परंतु त्याचा राज्यारोहणविधि तारीख २६ मे सन १६५९ रोजीं झाला त्या वेळीं बापानें त्यास दिलेलें 'आलमगीर' हें नाव त्यानें धारण केलें बऱ्याच अंशीं इंग्लंडच्या क्रॉम्वेलचा हा समकालीन असून दोघांच्या चरित्रक्रमांत बरेंच साम्य आहे क्रॉम्वेल हा क्रिस्ती धर्माच्या प्युरिटन पंथाचा होता त्या पंथाच्या लोकांचें राहणें अगदीं साधें व धर्मवेड जबर असे धर्माच्या नांवावर मनातील महत्त्वाकांक्षा तृप्त केल्याचा दोष इतिहासकारांनीं क्रॉम्वेल यास दिला आहे औरंगजेबाबद्दलही इतिहासकार तेंच म्हणतात. दोघांनींही मोठ्या गोष्टी करण्याचा आव घातला, पण दोघांचाही शेवट दु खकारक झाला धर्मसंस्थापना करण्याच्या भरात आपण कोणीकडे वाहत चाललों आहों, ह्याचें त्यांस स्मरण राहिलें नाहीं इंग्लंडातील प्रसिद्ध विद्वान् ग्रंथकार जॉन्सन यास 'मानवी इच्छाचें वैयर्थ्य' दाखविण्यासाठीं एक उदाहरण पाहिजे होतें तेव्हा स्वीडन देशचा राजा बारावा चार्लस् ह्याचें चरित्र त्याच्या उपयोगी पडलें. औरंगजेबाचें

चरित्र त्यास माहीत असतें, तर तेंहीं त्याच्या कामास आलें असतें: आणि त्यांतही चमत्कार हा, कीं चार्लस् व औरंगजेब हे एकमेकांचे समकालीन होते. हिंदुस्थानचा बादशहा व स्वीडनचा राजा ह्यांच्या अंगीं साधें वर्तन, अखंड धैर्य, व हट्टी स्वभाव हे गुणावगुण सारखे भरले होते. दोघांचेंही नांव काढिलें असतां त्यांनीं केलेल्या घोर पातकांचें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. चार्लस्नें परराष्ट्राच्या वकिलाला चाकावर आपटून ठार मारिलें, आणि औरंगजेबानें भ्रातृहत्या करून बापास कैदेत टाकलें, ह्या गोष्टींचें इतिहासास कधीं विस्मरण होणार नाहीं. परंतु औरंगजेबाची परिस्थिति प्रत्येक गोष्टींत चार्लस्पेक्षां अत्यंत विस्तृत असल्यामुळें, त्याच्या कृत्यांचा परिणामही तसाच विस्तृत व भयंकर झाला. अर्थात् चार्लस्च्या इतिहासापासून शिकण्याजोगा अंश विशेष निघत नाहीं. पण औरंगजेबाचा अंत म्हणजे मोगल बादशाहीच्या नाशाचा आरंभ होयः आणि तेथपासूनच हिंदुस्थानच्या इतिहासाची दिशा बदलत चालली.

तयमूरलंगच्या घराण्याची हिंदुस्थानांत प्राणप्रतिष्ठा होऊन मोगल बादशाहीचा प्रारंभ झाला. तिचा पहिला पुरुष बाबर हा संपूर्ण वीर्यशाली होता. हुमायून हा भाग्यहीन, वनवास व संकटें यांनीं ग्रस्त झालेला, परंतु सत्त्वशील व साहसी होता. अकबर हा मुत्सद्दी व व्यवस्थापक असून जहांगीर हा बुद्धिमान् परंतु आळशी व दारूबाज, आणि शहाजहान भव्य राजमंदिरें बांधून विलास भोगणारा झाला. ह्यापुढें जो पुरुष त्या वंशांत तख्तनशीन झाला, त्यास तज्ज्ञातीय इतिहासकार साधु असें नांव देतात: आणि परजातीय इतिहासकार क्रूर, कठोर व स्वार्थसाधु अशी त्याची निंदा करितात. मोगल बादशहांच्या ठिकाणीं असे फरक होत जाण्याचीं कारणें स्पष्ट दिसतात. आरंभीं मोगल लोक हे साहसी व स्वोन्नतिप्रीत्यर्थ झटणारे होते, परंतु त्यांस स्वास्थ्य मिळूं लागल्याबरोबर ते चैनी बनले. बाबर बादशहा दोन दिवसांत घोड्यावर १६० मैल मजल करून गंगानदींतून दोन वेळ पोहून गेला. त्याचाच पांचवा वंशज औरंगजेब तख्तावर असतां दरबारच्या लोकांस मृदु मलमलीचा पोषाख सुद्धां जड वाटे. बादशहाच्या स्वारीबरोबर प्रवासांत असतां, ते लोक पलंगावर निजून नोकर त्यांस पलंगासकट वाहून नेत: आणि मुक्कामावर पोंचल्याबरोबर भोजन त्यांची वाट पाहत तयार असे. धर्माच्या बाबतींत असाच फरक झाला होता, हें येथवर सांगितलेल्या इतिहासावरून झालेंच आहे. सर्व जातींच्या रयतेस समबुद्धीनें

वागविणें, ह्या उदात्त तत्त्वावर पूर्वीन्या बादशहांनीं आपल्या राज्याची इमारत सुदृढ केली होती ह्या तत्त्वाविषयीं एतद्देशीय लोकांनीं दाखविलेला आदर हिंदुस्थानच्या इतिहासांत विशेष स्मरणीय झाला आहे अकबराच्या पदरीं मोठमोठे हिंदु सरदार प्रसिद्धीस आले. सर्वांस मान्य होण्याजोग्या नवीन धर्माची त्याने स्थापना केली असा धर्म स्थापन करण्याकडे पूर्वी दोनशे वर्षे हिंदु साधुसंताचे अव्याहत प्रयत्न चालले होते. बंगाल्यात प्रसिद्ध साधु कबीर मरण पावला असता त्याच्याबद्दल हिंदु-मुसलमानांचें भांडण लागलें. त्या वेळचा चमत्कार असा सांगतात कीं साधूनें स्वप्नात येऊन दर्शन दिलें, आणि कफन उघडून पाहण्यास सांगून आपण अदृश्य झाला पुढे कफनाखालीं प्रेताऐवजीं त्यास सुंदर फुलें सापडलीं त्यापैकीं अर्धीं मुसलमानांनीं विधिपूर्वक दफन केलीं, आणि बाकीचीं निम्मीं हिंदूंनीं आपल्या रीतीप्रमाणें दहन केलीं. सारांश, त्या वेळेस धर्मजागृति विशेष झाली होती अकबराच्या वेळेस पुष्कळ देवस्थानें अशीं होतीं, कीं तेथें हिंदु व मुसलमान दोघेही भजनास एकत्र जात, परंतु अकबराच्या मनातील हा धर्मभाव सलीम व शहाजहान ह्याच्या ठिकाणी जागृत नसल्यामुळे अनाचार सुरू झाला, आणि अकबराच्या उदात्त कल्पना बाजूस राहून, ढोंगी व लुच्चे लोक आपला कार्यभाग साधून घेऊं लागले ही शोचनीय स्थिति पाहून स्वधर्मनिष्ठ औरंगजेबास चैन पडेना तेव्हा आजपर्यंत चालत आलेली धर्मभ्रष्टता नाहींशी करून आपला पर्वीचा मुसलमानी धर्म पूर्ववत् चालू करण्याचा त्यान निर्धार केला ह्या कामीं यश येण्याइतकें त्याच्या ठायीं कर्तृत्व व धैर्य होतें एके दिवशीं एक सिंह मोकळा सुटला असता त्याच्या अंगावर धावत जाऊन त्यास औरंगजेबानें ठार मारिलें होते. तरुणपणींच दक्षिणप्रांतावर त्याची नेमणूक झाल्यामुळें तेथील शियापंथी मुसलमानी राज्यें व हिंदुधर्मी मराठे याजवर आपला प्रताप गाजविण्याची त्यास उत्कट इच्छा उत्पन्न झाली. परंतु राज्यप्राप्ति होण्यापर्वी त्यास ही आपली इच्छा तडीस नेता आली नाहीं. आरंभीं कदाचित् त्याच्या मनात राज्यप्राप्तीची इच्छा नसेल पण त्याच्या मनात जी धर्मप्रेरणा होती, ती तडीस नेण्याच्या कामास आपले दोघे वडील भाऊ अयोग्य आहेत असें त्यास वाटल्यामुळें, धर्मवेड व महत्त्वाकांक्षा ह्या दोनही वासना तृप्त करून घेण्याचा त्यानें घाट घातला हा त्यानें कोणत्या रीतीनें तडीस नेला हे पुढे कळून येणार आहे

राज्य प्राप्त झाल्यावर पुढील वर्तनामध्यें त्याच्या डोळ्यांपुढें नेहमीं दोन तीन उद्देश कायमचे होते. पहिला उद्देश असा, कीं अकबराच्या वेळेपासून बिघडलेली दरबारची नीति; दुसरा, आजपर्यंत मुसलमानी धर्माची जी अवहेलना झाली, ती बंद करून पूर्वीप्रमाणें सुनी पंथाची स्थापना करून काफर हिंदु लोकामध्यें त्याचा होईल तितका प्रसार करणें; आणि तिसरा, दक्षिण प्रदेश जिंकण्याचे प्रयत्न पूर्वापार चालू असतां जें काम आपल्या पूर्वजांच्या हातून तडीस गेलें नाहीं, तें आपण करून दाखविणें. हे उद्देश त्यानें एकसमयावच्छेदेंकरून तडीस नेले असते, परंतु मध्यंतरीं अनेक अडचणी आल्यामुळे ते फार लांबणीवर पडले. इतकेंच नाहीं, तर त्या कामीं त्याचे पुढील सर्व श्रम फुकट जाऊन अंतीं त्याचा अत्यंत आशाभंग झाला. अशा उद्देशसिद्धीच्या खटपटींत जीं कृत्यें त्याच्या हातून घडलीं, त्यांजवरून त्याच्या चरित्राचे तीन भाग कल्पितां येतात. पहिला भाग सन १६५८ पासून १६६४ पर्यंतचा. ह्या भागांत त्याने आपल्या सर्व शत्रूंचा पाडाव करून नवीन राज्यपद्धति सुरू केली, ती हकीकत येते. ह्या भागाचे अखेरीस त्याचें राज्य भरभराटीच्या शिखरास पोंचलें, आणि पुढें त्यास उतरती कळा लागली. दुसरा भाग सन १६६५ पासून १६८१ पर्यंतचा. ह्या वेळीं काश्मीर, दिल्ली, व काबूल इत्यादि ठिकाणीं राहून त्यानें धर्मप्रसाराचे नानाविध प्रयत्न केले. पण त्यांत त्यास यश न येऊन निराशेनें त्यानें आपला उद्देश सोडून दिला. तिसरा व शेवटचा भाग सन १६८१ पासून १७०७ पर्यंतचा. ह्या भागांत मुख्यतः त्याच्या दक्षिणच्या स्वारीची हकीकत येते. पंचवीस वर्षेपर्यंत दक्षिणेंत स्वतः राहून तो प्रदेश जिंकण्याचे त्यानें होते तितके प्रयत्न केले, पण येथेंही त्याचा मनोरथ विफल झाला. असो. प्रस्तुत औरंगजेबानें तख्तनशीन झाल्याबरोबर कोणकोणते विशेष फेरफार केले ते सांगावयाचे आहेत.

दुसऱ्या एका दृष्टीनें औरंगजेबाच्या कार्किर्दीचे दोन भाग पाडतां येतील. ता. २१ जुलै १६५८ रोजीं औरंगजेबानें दिल्लीस राज्यारोहण केलें; आणि ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजीं तो अहंमदनगर येथें मरण पावला. म्हणजे त्याच्या कार्किर्दीचीं जवळ जवळ ५० वर्षें होतात. पैकीं २५ वर्षांचा पहिला भाग उत्तर हिंदुस्थानचा कारभार आणि सन १६८२ पासून पुढील २५ वर्षें दक्षिण हिंदुस्थानचा कारभार, असे दोन ठळक विभाग पडतात. पहिल्या भागांत त्याचें

लक्ष सर्वस्वी उत्तर हिंदुस्थानच्या व्यवहारात असून दुसऱ्या भागात उत्तर हिंदुस्थानची सर्वस्वी हेळसाड झाली पहिल्यात दिल्ली, आग्रा, लाहोर या ठिकाणीं राजधानीचे वैभव चमकले, परंतु दुसऱ्यात त्याचे शहराचे वैभव नाहींसे होऊन तेथील मोठमोठे वाडे व बाग ओस पडले उत्तर भागात राज्याचा सर्व व्याप लष्करी हालचालींत व्यक्त होऊन स्वारींतील लोकास घरेदारे सोडून वनवासात राहण्याचा अगदीं वीट आला 'लाख रुपये नजराणा देतो, पण एक वर्ष घरीं राहण्यास रजा द्या,' अशा विनवण्या सरदार बादशहास करूं लागले. लष्करातील रजपूत लोक खंत घेऊन मरूं लागले. आणि आपली सर्व अवलाद संपली, आपला वंशक्षय झाला, असे वाटून सदैव दु ख करूं लागले

औरंगजेबाचीं पहिलीं काहीं वर्षे शाततेत गेलीं इराण, बुखारा, आरबस्तान, अबिसिनिया येथील राजाकडून त्याच्या अभिनंदनार्थ मोठ्या थाटानें वकील आले त्या सर्वांचा उत्तम सत्कार करून औरंगजेबाने त्यास आपल्या वैभवानें दिपवून सोडले.

आरंभींच त्याने आग्र्याच्या किल्ल्यातील सर्व संपति शेकडों गाडे भरून दिल्लीस नेली दिल्लीच्या मुख्य काजीनें, शहाजहान जिवंत असल्यामुळे, औरंगजेबास बादशहा असें कबूल केलें नाहीं, आणि त्याच्या नावाने खुतबा वाचिला नाहीं मक्का येथील मुख्य धर्माध्यक्षानेंही सर्व यात्रेकरूंस असें जाहीर केलें, कीं शहाजहानशिवाय दुसऱ्या हिंदुस्थानच्या बादशहास आपण ओळखीत नाहीं. औरंगजेबानें आपल्या वकिलावरोबर पुष्कळ पैसे मक्केस पाठविले, पण त्या धर्माध्यक्षानें त्याचा स्वीकार न करिता ते तसेंच परत पाठविले. तेव्हा दिल्लींतील मुख्य काजीस सर्व मुल्लालोकासमक्ष औरंगजेबानें बडतर्फ केले तेव्हा ऑक्टोबर सन १६६० पासून औरंगजेबाच्या नावाने खुतबा वाचण्याची सुरुवात झाली औरंगजेबानें अलीकडे जीं घोर कृत्ये केलीं, त्यामुळे त्याजवर सर्वांचा रोष झाला. होता. तो कमी करण्यासाठीं सर्व अमीरउमरावास व हिंदु राजास दिल्लीस बोलावून त्यानें एक मोठी मेजवानी दिली तो समारंभ नऊ दिवस चालला होता त्यामुळे मुसलमानाच्या मनात बराच तिरस्कार उत्पन्न झाला, तथापि तो दूर करण्याकरिता त्याने लगेच अनेक उलट हुकूम फर्माविले. मद्यप्राशनाची सक्त बंदी केली जे कोणी मुसलमान मद्यपान करितांना आढळतील, त्याचे हातपाय तोडण्याचा त्यानें हुकूम दिला. क्रिस्ती

लोकांनीं मुद्धां आपल्या वस्तीबाहेर दारू पिऊं नये अगर विकूं नये असें त्यानें फर्माविलें. त्याचप्रमाणें गाणेंबजावणें त्यानें बंद केलें. जे कोणी शहरांत गायनवादन करीत असतील, त्यांच्या घरांत शिरून त्यांचीं वाद्यें फोडून टाकण्याचा सपाटा चालवला. शेकडों गवई लोक भिकेस लागले. त्याचप्रमाणें नृत्यकला बंद झाल्यामुळें अनेक कलावंतिणी उपाशी मरूं लागल्या. तेव्हां त्यांनीं लग्नें करावीं असें औरंगजेबानें फर्माविलें. सुनी पंथाचा प्रसार व्हावा म्हणून त्याच्या पदरीं जे शियापंथी इराणी आसामदार होते, त्या सर्वांचीं इनामें बंद केलीं; तेव्हां ते निघून काश्मीरकडे गेले. राज्यांत काय चाललें आहे, त्याची आपणास खबर कळावी म्हणून गुप्त बातमीदारांचें खातें त्यानें विशेष वाढविलें. ह्या सर्व गोष्टींनीं असंतोष उत्पन्न झाला. शहाजहानने औरंगजेबाची चांगली कानउघडणी केली. त्याजबद्दल उलट तो बापास वाईट रीतीनें वागवूं लागला. काबूलचा सुभेदार महाबतखान ह्यानें औरंगजेबाचा पुष्कळ निषेध केला. तो न आवडून महाबतखान कदाचित् इराणच्या शियापंथी शहास मिळेल, ह्या भीतीनें त्याची औरंगजेबानें गुजराथच्या सुभ्यावर बदली केली, आणि बापाची सक्त कैद ढिली केली.

लवकरच सर्व लोकास कळून आलें, कीं आपला नवीन धनी आजपर्यंत झालेल्या बादशहांसारखा नाहीं; शिपाई, बादशहा व साधु अशा तीन लक्षणांचें तो मिश्रण आहे. त्याचें वर्तन नेहमीं शांत व नम्र असे. अत्यंत विजयोत्साहांत व अत्यंत दुर्धर प्रसंगीं सदैव ईश्वरावर भरंवसा टाकून स्वस्थ बसण्याची त्याची हातोटी विलक्षण होती. तो कधीं उच्च स्थानावर बसत नसे, कीं सोन्याचांदीचीं भांडीं वापरीत नसे. दरबारांतून होणारा धर्मादायाचा खर्च त्यानें दुप्पट वाढविला; आणि गरीब व आजारी लोकांच्या शुश्रूषेकरितां नवीन गृहें स्थापन केलीं. दिवसांतून दोन वेळ तो भरदरबारांत सरकारी कामानिमित्त येऊन बसूं लागला. शुक्रवारीं भजनाचा मेळा काढून त्याबरोबर आपण मशिदींत जाण्याचा त्यानें प्रघात सुरू केला. रमजान महिन्यांत तो दररात्रीं सहापासून नऊ तास कुराण वाचीत बसे. दोन लाखांवर खर्च करून मुसलमानी कायद्यांचें त्यानें एकीकरण करविलें, त्यास 'फत्वा-ए-आलमगीर' असें नांव आहे. अशा प्रकारें ह्या नवीन कारकिर्दीस सुरवात झाली.

२. **मीर-जुम्ला.**--सन १६६१ पर्यंत औरंगजेबाचा सर्व काल बंधूंचा संहार

करण्यात गेला त्याचा केवळ उजवा हात जो मीर-जुम्ला तो शुजास आराकानात घालवून दिल्यावर बंगाल प्रांतांत स्वास्थ्य करीत होता. पुढे औरंगजेबानें त्यास बंगालचा सुभेदार नेमिलें. नंतर त्याच्या मनांत दक्षिणेंत जाऊन विजापुर व गोवळकोंडें हीं राज्यें काबीज करण्याचा विचार होता. वृद्धापकाळ झाल्यामुळें आपलीं मुलेंमाणसें स्वतः जवळ असावीं असें वाटून, दिल्लीहून त्यास आपणाकडे पाठवून देण्यास मीर-जुम्ला यानें बादशहास विनंति केली. औरंगजेबाच्या संशयी स्वभावास मीर-जुम्ला याचा कधीं भरंवसा आला नाहीं. हा बलाढ्य सरदार केव्हांना केव्हां तरी आपणावर उठेल अशी त्यास भीति होती. सबब त्याचा मुलगा महंमद अमीनखान यास स्वतः जवळ ठेवून घेऊन बाकीच्या मंडळीस त्यानें मीर-जुम्ला याजकडे पाठवून दिलें. आणि महंमद अमीनखानास मीर-बक्षी म्हणजे स्वारांचा मुख्य सरदार हें काम देऊन स्वतः जवळ ठेविलें. मीर-जुम्ला यास औरंगजेबानें आसाम प्रांत जिंकण्यास पाठविलें. तें काम त्यानें चांगल्या रीतीनें तडीस नेऊन चीन देशच्या हद्दीपासून वीस दिवसांच्या मजलेवर येऊन पोंचला. आसामची राजधानी घेरगांव त्यानें काबीज केली. आणि पुष्कळ संपत्ति मिळविली. औरंगजेबाच्या मनांत चीन देश जिंकण्याची फार इच्छा होती, ती मीर-जुम्ला यानें तडीस नेली असें त्यास वाटलें. इतक्यांत पर्जन्यकाळ लागल्या-मुळें मीर-जुम्ला यास पुढें जातां येईना. आसामच्या राजानें आसपासचा सर्व मुलख ओस पाडिला. तेव्हां मीर-जुम्लाच्या सैन्यांत धान्याचा फार तोटा पडला. त्यास मागेंही फिरतां येईना. शेवटीं हतवीर्य होऊन मोठ्या संकटानें तो सरहद्दीवरच्या एका किल्ल्यांत परत आला. दुसऱ्या वर्षी आसामवर पुनः स्वारी करीत असतां तो आमाशाचा आजार होऊन सन १६६३ त मरण पावला. मीर-जुम्ला याच्यासारखे शूर, शहाणे, व कारस्थानी पुरुष थोडेच निपजले. औरंगजेबास राज्य प्राप्त होण्यास मुख्य कारण तोच झाला. मरणा-पूर्वी स्वतः जवळ असलेला कोह-इ-नूर हिरा त्यानें बादशहास नजर केला असें म्हणतात. मीर-जुम्लाच्या हाताखालील सुरेख फौजेचा नाश झाला म्हणून औरंगजेबाला जरी वाईट वाटलें, तरी मीर-जुम्लासारखा डोईजड सरदार मरण पावल्यामुळें त्याचें चित्त स्वस्थ झालें. त्याचा मुलगा महंमद अमीनखान यास त्यानें सन्मानानें वागविलें. पश्चात् बंगालच्या सुभेदारीवर शायिस्ताखानाची नेमणूक बादशहानें केली.

**३ बुंदेले राजांशीं युद्ध व पूर्वपीठिका.**—बुंदेलखंडचा राजा छत्रसाल याजबरोबर औरंगजेबाचें युद्ध पुष्कळ दिवस चाललें होतें. ह्या बुंदेले राजाची थोडीशी पूर्वपीठिका देणें जरूर आहे. बुंदेलखंड प्रांत यमुनेच्या दक्षिणेस विंध्याद्रीपर्यंत विस्तारतो असें प्राचीन लेखांत सांगितलें आहे. त्यांत लहान लहान पुष्कळ संस्थानें होतीं. इसवी सनाच्या आरंभास ह्या प्रदेशावर गुप्त, नाग, व कच्छवाह इत्यादि वंशांचे राजे राज्य करीत होते. पुढें कांहीं दिवस तो प्रांत कनोजच्या रजपूत राजांच्या ताब्यांत होता. नवव्या शतकाच्या सुमारास चंडेल नांवाचें रजपूत घराणें बुंदेलखंडावर राज्य करीत होतें. त्याची राजधानी महोबा येथें होती. इ. स. ११८३ मध्यें दिल्लीचा राजा पृथ्वीराज चव्हाण ह्यानें परमल नामक चंडेल राजावर स्वारी करून बुंदेलखंडावर आपला अंमल बसविला. पुढें हिंदुस्थानांत मुसलमानांचा अंमल सुरू झाला, तेव्हां बुंदेलखंडांतील काल्पी, कलिंजर, चंदेरी वगैरे मजबूद किल्ले त्यांनीं अनेक वेळां काबीज केले; आणि अनेक वेळां ते त्यांच्या हातांतून गेले. आरंभीं गुलाम सुलतान कुत्बुद्दीन, अल्तमश, नासिरुद्दीन महंमूद, इत्यादि पुरुषांनीं सर्व बुंदेलखंड हळूहळू आपल्या ताब्यांत आणिलें. ह्या प्रांतास बुंदेलखंड हें नांव काशी येथील कोणी एका सूर्यवंशी पंचम नामक राजानें दिलें असें सांगतात. पदभ्रष्ट झाल्यामुळें बुंदेलखंडात येऊन महोबा येथें त्यानें स्वतंत्र राज्याची स्थापना केली. त्याच्याच वंशांत पुढें रुद्रप्रताप म्हणून एक पराक्रमी पुरुष झाला. त्यानें ओर्छा येथें नवीन शहर वसवून बुंदेल्यांच्या कुलास विशेष महत्त्व आणिलें. रुद्रप्रताप राजास बारा पुत्र झाले, ते सर्व एकापेक्षां एक पराक्रमी निघाले. सांप्रत बुंदेलखंडांत जीं लहान मोठीं राज्यें आहेत, तीं सर्व ह्या द्वादश पुरुषांचाच विस्तार होत. रुद्रप्रतापाचा वडील मुलगा राजा भारतीचंद हा इसवी सन १५७४ त मरण पावला आणि त्याचा भाऊ मधुकरसा हा गादीवर अधिष्ठित झाला. त्या वेळेस दिल्लीस अकबर बादशहा राज्य करीत होता. अकबराचा सरदार सय्यद महंमद बडा हा बुंदेलखंडाच्या कारभारावर होता. बुंदेले राजे आपला मुलूख बादशहाच्या ताब्यांतून सोडविण्यासाठीं एकसारखे झटत असल्यामुळें अकबरास त्यांजबरोबर युद्ध करावें लागलें. सन १५७८ सालीं गडमंडळचा सुभेदार सादतखान व दुसरे सरदार यांच्या हाताखालीं सैन्य देऊन अकबरानें ओर्छावर पाठविलें. पुढें उभयतांच्या

अनेक चकमकी झडून राजा मधुकरसा अकबरास शरण गेला बादशहाने त्याज-कडे त्याचे राज्य चालू ठेविले मधुकरसा सन १५९३ त मरण पावला नंतर त्याचा मुलगा रामचंद्रसा गादीवर बसला स १६०६ साली जहागीर बादशहाने रामचंद्रसा यास गादीवरून काढून ओर्छाचे राज्य त्याचा धाकटा भाऊ वीर-सिंहदेव यास दिले परंतु रामचंद्रसा याजवर जहागीरची पुढें बहाल मर्जी होऊन त्याच्या एका कन्येशीं बादशहाने लग्न केले रामचंद्रसा चंदेरी येथे राज्य स्थापन करून सन १६१२ त मृत्यु पावला वीरसिंहदेव हा आरंभापासूनच शहाजादा सलीम यास मिळून होता सन १६०२ या वर्षी सलीमने बापा-विरुद्ध बंड केले, त्यात त्यास ह्या वीरसिंहदेवाचे साहाय्य होते. वीरसिंहानेच अबुल्-फज्ल् यास पकडून ठार मारिले ह्याच कामगिरीबद्दल बुंदेलखंडचें राज्य जहागीरने वीरसिंहास दिले वीरसिंहाचा चुलतभाऊ चंपतराय हा महोबा येथे राज्य करीत होता जहागीर बादशहा मरण पावला, तेव्हा सर्व बुंदेले राजानीं एकत्र होऊन दिल्लीपतीचे सार्वभौमत्व झुगारून देण्याची खटपट चालविली. शहाजहानने बाकीखान नामक सरदार त्याजवर पाठविला परंतु चंपतरायाने अद्वितीय पराक्रम करून बादशाही फौजेस परत लाविलें ह्या प्रसंगी चंपतरायाचा मुलगा सर्वाहन बाकीखानाशीं लढताना धारातीर्थी पतन पावला पुढें शहाजहानने बुंदेलखंड जिकण्यास हरप्रयत्न केले, पण ते सिद्धीस गेले नाहींत तेव्हा ज्यास्तच त्वेष येऊन आग्र्याहून महाबतखान, दक्षि-णेतून खानजहान लोदी, आणि अलाहाबादेहून अब्दुल्ला ह्या तिघांस बुंदेल-खंडावर. स्वारी करण्याचे त्याने हुकूम पाठविले, परंतु शिवाजीच्या मावळ्याप्रमाणें बुंदेले रजपुतानीं डोंगराळ प्रदेशाचा आश्रय करून मोगली फौजेस जर्जर केलें मी मी म्हणणारे मोटमोठे मुसलमान योद्धे पतन पावले शेवटीं शहाजहाननें कंटाळून बुंदेले राजाबरोबर तह केला, वीर-सिंहदेवाचा मुलगा पहारसिंह यास ओर्छाचा राजा कबूल केलं, आणि चंपत-रायास कोंच परगणा जहागिर देऊन त्यास आपल्या उमरावात जागा दिली. पहारसिंहाचे व चंपतरायाचें पुढें वाकडें आले. दाराने पहारसिंहाचा पक्ष घेतला, तेव्हा औरंगजेबानें चंपतरायास आपणाकडे बोलाविलें. सामूगड येथील लढाईत चंपतरायाने अद्वितीय पराक्रम केला या उपकाराबद्दल औरंगजेबानें बादशहा झाल्यावर त्यास बारा हजार स्वाराची मनसब देऊन श्रेष्ठ प्रतीच्या उमरावामध्यें

त्याची अग्रस्थानीं योजना केली, असें बुंदेल्याचा लाल कवि लिहितो. तें सर्व खरं नसावें. औरंगजेबाच्या कपटी स्वभावास ह्या वीर्यशाली बुंदेले सरदारांचा प्रभाव रुचला नाहीं. लवकरच चंपतरायाचा त्यानें अपमान केला आणि त्यास आपल्या जवळून काढून दिलें. ह्या अपमानाचा सूड घेण्याचा विचार करून चंपतराय बुंदेलखंडांत परत आला. तेथें फौजेची जमवाजमव करीत असतां त्याजवर औरंगजेबानें शुभकर्ण बुंदेला व आणखी रजपुत अधिकारी फेब्रुवारी १६५९ त पाठविले. चंपतरायाने स्वतःचा बचाव करीत जिवावर उदार होऊन यवन फौजेशीं सामना केला, पण अखेरीस नाइलाज होऊन एका जंगलातून जात असतां त्यास शत्रूंनीं गांठिलें; त्या प्रसंगीं तो महावीर आपला अद्वितीय पराक्रम दाखवून क्षात्रधर्माप्रमाणे धारातीर्थी मरण पावला. त्याची राणी कालीकुमारी इनेंही वनवासांत त्याजबरोबर राहून आपला कंठ चिरून प्राण दिला.

**छत्रसाल**.––महाराष्ट्राचे मराठे व मध्यहिंदुस्थानचे बुंदेले याच्या या वेळच्या चरित्रक्रमांत एक प्रकारचें विलक्षण साम्य आहे. दोघेही स्वदेशस्वातंत्र्याकरिता जिवापाड मेहेनत करीत होते. चंपतराय व शहाजी भोसले या पुरुषांतही निकट साम्य दृग्गोचर होतें. एका गोष्टींत तर तें साम्य फारच मनोरम झालें आहे. ज्याप्रमाणे शहाजीच्या पोटीं स्वदेशाचा उद्धार करणारा शिवाजी जन्मला, त्याचप्रमाणे चंपतरायाचा मुलगा छत्रसाल यानें बुंदेले लोकांचें स्वातंत्र्य परत मिळविलें. चंपतरायास मरणसमयीं पांच मुलगे होते; त्यांपैकीं चौथा छत्रसाल सन १६५० च्या सुमारास जन्मला. त्याचें लहानपणचें शिक्षण बहुतेक अंशीं शिवाजीसारखेंच झालें. पौराणिक कथा श्रवण करण्याचा त्यास विशेष नाद होता. बाप मरण पावल्यावर स्वदेशाचें स्वातंत्र्य स्थापन करण्यांत देह झिजविण्याचा त्यानें संकल्प केला, आणि मोगल सत्तेचा पाडाव झालेला पाहून वृद्धापकाळीं ऐशीं वर्षांवर वय होऊन तो मरण पावला.

चंपतरायाच्या उच्छेदामुळे सर्व बुंदेले त्याजविरुद्ध उठलेले होते. म्हणून त्याच्या ह्या पांच मुलांस कोठेंच आधार मिळेना. मीर्झा राजा जयसिंहाची नेमणूक शिवाजीवर झाली, तेव्हां आपणास या स्वारींत नोकरी देऊन बरोबर न्यावें अशी छत्रसाल व त्याचा वडील भाऊ अंगद यांनीं त्याजपाशीं याचना केली. परंतु हे कदाचित् दगा करतील असें वाटून जयसिंगानें त्यांस बरोबर घेतलें, पण काम कांहीं दिलें नाहीं. पुढें पुरंदरच्या वेढ्यांत त्यांनीं जिवावरचें

साहस केले, त्यावरून अंगदास एक हजार व छत्रसालास तीनशे अशा मनसबी जयसिंहाने बादशहाकडून ता ३-८-१६६५ रोजी करून देवविल्या पुढे ते बंधु जयसिंहाबरोबर विजापुरवर चालून गेले, (डिसें १६६५-फेब्रु० १६६६) काहीं काळाने गोंडवणातील देवगडावर दिलेरखानाने हल्ला केला त्यात त्याने छत्रसालाचा उपयोग केला त्या प्रसंगीं छत्रसालास मोठमोठ्या जखमा लागल्या, पण जय मिळाला दक्षिणत आल्यापासन शिवाजीचे पराक्रम ऐकून छत्रसालास नवीनच स्फूर्ति उत्पन्न झाली, आणि मोगलाच्या पदरीं हलकी नोकरी करण्यापेक्षा, त्याजविरुद्धच आपले क्षात्रतेज गाजविण्याचा त्यान निश्चय केला एके दिवशीं शिकारीस जाण्याचे निमित्त करून तो आपल्या बायकोसह बाहेर पडून थेट शिवाजीकडे आला पवी संकेत ठरविल्याप्रमाणे उभयताची भेट भीमा नदीच्या काठीं झाली शिवाजीने त्यास बुंदेलखंडात जाऊन तेथील लोकास मोगलावर उठण्याविषयीं परोपरी सागितले बुंदेल्यानीं उत्तरेंत व मराठ्यानीं दक्षिणेत, अशा रीतीने एकदम उठावा केल्यास मोगलास हार खावी लागेल, अशी मसलत ठरली शिवाजीने छत्रसालास तलवार बक्षीस देऊन मोठ्या सन्मानाने मार्गस्थ केले दोन राष्ट्रपुरुषाच्या त्या प्रेमळ भेटीच वर्णन भूषण कवीने फार सुरस केले आहे ही भेट सन १६६७ त झाली असली पाहिजे

छत्रसाल परत जाऊन शुभकर्ण नामक बुंदेला सरदार इकडेच मोगल फौजेत होता, त्यास भेटला परंतु शुभकर्ण त्यास सामील होईना तो छत्रसालास म्हणाला, 'तुम्हास मनसब पाहिजे असेल तर बादशहाकडे शिफारस करून देवविनों, परतु बंडखोरी पत्करण योग्य नाहीं.' छत्रसालास मोगलाची नोकरी करणे अत्यंत नापसंत वाटून तो तसाच विवंचनेत स्वदेशीं गेला त्याजवळ मनुष्यबळ किंवा द्रव्यबळ काहींच नव्हते याच सुमारास म्हणजे स १६७० त हिंदु लोकाचीं मंदिरें जमीनदोस्त करण्याचा बादशहाने हुकूम सोडिला, तो छत्रसालच्या पथ्यावर पडला ग्वाल्हेर येथे फिदाईखान म्हणून मोगल अधिकारी होता, तो ओर्छा येथील मंदिर फोडण्यास आला असता धर्मागदाने बुंदेले वीराच्या मदतीने त्याचा धुव्वा उडवून दिला. आपल्या धर्मावर जो हा उगाच घाला आला, त्यामुळे ते अतिशय चिडून गेले, आणि जे कित्येक सरदार बादशहाचे चाकरीत होते त्याचीं सुद्धा मनें फिरलीं या प्रसंगीं छत्रसालासारखा पुढारी त्यास आयताच मिळाला ओर्छाचा राजा सुजनसिंग व दिवाण बळदेव

यांनीं छत्रसालाशीं संगनमत केलें. आरंभीं छत्रसालाजवळ फक्त पांच स्वार व पंचवीस पायदळ शिपाई होते. बाकीखान नांवाचा एक अफगाण सरदार मोगलांशीं विरुद्ध होता, तो या बुंदेल्यांस सामिल झाला. बंडास सुरुवात होतांच छत्रसालाची फौज वाढत गेली. पूर्वी चंपतरायास भजणारे अनेक बुंदेले वीर होते, ते छत्रसालास लगोलग येऊन मिळाले. हळू हळू त्यास जय मिळत गेले; तसा त्याचा लौकिक वाढला. त्याचा भाऊ रतनशहा व बुंदीचा राजा दुर्जनसाल हे त्याच्या साह्यास आले. छत्रसालानें जिकडे तिकडे स्वाऱ्या करून मराठ्यांप्रमाणेंच चौथाई वसूल करण्याचा प्रघात घातला. येणें करून छत्रसालाच्या गुणांची जिकडे तिकडे वाहवा होऊन पूर्वी जे बुंदेले राजे मोगलांस मिळून होते, तेही त्यास येऊन मिळाले. छत्रसाल बादशाही मुलखांत लूटमार करून डोंगरी किल्ले सर करूं लागला. भिलसा, सिरोंज, धामुनी, कालिंजर वगैरे ठिकाणें त्यानें हस्तगत केलीं. नेमाजी शिंदे दक्षिणेंतून माळव्यावर स्वाऱ्या करीत होता, त्याजबरोबर छत्रसालानें मैत्री केली, आणि उभयतांनीं बादशाहीस नेट लाविला. औरंगजेबास हें वर्तमान कळतांच त्यानें बुंदेलखंड सर करण्याची कडेकोट तयारी केली, आणि रणदुल्लाखान यास फौजेचा अधिपति नेमिलें. गडकोटा येथें उभयतांची निकराची लढाई होऊन रणदुल्लाखान पराभव पावून पळून गेला. तेव्हां बादशहास परमावधीचें दुःख झालें. बुंदेले लोक दिल्लीवर येतात कीं काय, अशी त्यास भीति पडली. पुनः त्यानें तुहव्वरखान नामक शूर व युक्तिवान सरदाराची बुंदेले लोकांवर रवानगी केली. पण त्याचाही पराभव होऊन तो परत गेला. या विजयाच्या योगानें छत्रसालाचें वैभव फारच वाढत चाललें. हळूहळू बुंदेलखंडांतले बहुतेक राजे त्यानें आपल्या ताब्यांत आणिले आणि सर्व बुंदेलखंडावर निष्कंटक सत्ता सुरू केली. आसपासचे मुसलमान सरदारही त्यास कारभार देऊं लागले. पुढें स. १६९९ त बादशहानें शेख अन्वरखान यास छत्रसालावर पाठविलें. पण त्याचीही इतकी दुर्दशा झाली, कीं छत्रसालास शरण जाऊन सव्वा लाख रुपये दंड भरून, त्यास आपली सुटका करून घेणें भाग पडलें. बादशहानें भर दरबारांत अन्वरखानाची निर्भर्त्सना करून त्याचे सर्व मानमरातब काढून घेतले; आणि बुंदेले लोकांचें पारिपत्य करणारा एकही इसम आपणापाशीं नाहीं, याबद्दल अत्यंत खेदसूचक भाषण

दरबारात केले त्या वेळीं मीर्झा सदरुद्दीन नामक उमराव पुढे झाला, आणि बादशहाने सांगितलेलें काम तडीस नेण्याचे त्याने पत्करिले. औरंगजेबानेही छत्रसालास ताब्यात आणण्याचे अनेक हितमंत्र व कपटवाद त्यास सांगितले. परंतु अंतत: त्याही सरदारास इतराप्रमाणें अपमान सोसून परत यावे लागले. त्याचप्रमाणे पुढे आणखी अनेक मुसलमान सरदार पराभव पावून हातटेकीस आले शेवटीं औरंगजेबाचा सरदार फिरोजजंग याच्या सल्ल्यावरून बादशहाने स १७०५ त छत्रसालास दक्षिणेत आपल्या भेटीस आणून त्याशीं दोस्ती केली, आणि त्यास चार हजारी मनसब दिली छत्रसालाचे हें युद्ध चालू असता छत्रसाल राजाचा गुरु श्रीप्राणनाथप्रभु याने त्यास वारंवार प्रोत्साहन व आशीर्वचने देऊन बुंदेल्याच्या मनात आवेश उत्पन्न केला स. १७०७ त औरंगजेब बादशहा मरण पावल्यावर त्याचा पुत्र बहादूरशहा याने छत्रसालाचे स्वातंत्र्य कबूल करून त्याची अनेक प्रसंगीं मदत घेतली. इकडे छत्रसालाने सर्व बुंदेलखंड काबीज करून व खुद्द दिल्लीदरबारावर आपली छाप बसवून पन्ना येथे स्वतंत्र रीतीने राज्यकारभार चालू केला ह्यापुढे छत्रसालाचा मोगलाशीं विशेष संबंध घडला नाही छत्रसालाच्याच मार्फतीने मराठ्याचा बुंदेलखंडात प्रवेश झाला ती हकीकत मराठ्याचे भागात येईल बुंदेल्याचा इतिहास बऱ्याच अंशीं मराठ्याचे इतिहासाशीं मिळता आहे *

• ४. **जनानखान्यांतील मसलती**.—ह्या कार्किर्दीच्या प्रथम भागांतील एक महत्त्वाचे वर्ष म्हटले म्हणजे स १६६२ हे होय त्या वर्षीं औरंगजेबास जबरदस्त दुखणे लागले, (ता.१२मे–२४ जून) त्या दुखण्यात तो शुद्धीवर नव्हता. त्याची बहीण रोशन-आरा हिची त्याजवर सर्वतोपरी देखरेख असे. बाहेर तातीर बायाचा कडक पहारा असे. ह्या दुखण्याची हकीकत इतकी गुप्त ठेवण्यात आली, कीं बादशहा मरण पावला अशीच पुष्कळाची समजूत झाली. प्रत्यक्ष त्याच्या बायकोसही बादशहाची भेट घेता येईनाशी झाली अलीकडे रोशन-आराचे महत्त्व फार वाढले होते सर्व जनानखाना तिच्या ताब्यात होता. तिनेंच औरंगजेबास राज्य प्राप्त करून देण्यास विशेष मदत केली असल्यामुळे औरंगजेब तिचे म्हणणे कधी मोडीत नसे औरंगजेब आतां जगत नाहीं, असे तीस

* पारसनीसकृत बुंदेलखंड, व सरकारकृत औरंगजेब भा ३ पृ. ६९०.

वाटल्यावरून, पुढे आपलें महत्त्व कायम राखण्याचा उद्योग तिनें आरंभिला. औरंगजेबाचा वडील मुलगा सुलतान मुअज्जम हा रजपूत राणीच्या पोटचा असून १९ वर्षांचा होता. दुसरा मुलगा अजीमशहा हा मुसलमान राणीच्या पोटचा असून केवळ सहा वर्षांचा अल्पवयस्क होता. या लहान मुलास तख्तावर बसविलें म्हणजे आपली सत्ता कायम राहील असें रौशन-आरा हिला वाटलें. तदनुसार तिनें राज्यांतील सर्व अमीर उमरावांस शेकडों पत्रें लिहिलीं. औरंगजेबाच्या बोटांत राहणारी आंगठी काढून घेऊन तिनें ती प्रत्येक पत्रावर मोर्तब करी. ह्या बेताची थोडीबहुत कुणकुण इतर बायाच्या कानावर गेली. वडील राणी रजपूत होती, तरी तीच पट्टराणी असून औरंगजेबापाशीं तिचें वजन कांहीं कमी नव्हतें. तिच्यासाठीं हिंदु चालीच्या देवपूजेच्या अनेक गोष्टी औरंगजेब स्वतः करीत असे. तेव्हां नवरा जिवंत आहे कीं नाहीं, ह्याचा पूर्ण तपास करण्याच्या इराद्यानें, तिनें पहारेकरी बायांस पैसे भरून बादशहाच्या खोलींत प्रवेश केला. तेव्हां तो जिवंत आहे, पण आपणास ओळखीत नाहीं असें तीस आढळलें. इतक्यात राणी आंत आल्याची वार्ता रौशन-आराला लागून ती वाघिणीसारखी चवताळून राणीच्या अंगावर गेली. तिला क्रूरपणानें ताडन करून तिनें बादशहाच्या खोलीतून राणीला हुसकून दिलें. हा अपमान त्या राणीस कसा सहन होणार! तिनें ती हकीकत आपल्या मुलास कळविली. तेव्हां रौशन-आराचे बेत मोडून काढण्याची त्यानें खटपट चालविली. राजा जयसिंह ह्या वेळेस दिल्लींत होता. मनात आलें तर एखादी गोष्ट तडीस नेण्याची शक्ति ह्या बलाढ्य रजपूत राजाच्याच अंगीं होती. त्याजकडे मुअज्जम जाऊन सांगूं लागला, कीं 'औरंगजेब मरण पावला आहे. अशा प्रसंगीं बंधूंचा वध करून राज्य मिळविण्याची माझी इच्छा नाही. मी शहाजहानास सुद्धां परत गादीवर आणण्यास तयार आहें.' हें ऐकून जयसिंहानें वरकरणीं त्याचें बोलणे मान्य केलें. 'मी मदत करण्यास तयार आहें, शहाजहानास सोडविणें चांगलें नाहीं,' इत्यादि गोष्टी सांगून औरंगजेबाच्या मृत्यूची खरी वार्ता कळेपर्यंत तो कोणाच्याच पक्षास उघडपणें मिळेना. औरंगजेबाची त्यास मोठी दहशत पडली होती. राजवाड्यांतील लोकांस पैसे भरून खरें वृत्त समजून घेण्याचे त्यानें नाना यत्न केले. शेवटीं त्याला असें खास कळलें, कीं औरंगजेब जिवंत आहे. तेव्हां प्रस्तुत प्रसंगीं हालचाल करण्यास तो धजेना. ह्या प्रसंगीं राज्यांत बंडें

झालीं नाहींत हेच मोठे आश्चर्य होय. औरंगजेबाचा धाकच सर्व लोकांस दाबात ठेवीत होता. शेवटी त्याची तब्यत हळूहळू सुधारत चालली. तसा प्रथम तो राजा जयसिंह व इतर सरदारास भेटला, तेव्हा त्याच्या मनातील संशयाची निवृत्ति झाली. लौकरच औरंगजेबास आपल्या बोटांतील अंगठीची आठवण झाली. बहिणीने त्यास सांगितले, कीं ती बोटांतून गळून पडली. ह्या उत्तराने त्याच्या मनात जबर संशय उत्पन्न होऊन, योग्य संधि येताच त्याचा निकाल करण्याचा त्याने आपल्या मनात निश्चय केला. काहीं दिवसांनीं भर दरबारात येऊन बसण्याइतकी बादशहास शक्ति आली. आपण सर्वांच्या दृष्टीस पडण्याच्या हेतूने वाटेल त्याने दरबारास यावे अशी द्वाही त्याने फिरविली. तेव्हा सर्व शहर त्यास पाहण्यास लोटले. त्या वेळीं सर्वांसमक्ष जीवदान दिल्याबद्दल ईश्वराचे आभार मानून त्याने अशी काहीं धार्मिक वृत्ति धारण केली, कीं त्या योगे सर्व लोकांचे समाधान झाले. ह्या प्रसंगीं मुसलमानावरील कित्येक कर त्याने माफ केले. येणेकरून त्याने हिंदूंचीं मने दुखविलीं. पुढे जो त्याने त्याचा छळ आरंभिला, त्याची ही केवळ सुरुवात होय.

हळूहळू आपल्या बहिणीविषयीं औरंगजेबास संशय येऊं लागला. आतापर्यंत रोशन-आराने आपल्या उद्दामपणाने जनानखान्यातील बहुतेकांचीं मने दुखविलीं होतीं. बादशहाच्या मनातील तिजबद्दलचा किंतु त्यास व्यक्त होताच, तिच्याबद्दल नानातऱ्हेच्या कागाळ्या बादशहाच्या कानावर जाऊं लागल्या. आपण आजारी पडल्यावर तिने काय काय खटपटी केल्या, आपली दहशत लोकास नसती तर सर्व राज्यात दंगा उसळण्याचा प्रसंग कसा येऊन ठेपला होता, इत्यादि अनुमान बादशहास सहज काढिता आलीं. रागाने तो अगदी वेडा होऊन गेला. तरी पण आपल्या मनातील संशय झाकून तो रोशन-आराविषयीं आपली इतराजी जपून दाखवूं लागला. रजपूत राणीचे वजन त्याने वाढविले, आपल्या दुखण्यामध्ये तिने दाखविलेल्या कळकळीबद्दल तिची प्रशंसा करून तीस नवीन किताब दिले. रोशन-आराला हे न खपून तिनें एका स्वतंत्र वाड्यात जाऊन राहण्याची परवानगी मागितली. 'तुझ्याशिवाय माझ्या लहान मुलीचे शिक्षण तडीस जाणार नाहीं,' अशी थाप देऊन त्याने तीस दूर जाऊं दिले नाही. औरंगजेबास मुले किती होतीं, तीं एकदा समजलीं म्हणजे पुढील हकीकत कळण्यास अडचण पडणार नाहीं, सबब त्याची नावनिशी प्रथम देतों.

**औरंगजेबाचीं बायकांमुलें.**--**पहिली बायको**-दिलरास बानू. हिला बेगम अशी संज्ञा होती. ती औरंगाबाद येथें ता. ८ ऑक्टोबर १६५७ रोजीं बाळंतरोगानें मरण पावली. औरंगाबादेस तिची कबर आहे. ती बरीच हट्टी व उद्दाम होती. नवरा तिला भिऊन असे. मुले--१**झेबुन्निसा**, जन्म दौलताबाद, ता. १५ फेब्रुवारी १६३८; मृत्यु, दिल्ली ता. २६ मे, १७०२; अविवाहित. ती हुशार व शिकलेली होती. तिला शिकविण्यास एक विद्वान् बाई ठेविलेली होती. तिनें सर्व कुराण तोंडपाठ म्हणून दाखविलें तेव्हां औरंगजेबाला फार आनंद होऊन, त्यानें तिला तीस हजार मोहोरा बक्षीस दिल्या. तिला आरबी व फारशी भाषा चांगल्या येत होत्या. तिचा पुस्तकसंग्रह फार मोठा होता. औरंगजेबास कवितेची आवड नसल्यामुळें, कवींचा व विद्वानांचा बंद पडलेला आश्रय, तिनें आपल्या पैशांतून चालू ठेविला. भाऊ अकबर याचा पक्ष घेऊन त्यास तिनें पत्रें लिहिलीं, तीं पकडल्यावर बादशहानें तिला स. १६८१ जानेवारी-पासून मरेपर्यंत सालिमगड येथें बंदींत ठेविलें. २**झीनतुन्निसा** ऊर्फ पादशहा-बेगम, जन्म औरंगाबाद ता. ५ ऑक्टोबर १६४३, अविवाहित; बापाच्या दक्षिणच्या स्वारींत त्याच्याबरोबर राहून ती त्याची सर्व खासगी व्यवस्था पाहत असे. तिनें दानधर्म पुष्कळ केला, आणि बापाजवळून हुंड्याची रक्कम मागून घेऊन, त्या पैशानें तिनें दिल्लीस एक सुंदर मशीद बांधिली, ती कुमारी-मशीद म्हणून प्रसिद्ध आहे. संभाजीच्या बायकामुलांची निगा हिनेंच ठेविली. बापानंतर ती पुष्कळ वर्षे जिवंत राहिल्यानें जुन्या काळची म्हातारी असें तिला म्हणत. ३ **झुब्दतुन्निसा**, जन्म मुलतान, ता. २ सेप्टेंबर १६५१; लग्न ता. ३० जानेवारी १६७३, दारा शेखोचा मुलगा सिपिर शेखो याजबरोबर; मृत्यु फेब्रुवारी १७०७. ४ **महंमद अज्जम**, जन्म ब्ऱ्हाणपुर, ता. २८ जून १६५३, मृत्यु, लढाईत ता. ८जून १७०७. ५ **महंमद अकबर**, जन्म औरंगा-बाद, ता. ११ सेप्टेंबर १६५७, मृत्यु इराणांत नोव्हेंबर १७०४.

**दुसरी बायको.**—रहमतुन्निसा ऊर्फ नबाबबाई, काश्मिरांतील रजपूत राजा राजू याची मुलगी. शहाजहाननें तिला तिच्या बापापासून मागून घेतलें. औरंगाबादचा बाईजीपुरा इच्या नांवानें वसलेला आहे. तिचें व नवऱ्याचें पटलें नाहीं. शेवटीं पुष्कळ वर्षें ती नवऱ्यापासून दूर राहून १६९१ त दिल्लीस मरण पावली. मुलें, ६ **महंमद** सुलतान, जन्म मथुरा ता. १९ डिसेंबर १६३९,

कैदेंत असता मृत्यु, ३डिसेंबर १६७९ ७ महंमद **मुअज्जम** ऊर्फ शहा आलम, हा बहादूरशहा या नावाने बादशहा झाला, जन्म ब-हाणपुर ता ४ ऑक्टोबर १६४३, मृत्यु, ता १२ फेब्रुवारी १७१२ ८ **बद्रुन्निसा**, जन्म ता. १७ नोव्हेंबर १६४७, अविवाहित, मृत्यु ता ९ एप्रिल १६७०

**तिसरी बायको**--औरंगाबादी महल् ही सन १६८८ च्या नोव्हेंबरात विजापुर येथे प्लेगने वारली एक मुलगी झाली, ९ **मिहृरुन्निसा**, जन्म १८सेप्टेंबर १६६१, लग्न मुरादचा मुलगा इझतबक्ष याजबरोबर, ता २७ नोव्हेंबर १६७२, मृत्यु जून १७०६

**चौथी बायको**--उदेपुरी ही बादशहाची फार आवडती असून मरणसमयीं शुश्रूषा करीत जवळ होती हिला मुलगा एक, १० **कामबक्ष**, जन्म दिल्ली ता २४ फेब्रुवारी १६६७, मृत्यु लढाईत ता ३ जानेवारी १७०९ ती मद्यप्राशन करी ते सुद्धा बादशहा सहन करीत असे

मोगल घराण्यातील जनानखान्यात राजकन्याचे माहात्म्य केवढे होतें, हे मागील कार्किर्दीवरून कळून आलेच असेल त्यांचीं लग्ने होण्यास मारामार पडे बादशहास रजपूत राण्यांच्या पोटच्या मुली असत, त्यांचीं रजपूत राजपुत्राशीं केव्हा केव्हा लग्ने होत,* परंतु इतर मुली योग्य वर न मिळाल्याने आजन्म अविवाहित राहत. तरी त्यांचे वर्तन नेहमींच पवित्र असे असे नाहीं. शहाजहानच्या दोघी मुलींसंबंधीं अनाचाराची बोलवा जगजाहीर होती. प्रस्तुत जहान्-आरा बापाजवळ आग्र्यास राहत होती, आणि रौशन-आरा दिल्लीस जनानखान्याची मुख्य व्यवस्थापक होती बादशहाची तिजवर गैरमर्जी दिसताच तिच्या दुराचाराचे प्रकार त्याच्या कानांवर गेले. इराणी राणीच्या पोटच्या मुली होत्या, त्यांचीं त्या राणीने खटपट करून दारा व

---

* बादशहाच्या मुली रजपूत करीत नसत असे मागे एकवार सागण्यात आले आहे फादर काट्रूने असे लिहिले आहे, कीं एका रजपूत राणीपासून झालेली शहाजहानची मुलगी जशवंतसिंहास दिली होती यामुळेंच जशवंतसिंहाने औरंगजेबास साह्य केले नाहीं आपल्या मुली काफर हिंदूस देणे मुसलमानास आवडत नसल्यामुळे, मुसलमान इतिहासकारानी ह्या गोष्टीचा कोठेंही उल्लेख केलेला दिसत नाहीं

मुराद यांच्या मुलांशीं लग्नें करून दिलीं. परंतु सर्वांत वडील मुलगी झेबुन्निसा ही फार खटपटी होती. आरंभीं तिचें रौशन-आराशीं सख्य होतें; पण पुढें जनानखान्यांत राहून रौशन-आराचें वजन नाहींसें करण्याची तिनें खटपट चालविली. रौशन-आराचे जे काणी प्रियकर पुरुष होते, त्यांची तिनें हळूहळू वाट लाविली. शेवटीं रौशन-आराचाही तशाच प्रकारें अंत झाला. कोणी म्हणतात कीं, तिचा अंत विषप्रयोगानें झाला. तेव्हांपासून झेबुन्निसा जनानखान्यांत मुखत्यारीण झाली. तिचें बादशहावर असलेलें वजन सर्व राज्यांत लवकरच लोकांस कळून येऊं लागलें. औरंगजेब चांगला बरा झाला नव्हता, म्हणून काश्मिरास चांगल्या हवेवर जाण्याविषयीं मुलीनें त्याजला टोंचणी लाविली. आपण बादशहाबरोबर स्वारींत राज्यांतील ठिकठिकाणा जाऊन प्रांतोप्रांतीं आपलें वजन लोकांच्या नजरेस आणावें असा तिचा विशेष हेतु होता. वैद्यांचेंही काश्मिरास जाण्यास अनुमोदन मिळालें. शेवटीं बादशहानें आपला रुकार दिला. स्वारीचा दिवस नक्की झाला. जिकडे तिकडे स्वारीची तयारी जारीनें सुरू झाली. परंतु औरंगजेबास चैन पडेना. बाप आग्र्यास आहे, तोंपर्यंत आपण दूर गेल्यास रजपूत व शियापंथी लोक त्यास तख्तावर बसवून आपला घात करतील असें त्याचें मन त्यास खाई. इतबारखान नामक आपल्या विश्वासाच्या सरदारास शहाजहानचे बंदोबस्तासाठीं त्यानें आग्र्यास ठेविलेलें होतें. औरंगजेब आजारी असतां बापाचा बंदोबस्त उत्तम ठेवण्याविषयीं तो इतबारखानास वारंवार पत्रें पाठवीत असे. काश्मिरास जाण्याची तयारी होत असतां, इराणचा सूफी व शियापंथी शहा दुसरा अब्बास याजकडून पत्रें घेऊन वकील आले. शहा अब्बासनें औरंगजेबास लिहिलें, कीं 'शहाजहानची एकदम सुटका करावी, नाहीं तर आम्ही लढाईस येऊं.' तेव्हां दिल्लीस राहवें तर खराब हवेनें मरण येणार, काश्मिरास जावें तर मागें काय होईल याची शाश्वती नाही, अशा विवंचनेंत औरंगजेब पडला. पण त्याच्या पाषाणहृदयास युक्ति सुचण्यास विलंब लागणारा नव्हता. बापासच नाहींसें करावें म्हणजे सर्व त्रास मिटेल, असें त्याच्या मनांत आलें. प्रसंगच तसा आहे, म्हणून असें घोर पातक आचरणें या प्रसंगीं अनुचित नाहीं, अशा समजुतीवर हा विचार त्यानें आपल्या मुलीस कळविला. ह्या राक्षसी कल्पनेनें तिचें अंतःकरण एकदम विदारल्यासारखें झालें. आत्याबाईची लंबे करण्यांत तिनें पुढाकार घेतला होता, तरी आपल्या वयोवृद्ध व

निरपराधी आजोबाची अशी अवस्था व्हावी, हा विचार तिच्या मनास टोचून खाऊं लागला 'आजोबाविषयीं तुम्ही बेफिकीर राहा,' असे परोपरी तिने आपल्या बापास सांगितले, पण औरंगजेबाची खात्री पटेना इतक्यात आग्र्यास शहाजहान व इतबारखान ह्यांची भाडाभाडी होऊन इतबारखानास त्या वृद्ध बादशहाने जोड्याने मारिले इतबारखानाने बादशहास पकडण्याचा हुकूम केला, पण शिपायांनी तो मानिला नाहीं ही हकीकत समजल्यावर औरंगजेबाने शहाजहानच्या वैद्यामार्फत बापास मारण्याकरिता विष पाठविले वैद्य राजघराण्यातील पुरातनचा नोकर होता, त्याच्याने हे काम होईना तेव्हा आपणच ते विष खाऊन तो वैद्य मरून गेला इकडे औरंगजेब स १६६३ ता. २३ एप्रिल रोजीं काश्मिरास गेला, तो चार महिन्यांनीं ता २९ सेप्टेंबरात परत आला काश्मीरच्या हवेने त्याच्या प्रकृतीस उत्तम आराम वाटला. स १६६६ च्या जानेवारी ता २२ रोजीं शहाजहान मरण पावला तो कसा मरण पावला हे बरोबर समजत नाहीं पण विषप्रयोग झाला नाहीं असे मानण्यास चागला आधार आहे बाप मरण पावल्यामुळे औरंगजेब निर्धास्त झाला एवढी मात्र गोष्ट खरी औरंगजेबाने बापास ताजमहालात नेऊन पुरिले, आणि त्याचे उत्तरकार्य त्याच्या इतमामास शोभेल अशा समारंभाने केले इराणचा शहा अब्बास ह्याच्या मनात औरंगजेबाने बापाचा खून केला असावा असा संशय आला.

जनानखान्यातील आणखी एक गोष्ट सांगावयाची आहे तुर्कस्तानातील एक क्रिस्ती बाई दारापाशीं होती लहान असताच एका व्यापाऱ्याने तीस आणून गुलाम म्हणून दारास विकिले ती फार रूपवती असल्यामुळे दाराची तिजवर अत्यंत मर्जी होती, कदाचित् तिच्याच संगतीने दाराची क्रिस्ती धर्माकडे प्रवृत्ति झाली असेल. दाराचा वध झाला तेव्हा त्याच्या दोन आवडत्या बायकास औरंगजेबाने आपणाकडे घेतले कुराणातील नियमाप्रमाणे भावाच्या विधवा स्त्रियाशीं लग्न करणे हे आपले कर्तव्य आहे, असे त्याने त्या वेळीं लोकास कळविले, परंतु त्यांतील एक बायको रजपूत होती, तिने विष खाऊन प्राणत्याग केला दुसरी ही क्रिस्ती बाई तिचे नाव उदेपुरी. तिने औरंगजेबास वरिले, व पुढे ती त्याची अत्यंत आवडती बायको झाली. जनानखान्यातील बाया नेहमीं बादशहास मोठमोठ्या मेजवान्या देत, त्या प्रसंगीं आपली मेज-

वानी उत्तम ठरविण्याबद्दल प्रत्येक बाई झटत असे. परंतु उदेपुरीची सर दुसऱ्या कोणास कधीं आली नाहीं म्हणून दुसऱ्या बायका तिचा हेवा करून तिच्या नाशाची वाट पाहत होत्या. उदेपुरी ख्रिस्ती असल्यामुळे तीस मद्यप्राशनाची मोकळीक असे. एकदां बादशहास ती अव्यवस्थित आढळली; पण तिचें रूप पाहून त्याच्या मनांतील क्रोध शांत झाला. त्या दिवसापासून जनानखान्यांत मद्य आणण्याची त्यानें सक्त मनाई केली. एकदां उदेपुरच्या राजाशीं युद्ध चालू असतां रजपुतांनीं उदेपुरीस पळवून नेलें. पण लवकरच तीस त्यांनीं परत दिलें. औरंगजेबाच्या मरणसमयीं दक्षिणचें राज्य आपला मुलगा कामबक्ष यास मिळावें म्हणून उदेपुरीनें पुष्कळ खटपट केली.

शिवाजी औरंगजेबाचे भेटीस गेला, ती भेट आग्रा येथें झाली, दिल्लीस झाली नाहीं. स. १६५८ त शहाजहान बादशहा आग्ऱ्याच्या वाड्यांत कैद होऊन, तेथेंच स. १६६६ त वारला, तेवढ्या मुदतींत औरंगजेब आग्ऱ्यास कधीं गेला नाहीं. बाप कांहीं तरी कारस्थान रचून आपणास दगा करील, अशी त्यास नेहमीं भीति वाटत असे. सन १६६६ च्या ता. १५ फेब्रुवारीपासून ९ ऑक्टोबरपर्यंत तो आग्ऱ्यास होता.आग्रा येथें तारीख २७ माहे मार्च रोजीं औरंगजेबाचा नववा राज्यारोहण समारंभ झाला, आणि १२ मे रोजीं त्याचा चांद्रमासी पन्नासावा वाढदिवस होऊन सुवर्णतुला झाली, त्याच दिवशी शिवाजी औरंगजेबाच्या भेटीस गेला. हा दरबार 'दिवाणी-आम 'मध्यें झाला.शिवाजीनें दुरूनच बादशहास मुजरा केला. नंतर त्यास पंचहजारी मनसबदारांत जागा' दाखविली, तेव्हां संतापानें शिवजी लाल झाला. तें पाहून 'त्यास घरीं घेऊन जा,' असें बादशहानें रामसिंहास सुचविलें. त्याप्रमाणें रामसिंह शिवाजीस घेऊन यमुनेच्या कांठीं आपल्या बागेंतील बंगल्यांत गेला. हा बाग ताजमहाल व किल्ला यांच्या दरम्यान होता. शिवाजीबरोबर एकंदर चार पांचशें माणसांचा जमाव होता. औरंगजेबाची व शिवाजीची एवढीच काय ती दृष्टभेट झालेली आहे. प्रत्यक्ष बोलाचालीचा प्रसंगच आला नाहीं. अशा प्रकारची शिवाजीच्या भेटीची हकीकत फारसी ग्रंथांत सांपडते. ता. १९ ऑगस्ट १६६६ रोजीं शिवाजीनें आग्ऱ्यांतून पलायन केलें.

५. **कारकीर्दींतील कांहीं युद्धप्रसंग.**—डाका हें बंगालच्या सुभेदाराचें राजधानीचें शहर होतें. पुढें आराकानच्या किनाऱ्यावर चित्तगांव हें ठिकाण

असून तेथील ' माघ ' नांवाचे दर्यावर्दी लोक चाचेपणाचा धंदा करून बंगालच्या किनाऱ्याने मोगल राज्यात फार दिवसापासून उच्छेद करीत असत. त्यासच पोर्तुगीझ वगैरे पाश्चात्य चाचे लोक जाऊन मिळत, आणि त्यांच्या जमावापुढे मोगल सुभेदाराचे काहीं चालत नसे अकबराच्या वेळेस बंगाल्यात मोगल आरमार तयार करण्यात आले होते, त्याची पुढे अव्यवस्था होऊन, शहाजहानच्या वेळेस वरील चाचे लोकाचा उपद्रव अतोनात वाढला. स १६६४त शायिस्ताखानाची नेमणूक बंगाळच्या सुभ्यावर झाली त्यानें डच व पोर्तुगीझ लोकाना चाचे लोकांच्या कटातून फोडून, आपल्या ताब्यात आणून योग्य मार्गास लाविलें नंतर आतिशय मेहेनत करून त्याने स्वत.चे एक मोठें आरमार बाधिले त्याकरिता जंगलातून मोठमोठालीं झाडे तोडून आणविलीं जहाजे बाधून झाल्यावर त्याजवर अन्नसामुग्री व दारूगोळा ह्याची उत्कृष्ट भरती केली. नंतर चित्तगावपर्यंत रस्ता करून एक फौज पायरस्त्याने व दुसरी आरमारानें अशा रीतीनें चाचे लोकावर चाल करून त्याने चित्तगावचे ठाणे काबीज केले आणि त्याचे नाव इस्लामाबाद टेविले, ( जानेवारी १६६६ ) मोगलाच्या आरमारात ह्या वेळीं लहान मोठीं २८८ जाहजे होतीं शत्रूंची १३५ जहाजे मोगलास मिळालीं चित्तगांव काबीज केल्याचे वर्तमान ऐकून औरंगजेबास अतिशय आनंद झाला, आणि त्याने सर्व अधिकाऱ्यास बक्षिसे व बढत्या देऊन त्याचा गौरव केला.

काश्मिराहून परत आल्यावर सर्व राज्य सुरळीत चालले आहे असें पाहून औरंगजेबास आनंद झाला. एकंदर मोगल बादशाही ह्या वेळेस अत्यंत भरभराटींत होती तेव्हा अशा समयास इराणच्या शहाच्या धमकावणीकडे नजर देण्यास त्यास स्वस्थता मिळाली. औरंगजेबाने काश्मिरास जाताना मोठी फौज बरोबर घेतली होती, तेव्हा त्याचा कदाचित् इराणच्या प्रदेशावर स्वारी करण्याचा विचार असेल असे तेथच्या शहास वाटले, आणि तदनुसार त्याने कंदाहारचे आसपास आपली फौज जमविली तेव्हा शहाकडे वकिलाबरोबर नजराणे पाठवून त्याचे समाधान करण्याचा औरंगजेबाने विचार केला ह्या वकिलासंबंधाने त्या वेळेस चहूंकडे चळवळ सुरू झाली होती. शहा अब्बासने या वकिलाचा अपमान केला. त्याचे संभाषण त्यानें ऐकून घेतले नाहीं. औरंगजेबाने पाठविलेले नजराणे स्वतः न घेता त्याने दरबारच्या मंडळींस वांटून टाकिले.

औरंगजेबाचा ढोंगीपणा व पितृहत्या यांजविषयीं त्यानें उघडपणें औरंगजेबाची निर्भर्त्सना केली; आणि आपल्या नाण्यांवर 'आलमगीर' हीं अक्षरें दाखल केल्याबद्दल त्याची थट्टा केली. शेवटच्या भेटीस तर शहाच्या एका नोकरानें वकिलाच्या दाढीस आग लाविली; आणि 'हिमत असेल तर काबुलावर येऊन युद्ध करा,' असा निरोप सांगून शहानें वकिलास रजा दिली. वकील परत आला, तेव्हां औरंगजेब फार खट्टू झाला. अगोदरच हातीं सांपडलेला शिवाजी सुटून जाऊन मराठे लोक त्यास भारी झाले होते. त्यांत ही शहानें मानहानि केली. मग काय विचारतां! औरंगजेब वकिलास बोलला, 'तुम्हीं शहाचा तेथच्या तेथें खून कां नाहीं केला?' असें म्हणून त्याच वेळेस वकिलास सर्पदंश करून त्यानें ठार मारविलें. तिकडे शहा अब्बासनें म्हटल्याप्रमाणें केलें. उत्तम फौज बरोबर घेऊन तो लगेच अफगाणिस्तानावर आला. औरंगजेब अंतर्यामीं घाबरला, तरी बाहेरून त्यानें फौजेची तयारी चालविली. इतक्यांत शहा अब्बास एकाएकीं आजारी होऊन मरण पावला, त्यामुळे औरंगजेबावरचें संकट टळलें. परंतु अफगाण लोकांनीं बंडें चालविलीं. मोगलांचा सुभेदार पेशावर येथें राहत असे. शहा अब्बास तिकडे आला, तेव्हां सर्व अफगाण लोक त्यास मिळण्यास तयार झाले होते. शहा मरण पावल्यावर सन १६६७ त मीर-जुम्ला याचा मुलगा महंमद अमीनखान यास औरंगजेबानें काबूलचा सुभेदार नेमून अफगाण लोकांचा बंदोबस्त करण्यास पाठविलें. अमीनखान मोठी फौज घेऊन पेशावर सोडून काबुलावर गेला. तेव्हां अफगाण लोक पहाडी प्रदेशांत पळून गेले; त्यांचा पाठलाग अमीनखानाच्यानें होईना. त्यानें आपला जनानखाना बरोबर नेला होता. पुढें धान्याचा तोटा पडल्यामुळें तो पेशावरास परत येऊं लागला. इतक्यांत अफगाण लोक खैबरघाटांत त्यास अडविण्यास आले; आणि एका रात्रीं अमीनखानाची सर्व फौज खिंडींत सांपडली असतां, हातांत शस्त्रें घेऊन विलक्षण आरोळ्या ठोकीत अफगाण लोकांनीं त्यांजवर छापा घातला. अमीनखानानें एका साधूस पुढें करून समेट करण्यास सांगितलें; परंतु त्या मदांध रानटी लोकांनीं त्या साधूचाही खून केला. पुढें अमीनखानावर येऊन ते त्याचा खून करणार, इतक्यांत तो हत्तीवरून खालीं आला; आणि अफगाणांस कापीत त्यांचा पोषाख घालून अंधारांतून पळून गेला. त्याच्या बायकोचे अफगाणांनीं तुकडे केले, आणि बहीण, आई व मुलगी यांस पळवून नेलें. ही मुलगी बाद-

शहाचा मुलगा अकबर यास देऊं केली होती तिची पुढें सुटका झाली, पण तिला बादशहाने पत्करिले नाही अमीनखानाचा बादशहाने अपमान केला; आणि त्यास परत बोलावून महाबतखानास काबूलच्या सुभ्यावर पाठविले. महाबतखानास तिकडची पूर्वीपासून माहिती असल्यामुळे तो कांहीं दिवस पेशावर येथे स्वस्थ बसला अफगाण लोकांनींही कांहीं हालचाल केली नाहीं. सन १६७२ त अफगाणिस्तानात पुन बंडावा झाला शहाजादा शुजा आराकानात मरण पावला अशी बातमी होती, परंतु शुजा नावाचा एक तोतया अफगाणिस्तानात उत्पन्न झाला त्याने आपल्या अनेक साहसाच्या गोष्टी लोकांस सागून त्यांचीं मने आपणाकडे वळविलीं थोड्याच वेळात त्याजपाशीं मोठी फौज जमा झाली महाबतखानाची खात्री झाली, कीं हा खरोखरीचा शुजा आहे तेव्हा त्याचा बंदोबस्त करण्याचा प्रयत्न त्याने केला नाहीं. अखेरीस अफगाण लोकाचा बंडावा सर्व देशभर पसरला. त्यानी शुजास आपला राजा असे कबूल केले येणेकरून हिदुस्थानातील मोगल सत्ता नाहीशी करून टाकून अफगाण अंमल पुनरपि हिंदुस्थानावर स्थापन करण्याचा त्याचा विचार होता हीं वार्ता ऐकून औरंगजेबाने दक्षिणची व इतर ठिकाणची सर्व फौज जमवून, तिचे आधिपत्य स्वत· स्वीकारिले, आणि अफगाणिस्तानावर चालून गेला त्या वेळीं बसण्यास घोडा व हातात भाला अशा तयारीनिशी तो अगदीं सडा गेला हे युद्ध दोन वर्षे चालले महाबतखानास त्याने परत पाठविले रस्त्यात तो जुना सरदार मरण पावला, ( १६७२ ) तिकडे अफगाण लोक हटले नाहींत पहाडी प्रदेशातील ह्या अफगाणाच्या अंगी विलक्षण कुवत आहे, असे आजमितीसही जर दिसून येत, व इंग्रजाच्या जय्यत तयारीलाही ते हार गेले नाहींत, तर औरंगजेबाच्या मोगल फौजेस त्यानीं त्राहित्राहि करून सोडिले, यात नवल नाहीं शेवटीं औरंगजेबाने नेहमींचे कपटजाल पसरिले कासमखान नावाच्या सरदारास अफगाणिस्तानात ठेवून आपण परत आला कासमखानानें सर्व कर वगैरे माफ करून लोकास मोकळे सोडिले, आणि बाह्यत त्याशी अत्यंत स्नेहभाव दाखविला बिनहत्यारी तो एकटा त्या लोकात जाऊन मिसळे परंतु शुजा त्याच्या हातीं लागेना शेवटीं पेशावर येथे आपल्या वडील मुलाची सुंता करण्याचा मोठा समारंभ कासमखानानें केला त्या प्रसंगीं सर्व मोटमोठ्या अफ-

गाण सरदारांस त्यानें आपल्या येथें बोलाविलें. सर्व लोक आनंदानें आले. पण शुजा आला नाहीं. एके दिवशीं रात्रीं मेजवानी चालू असतां संकेत ठरल्याप्रमाणें कासमखान फळ कापतांना हात तुटलासें निमित्त करून निघून गेला, तोच इशारा समजून त्या समारंभांत एकदम कापाकापी सुरू झाली.कोणालाही सुटून जाण्यास अवधि मिळाली नाहीं. कासमनें शहरांत सुद्धां रस्तोरस्तीं उत्तम बंदोबस्त ठेविला होता. शुजाचें पुढें काय झालें तें कळलें नाहीं. काबुलांत जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. अफगाण लोक निमूटपणें ताब्यांत आले. सर्व कार्किर्दींत त्यांनीं पुनरपि बादशहास त्रास दिला नाहीं. कासमखानावर वरील कपटाबद्दल बादशहानें बाह्यतः इतराजी दाखविली. त्यास परत बोलावून कांहीं दिवस कामावरून काढिलें; परंतु पुनः लवकरच त्यास पहिल्या प्रतीचे मानमरातब दिले. अफगाणांची कत्तल करण्याचें काम बादशहाच्या विचारानें झालें असेल ह्यांत संशय नाहीं. कासमखानास परत बोलाविल्यावर जशवंतसिंहास बादशहानें काबूलचा सुभेदार नेमिलें. तो ह्यापूर्वी गुजराथचा सुभेदार होता, पण तेथून कदाचित् तो मराठ्यांस सामील होईल, अशा भीतीनें त्याची नेमणूक काबुलास करण्यांत आली.

६. **हिंदूंचा छळ व रजपुतांशीं युद्ध**, ( १६६९-१६८१ ).—औरंगजेबानें आपली इतिकर्तव्यता इतकीच मानिली होती, कीं पूर्वी मुसलमानी धर्माचा प्रसार करणारे जे मोठे पुरुष होऊन गेले, त्यांप्रमाणें आपणही आपली कीर्ति गाजवावी, आणि हिंदु धर्माचा पाडाव करून सर्व हिंदुस्थान देश मुसलमानमय करून टाकावा. पूर्वीच्या अफगाण राज्यकर्त्यांनीं असेच प्रयत्न केले, त्यांमुळें कांही एक फायदा झाला नाहीं असें पाहून, पुढील मोगल बादशहांनीं पहिला क्रम सोडून दिला, आणि धर्माच्या बाबतींत आपण हात घालावयाचा नाहीं, असा निश्चय चालविला. या पद्धतीनें एकंदर राज्याची भरभराट झाली हें मागील तीनचार कार्किर्दींच्या इतिहासावरून व्यक्त झालेंच आहे. पण औरंगजेबास आपल्या वाडवडिलांची पद्धति पसंत पडली नाहीं. हातांत अधिकार आल्यापासून हिंदूंचा पाडाव करण्याचा त्याचा मनोदय होता. आरंभाचीं कित्येक वर्षें राज्यांत स्वस्थता करण्यात गेलीं, आणि वास्तविकपणें इसवी सन १६६६ च्या सुमारास मोगल बादशाहीची सत्ता कळसास पोंचली होती. सर्व शत्रूंचा पाडाव होऊन राज्यांत जिकडे तिकडे शांतता व भरभराट होती. सर्व

बाजूंनीं आपण निर्भय झालो असे दिसताच, औरंगजेब आपल्या अंतस्थ हेतूच्या खटपटीस लागला ह्या कामीं त्याने जे प्रमाद केले, त्याच्या योगाने अंतीं अखिल बादशाहीचा लय झाला औरंगजेबासारखे शहाणे व धोरणी पुरुष थोडेच सापडतील, पण एका गोष्टीच्या हट्टास पेटल्यामुळे व मनाचा उदारपणा सोडून दुराग्रह धारण केल्यामुळे, त्याची जी फजिती व दुर्दशा झाली, तिच्याशीं तुलना करण्यासारखे दुसरे उदाहरण हिंदुस्थानच्या इतिहासात नाहीं त्याचप्रमाणे औरंगजेबाच्या चरित्रासारखा दु खद शेवट दुसऱ्या कोणाचाही झाला नसेल

राज्यपदारूढ झाल्याबरोबर त्याने कित्येक असंतोष उत्पन्न करणारीं कृत्ये केलीं, तीं मागे सागण्यात आलींच आहेत सौरमानाचे वर्ष अकबराने सुरू केले होते, ते अग्निपूजकानीं शोधून काढिल्यामुळे अशास्त्र आहे, अशा सबबीवर औरंगजेबाने बंद करून चाद्रमान वर्षाची सुरुवात केली पुढे दारूचे पिठे, जुवेबाज लोकाचे अड्डे, व मूर्तिपूजेच्या डामडौलाचे ढोग ह्या गोष्टी बंद करण्याकरिता एक मुल्ला त्याने नेमिला, आणि अंमलबजावणीकरिता त्याच्या हाताखालीं घोडेस्वारांची मदत दिली कवींसाठी नेमणुका ठरलेल्या असत त्या त्याने बंद केल्या सन १६६८ च्या सुमारास त्याने बादशाही तवारीख म्हणजे बादशहाची दररोजची कृत्ये लिहिण्यासाठीं पगारदार नोकर असत, ते त्याने काढून टाकिले, आणि अशा प्रकारची तवारीख लिहिण्याचे काम बंद केले. ह्या तवारिखींत बादशहाचा प्रत्येक शब्द व त्याचे प्रत्येक कृत्य नमूद होत असे परंतु आपलीं वाईट कृत्यें तींत यावीं हे औरंगजेबास न आवडून त्याने तवारीख बंद केली असावी. असे करण्याचे कारण त्याने स्वत वेगळेच दिले आहे 'मनुष्यानीं परमेश्वराचीं कृत्यें लिहावीं, माझ्यासारख्या य कश्चित् माणसाची कृत्ये त्यानीं लिहिणे युक्त नाहीं,' असे तो म्हणे तवारीख बंद झाल्यामुळे मोगल बादशाहीचा खरा इतिहास बंद पडला. पुढील हकीकत अदमासाने लिहिलेली सापडते काफीखानाने जो उत्कृष्ट इतिहास लिहिला, तो बादशहा मरण पावल्यावर त्याने बाहेर काढिला सन १६६९ हे वर्ष हिंदूंच्या छलाचा पहिला आरंभ होय त्या वर्षी त्यास विशेषत. अशी खबर लागली, कीं बनारस व इतर ठिकाणचे ब्राह्मण आपला धर्म मुसलमानासही शिकवीत आहेत हिंदूंचा छळ करण्यास हे निमित्त त्यास आयतेच सांपडलें. लगेच त्यानें बनारस येथील हिंदुधर्माध्यक्षाची नेमणूक बंद करून सन १६६९ च्या ता.९ एप्रिल रोजीं सर्व राज्यात असा सक्तीचा हुकूम फर्माविला कीं,

हिंदूंच्या पाठशाळा, मठ, देवालयें वगैरे सर्व जमीनदोस्त करावीं. औरंगजेबाची तीनचतुर्थांश प्रजा हिंदु असल्यामुळें वरील हुकूम अमलात आणणें किती अवघड होतें हें सागणें नको. काशी येथील विश्वनाथाचें मंदिर सेप्टेंबरांत जमीनदोस्त झालें. तसेंच बुंदेला राजा नरसिंहदेव यानें मथुरा येथें तेहतीस लाख रुपये खर्चून केशवाचें भव्य मंदिर बांधिलें होतें, तें सन १६७० च्या जानेवारींत पाडून तेथलि मूर्ती आग्र्यास आणिल्या, आणि त्या मशिदीच्या पायऱ्याखालीं पुरून टाकिल्या. योगी व संन्यासी लोकास हिंदुस्थानात थारा राहिला नाही. उद्धव बैराग्यास कैदेंत टाकिलें. काठेवाडातील सोमनाथाचें मंदिर पुनरपि पाडून टाकण्यांत आलें. हिंदूंचे सर्व सण व यात्रा बंद करून त्यांस नोकरींतून बडतर्फ करण्यात आलें. औरंगजेब लढाईच्या वगैरे उद्योगात गुंतला असतां, दिल्लीसारख्या राजधानीच्या शहरातही वर सांगितलेल्या जुलमामुळें हिंदु लोक वरचेवर दंगे करूं लागले. एकदा एका मंत्रविद्येचें ढोंग करणाऱ्या बाईनें दिल्लीतील लोकास चिथवून प्रत्यक्ष बादशहासही पदच्युत करण्याची वेळ आणिली होती. पण औरंगजेबाचें प्रसंगावधान जबर असल्यामुळें तो असल्या प्रसंगीं डगमगत नसे. कुराणातील वचनें भाल्यांच्या टोकांस बांधून त्याने आपल्या लोकांस चेव आणून बंडवाल्यांचा फडशा पाडिला.

अशाच प्रकारचें एक बंड औरंगजेब अफगाण स्वारीतून परत येत असतां घडून आलें. दिल्लीनजीक नार्नोळ शहरच्या आसपास सत्नामी नावाचे हिंदु गोसावी राहत असत. त्यांचे वर्तन सौम्य होतें, तरी त्याजला कोणी त्रास दिल्यास तो ते मुकाट्यानें सोसून घेणारे नव्हते. एकदां क्षुल्लक कारणावरून कोतवालाचा व त्यांचा तंटा झाला. त्या वेळीं कोतवालानें सौम्योपचाराची योजना न करितां लष्कर जमविलें. त्यामुळें जबरदस्त रणकंदन माजलें. सत्नामी लोकांनीं फौजदाराचा पराभव करून नार्नोळ शहर हस्तगत केलें, (मे, १६७२). त्यांजवर शस्त्र लागू पडत नाही अशी मुसलमानी फौजेची समजूत झाली. तेव्हां औरंगजेबानें मोठें लष्कर जमा करून कडेकोट तयारीनिशीं त्या बैराग्यांवर चाल केली, आणि सर्वांची कत्तल करून टाकिली. तेव्हां बंडाचा उपशम झाला. अशाच प्रकारचीं बंडें इतर ठिकाणींही झालीं. गोकळजाटानें मथुरेस बंड केलें. शीख गुरु तेघबहाद्दरचा छळ झाल्यामुळें त्यानें स. १६७५ त तुरुंगांत जीव दिला.

ह्या गोष्टींच्या योगानें औरंगजेब फारच चिडून गेला आणि हिंदूंचा निःपात

करण्याचे सक्तीचे उपाय योजूं लागला हिंदु लोकास अत्यंत अपमानकारक गोष्ट म्हटली म्हणजे जिझिया कर द्यावा लागणे ही होय सर्व परधर्मी लोकापासून हा कर मुसलमान अधिकारी वसूल करीत असत परंतु अकबर बादशहाने दूरवर दृष्टि पोचवून हा कर माफ केला होता औरंगजेबाने कोत्या धर्मवेडाचे भरीस पडून स १६७९ च्या ता २ एप्रिल रोजीं हा कर पुन सुरू केला त्या वेळीं सर्व लोकात हाहा कार उडून गेला बादशहाकडे दाद मागण्याकरिता लाखो लोक दिल्लीच्या राजवाड्यासमोर व रस्तोरस्तीं जमा झाले अशा स्थितींत एका शुक्रवारी बादशहा मशिदींत जात असता त्यानीं त्याचा रस्ता अडविला तेव्हा त्याच्या अंगावरून हत्ती नेऊन हजारो लोकास बादशहानें ठार केलें हा कर इंग्रज व डच यावरही बसविलेला होता कराची प्रत्यक्ष रक्कम न देता त्याच्या बदल्यात हे व्यापारी दरवर्षी काहीं इराणी घोडे बादशहास नजर देत असत प्रत्येक ब्राह्मणास दरसाल एक मोहोर ह्या कराबद्दल द्यावी लागे, आणि गरीब लोकावर सुमारे साडेतीन रुपये बसविलेले होते. रजपूत राजापासून सुद्धा हा कर सक्तीनें वसूल करण्याचा औरंगजेबाचा हुकूम सुटला होता त्याची बजावणी चालू झाली, तेव्हा आजपर्यंत बादशाहीचे केवळ आधारस्तंभ असलेले सर्व रजपूत राजे औरंगजेबावर उठले आणि त्याजवर शस्त्र धरणे बादशहास भाग पडले या कराची उत्पत्ति भाग १ पृ. २१वर दिली आहे.

औरंगजेबाच्या वेळेस राजपुतान्यात राज्य करीत असलेले राजे विशेष पराक्रमी होते अकबराप्रमाणे औरंगजेब त्याजबरोबर सख्य ठेविता तर बादशाहीचे कल्याण झाले असते उदेपुरास राणा राजसिंह राज्य करीत होता. जिझिया कर बसविण्यात आला, त्या वेळीं जयपुरचा राजा जयसिंह व मारवाडचा राजा जशवंतसिंह हे मरण पावले असून रजपुतात राजसिंहच प्रमुखत्वाने वागत होता मारवाडचा राजा जशवंतसिंह काबुलास गेला, तेव्हा त्यानें आपला शूर पुत्र पृथुसिंह यास मारवाडचा कारभार पाहण्यास ठेविले रजपुताचा संहार करण्याच्या इराद्याने औरंगजेबाने पृथुसिंहास आपल्या दरबारीं बोलाविले, आणि बाह्यात्कारीं त्याचा उत्तम गौरव केला परंतु परत जातेवेळीं त्यास विषारी पोषाख घालण्यास देऊन ठार मारिलें. पुत्रशोकानें काबुलास जशवंतसिंहाची कंबर खचली लवकरच तेथच्या रोगट हवेनें त्याचे आणखी दोन पुत्र मृत्यु पावले. त्यामुळे दुःखग्रस्त होऊन तोही सन १६७८ त

ता. १० डिसेंबर रोजीं काबूल येथे मरण पावला. येणेंप्रमाणें जशवंतसिंहाचा सूड घेण्याचे औरंगजेबाचे विचार सफल होत चालले. त्यानें जोधपुरची गादी आपल्या शिफारशीच्या भलत्याच एका इसमास दिली. जशवंतसिंहाची स्त्री आपल्या दोन लहान मुलांस घेऊन परत येत असतां, सिंधु नदीवर बादशहाच्या लोकांनीं तीस अटकाव केला. परंतु तिच्या राठोडांनीं मुसलमानांचा पराभव करून तीस दिल्लीकडे आणिलें. तेथें बादशहानें तीस अटकेंत ठेविलें. दुर्गादास नांवाचा एक शूर सरदार जशवंतसिंहाचे पदरीं होता, त्यानें मोठी शिताफी करून राजाच्या कुटुंबास सोडवून जोधपुरीं रवाना केलें. तेव्हां औरंगजेबानें जशवंतसिंहाच्या फौजेवर हल्ला करून तिचा पराजय केला. जशवंतसिंहाची बायको ही रजपूत राणीच्या पोटीं जन्मलेली शहाजहानची मुलगी होती. तिनें आपला ज्येष्ठ पुत्र अजितसिंह यास जोधपुरचे गादीवर स्थापून दुर्गादास यावर सर्व कारभार सोंपविला. राणा राजसिंह यानें अजितसिंहास चांगला आश्रय दिला. येणेंप्रमाणें हे बलाढ्य रजपूत राजे एकचित्त झाले आणि जिझिया कर न देतां मोगलांशीं लढून आपला बचाव करण्याच्या उद्योगास लागले. या युद्धाचा सर्व भार राजसिंहावर होता. आपला धर्म सोडावा, नाहीं तर युद्ध करावें यांशिवाय दुसरा मार्ग रजपुतांस उरला नव्हता. रजपुतांची वर्तणूक पाहून औरंगजेब चवताळून गेला आणि त्यानें युद्धाची कडेकोट तयारी केली. हा आतां सर्व पृथ्वी जिंकितो कीं काय, असा सर्वांस विस्मय वाटला. त्यानें आपल्या सर्व मुलांस, आपापल्या फौजा घेऊन युद्धास बोलाविलें. अरवली पर्वताच्या रांगांत रजपूत लोक आश्रयानें राहिले होते. औरंगजेबाचा वडील मुलगा शहाआलम दक्षिणेंतून अहंमदाबादच्या रस्त्यानें मेवाडच्या मुलुखांत शिरला. बंगाल्यांतून अज्जमशहा उदेपुरच्या दक्षिणबाजूस येऊन उतरला. स्वतः औरंगजेब व त्याचा तिसरा मुलगा अकबर हे उत्तरेकडून अजमीरच्या वाटेनें उदेपुर प्रांतांत आले. त्यांस कोणीही अटकाव केला नाहीं. मध्यंतरीं एक दिवस औरंगजेब एका कठिण खिंडींतून चालला असतां, रजपुतांनीं दोहोंकडच्या दोन वाटा बंद केल्यामुळें त्याजवर आणीबाणीचा प्रसंग आला होता. त्याजवळ अन्नपाणी सुद्धां नव्हतें. ह्या वेळीं राणा राजसिंहानें पुढें होऊन बादशहास वाट करून दिली, आणि रजपुतांवरील रोष सोडून देण्याबद्दल विनंति केली. परंतु ह्या उदार वर्तनानें औरंगजेब अधिकच चिडला;

आणि सर्व गाईस ठार मारण्याचा हुकूम देऊन आपण परत अजमिरास गेला. त्याने आपल्या मुलास उदेपुरावर स्वारी करण्याचा आग्रह केला. परंतु पुढे जाण्याची छाती कोणासच होईना इकडे रजपूत फौजा गुजराथ, माळवा वगैरे प्रांत उध्वस्त करीत चालल्या होत्या शिवाय औरंगजेबाच्या मुलास फितूर करण्याचा त्यांचा प्रयत्न चालू होता जशवंतसिंहाची राणी व दुर्गादास त्यांनी शहाजादा अकबर ह्यास अशी भर दिली, की अजमीर येथे बादशहाजवळ अगदींच थोडी फौज असल्यामुळे तेथे जाऊन एकदम त्यास कैद करावे व स्वत बादशाही पद घ्यावे असे केल्यास पन्नास हजार रजपूत लोकाचें साह्य देण्याचे त्यास राणीने वचन दिले त्या बेताने अकबराच्या तोंडास पाणी सुटून तो रजपूत फौज घेऊन अजमिरावर चाल करून गेला परंतु हा त्याचा बेत लगेच शहाआलम यास कळला त्याने ही सर्व हकीकत बापास लिहिली, आणि फौजेसह आपल्या मदतीस येतो,' असे कळविले परंतु कपटप्रचुर औरंगजेबाच्या चित्तास दोघांवरही भरंवसा येत नव्हता त्याला शहाआलमच्या उद्देशाचाच विशेष वहीम आला 'तुम्ही माझ्या हुकुमाशिवाय आपली जागा सोडूं नये,' असे त्यास औरंगजेबाने लिहिले परंतु हा हुकूम न मानता तो शहाजादा त्वरा करून आलाच इकडे अकबराच्या ज्योतिष्याकडून त्या बेताची खर्ची हकीकत औरंगजेबास कळली, तेव्हा तो घाबरून फौजेची जमवाजमव करूं लागला मुहूर्त लावणावर टाकण्याविषयीं त्याने ज्योतिष्यास विनविले. ह्यामुळे अकबरापूर्वी तीन तास शहाआलम अजमिरास येऊन पोचला. तथापि अकबराशीं लढाईच केल्याने निभाव लागेल असे औरंगजेबास वाटले नाहीं तेव्हा त्यान आपली नेहमींची युक्ति लढविली त्याने खालील मजकुराचे पत्र अकबरास लिहिले,आणि ते दुर्गादास याच्या हातात पडेल असे केले. 'रजपुतास फसवून तुम्हीं येथवर आणिले हा फार चांगली गोष्ट केली. ठरल्याप्रमाणे त्यास तुम्ही आपल्या अग्रभागीं ठवा, म्हणजे आम्ही पुढून व तुम्ही मागून मिळून त्याची अशी चंदी उडवून देऊं की एकाही काफर हिंदूने आज सुटून जाऊं नये ' हे पत्र दुर्गादासाच्या हातात पडताच त्याची पाचावर धारण बसून, अकबराने आपणास फसविले, आपणास ही वार्ता थोडी अगोदर कळली म्हणून बरे, असे समजून तो रातोरात आपली फौज घेऊन मारवाडकडे पळून गेला दुसऱ्या दिवशीं रजपूत निघून गेलेले पाहून अकबर गर्भगळित झाला.

त्याच्या सर्व सरदारांनीं त्यास सोडिले. एक असामी बादशहाचा खून करण्यास गेला असतां स्वतःच मारला गेला. तेव्हां जीव घेऊन अकबर परत मारवाडांत पळून गेला. तेथे त्यास त्या खोट्या पत्राची हकीकत कळली. त्यास पकडण्या-साठीं शहाआलम आला, परंतु त्याचा रजपुतांनीं चांगला समाचार घेतला. अकबरास शेवटीं महाराष्ट्रांत येऊन छत्रपति संभाजा भोसले याचा आश्रय करावा लागला, ( मे १६८१ ).

रजपुतांस जिंकण्याचे होते तेवढे प्रयत्न औरंगजेबानें केले, पण त्यांनीं दाद दिली नाहीं. जशवंतसिंहाचा अल्पवयी मुलगा अजितसिंह यास त्यांनीं जोध-पुरास नेऊन गादीवर बसविले होते, ( जुलै ता. २३, स. १६७९ ). अकबर फितल्यामुळें तर औरंगजेबाची आतां कांहींच किमत राहिली नव्हती. तो मराठ्यांकडे गेल्यामुळे मराठ्यांवर चाल करून जाणें औरंगजेबास अपरिहार्य झालें. शिवाजीप्रमाणेंच त्यास संभाजीची अतोनात भीति वाटत होती. तेव्हां तह करून रजपूत प्रकरण मिटविण्याची त्यास उत्कंठा लागली. पण आपण होऊन तहाची गोष्ट काढणें लाजिरवाणें असल्यामुळें, विकानेरचा श्यामसिंह उभय पक्षीं दोस्त होता, त्याचे मार्फत तें काम त्यानें घडवून आणिलें. रजपुतांस तरी आतां युद्धाचा कंटाळाच आला होता. एकट्या मेवाडांत १७५ मंदिरांचा पाडाव झाला. शेवटीं एकदांचा तह ठरून बादशहानें अपमानकारक अटी कबूल केल्या, ( जून सन १६८१ ). त्या अटी अशाः—( १ ) औरंगजेबानें घेतलेला रजपुताचा मुलूख त्यांस परत द्यावा; ( २ ) धर्माच्या बाबतींत हात न घालतां रजपुतांपासून जिझिया कर मागूं नये; ( ३ ) जशवंतसिंहाचें राज्य त्याच्या मुलाकडे पूर्ववत् चालवावें; आणि ( ४ ) रजपुतांनीं पूर्वसंप्रदायानुरूप बादशहाची नोकरी करावी. ह्याप्रमाणे हें रजपूत युद्ध एकदांचें संपून औरंग-जेबाची सत्ता पुष्कळ खालावली. इतउत्तर ह्या रजपूत राजांनीं मोगलांच्या तर्फेनें लढण्याचें सोडून दिलें.

हिंदुस्थानांत रजपुतांनीं बादशाही फौजेवर विजय मिळविल्याचें हें पहिलें उदाहरण होय. ह्याच वेळेस बुंदेले, रजपूत व दक्षिणचे मराठे बादशहाशीं झगडून स्वतंत्र होत होते; म्हणून परराज्य झुगारून देऊन आपापलीं स्वतंत्र राज्यें स्थापण्याची ही एक लाटच ह्या वेळीं उसळली होती. मात्र सर्व लोकांत

राष्ट्रीयत्वाची व स्वाभिमानाची भावना असती, तर त्यास एक प्रकारचें संयुक्त स्वराज्य स्थापन करण्यास त्या वेळीं उत्तम संधि आलेली होती. परंतु याच्यासारखे स्वातंत्र्यसंपादनाचे अनेक प्रसंग वायां गेलेले आपल्या इतिहासात दृष्टीस पडतात

**७ दक्षिणची स्वारी व मृत्यु, (१६८३–१७०७)**—अल्लाउद्दीन खिलजीच्या वेळेपासून मुसलमान राज्यकर्त्यांनीं दक्षिणदेश एकछत्री अंमलाखाली आणण्याचे प्रयत्न कसे विफल झाले, हे मागील इतिहासावरून व्यक्त झालेच आहे दक्षिण देशाने मोगलबादशहाचे पराक्रम कसास लाविले अकबराने अनेक प्रांत जिंकिले, पण दक्षिणेंत त्यास हार खावी लागली जहांगीर नेभळटच होता, तेव्हा त्याच्या हातून दक्षिणदेश जिंकण्याचे काम तडीस गेले नाहीं, त्यात आश्चर्य नाहीं शहाजहानने शिकस्त करून निजामशाही तेवढी बुडविली. शहाजहान व औरंगजेब दोघेही दक्षिणेंतच अनुभव घेऊन लायक झाले औरंगजेबाचे आयुष्य तर बहुतेक दक्षिणेंतच गेल. दक्षिणदेश काबीज करणे, हं त्यान आपल्या आयुष्याचं इतिकर्तव्य मानिल. पण ते तडीस न जाता, त्यात केवळ त्याच्या जिवाचाच नव्हे, तर राज्याचाही अंत झाला साराश, चारशें वर्षे मुसलमानास त्या कामी एकसारखी हार खावी लागली, त्याच मुख्य कारण भूगोलिक परिस्थिति होय, असेच विचाराअंतीं म्हणावे लागते राज्यस्थापन झाले की लगेच, किंबहुना राज्य स्थापण्याच्या पूर्वीच, सरहद्द हुडकून काढण्याकडे संस्थापकाचा मुख्य रोख असतो स्वभावसृष्ट सरहद्द सापडली, कीं त्याचे काम भागले चीनदेशाने प्रचंड भिंत बांधून नवीन सरहद्द उत्पन्न केली नर्मदा नदी व विंध्याद्रि त्याच्या योगाने हिंदुस्थानचे दोन भाग अगदी भिन्न झाले आहेत एक हीच कायमची मर्यादा ठरवावी, अथवा थेट दक्षिणटोंकापर्यंत सर्व प्रदेशात लष्करी बंदोबस्त करून, त्याची व्यवस्था दिल्लीहून ठेवावी, हे त्या वेळचे दोन मार्ग होते दळणवळणाचीं साधनें सुलभ नव्हतीं. डोंगराळ व जंगली मुलखातून लष्कराच्या सोयीचे रस्ते करून, ते नेहमी व्यवस्थित ठेवणे दुर्घट होते दक्षिणच्या स्वारीची व्यवस्था पाहण्यास जो अधिकारी नेमावयाचा, तोच बहुधा धन्यास न जुमानता, स्वतंत्र होण्याच्या नादास लागे. अशा कारणास्तव दक्षिण देश मोगलांस जिंकिता आला नाहीं. पुढे जेव्हा मराठ्यांनीं आपले राज्य स्थापिले, तेव्हा त्याना त्या भूगोलिक सरहद्दीची नेहमींच

मोठी पंचाईत पडत असे. निजामाचा व पेशव्यांचा कायमचा तंटा म्हणजे दोघांचाही सरहद्द हुडकून काढण्याचा प्रयत्न होय, असें म्हटलें पाहिजे. इतिहासांत ह्या भूगोलिक परिस्थितींचें महत्त्व अतोनात असून, विचारवंतांनीं ह्या मुद्याकडे ज्यास्त लक्ष देणें, व अनेक ठळक उदाहरणांनीं आपल्या देशांतील पुष्कळसे ऐतिहासिक प्रसंग स्पष्ट करणे जरूर आहे. युरोपात पोलंडची दुर्दशा याच कारणास्तव झाली.

औरंगजेबाचें पूर्वायुष्य दक्षिणेंत गेलें होतें. दक्षिणेत राहूनच त्यानें राज्यप्राप्तीचे बेत केले. शहाजहान आजारी न पडतां औरंगजेबास दक्षिणेंत ज्यास्त दिवस राहतां आलें असतें, तर कदाचित् त्यानें शिवाजीस वर डोकें काढूं दिलें नसतें. पण दिल्लीस गेल्यामुळें प्रथम त्यास दक्षिणेकडे स्वतः लक्ष देण्यास सवड मिळाली नाहीं. तथापि हा हेतु त्याच्या दृष्टीपुढून ढळला नव्हता. त्यानें अनेक सरदार इकडे पाठविले, त्यांचे मराठ्यांशीं घडलेले व्यवहार मराठ्यांच्या भागांत विस्तारानें येतील. इ. स. १६८० सालीं शिवाजी राजा मरण पावतांच दक्षिणेतील मुसलमानी, हिंदु वगैरे सर्व राज्यें बुडवून, सिंधु नदीपासून कन्याकुमारीचे टोंकापर्यंत मोगल बादशाही व महंमदी धर्म वाढविण्याचा जो प्रचंड उद्देश त्याच्या मनांत घोळत होता, तो तडीस नेण्याचा समय आला असें त्यास वाटलें. शहाजहान हयात होता, तोंपर्यंत दिल्ली सोडून त्यास दूर जातां येईना. तो मरण पावल्यावर, अफगाणिस्तानांत व राजपुतान्यांत युद्धें उद्भवल्यामुळें त्याचा वरील उद्देश बरेच दिवस मागें पडला. स्वधर्मप्रसाराचा जो उपक्रम दक्षिणेंत करण्याचा त्याचा विचार होता, तो त्यानें उत्तरहिंदुस्थानांत करून पाहिला, पण तेथें त्यास म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. इतक्यांत शिवाजी मरण पावल्यामुळें त्याच्या उद्देशास बळकटी आली. पूर्वी कदाचित् त्याचा असाही हेतु असेल, कीं दक्षिणेंतील मराठे व मुसलमान राजे आपआपसांत लढून स्वतःचें सामर्थ्य कमी करीत आहेत, ही आपल्या पथ्याची गोष्ट आहे. ते निर्वीर्य झाले म्हणजे त्यांस जिंकण्यास प्रयास पडणार नाहींत. तशांत राजपुतान्यांत युद्ध चालूं असतां बादशहाचा मुलगा अकबर दक्षिणेंत पळून येऊन संभाजीचा आश्रय करून राहिला होता, हें दक्षिणेंत स्वारी करण्याचें आणखी एक विशिष्ट कारण झालें. सारांश, आपल्या सर्व बादशाही डामडौलानिशीं औरंगजेब अवाढव्य फौज घेऊन स. १६८१ ता. ८ सेप्टेंबर रोजीं अज-

मिराहून निघाला, तो ता २२ मे १६८२ रोजीं बऱ्हाणपुरास आला तेथून नोव्हेंबर १३, सन १६८३ रोजीं तो अहंमदनगरास पोचला

औरंगजेबाच्या ह्या प्रचंड स्वारीच्या थाटाचें वर्णन अनेकानीं केलें आहे. बादशाही वैभवाच्या मिरवणुकीनें लोकास घाबरवून देण्याचा औरंगजेबाचा उद्देश असल्यामुळे, ही स्वारी इतिहासात चिरस्मरणीय झाली आहे दक्षिणेतील थाटमाट लोकाना केवळ श्रवणगोचर होता, त्याचे डोळे ह्या स्वारीचें प्रत्यक्ष वैभव पाहून दिपून गेले जहागीरच्या स्वारीचें वर्णन मागे केलं आहे कुदळीपावडीं घेतलेले हजारो लोक सर्वापुढे रस्ता साफ करीत जात होते. त्याच्यामागे बादशहाचा प्रचंड तोफखाना व घोडेस्वार चालत मध्यें असंख्य उंट, हत्ती व गाडे असन त्याजवर बादशहाचे जडजवाहीर, खजिना, सरकारी कामाची दप्तरे,खाण्याचे व इतर जिन्नस,कपडेलत्ते,पिण्याकरिता गंगाजल व आणखी अनेक प्रकारच सामान भरलेलें असे त्याच्यामागे खुद्द बादशहाची स्वारी हत्तीवर, घोड्यावर किंवा पालखींत बसून येई बादशहाच्या मागें खासपागेचे स्वार चालत बादशहाच्या स्वारीपाठीमागें जनानखाना चाले जनानखान्याबरोबर घोड्यावर स्वार झालेल्या लढाऊ बायकाचा ताडा व एक हलका तोफखाना चालत असे छावणीच्या मुक्कामाचें सर्व सामान दुहेरी असून, पुढील मुक्काम तयार झाल्याशिवाय मागचा मुक्काम उठत नसे बादशहाचा मुक्काम म्हणजे एक प्रतिदिल्ली शहर वसत असे सर्वांच्या मध्यभागीं बादशहाचे तंबू असून तेथून इतर भागीं जाण्याकरिता भव्य रस्ते केलेले असत प्रत्येक रस्त्याच्या नाक्यावर तोफखान्याचा पहारा असे

औरंगजेबाच्या स्वारीचा भपका जरी लोकास बाहेरून दिपविणारा होता, तरी त्यातील शिस्त प्रत्यक्ष युद्धाचे कामी अत्यंत निरुपयोगी होती ह्या स्वारीचा परिणाम विफल होण्याचे कारण तरी तीतील अतस्थ अव्यवस्थाच होय वास्तविक पाहिले तर बादशहाचे लोक कमी लढाऊ होते असें नाहीं अफगाणिस्तान, पंजाब वगैरे प्रातातील धिप्पाड, भव्य व मोठमोठीं हत्यारें बाळगणाऱ्या लोकाचाच फौजेत भरणा विशेष होता उंच व धिप्पाड घोड्यावर स्वार झालेले हे लोक बादशहाच्या सैन्याचे केवळ नाकच होते तसेच बुंदेले, मेवाडी, वगैरे पहाडी लोकही दक्षिणच्या मावळे लोकाशी लढण्याकरिता बादशहानें मुद्दाम बरोबर घेतले होते तोफखाना उत्कृष्ट स्थितींत असून त्याजवर युरोपियन

गोलंदाज नेमिलेले होते, आणि प्रत्येक तोफ अगदीं निवडक अशी बाळगलेली होती. तथापि जहांगीरच्या वेळेपासून मोगल लष्करास बहुतांशीं स्वास्थ्य प्राप्त झाल्यामुळें लढाऊ लोकांचा स्वभाव पुष्कळ नरम पडला होता. आळस, मिजास व डामडौल हे दुर्गुण लष्करामध्यें अतोनात पसरले असून, इतर व्यवस्थाही त्याच मासल्याची होती. लष्कराचे पोषाख भारी किमतीचे व अवजड होते; ते चढविण्यास व घोडे वगैरे शृंगारण्यास अतोनात वेळ व श्रम लागत. बादशहाची छावणी केवळ स्वस्थ वेळेच्या ऐषआरामाचें मंदिर असे. प्रत्येक लहानसा शिपाई सुद्धां आपल्या तंबूंत शरीरसुखाची भरपूर तजवीज करून ठेवी. छावणींत बायका, कारागीर, दुकानदार, व्यापारी, नोकरचाकर, गवई, नृत्यांगना वगैरे लोकांचा भरणा मुबलक असल्यामुळे, एक मुक्काम उठवून नवीन मुक्काम बसविण्यास अतोनात वेळ लागे; आणि एकाएकीं लढाईचा प्रसंग आला असतां पुढें तोंड देण्यास कोणीच तयार नसे. स्वतः औरंगजेब अगदीं साधा व नियमित होता खरा, परंतु लष्करांतील अव्यवस्था मोडण्याचे काम त्याच्यानें झालें नाहीं.

ह्या स्वारींत बादशहाबरोबर एकंदर फौज किती होती ह्याची गणती बरोबर केलेली नाहीं. डॉक्टर कॅरेरी नांवाचा एक इटली देशचा गृहस्थ स. १६९५ चे सुमारास दक्षिणेंत आला होता, त्यानें प्रत्यक्ष पाहिल्यावरून असें लिहून ठेविलें आहे, कीं बादशहाची लढाऊ फौज ६० हजार स्वार व एक लक्ष पायदळ इतकी असून, शिवाय ओझ्याकरितां ५० हजार उंटें व ३ हजार हत्ती होते. परंतु नोकरचाकर, व्यापारी व कारागीर इत्यादि सर्व लोक धरले असतां," बादशहाबरोबर एकंदर ५ लाख मनुष्य होतें. शेवटीं त्या प्रवाश्यानें असाही शेरा मारिला आहे, कीं बादशाही फौज ३ लाख स्वार व ४ लाख पायदळ इतकी होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. छावणीमध्यें एकंदर २५० बाजार असून तिचा विस्तार सुमारें तीस मैलपर्यंत असे. या विधानामध्यें अतिशयोक्तीचा अंश असेल, तरी पण फक्त फौजेचीच संख्या चार लाखांपर्यंत होती असें अनेक इतिहासकारांचें मत आहे. शिवाय जरुरीच्या प्रसंगीं बाजारबुणगे लोक सुद्धां लढाईस बोलावीत. तोफखाना सर्वांपुढें ठेवून लढाईस सुरुवात होई. दोनही बाजूंकडून घोडेस्वार आपल्या बाणांचा वर्षाव करीत; आणि तोफांनीं शत्रूंच्या रांगांमध्यें गोंधळ उडवून दिला, म्हणजे स्वार मोठ्या वेगानें हल्ला करीत, आणि मग कांहीं वेळ हातघाईची लढाई सुरू होई. एकंदर लढाई चालू

असता बादशहास मात्र आपल्या हत्तीवरून खालीं न उतरण्याची खबरदारी ठेवावी लागे बादशहा दिसेनासा झाला, कीं लोक रणांगण सोडून पळून गेले म्हणून समजावे तथापि ह्या फौजेचा मुख्य दोष म्हणजे कूच करण्याचे वेळची अव्यवस्था होय खालच्या वरच्या लोकांमध्ये हुकमत विभागलेली नसल्यामुळे प्रत्येक इसम मर्जीस येईल तसे वागे लाखो मनुष्याची ही टोळधाड आसपासचा शेंकडो कोसाचा मुलूख खाऊन फस्त करी एकंदर छावणीचा परिघ कधीं पाच, तर कधीं साडेसात मैल असे ओझ्याचीं जनावरे मरून त्याच्या दुर्गंधीने सर्व हवा भरून जाई. रणांगणीं उभे राहिले असता हे लोक मरणास भिणारे नव्हते हा त्याचा स्वभाव अनेक पाश्चात्य, फ्रेंच व इतर प्रवाश्यानीं पारखून लिहून ठेविला होता, आणि तीच गोष्ट ध्यानात धरून त्यास थोडेसे लष्करी शिक्षण दिले असता ते आपल्या उत्तम उपयोगी पडतील, असा तर्क पुढे मोंगल बादशाहीच्या उतरत्या काळात पाश्चात्यानी बांधिला व तो खरा ठरला. शिस्तीचा अभाव हेच आमचे मोठे वैगुण्य

अशा बादशाही फौजेशीं मराठी सैन्याची तुलना केली असता विलक्षण तफावत दृष्टीस पडते मराठे लहान बांध्याचे, चपळ, भूक व तहान सोसण्यास कंटक, आणि केव्हाही शत्रूंवर चालून जाण्यास तयार असत त्याचे घोडेही त्याच्या सारखेच सडपातळ व दऱ्याखोऱ्यातून चढून जाण्याच्या सोयींचे होते मराठे स्वाराचा सगळा संसार एवढ्याशा लहान घोड्यावर मावत असे सरदार लोकांशिवाय इतरास तंबू नसत स्वारींत असता प्रत्येक शिपाई जमिनींत भालां टोंचून, व घोड्याची लगाम हातात धरून उघड्यावर निजे. यास्तव शत्रूची चाहूल लागताच तो चटकन स्वार होऊन पळून जात असे असें असूनही त्यास सेनानायक योग्य न मिळाल्यामुळे, औरंगजेबास ह्या स्वारींत आरंभीं बरेंच यश मिळाले तथापि एवढ्या अवाढव्य फौजेची मूठभर मराठ्यापुढें अंतीं दाद लागली नाहीं, ही गोष्ट ऐतिहासिक रीत्या विशेष स्मरणीय असून तिचा विस्तृत विचार मराठ्याच्या भागात येईल

सन १६८२ त औरंगजेब दक्षिणेत आला, त्याचे पाय पुनरपि दिल्लीस लागले नाहींत पंचवीस वर्षे त्याने दक्षिणेत काढिलीं. आपण आपल्या बापाची जी अवस्था केली, तीच आपले मुलगे माझी करतील, अशी धास्ती औरंगजेबाच्या

पोटांत नेहमीं असल्यामुळे, कदाचित् दिल्लीस परत न जाण्याचा त्यानें अगोदरच निश्चय केला असावा. बऱ्हाणपुरास येऊन उतरल्याबरोबर त्यानें सर्व हिंदूंकडून जिझिया कर वसूल करण्याचे सक्त हुकूम सोडिले. लोकांनीं वाटेल तितकी नाखुषी दाखविली, पण तिचा उपयोग न होतां मारहाणीनें हा कर वसूल होऊं लागला. एकट्या बऱ्हाणपुरांत सव्वीस हजार रुपये गोळा झाले, असा आधार मिळतो. पुढें तर बादशहानें असा जाहीरनामा लाविला, कीं कोणाही हिंदूनें परवानगी घेतल्यावांचून पालखींत अगर आरबी घोड्यावर बसूं नये. ह्या कृत्यांनीं लोकांचीं मनें इतकीं खवळलीं, कीं आजपर्यंत मोगल बादशहाविषयीं त्यांच्या मनांत असलेली पूज्यबुद्धि नाहींशी होऊन, ते त्याचा नाश करण्यास उद्युक्त झाले. बऱ्हाणपुर येथें औरंगजेबानें पुढील उद्योगाची सर्व तयारी केली. मराठे लोकांस जिंकून सर्व हिंदुस्थानभर आपला अंमल स्थापावयाचा, हा त्याचा मुख्य उद्देश होता परंतु त्यास असें वाटलें, कीं विजापुर व गोवळकोंडा ह्या राज्यांची मराठ्यांस पुष्कळ मदत होते, निदान त्यांच्या वतीनें मोगलांस दहशत दाखविण्याची त्यांस सोय होते, तेव्हां हीं राज्यें नाहींशीं केल्याशिवाय मराठ्यांस जिंकितां यावयाचे नाहीं. असा तर्क बांधून प्रथम त्यानें आपला मोर्चा त्या दोन राज्यांवर फिरविला. परंतु हीं राज्यें बरीच जुनाट असून त्यांजबद्दल लोकांच्या मनांत पूज्यबुद्धि होती. शिवाय ती मुसलमानी असल्यामुळे बादशहा त्यांच्याशीं सलोख्यानें वागता, तर मराठ्यांस जिंकण्याच्या कामांत त्यांनीं त्यास मदत केली असती. निदान मराठ्यांचा निःपात होईपर्यंत त्यानें त्यांजवर शस्त्र धरावयाचें नव्हतें. त्या राज्यांत अनेक बलाढ्य मराठे सरदार नोकरीस होते. तीं राज्यें बुडतांच ते सरदार आपापल्या पथकांनिशीं मराठ्यांस येऊन मिळाले, आणि औरंगजेबाच्या जुलमी वर्तनाबद्दल त्याचा सूड घेण्यास तयार झाले इतिहासकारांच्या मतें औरंगजेबाची ही चुकी अक्षम्य आहे; तरी पण बादशहाच्या बाजूची आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे, ती अशी, कीं विजापुर व गोवळकोंडा ह्या राज्यांत शिया पंथाची चलती होती. औरंगजेबाचा वर्तनक्रम आरंभापासून धर्माच्या सबबीवर रचिलेला होता. जिकडे तिकडे एकजात सुनी पंथाचा प्रसार करण्याकरितां तो जिवापाड मेहनत करीत होता. तेव्हां वरील दोन राज्यें जिंकून तेथें स्वधर्माचा प्रसार करण्याची त्याची इच्छा उत्कट होती, शिवाय बहामनी राज्य म्हणजे आरंभापासून दिल्लींतील सार्वभौम

राज्याविरुद्ध बंडखोरीचे असन त्याच्या शाखा, जिकण्यास अकबराचे वेळेपासून अव्याहत प्रयत्न चाल होते.

औरंगजेबाने बऱ्हाणपुराहून आपला वडील मुलगा शहाआलम यास मराठ्यांच्या कोकणपट्टीत पाठवून समुद्रकिनारा हस्तगत करण्यास हुकूम दिला आणि दुसरा पुत्र अज्जम यास खानदेशात पाठवून आपण स्वत औरंगाबादेस आला तेथून काही दिवसांनी तो विजापुरच्या मुलखात शिरला संभाजीबरोबर आरंभीं लढण्यात त्याचा हेतु आपला बंडखोर मुलगा अकबर यास पकडण्यापुरताच होता संभाजीचे व अकबराचे जे अंतस्थ बेत चालले होते, ते सर्व गुप्त हेराच्या मार्फत औरंगजेबास कळत होते तेव्हा औरंगजेबाने अकबराच्या गुरूस फकिराचा वेष देऊन मराठ्याचे छावणींत पाठविले त्याने पुष्कळ पैसे भरून मराठे सरदारास फितवावे, आणि मोगल फौजेस त्यानी अडथळा न करिता मराठ्याचे छावणीत येऊं द्यावे, अशा प्रकारे संभाजीस पकडल्यास अकबरास सर्व गुन्ह्याची माफी करण्यात येईल, असा गुप्त बेत त्या गुरूने अकबरास पढविला परंतु अकबराने तो सर्व संभाजीस कळविला. आणि मराठे सरदारास लाच देण्याचे पैसे बादशहाकडून उपटून, मोगल फौज नजीक येताच तिची मराठ्यानी अशी कत्तल उडवून दिली, की एकही मनुष्य जीव घेऊन परत गेला नाही संभाजीजवळ राहिल्याने आपला निभाव लागत नाही आणि आपणास काहीच फायदा होत नाहीं असें पाहून, मिळालेल्या गलबतावर इराणात पळून जाण्याच्या उद्योगास अकबर लागला. त्या कृत्यांनी औरंगजेबाच्या पायाची आग मस्तकास गेली, आणि संभाजी व अकबर हातीं येण्याची त्याची निराशा झाली तेव्हा पोर्तुगीझ लोकाशीं संधान बांधून त्याजकरवीं संभाजीस शह द्यावा अशा हेतूने त्याने आपला वकील गोव्यास पाठविला त्या वेळीं गोवेकरांची विशेष चलती नव्हती मोगल बादशहाकडून आपलेकडे वकील आलेला पाहून, गोव्याच्या मुख्य अधिकाऱ्याचे डोके गर्वाने फिरून गेलें प्रसिद्ध इतिहासकर मनूची हा त्या वेळीं गोव्यास होता, त्याने औरंगजेबाच्या पत्राचे भाषातर करून कारभाऱ्यास दिले. आणि 'बादशहाच्या शब्दावर कधींही भरंवसा ठेवूं नये, आपणास मोगलापेक्षा मराठेच चागले, कोकण ही एक भित मध्ये असल्यामुळे मोगलापासून आपले सहज संरक्षण होत आहे,' इत्यादि प्रकार समजावून चागली

कानउघडणी केली. परंतु त्या कारभाऱ्यास तो उपदेश रुचला नाहीं. इकडे अकबराची पांचांवर धारण बसली. आपण पळून जात असतां गोवेकर आपणास पकडून खचित बादशहाचे हवालीं करितात असें त्यास वाटलें. त्यानें कारभाऱ्यास पैका भरून येथें एक जहाज बांधण्याची तजवीज चालविली. त्यांत बसून तो इराणास पळून जाणार होता. जहाज बांधण्यासाठीं सुतारांच्या वगैरे वेषानें पुष्कळ मराठे लोक गोव्यांत येऊन उतरले. मराठ्यांचा हेतु गोवें जिंकून घेण्याचा होता. दररोज ज्यास्त ज्यास्त लोक येऊं लागले. मागाहून संभाजीही स्वतः येण्याच्या तयारींत होता. हा घाट मनूचीच्या लक्षांत येऊन त्यानें वेळींच कारभाऱ्यास सावध केलें. कारभाऱ्यानें अकबराचें गलबत तयार करून वेंगुर्ल्यास पाठविलें, आणि मराठ्यांबरोबर युद्ध सुरू केलें. ह्या युद्धांत मराठ्यांनीं गोवेकरांची चांगली खोड मोडून प्रत्यक्ष गोवे घेण्यापर्यंत पाळी आणिली होती. इकडे औरंगजेबानें मराठ्यांबरोबरचें युद्ध सोडून दिलें, आणि प्रथम विजापुराकडे दृष्टि फिरविली. वडील मुलगा शहाआलम सेप्टेंबर १६६३ पासून मे १६८४ पर्यंत कोंकणांत लढत होता. त्याची पोर्तुगीझ लोकांशीं थोडीशी कटकट झाली. पोर्तुगीझ व मराठे ह्या दोघांसही विश्वासघातानें ताब्यांत आणावे असें त्यास बादशहाचें आंतून सांगणें होतें. पण शहाआलम यास ही गोष्ट न रुचून दोघांशींही त्यानें सख्य ठेविलें. औरंगजेब मरण पावल्यावर भावांबरोबर कराव्या लागणाऱ्या युद्धांत ह्या दोघां राष्ट्रांनीं आपणास मदत करावी, असा त्याच्या पोटांतला हेतु होता. म्हणून तूर्त अकबरास पकडण्यापलीकडे त्याचा दुसरा हेतु नव्हता. ह्या कामीं शहाआलमनें आपली शिकस्त करून पाहिली; पण इलाज न चालल्यामुळें त्यास कोंकणपट्टी सोडून परत यावें लागलें. बादशहानें त्यास विजापुरकडील संभाजीचा मुलूख घेण्यास पाठविलें. शहाजादा अकबर संभाजीकडे होता. परंतु दिवसेंदिवस संभाजीची स्थिति बिघडत चालली आहे, आतां त्याजकडून आपणास तादृश साहाय्य होण्याची आशा नाहीं असें पाहून, तो संभाजीस सोडून राजापुर येथें स. १६८६ च्या ऑक्टोबरांत गलबतांत बसून मस्कतवरून मक्केस गेला, आणि तेथून पुढें इराणांत इस्पहान येथें २४ जानेवारी १६८८ रोजीं पोंचला. इराणच्या शहानें त्यास खुरासान येथें ठेविलें. तेथेंच तो स. १७०४ त मरण पावला.

कुतब्शाही व आदिलशाही ह्या राज्यांचे अंत कसे झाले, त्याची हकीकत

मागे त्या राज्याच्या इतिहासात आली आहे औरंगजेबाने ता २७ मे १६८५ रोजीं विजापुरास वेढा घातला ता २२ सेप्टेंबर १६८६ रोजीं विजापुरचे राज्य खालसा झाले इकडे ता २८ जून १६८५ रोजीं राजपुत्र शहाआलम गोवळकोड्यावर आला. ता २१ सेप्टेंबर १६८७ रोजीं गोवळकोड्याचे राज्य औरंगजेबाचे ताब्यात आले त्या प्रसंगीं औरंगजेबाने केलेले विश्वासघातकी वर्तन तिरस्कारार्ह आहे त्या जुन्या मुसलमानी राज्याचा शेवट होताना जे अनेक निंद्य प्रकार घडले, त्याचे वर्णन करण्याची विशेष जरूर नाही स्वार्थ साधताना औरंगजेबाने सर्व न्यायनीति अगदीं बाजूस ठेविली इतके सांगितलें म्हणजे पुरे आहे मदनपंत ऊर्फ मादण्णा हा कुत्बशाही राखण्याचा प्रयत्न करीत असता, मत्सरी सेनापतीच्या दुष्ट बेतात मारला गेला आणि शहा उघडा पडला तेणेकरून औरंगजेबाचा त्या राज्यात सहज शिरकाव झाला लखनौचे प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ प्रो० मौलाना शिबली ह्यानी 'अन्नद्वा' नामक ऊर्दू मासिकात ह्यासंबंधाने साधकबाधक प्रमाणे देऊन, औरंगजेबाच्या कृतीचे समर्थन केले आहे

ह्याच सुमारास इंग्रज लोक व औरंगजेब ह्याचा बराच मोठा झगडा झाला, त्याचे वर्णन ब्रिटिश रिसायत पृ० ३४५ वर आहे

विजापुर व गोवळकोडा हीं राज्ये जिंकिल्यावर औरंगजेबाने आपली नजर संभाजीकडे फिरविली लवकरच तो दुर्वृत्त राजा बादशहाच्या हातात सापडला तेव्हा त्याचा मोठ्या क्रूरतेने वध झाला, (मार्च ११ स १६८९) परंतु ह्या गोष्टींनीं औरंगजेबाचा हेतु तडीस गेला नाहीं. विजापुर व गोवळकोडा ह्या राज्यात अनेक मराठे सरदार नोकरीस होते, ते आता मराठ्यास येऊन मिळाले. बादशहाच्या छावणींत प्लेगचा उद्भव होऊन पुष्कळ लोक मेले

'औरंगजेबाच्या नाशाची ही सुरुवात होय, त्याच्या आयुष्याचा अत्यंत दुःखदायक भाग येथे सुरू झाला मोगल बादशाहीचा विस्तार अतिशय झाल्यामुळे, त्याची व्यवस्था एका ठिकाणाहून व एका पुरुषाच्या हातून होणे शक्य नव्हते नवीन जिंकिलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावणे व मराठ्याना जिंकणे, हीं दोन कामे एका वेळीं सिद्धीस नेणे फार दुर्घट झाले. तिकडे उत्तरहिंदुस्थानात बंडावे माजले बादशहा राजधानीपासून दूर गेल्यामुळे कामदारावरील दाब नाहींसा होऊन राज्यात अव्यवस्था सुरू झाली बादशहाचा आश्रय बंद पडल्यामुळे विद्या व कला याचा झपाट्याने ऱ्हास झाला ज्या बादशाहींत

कांहीं तरी सुंदर असें नवीन काम झाल्याशिवाय दिवस जात नसे, त्या ठिकाणीं ह्या पंचवीस वर्षांत एक मुद्दां इमारत उठली नाहीं, कीं एक सुंदर चित्रयुक्त पुस्तक बाहेर आलें नाहीं. बादशहाची सर्व संपत्ति व उत्पन्न निरर्थक युद्धांत खर्च झालें. बंगालचा कारभारी मुर्शीदकुलीखान आपल्या प्रांताचा वसूल नियमानें पाठवी, म्हणून बादशहाचा योगक्षेम कसाबसा चालला. ( Prof Sarkar in Modern Review ).

आपल्या राजाचा बादशहानें क्रूरतेनें वध केला त्यामुळें सर्व मराठे चिडीस जाऊन, त्यांनीं गनिमी काव्याच्या शिताफीच्या युद्धकलेनें बादशहाचा असा कांहीं सूड घेतला, कीं पुढील सतरा वर्षांत स्वातंत्र्यरक्षणार्थ मराठ्यांनीं केलेल्या उद्योगास उपमा देण्याजोगीं उदाहरणें इतिहासांत थोडीं आहेत. प्रथम मोगल फौजेस हूल दाखवून आपल्या अंगावर आणून घ्यावी, क्षणार्धांत मागें फिरून तिची साफ कत्तल उडवावी, अन्नसामुग्री व पैसा बादशाही फौजेंत येत असल्यास, त्याची पाळत राखून तो मध्येंच लुटून फस्त करावा, अशा प्रकारें औरंगजेबासारख्या कसलेल्या व धोरणी पुरुषासही त्यांनीं इतकें हैराण केलें, कीं अखेरीस अत्यंत विपन्नावस्थेच्या यातनांमध्यें त्यास परलोकवास स्वीकारावा लागला. उत्तरेंत राजपूत लोकांनीं औरंगजेबास दाद दिली नाहीं ही गोष्ट खरी: तथापि ते लढाईस जाण्याच्या आदल्या दिवशीं बायकामुलांची व इष्टमित्रांची शेवटची भेट घेत, आणि निकरानें समोर येऊन तुटून पडत. परंतु मराठ्यांचा प्रकार वेगळा होता. आपण मरूं ही कल्पनाच त्यांच्या डोक्यांत नव्हती; मग राजपुताप्रमाणें मुलांबाळांस भेटण्यास ते थोडेच थांबणार? जिंकूं अशी खात्री वाटल्याशिवाय ते समोर येतच नसत. घोड्यावर एक गोधडीची घडी व अंगावर कांबळी, अशा थाटानें त्यांचे थवे पर्जनकाळच्या मेघांप्रमाणें आसपास मागमूस नसतां, मोगलांच्या अवाढव्य फौजेसभोंवतीं एकदम गोळा होत, आणि क्षणार्धांत त्यांचा फन्ना उडवीत. मुसलमानाची अवजड हत्यारें पाहून त्यांस मनापासून हसूं येई. मोगलांच्या पुरवठ्यांतून पुरेसें अन्न लुटण्यास न सांपडल्यास, पाहिजे त्या गांवांत कांदाभाकर मिळण्यास त्यांस अडचण पडत नसे. नदीचें वांकण किंवा डोंगराचा वळसा यांत मोगली फौज सांपडली म्हणजे त्यांस कृतार्थता वाटे. अशा प्रकारें सतरा वर्षे बादशहा लढत होता. अशा बिकट प्रसंगीं औरंगजेबाचें वृद्धावस्थेंतील चापल्य, त्याची मेहेनत व प्रत्येक गोष्ट स्वतः

करण्याची त्याची हौस, ही पाहून कोणासही कौतुक वाटल्यावाचून राहणार नाही. अनेक संकटे सोसून लढाईचे काम तो स्वतः पाहत होता, ही त्याची धन्य होय. अनेक वेळा नद्यास पूर येऊन त्याचे असंख्य लोक प्राणास मुकत, अन्नसामुग्री मिळत नसे, मोठमोठे दुष्काळ पडत, पटकीच्या साथी येत. असे होई तरी त्याने धैर्य सोडिले नाही. तो सर्व कच्चा कारभार स्वतः पाही. लढाईचे बेत व नकाशे स्वतः करून पाठवी. उत्तरहिंदुस्थानातील राज्यव्यवस्थेबद्दल तो हंमेश पत्रे लिहून पाठवीत असे. त्याच्या स्वदस्तुरच्या हुकमाशिवाय काडी सुद्धा हालत नसे. परगण्यातील लहानशा अंमलदाराची नेमणूक करणे किंवा एकाद्या लहानशा कारकुनाची निवड करणे ही कामे सुद्धा तो स्वतः करीत असे. आपले कामदार कसा कारभार चालवितात, ह्याचा पूर्ण तपास तो ठेवीत असे. अशा कच्च्या कामात तो लक्ष ठेवी, तरी राज्यातील सर्व महत्वाच्या मोठमोठ्या कामावरही त्याची दक्षता विशेष असे. ह्या सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे त्याच्या बुद्धिप्रभावाची तारीफ करावी तितकी थोडीच होईल. तथापि त्याचे चित्त कधीही स्वस्थ नसे. आपण आपल्या बापाची व भावांची जी दशा केली, तीच आपले मुलगे व सरदार आपली करतील अशी त्यास नेहमी धास्ती असे. म्हणून सर्व नेमणुका त्याने आपल्या स्वतःच्या हातात ठेविल्या होत्या. तसेच तो सरदारांच्या वारवार बदल्या करी. मुलावर तर त्याची सारखी नजर असे. तसेच इतर सर्व लोकांवर तो फार प्रीति दाखवी. कोणास दोष देणे झाला तरी त्यास चमत्कारिक शब्दरचनेने खुष करण्याचा प्रयत्न करी. त्याने अनेक उपाय केले, तरी त्याच्या अविश्वासी स्वभावामुळे लोकांची त्यावर प्रीति जडली नाही. अखेरीस जिकडे तिकडे फार तंटे माजले. उत्तरेत राजपूत, शीख व जाठ लोकांनी बंड केली. पंढरपुरच्या पूर्वेस इस्लामपुरी येथे चार वर्षे काढिल्यावर नस्रतजंग, फिरोजजंग, सुजायतखान, महंमदमुरादखान, तर्बियतखान, व फतुल्लाखान हे त्याचे सरदार आपापसात कलह करून एक दिलाने काम करीतात, सबब त्याजवर भिस्त न ठेवता, ता १९ ऑक्टोबर सन १६९९ रोजी मराठ्यांचे किल्ले काबीज करण्यास बादशहा स्वतः निघाला. पण ह्या त्याच्या प्रयत्नात त्यास विशेष सिद्धि मिळाली नाही. त्याने एक किल्ला काबीज करावा, तोच काही दिवसांनी मराठ्यांनी तो परत घ्यावा, असा प्रकार चालला. मराठे लोकही हळू हळू बळावत जाऊन

ते एकामागून एक आपले किल्ले परत घेऊं लागले. बादशाही फौज अगदीं थकून गेली. खजिना रिकामा पडून शिपायांस पगार देण्यास बादशहापाशीं कांहींच नाहींसे झालें. आजपर्यंत सर्व शिपायांस फारच नियमानें पगार मिळत असे. परंतु आतां अशा प्रकारें सैन्यावस्थेत हाल होत होत शेवटीं औरंगजेब वाकिन-खेड्याजवळ सुरापुर येथें सन १७०५ च्या पावसाळ्यांत जाऊन राहिला. तेथेंच आजारी पडून तो अशक्त झाला. तरी रोजचें काम व आग्रह तो सोडीना. शेवटीं बहादूरगडास जाऊन ता. २० जानेवारी १७०६ रोजीं तो अहंमद-नगरास परत आला. ह्या वेळीं मराठयांच्या तडाक्यातून त्याची मोठया कष्टानें सुटका झाली. ह्याप्रमाणें ज्या अहंमदनगरांतून वीस वर्षांपूर्वी अवाढव्य सैन्या-निशीं औरंगजेब बाहेर पडला होता, त्याच शहरीं अगदीं हतवीर्य होऊन तो कार्यदक्ष बादशहा मोठया कष्टानें परत आला. तेथें त्याची प्रकृति उत्तरोत्तर फारच क्षीण होत चालली. एखाद्या पराक्रमी पुरुषाचा शेवट अत्यंत दुःखदायक झाला असेल तर तो औरंगजेबाचाच होय. आपल्या पन्नास वर्षांच्या कारभारानें आपण सर्व राज्याचा नाश केला, हे पाहून त्यास काय बरें वाटलें असेल! त्याच्या कौटुंबिक संसाराचीही अशीच दुर्दशा होती. लोकांस मरणसमयीं कुटुं-बाचीं माणसें जवळ असावींशीं वाटतात, पण औरंगजेबास आपले मुलगे मुलींच जवळ नकोत असें वाटे. चारही मुलास त्यानें केव्हाना केव्हा कैदेंत ठेविले होतें. बापासारखीच ते आपली अवस्था करतील! आपले डोळे मिटले कीं, पुनरपि हे एकमेकाच्या मानेस बसून सर्व देशभर धुमाकूळ मांडल्याशिवाय राहणार नाहींत. दुसरी मुलगी वृद्ध कुमारिका झीनतुन्निसा व बायको उदेपुरी ह्या दोघी वृद्ध बादशहाच्या बिछान्याजवळ बसून होत्या. 'माझ्या मुलाचा पुढें साभाळ कोण करणार,' असें म्हणून उदेपुरी सारखी रडत होती. 'बाबानों, माझ्या पश्चात् भांडूं नका,' म्हणून त्यानें विनवणीचीं पत्रें दोघा मुलास लिहिलीं. धाकटी मुलगी गौहर-आरा मार्च स. १७०६ त वारली. शिवाय दुसऱ्या मुली, पुतणे, नातू, वगैरे अनेक माणसें ह्याच वर्षी मृत्युमुखीं पडलीं. स्वतःच्या चौदा भावंडांपैकीं आतां औरंगजेब एकटा जिवंत होता. अहंमदनगरी आल्यावर आपण आपल्या शेवटल्या अखेर मजलीस येऊन पोचलों असें त्यास वाटलें तेथून जीं पत्रें त्यानें लिहिलीं आहेत, त्यावरून त्याच्या शरीरास किती क्लेश होत होते, त्याची इहलोकीं कशी निराशा झाली होती, परलोकची भीति

त्यास किती पडली होती, हे एकदाच दृष्टीस पडते त्याच्या मुलानीं मरण-समयीं जवळ येण्याची परवानगी मागितली, तेव्हा तो म्हणाला, कीं 'शहाजहान आजारी असता जे निमित्त मीं योजिले होते, ते हेच महत्त्वाकांक्षेच्या धुराइतकी दुसरी कोणतीहि हवा रोगकारक व सर्वनाशक नाहीं'

जानेवारी १७०७ त त्याची प्रकृति फारच बिघडली पुढे अंतकाळ समीप येताच त्याने आपल्या सर्व मुलास निर्वाणीचीं पत्रे लिहिलीं त्यात खेदसूचक, उपदेशपर व निराशादर्शक पुष्कळ मजकूर आहे पुढे त्याने एक मृत्युपत्र लिहून सर्व राज्य आपल्या तिघा मुलास वाटून दिले आयुष्यभर अत्यंत मोठें ऐश्वर्य भोगलेल्या बादशहास मरणसमयीं ईश्वराची व प्रत्यक्ष पोटच्या मुलाचीही दहशत पडावी, ह्यापेक्षा ज्यास्त दुःखकारक मरण कोणते असणार! अशा हाल-अपेष्टेत पृथ्वीवरील एका अति मोठ्या राज्याचा हा महान् बादशहा औरंगजेब आपल्या वयाच्या ८९ व्या वर्षी व कारकिर्दीच्या ५० व्या वर्षा, सन १७०७, फेब्रुवारी, शुक्रवार तारीख २० रोजीं अहंमदनगर येथे मरण पावला, आणि त्याबरोबरच मोगल बादशाहीचा जुनाट व कोरम झालेला वृक्ष उपटून पडला त्याच्या कित्येक शाखा काहीं दिवस धडपड करून जीव धरून होत्या, पण त्याही पुढे लवकरच लयास गेल्या आपल्या एकदर आयुःक्रमात नाव घेण्यासारखे काहीच सत्कृत्य आपल्या हातून घडले नाहीं, अशा बुद्धीनेच कीं काय, औरंगजेबाने आपला अंत्यविधि, डामडौलाचा समारंभ काहीं न करिता, अत्यंत साधेपणाने करावा अशी आज्ञा केली होती. आणि तत्प्रीत्यर्थ स्वहस्तलिखित कुराणाच्या प्रती विकून उत्पन्न झालेल्या रकमेतून पाच रुपये खर्च करण्याविषयीं त्याने अंतकाळीं आपली इच्छा दर्शविली होती तदनुसार प्रेतविधि उरकण्यात येऊन त्याचे शव दौलताबादेनजीक खुल्दाबाद येथे शेख झेनुद्दीन नामक एका प्रसिद्ध साधूच्या कबरेशेजारीं पुरण्यात आले त्याने आपली कबर अगोदरच बाधून ठेविली होती स्वतःच्या श्रमाने मिळविलेले आठशेपाच रुपये त्याने गरिबास वाटण्याकरिता ठेविले होते मरणापूर्वी एक मृत्युपत्र करून त्यात त्याने असे ठरविले होते, कीं पूर्व व उत्तर दिशाकडील आपले राज्य मुअज्जम व अज्जम ह्या दोन मुलानीं वाटून घ्यावे, व कामबक्ष ह्याने दक्षिणचे राज्य घ्यावे परंतु ही व्यवस्था अमलात आली नाहीं हे पुढे कळून येईलच.

८. **औरंगजेबाची योग्यता.**—लेन्पूल म्हणतो, 'शहाजहानने कैदेत पडल्यावर आपली तरवार औरंगजेबाकडे पाठवून दिली. तिच्यावर आलमगीर जगज्जतो हा फारशी शब्द कोरलेला होता. तेंच नाव औरंगजेबाने स्वीकारिलें; आणि त्याच नावानें मुसलमान लोक त्यास ओळखितात. कडकडीत धर्माचरण हेंच औरंगजेब आपलें मुख्य कर्तव्य समजत असे. त्यापुढें संसार-सुखाची त्यानें यत्किंचित् परवा केली नाही. त्याचीं सर्व कृत्यें धर्मप्रेरित आहेत. गाणेंबजावणें, नाचतमाशे, खाणेंपिणें, कपडालत्ता, अत्तरगुलाब, असले विलास त्यानें कधीं भोगिले नाहींत. मद्यास त्यानें कधींच स्पर्श केला नाहीं. स. १६६५त महिनाभर एक धूमकेतु उगवला होता, त्या अवकाशांत त्यानें सबंध उपोषण केलें. त्या मुदतींत फक्त थोडें पाणी व भाकरीचा तुकडा खाऊन तो राहिला. तो नेहमीं व्याघ्रांबर टाकून जमिनीवर निजे. प्रत्येकानें स्वतः काम करून आपलें पोषण करावें, ही इस्लामाची अनुज्ञा पाळण्याकरितां, औरंगजेब स्वतः आपल्या हातानें डोक्याच्या पातळ टोप्या करून विकी. त्याला सर्व कुराण तोंडपाठ येत होतें. ह्या सर्व गोष्टी त्यानें राज्य संभाळण्याकरितां केल्या असें नाहीं. त्यानें आपले सर्व प्रतिस्पर्धी अगोदरच मारून टाकिले होते. तेव्हां धर्माचरण बाजूस ठेवूनही त्याचें राज्य जहांगीर-शहाजहानप्रमाणें चैनींत चालण्यांत कोणतीच हरकत नव्हती; इतकेंच नव्हे, तर धर्मशास्त्र बाजूस ठेवून केवळ व्यवहारनीती-कडे दक्षतेनें लक्ष्य दिल्यानेंच अकबराची भरभराट झाली होती. अकबराचा सारासार विचार, जहांगीरची विषयवासना किंवा शहाजहानचा ऐषआराम, ह्याचा स्वीकार करण्यास औरंगजेबास स्वतःच्या मनाशिवाय दुसरी कांहीं एक आडकाठी नव्हती. हिंदूंना तर असला खडतर धर्मिष्ठ राज्यकर्ता नको होता. औरंगजेब रजपुतांच्या वाटेस गेला नसता, तर आपण होऊन त्याजवर शस्त्र धरण्याची बुद्धि त्यांना कधींच झाली नसती. औरंगजेबाच्या ठिकाणीं दुसरा कोणी असता, तर असा भलताच खटाटोप करण्याच्या नादास तो पडता ना. बाप व आजा यांसारखी चैन करून दिवस काढणेंच त्यास ज्यास्त पसंत पडलें असतें. परंतु धर्माच्या केवळ मानसिक समाधानाकरितां सर्वस्वाचाही त्याग कर-ण्यास औरंगजेब तयार झाला, ही गोष्ट मोगलांच्या इतिहासांत अगदीं अपूर्व आहे. औरंगजेब निर्बुद्ध नव्हता; आपण करितो काय, आणि त्याचे परिणाम काय होतील, हें समजण्याची त्यास अक्कल होती. गादीवर आला त्या वेळेस

तो पोरवयात नव्हता त्या वेळीं त्याचें वय चाळीस वर्षांचें असून, त्याने राज्याच्या हरएक बाबतींत अनुभव मिळविला होता असें असून, हिंदूंचीं मनें दुखवून अशा शियापंथी प्रबल सरदाराना नाराज करणे, दरबारातील हरएक आनंद व त्याच्या धर्माचा पाडाव करणे, ज्याच्या पराक्रमावर सगळया लष्कराची भिस्त गंमत नाहीशी करून सर्व दरबारी लोकाना दुखविणे, ह्या गोष्टी केल्याने आपलें राज्य उलथून पडेल, हे औरंगजेबास पूर्णपणे समजलें असेल हे सर्व समजून, त्याने आपली कर्तव्यमर्यादा ठरविली, आणि अखेरपर्यंत ती ढळं दिली नाहीं. सन १६५६ त तो दक्षिणेतून राज्य मिळविण्यासाठीं निघाला, त्या वेळेस जो उद्देश त्याच्या मनात होता, तोच उद्देश अहंमदनगर येथे त्याच्या मरणसमयीं कायम होता त्यात सारासार विचारास जागाच नव्हती माझ्या मनाने घेतलें, मी करणार, ह्या आग्रहावर सर्व कांहीं चाललें त्याचा निश्चय कधी ढळला नाहीं त्याच्यासारखे शूर व धीट पुरुष थोडेच निपजले कसेंही संकट आलें तरी तो आपला निश्चय टळं देत नसे राज्यप्राप्तीच्या वेळेस केलेलीं क्रूर कृत्ये वगळून दिलीं, म्हणजे न्यायाच्या कामात त्यास इस्लामी कायद्याप्रमाणे दोष लगण्याजोगें यत्किंचित कृत्य त्याच्या हातून घडलें नाहीं त्याच्या ह्या न्यायप्रियतेची स्तुति त्याच्या शत्रूंनीं सुद्धा केली आहे राव किंवा रंक दोनही त्यास अगदीं सारखे असत '

त्याच्या स्वभावात अविश्वास मात्र पूर्ण भरला होता विषप्रयोगाची तर त्यास एकसारखी भीति असे वैद्याने गोळी किंवा औषध आणिलें, कीं प्रथम तितकाच भाग स्वत वैद्य घेऊन दाखवील, तरच तो औषध घेई त्याच्या बापाच्या वेळेस हाच प्रघात होता धर्मनिष्ठ मुसलमान त्याची स्तुति करितात, परंतु राज्यातले इतर लोक त्यास अगदीं कंटाळून गेले होते

औरंगजेबाच्या गुणदोषांचें परीक्षण त्याच्या कृत्यावरून सहज होण्याजोगें आहे मोगल वंशात ऐतिहासिक दृष्ट्या विवेचनार्ह असा दुसरा पुरुष औरंगजेबानंतर कोणीच झाला नाहीं. तसच त्याच्या पुढील पुरुषात राज्यधोरण म्हणून काहीं नव्हतें कुटुंबातील सर्व प्रतिस्पर्धी मंडळी त्याने नाहीशी केली, एवढ्यावरच त्यास दोष देण्याचें कारण नाहीं शहाजहानने तोच प्रकार केला होता दक्षिणची मुसलमानी राज्ये जिंकण्याबद्दलही त्यास नांवे ठेवण्याचें कारण नाहीं. उलट दक्षिण देश जिंकण्याचें पिढीजाद काम तडीस नेल्याबद्दल त्याची वाहवा

केली पाहिजे. परंतु एवढ्या बलिष्ठ राज्याची सर्व शक्ति औरंगजेबानें हिंदूंचा पाडाव करून मुसलमानी धर्माची अभिवृद्धि करण्यांत खर्चिली, हें अत्यंत शोचनीय होय. प्रजाजनांस समबुद्धीनें वागविण्याच्या पद्धतीवर ज्या राज्याचा अकबरानें पाया घातला, तें राज्य औरंगजेबानें जुलमानें व दुराग्रहानें मोडकळीस आणिलें. तो जिवंत असेपर्यंत निरनिराळे भाग कसे तरी एक ठिकाणीं होते, परंतु तो मरण पावतांच ते सर्व विसकळीत झाले आणि बादशहा ह्या नांवांत कांहीं अर्थ राहिला नाहीं. औरंगजेबाच्या स्वभावाचें आरंभीं वर्णन दिलें आहे, त्यावरून असें दिसून येईल, कीं शहाजहानच्या मुलांतून त्यासच राज्य मिळणें अपरिहार्य होतें. राज्य प्राप्त होतांच त्यानें परंपरागत पद्धति मोडून कोणाचें न ऐकतां व कोणासही न विचारतां आपल्या राज्यनौकेचें सुकाणूं अशा रीतीनें चालविलें, कीं मातीच्या घड्याप्रमाणें क्षणमात्रांत फुटून नाहींशी होण्यास ती पात्र झाली. धर्मसंबंधीं दुराग्रहाचे प्रयत्न तडीस नेतांना प्रत्यक्ष राज्य लयास गेलें तरी हरकत नाहीं, असें समजणारा स्पेन देशाचा राजा दुसरा फिलिप व हा औरंगजेब, ह्यांजमध्यें एक प्रकारचें निकट साम्य दृष्टीस पडतें. आपल्या सभोंवार काय गोष्टी चालल्या आहेत आणि लोकांच्या परिस्थितीचा झोंक कोणीकडे आहे, हें समजून घेण्याकडे दोघांनींही सारखेंच दुर्लक्ष केलें. राज्यांतील हरएक कामाचा खडानूखडा तपशील स्वहस्तें तडीस नेण्यांत दोघानाही कधीं थकवा येत नसे; व कितीही संकटें आलीं, तरी दोघांचाही धीर कधीं सुटला नाहीं. तरी दूरदृष्टीचा अभाव व कोतें मन ह्या दोषांचें उत्कृष्ट उदाहरण तेच दोघे पुरुष होते. स्वाभाविक वर्तन, सत्ता, ऐश्वर्य, दुराग्रह, व ह्या सर्वांचा मुगुटमणि अविश्वास व बेइमान इत्यादि गोष्टींत औरंगजेबाचा समकालीन फ्रान्सचा बलिष्ठ राजा चौदावा लुई ह्याच्याशीं त्याचें साम्य उत्तम जुळतें. चांगले गुण अंगांत असूनही कित्येक अक्षम्य दोषांमुळें दोघांच्याही शत्रूंस चांगलें फावलें. स्वभावांतील दोष एका बाजूस ठेविले, तरीही स्वानुरक्त राजपूत राजांस विनाकारण दुखविणें, निरपराधी व प्रसंगीं स्वतःस साह्य देणारीं विजापुर व गोंवळकोंडा येथील स्वधर्मी राज्यें बुडविणें, व मराठ्यांचा निःपात करण्याच्या मृगजल प्रयत्नापायीं सर्व शक्तींचा व्यय करणें, ह्या त्याच्या राज्यकारभारांतील चुका अगदीं अक्षम्य होत, ह्यांत संशय नाहीं. शेवटीं त्यास इतकें दुःख व निराशा प्राप्त झाली, कीं आपल्या पश्चात् राज्याची सुव्यवस्था लावून देण्यास त्यास सुचलें

नाहीं इहलोकचा कष्टप्रद वास केव्हां एकदा संपेल असे त्या भावावलेल्या बाद-शहास अखेरीस झाले सारांश, त्याच्या स्वभावातील मुख्य व्यंग बेभरंवसा ते नसते तर मोगल बादशहात पहिले पद मिळविण्यास तो लायक होता त्याचा पोशाख व वृत्ति अगदी साधी असे चष्मा लावल्याशिवाय लोकांचे अर्ज स्वत वाचून त्याजवर स्वहस्ताने तो शेरे करी कलाकौशल्याच्या कामात त्याने विशेष खर्च केला नाहीं धर्मसंबधात तो आग्रही होता तरी धर्मवेडा नव्हता हिंदु लोकावर त्याने नानातऱ्हेचे जुलूम केले ही गोष्ट खरी तरी धर्माच्या सबबीवर त्याने उगाच क्रूरपणा केला नाहीं त्याचे हस्ताक्षर उत्कृष्ट होते ।

" ह्याप्रमाणे शेवटच्या थोर मोगल बादशहाचा अंत झाला हट्टी, दुराग्रही व संशयी असा असनही थोरपणा मिळवून देणारे कित्येक गुण त्याच्या अंगीं होते. शिक्षक, सेनापति, वजीर, धर्मशास्त्रज्ञ, असल्या एखाद्या कामास तो फार योग्य होता परंतु मानवी अंत करणावर अंमल करण्याचे जे राजाचे काम त्यास तो मुळींच लायक नव्हता त्याचे खासगी वर्तन साधे व पवित्र होतें त्यास उद्योगाची आवड असून, चैन व ऐषआराम नको असे ' पिकलेल्या केसांचा वृद्ध बादशहा दररोज दरबार भरवून काम करितो लोकांचे अर्ज घेऊन ते स्वत वाचतो, आणि स्वहस्ताने त्याजवर शेरे करून, त्याचा निकाल करितो, हा प्रकार पाहून, युरोपियन प्रवाशयांना धन्यता वाटली ' त्याचीं स्वत ची सुमारे दोन हजार पत्रे उपलब्ध आहेत नियमाची व हुकमाची अमलबजावणी तो अगदीं कसोशीने करीत असे तो म्हणे, ' एक नियम मोडूं दिला, की लगेच लोक सर्वत्र नियम मोडू लागतात ' तथापि अंमलबजावणी करिताना नियमाच्या खऱ्या हेतूकडे त्याने लक्ष पुरविले नाहीं प्रत्येक गोष्ट स्वत करण्याच्या त्याच्या हौसेमुळे त्याचे अंमलदार केवळ यंत्रासारखे बनले. त्याची स्वत ची हुषारी बाहेर येण्यास अवकाश राहिला नाहीं त्याचे मुलगे बुद्धिमान् होते, तरी बापाच्या संशयी स्वभावाने त्यांच्या अंगची हुषारी व तर-तरी पार नाहींशी झाली. त्याचे अंत करण कठोर होते त्यास दयेचा पाझर सहसा फुटत नसे शरण आलेल्या शत्रूस उदारपणाने वागविणे, किंवा खासगी व्यवहारात मनमिळाऊपणाने लोकात मिसळणे ह्या अकबराच्या गुणाचा औरंग-जेबास बिलकुल संपर्क नव्हता कपटी स्वभावामुळे त्याजवर भक्ति अशी कोणा-चीच बसली नाहीं कितीही चांगला मनुष्य त्याच्याजवळ आला, तरी त्याची

चित्तवृत्ति अगदीं मारून जात असे. ललितकलांस त्यानें हद्दपार केल्यामुळें, आनंदाचा व्यवसाय असा त्यास कांहीं राहिला नाहीं. लोकांच्या सुखदुःखाची त्यास कधीं पर्वा वाटली नाहीं, म्हणून सगळें जीवन त्यास नीरस झालें. सारांश, आपल्या राज्याच्या नाशाची संपूर्ण तजवीज त्यानें आपल्या पन्नास वर्षांच्या कारकिर्दींत उत्तम प्रकारें करून ठेविली." (Modern Review).

रजपुताचा कैवारी कर्नल टॉड व दुसरे कित्येक आंग्ल ग्रंथकार ह्यांनी औरंगजेबावर नानातऱ्हेचे वाक्‌प्रहार करून, त्याच्या इतका दुष्ट व अधम राजा सर्व आशियाखंडांत कधींच झाला नाहीं, असें प्रतिपादन केलें आहे. पण युरोपांतही असले राज्यकर्ते कांहीं थोडे झाले नाहींत. औरंगजेबाची राज्यपद्धति ज्यास्त उदार व निष्पक्षपाताची असती, तरी मोगल बादशाहीचा लय होण्याचा समय येत होता. शीख, जाठ, मराठे इत्यादि रणशूर लोकाच्या अंगीं नवीन जोम येत होता. औरंगजेबाच्या सदोष राज्यपद्धतीमुळे बादशाहीचा लय थोडाबहुत लवकर झाला, एवढाच काय तो फरक दिसतो. शिवाय पाश्चात्य राष्ट्रांनीं केलेल्या हल्ल्याचा आघात मोगल बादशाहीस फार दिवस सहन करितां आला नसता. मोगल बादशाहीचा विध्वंस करण्याचें काम वर सांगितलेल्या भिन्नभिन्न जातींच्या लोकांनीं तडीस नेलें नसतें, तरी डच, फ्रेंच, इंग्रज इत्यादि राष्ट्रांशीं मोगलास झगडा करावा लागलाच असता; आणि अशा प्राच्य व पाश्चात्य राष्ट्रांच्या युद्धांत अंतीं सिद्धि कोणास मिळाली असती, ह्याजबद्दल फारसा संशय घेण्याचें कारण दिसत नाहीं.

९. **औरंगजेबाची राज्यव्यवस्था.**—येथपर्यंतच्या वर्णनावरून औरंगजेबाची राज्यव्यवस्था कोणत्या प्रकारची असली पाहिजे, याची योग्य अटकळ करितां येईल. विधर्मी राजानें एवढ्या अफाट लोकसंख्येच्या देशावर राज्य केल्याचीं उदाहरणें हिंदुस्थानासारखीं फारशीं नाहींत. अशा ठिकाणीं लोकांच्या तंत्रानें वागून राज्यास बळकटी आणणें हें राज्यकर्त्याचें आद्य कर्तव्य होय. अकबर बादशहानें हें कर्तव्य नेहमीं आपल्या दृष्टीसमोर ठेविलें होतें, म्हणूनच हिंदुस्थानांतील शेंकडों राजेरजवाडे त्याजकरितां जीव देण्यास सदा तत्पर असत. औरंगजेबानें आपला राज्यकारभार निराळ्याच तत्त्वावर बांधिला. इराणी, पठाण व रजपूत, असे निरनिराळे लोक नोकरीस ठेवून त्यांच्या आपसांतील वैमनस्याच्या जोरावर एकमेकास एकमेकांची दहशत बसावी अशी त्यानें योजना

केली फौजेच्या अंतर्व्यवस्थेंत औरंगजेबानें नवीन फेरफार विशेष केले नाहींत. अमीर, मनसबदार वगैरेच्या नेमणुका व अधिकार अकबराच्या प्रमाणेंच होते बारा हजार स्वाराची नेमणूक मिळत असलेले पंचवीस तीस अमीर दिल्लीस औरंगजेबापाशीं होते असें बर्नियरचें म्हणणं आहे प्रत्येक स्वाराचा पगार सुमारें २५ रुपये होता फौजेंतील अधिकाऱ्याच्या नेमणुका वंशपरंपरेच्या नव्हत्या नेमणूकदार मरण पावला, म्हणजे त्याची नेमणूक व जिंदगी सरकारांत जाई मयताच्या मुलास नोकरी देणें न देणें बादशहाच्या मर्जीवर असे यामुळें लोकांस फारशी स्वतंत्रता मिळत नसे बर्नियरच्या मतें घोडेस्वारांची संख्या दोनलाख होती पैकीं चाळीस हजार नेहमीं बादशहासन्निध हजर असत पायदळाचा मान फारसा नसे त्यास बंदूक वापरण्याची भीति वाटत असावीसें दिसतें. कारण प्रत्येकाजवळ बंदूक ठेवण्यास एक लाकडी घोडा असे त्याजवर ठेवून ते आपली बंदूक सोडीत बंदूक फुटण्याचें व हात भाजून घेण्याचें भय त्यास विशेष वाटे नोकरचाकर, दुकानदार वगैरे बाजारबुणग्याचा मोठा समूह नेहमीं फौजेबरोबर असून, त्याची संख्याही फौजेंत गणली जात असे बादशाही फौजेंत लहानसा तोफखानाही असे एकंदरींत राज्याच्या महसुलाचा बराच मोठा भाग फौजेच्या खर्चाकडे जाई

राज्याच्या इतर खात्याची व्यवस्थाही फौजखात्याच्या पद्धतीसारखीच होती. निरनिराळ्या प्रांतावरील दिवाणी व लष्करी अधिकार एकाच इसमाच्या हातांत असत. त्या इसमाकडे सर्व प्रांताचा स्वतंत्र अधिकार असे एकंदर प्रांताच्या वसुलाचा पांचवा हिस्सा बादशहाकडे पाठवून बाकीच्या रकमेंत त्यानें आपला, फौजेचा व इतर खात्याचा खर्च भागवावयाचा असे एकाच ठिकाणीं राहून, त्यानीं आपलें वजन फाजील वाढवूं नये, म्हणून बादशहा त्याच्या वरचेवर बदल्या करी यामुळें प्रत्येक असामीचें लक्ष आपल्या प्रांतांतून होईल तितका पैसा काढण्याकडे असे कारण पैसा हातांत असेल तरच अडचणींच्या प्रसंगीं त्याचा निभाव होई त्यानीं एखादा अन्याय केल्यास त्याची दाद प्रत्यक्ष बादशहाशिवाय दुसऱ्या कोणाकडे मागतां येत नसे काजी म्हणून जे न्यायाधीश असत, त्याजवर प्रांताच्या अधिकाऱ्याचा सर्वस्वी ताबा असे मधून मधून बादशहाचे तपासणीकामदार येत, परंतु त्याची तोंडें बंद करणें फारसें अवघड नसे. दिल्ली आग्रा येथें व राजधानीच्या आसपासच्या ठिकाणीं अ॰॥

अन्याय फारसा लपत नसे; आणि अशा ठिकाणीं बादशहाची न्यायप्रियता इतकी प्रसिद्ध झाली होती, कीं अन्याय करण्याचें धाडस कोणास होतच नसे. औरंगजेब बादशहा लोकांच्या फिर्यादी स्वतः ऐकून घेई. इतकेंच नव्हे, तर खराखरा प्रकार बाहेर काढण्यासाठीं फिर्यादींना मनसोक्त बोलूं देई व हातवारे करूं देई; आणि त्याजवर कधींही न चिडतां त्याचें सर्व म्हणणें शांतपणें ऐकून घेई. आरोपीस कोणी अधिकारी दावूं लागला, तर तें त्यास खपत नसे. परंतु राज्याच्या दूरदूरच्या प्रांतांत अन्याय परिहार होण्याचें फारसें साधन नव्हतें. अशामुळें व्यापारी व इतर लोकांस सामर्थ्य असलें, तरी कामदारांच्या जवळ अगदीं गरिबीनें वागावें लागे. जेणेंकरून आपली खरी स्थिति बाहेर प्रगट होणार नाहीं, असे वर्तनोपाय ते धारण करीत. अकबराच्या वेळची व्यवस्था अशीच होती; पण अकबराच्या हातून बहुधा योग्य व अनुभवशीर माणसाची निवड होत असल्यामुळें लोकांस जाच होत नसे. औरंगजेब स्वतः जरी पक्षपाती, क्रूर किंवा अन्यायप्रिय नव्हता, तरी त्यानें केलेल्या सर्व नेमणुका सहेतुक असल्यामुळें व त्याच्या अत्यंत अविश्वासी स्वभावामुळें, लोकांस सचोटीनें काम करण्याची उमेद राहत नसे. तथापि औरंगजेबाची पन्नास वर्षांची कारकीर्द एकंदरीत शांततेची गेली असें म्हणण्यास चिंता नाहीं. प्रत्यक्ष बादशहानें सुरू केलेलीं युद्धें सोडिलीं, तर लोकाकडून दुसरे दंगेधोपे झाले नाहींत. बंगालच्या सरहद्दीवर चित्तगांव येथें आराकानचा राजा मोगलांचा पाडाव करण्यास नेहमी टपलेला असे. मोगलांकडे नाराज होऊन गेलेल्या सर्व लोकास त्याजकडे आश्रय मिळे. असे लोक चांचेपणाचा धंदा करून बंगालच्या उपसागरांतील मोगलांच्या व्यापारास सर्वकाळ त्रास देत. गंगानदींतून वर येऊन पांचपन्नास कोसपर्यंत लोकांस ते उपद्रव देत. हुगळी येथें असलेले पोर्तुगीझ लोक त्यांस साह्य देत असल्यामुळेंच, शांतताप्रिय शहाजहान बादशहानें पोर्तुगीझ लोकांचा समूळ उच्छेद केला. चित्तगांवनजीक समुद्रांत संदीप नांवाचें एक बेट आहे, तेथें फ्रा जॉन नांवाचा एक पाद्री राजाप्रमाणें अंमल करून वरील चांचे लोकास सर्व प्रकारची मदत करी. ह्याच चांचे लोकांच्या मदतीनें शहाजादा शुजा यास आराकानांत पळून जातां आलें. शायिस्ताखानानें या पोर्तुगीझ चांचे लोकांचा असा विलक्षण बंदोबस्त केला, कीं ते पुनरपि बादशाही मुलखास त्रास देऊं शकले नाहींत. ढाक्याच्या खालीं कांहीं मैलावर त्यांस राहण्यास खानानें जागा दिली, तीस

फिरंगीबाजार हे नाव अद्यापि चालत आहे बंगालच्या उपसागरातील चाचे लोकाचा शायिस्ताखानाने केलेला बंदोबस्त इंग्रज व्यापाऱ्याच्या फार उपयोगी पडला.

औरंगजेबाच्या राज्याचा वसूल किती होता हे बरोबर सागण्यास अनेक अडचणी आहेत लोकावर कराच ओझे हल्लीच्या इंग्रजी राज्यापेक्षां मोगलाचे वेळीं ज्यास्त होते, असे हंटरप्रभृति पाश्चात्याचे म्हणणे आहे वसुलाच्या मानाने बादशहाचा खर्चही तसाच असून, औरंगजेबाचे मरणसमयीं खजिन्यात केवळ तेरा लाख रुपये शिल्लक होते एकंदर वसुलाच्या खात्यावर बादशहाची सक्त देखरेख होती कामदाराच्या जुलमी वर्तनाबद्दल त्यास शिक्षा करून लोकास संतोष दिल्याचीं अनेक उदाहरणे औरंगजेबाच्या हातून घडलीं असून, ‘ निष्पक्षपाती परंतु निष्ठुर न्याय करणारा ’ अशी त्याची कीर्ति आहे

दाऊदखान पन्नी, शहाबुद्दीनखान ऊर्फ गाजीउद्दीन, व त्याचा पुढे प्रसिद्धीस आलेला मुलगा निजामउलमुल्क, आसदखान व त्याचा मुलगा तकरीबखान ऊर्फ झुल्फिकारखान ( संभाजी राजे यास संगमेश्वर मुक्कामी पकडणारा ), मीर जाफरखान ऊर्फ मुर्शीद कुलीखान ( बंगालचा सुभेदार, मूळचा ब्राह्मण असून मुसलमान झालेला ), सादतखान ( अयोध्येचा वजीर ), वगैरे मुसलमान सरदार औरंगजेबाच्या हाताखालीं प्रसिद्धीस आले, ते त्याच्या शिस्तीत कसलेले असून त्यानीं पुढे अनेक उलाढाली केल्या

---

# प्रकरण सत्ताविसावें



## मोगल बादशाहीचें अंतरंग-परीक्षण

### स. १५२६-१७०७

१. बादशहांची दिनचर्या. २. मोगलांचीं नाणीं.
३. फारसी इतिहास व हिंदु लोक. ४. राजघराण्याचें शिक्षण व विद्वत्ता.
५. राजा व प्रजा यांचे एकमेकांवर परिणाम.
( १ ) पेहराव. ( २ ) युद्धकला. ( ३ ) बुद्धिप्रभाव. ( ४ ) प्रवास.
( ५ ) शिल्पकला. ( ६ ) डांक. ( ७ ) दळणवळण. ( ८ ) कारागिरी.
६. गादीच्या वारसाविषयीं अनिश्चय. ७. अनियंत्रित सत्तेचीं नियंत्रणें.
८. अधिकारविभागणी. ९. संतमंडळ व तत्कृत ग्रंथसंग्रह.

**१. बादशहांची दिनचर्या.**—ह्या विषयावर प्रो. जदुनाथ सरकार ह्यांनीं मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकांत दोन सुंदर लेख लिहिले आहेत, त्यांजवरून बादशहाच्या कामाची व एकंदर मोगल राज्यव्यवस्थेची बरीच कल्पना मनांत येते. बादशहाच्या वैभवाचीं रसभरित वर्णनें वाचून कोणाची जर अशी समजूत होईल, कीं हे बादशहा केवळ चैनी व ऐषआरामांत लोळत पडणारे होते, तर ती समजूत चुकीची होय. अकबरापासून औरंगजेबापर्यंत चार बादशहांनीं दीडशें वर्षें राज्याचा उपभोग घेऊन, आपल्या राज्याचा दरारा वाढविला, आणि देशांत शांतता व भरभराट नांदू दिली. हीं कामें चैनी व आळशी लोकांकडून होणें शक्य नाहीं. सर्वांत चैनी पुरुष शहाजहान होय. त्याचा दिनक्रम खालीं दिलेल्या मासल्यावरून समजून येईल.

सूर्योदयापूर्वीं दोन तास म्हणजे सुमारें चार वाजतां उठून व मुखमार्जनादि आटोपून, शहाजहान बराच वेळ नामस्मरण करी. तो विधि आटोपल्यावर मक्केकडे तोंड करून कुराणाचा पाठ व पुढें वाड्यांतील मशिदींत जाऊन, दिवसाची पहिली प्रार्थना करी. ह्या कृत्यांत सुमारें दोनअडीच तास जात. नंतर

पावणेसाताच्या सुमारास लोकाना दर्शन देण्यासाठीं तो झरोक्यात येऊन बसे त्या झरोक्याचे वर्णन मागे आलेच आहे यमुना नदीच्या वर आग्रा व दिल्ली येथील किल्ल्याच्या तटात बादशहास बसण्यासाठीं सज्जा-सारखी बाहेर आलेली एक जागा तयार केलेली होती म्हणजे बादशहा आत किल्ल्याच्या बंदोबस्तात राहून बाहेरच्या लोकास आपले दर्शन देई दररोज सकाळीं बादशहाच्या दर्शनासाठीं हजारो लोक खालीं नदीच्या वाळवंटात जमा होत सूर्योदयानंतर दोन घटिकानीं बादशहाची स्वारी त्या झरोक्यात येऊन बसे लोक त्यास खालून वंदन करीत, आणि तो त्याचा स्वीकार करी कोणास बादशहाकडे काहीं अर्ज करणे असल्यास तो ह्याच प्रसंगीं रुजू करावयाचा असे अर्जासाठीं वरून दोरी सोडण्यात येई तिला अर्ज बांधिला, म्हणजे तो वर ओढून घेत, आणि बादशहास वाचून दाखवीत नंतर बादशहा त्याजवर योग्य तो निकाल देई अर्ध्या तासाने सर्व लोक बाजूस करून, खालील वाळवंटात हत्तीच्या टकरा चालू होत हत्तींच्या टकरा फक्त बादशहाच्याच हुकमाने होत दुसऱ्या कोणास त्या करण्याचा अखत्यार नसे शहाजहानास त्या टकराचा मोठा शोक होता दररोज पाच चार जोड्याच्या टकरा होत आठ वाजण्याचे जरा अगोदर स्वारी दरबारात येऊन बसे त्या दरबारास दिवाणी-आम, म्हणजे सर्व लोकाचा मोठा दरबार असे नाव होते अकबर जहागीरच्या वेळेस हे दरबार मोठ्या तंबूंत भरत असत स १६२८ त शहाजहानने तंबूच्याच जागीं एक मोठा लाकडी मडप बांधिला आणि १६३८ त हल्लींचा दगडी दिवाणी-आम त्याने बांधिला त्यास चाळीस भव्य खांब असून, तीन बाजू मोकळ्या आहेत चवथ्या बाजूस भिंतीच्या मध्यभागीं जमिनीपासून बरीच उंच अशी बादशहाच्या सिंहासनाची आरसपानान बांधलेली जागा आहे तेथे येण्याचा रस्ता पाठीमागून जनानखान्याच्या बाजूने आहे पुढून वर जाण्यास रस्ता नाहीं त्या दरबारात सर्व लोक अगोदरच आपापल्या जागीं बसलेले असत बादशहा मागाहून येई केव्हा केव्हा राजपुत्र बरोबर येत ते कधीं त्याज-पाशी बसत, किंवा कधीं खालीं उभे राहत बादशहाच्या डाव्या उजव्या बाजूंस त्याच्या खास पाहऱ्याचे लोक उभे असत हा दिवाणखाना २०१ फूट लांब व ६७ फूट रुंद आहे त्याच्या तीनही बाजूंस चांदीचा कठडा असून प्रत्येकीं एक प्रवेशद्वार होते त्या दालनात सर्व मंडळींचा प्रवेश

होईनासा झाला, म्हणून चांदीच्या कठड्याबाहेरची जागा तयार करून तिच्या बाहेर दुसरा लाकडी कठडा ठेवण्यांत आला. ह्या कठड्यावर सुंदर नकशीकाम केलेलें होतें. ह्या बाहेरच्या जागेत हलक्या प्रतीचे नोकर, आंतील दरबारांत बसलेल्या सरदारांचा लवाजमा, पाहऱ्यावरचे लोक, भालदार, चोपदार वगैरे मंडळी उभी असत. बादशहापुढें लोकांनी बसण्याचा परिपाठ नव्हता. सिंहासनास लागून खालीं वजिराची जागा होती. कठड्यांतील प्रवेशद्वारावर लोकांस ओळखणाऱ्या दक्ष प्रवेशकांचा पहारा असून, योग्य परवाना असल्याशिवाय ते कोणासही आंत सोडीत नसत. नवीन इसम दरबारांत येणें झाल्यास प्रथम तसा परवाना मिळवून, नंतर कोणी तरी जुन्या सरदाराने त्यास आपल्याबरोबर आणावें, असा नियम होता. शिवाजी औरंगजेबाच्या दरबारीं गेला, तेव्हां त्याजबद्दल प्रथम परवाना घेऊन, नंतर रामसिंगाने त्यास आपल्याबरोबर दरबारांत नेलें. लष्करांतले मनसबदार, प्रांतांतील कामदार, नवीन नेमणुका झालेले लोक, इत्यादिकांचे अर्ज वाचणें व त्यांजबद्दलच्या तर्जावजी करून देणें हीं कामें ह्या मोठ्या दरबारात चालत. मुख्य बक्षी म्हणून एक अधिकारी असे, तो हीं कामें बादशहास समजावी व हुकूम होई तो ज्याचा त्यास कळवी. प्रत्येक खात्याचे मुख्य अंमलदार दरबारात हजर असत. ते निरनिराळ्या जागांस नवीन इसमांची शिफारस करीत. त्याच्या नेमणुका कायम झाल्यास त्यांस ह्या दरबारात पोषाख मिळून, त्याची कामावर रवानगी होई. राजपुत्र, प्रांतांतले अधिकारी व सरकारी बातमीदार ह्यांजकडून आलेलीं पत्रें ह्या दरबारांत बादशहास वाचून दाखवीत. पैकी कांहीं महत्त्वाचीं पत्रें बादशहा स्वतः वाची, व कांहींचा फक्त मतलब त्याच्या कानावर घातला जात असे. नंतर प्रांतांतून न्यायाचीं अपिलें आलीं असतील, त्याची सुनावणी 'सदर' म्हणून अधिकारी असे, तो करी. तसेंच विद्यार्थी, साधु, फकीर इत्यादिकांस दानधर्म किंवा नेमणुका करून देण्याचे काम ह्या दरबारांत चाले. इकडे खास पागेचे घोडे व हत्ती वगैरे जनावरें बादशहाच्या दृष्टीस पडावीं म्हणून त्यास त्याच्या समोरून फिरवीत नेण्याचा क्रम चालूच असे. हीं सर्व कामें झाल्यावर सुमारें दोन तासांनी हा दरबार संपे.

सुमारें दहा वाजण्याच्या थोड्या अगोदर 'दिवाणी-खास'च्या जागेंत खास सल्लागारांचे मंडळ भरे, तेथें बादशहा जाई. ह्यासच पूर्वी अकबराच्या

वर्णनांत 'घुशालखाना' असे नाव होतें कारण त्या वेळीं दिवाणी-खासच्या जागेतच स्नानगृह होतें दिवाणी-खासमध्यें आल्यावर तेथें खास-मंडळीच्या भेटी होत सल्लामसलत चाले महत्त्वाची पत्रें व जबाब स्वहस्तानें बादशहा लिही कित्येकांचे जबाब व निकाल बादशहा तोंडी सांगे, त्याप्रमाणें ते लिहून काढिल्यावर बादशहास वाचून दाखविण्यांत येत ह्याप्रमाणे सर्व कागद तयार झाल्यावर जनानखान्यांतील पहाऱ्यांत मुख्य शिक्का असे, तो आणवून सर्व कागदांवर सह्या शिक्के होत नवीन इमारतीचे नकाशे, कारागिरीची कामें वगैरे तपासून पाहिल्यावर, बादशहा सांगेल ते फेरफार करून, जवळ वजीर असे, तो त्या त्या प्रकारचे शेरे करून, खर्चाची मंजुरी घेऊन देई शहाजहान बादशहास शिल्पकामाचा मोठा शोक असल्यामुळें, ह्या कामांत त्याचा पुष्कळच वेळ जाई येथें सुद्धा कित्येक शिकारीचीं वगैरे जनावरें बादशहास दाखविण्यांत येत

ह्याप्रमाणें दिवाणी-खासमध्यें सुमारें दोन तास राज्याच्या खास मसलतींचें काम चालल्यावर, 'शहाबुर्ज' म्हणून वाड्याच्या उंच भागीं एक एकांत जागा केलेली होती तेथें अत्यंत गुप्त कारस्थानासाठीं बादशहा जाई ज्या इसमास तो वर बोलावी तेवढेच वर जावयाचे असत बाकी नोकर वगैरे सुद्धा सर्व खालींच दारापाशीं बसत गुप्त पत्रव्यवहार व इतर गोष्टींचा खल ह्या ठिकाणीं होत असे. जरूरीप्रमाणें वजीर बरोबर असे

ह्याप्रमाणें माध्यान्हपावेतों बादशहाचा सर्व वेळ कामांत जाई नंतर लगेच जनानखान्यांत जाऊन, दुपारची प्रार्थना म्हटल्यावर, भोजन करून, बादशहा तासभर पडून विश्रांति घेई ह्या विश्रांतीच्या वेळांत सुद्धा बहुधा जनानखान्या-संबंधींच कामें चालत गरीब विधवा, मुलें, विद्वान् व आश्रित मंडळींच्या गरीब मुली, इत्यादिकांची तजवीज लावण्यासाठीं त्यांचे अर्ज वाचून, हुकूम देण्यांत येत सतिउन्निसा म्हणून शहाजहानच्या जनानखान्यावर एक बाई नोकर होती, तिनें प्रकरणें बादशहास समजावण्याचीं असत जवळ बसून, राणी आपला अभिप्राय त्याजवर देई अशा प्रकारें जनानखान्यामार्फत पुष्कळ काम होत असे तीन वाजतां तिसरे प्रहरची प्रार्थना आटपून, जरूर असेल तर बादशहा पुनरपि दिवाणी-आममध्यें येई तेथें थोड्या वेळांत जरूरीचें काम असेल तें उरकून, स्वारी लगेच दिवाणी-खासमध्यें जाई तेथें उत्तम प्रकारची

रोपनाई केलेली असे. येथील वेळ बहुतेक गायन, वाद्य वगैरे करमणुकींत व आनंदांत जाई. स्वतः शहाजहान चांगला गाणारा असून त्यास गाण्याचा शौक होता. आठ वाजतां पुनरपि जरूरीच्या मुख्य कामासाठीं बादशहा शहाबुर्जावर जाई. तेथें वजीर, बक्षी वगैरे जरूर ते अधिकारी त्याजबरोबर असत. साडेआठ वाजतां बादशहा परत जनानखान्यांत जाई: आणि भोजनानंतर तेथें केव्हां वाचन व केव्हां गायन चालू असे. बादशहाच्या बिछान्याजवळ पडद्यामागें वाचक मंडळी बसून, झोप लागेपर्यंत त्यास निरनिराळीं पुस्तकें वाचून दाखवीत. तयमूरचें चरित्र व बाबरचें आत्मचरित्र हीं शहाजहानचीं आवडतीं पुस्तकें असत. दहा साडेदहा वाजतां बादशहा झोपीं जाई. तो चार वाजेपर्यंत सुमारें सहा तास निजत असे.

हा सामान्य कार्यक्रम झाला. शुक्रवारीं सुट्टी असून दरबार वगैरे सर्व बंद असत. बुधवारीं नेहेमींचा कार्यक्रम न चालतां तो दिवस फक्त न्यायाच्या अपिलांकरितां नेमिलेला असे. दर बुधवारीं आठ वाजतां बादशहा झरोक्यांतून एकदम दिवाणी-खासमध्यें येई. तेथें न्यायाधीशांशिवाय इतरांस येण्याची परवानगी नसे. निरनिराळ्या ठिकाणाहून आलेले अर्जदार व गुन्हेगार बादशहापुढें उभे करून त्याजबद्दलचा शेवटचा निकाल देण्यांत येई. केव्हां निकाल होई: केव्हां फेरतपासासाठीं पुनः तीं कामें परत प्रांतांत जात.

दिल्ली, आग्रा वगैरे राजधानींतला हा सामान्य क्रम असे. पण पुष्कळदां स्वारी फिरतीवर असे, तेव्हां हा क्रम बदले. सायंकाळीं बादशहा घोड्यावर किंवा हत्तीवर बसून शहरांत फिरावयास निघे: केव्हां यमुनानदीवर होडींत बसून सहल करी, किंवा शिकारीस जाई. सर्व मोगल बादशहा मोठे तरतरीत व उद्योगी होते. त्यास एकाच ठिकाणीं स्वस्थ बसणें व नुसत्या चैनींत वेळ घालविणें मुळींच आवडत नसे. सर्वांत अतिरंगेल म्हटला, तर शहाजहान. त्याचीच वरील रीत जर इतकी उद्योगपूर्ण आहे, तर इतरांबद्दल ज्यास्त काय सांगावें! बादशहा अलौकिक बुद्धिमान व उद्योगी असल्याशिवाय एवढ्या मोठ्या राज्यांत, विसाव्या शतकांतील साधनांच्या अभावीं, शांतता व बंदोबस्त राहिला नसता हें उघड आहे.

औरंगजेबाची दिनचर्या बऱ्याच अंशीं वरच्यासारखी होती. मात्र त्यांतील गाण्यावजावण्याचा व चैनीचा भाग वगळून त्या ठिकाणीं धार्मिक व ईश-

स्तवनाचा भाग वाढविलेला होता सकाळीं पांच वाजतां उठून, तो वाड्यातील मशिदींत जाऊन, ईशचिंतन व प्रार्थना करी साडेसात वाजतां झरोक्यांत येऊन बसे नंतर दिवाणी-आम व दिवाणी-खासमधील कामें करून, बारा वाजतां जनानखान्यांत जाई भोजनोत्तर थोडी विश्रांति झाल्यावर, औरंगबाचा पुढचा सर्व वेळ धर्मशास्त्राच्या अध्ययनांत जाई सायंकाळीं पुन राज्याचीं कामें चालत औरंगजेबानें गाणेंबजावणें तर सर्व मना केलेलें होतें, म्हणून ईशस्तवन व राज्याचें काम ह्यांतच त्याचा सर्व वेळ खर्च होई गुरुवारीं अर्धा दिवस ज्यास्त सुट्टी औरंगजेब देत असे पण औरंगजेबाची एकंदर कारकिर्द लढण्यांत व छावणींत खर्च होऊन निरनिराळ्या युद्धांच्या व्यवस्थेत त्याचा बहुतेक वेळ निघून गेला

२. **मोगलांचीं नाणीं.**--मुसलमानांचा मूर्तिपूजेविरुद्ध मोठा कटाक्ष आहे मेलेल्यांचीं स्मारकें किंवा श्राद्ध करणें व त्यांच्या कबरी बांधणें या गोष्टी सर्वथा वर्ज्य असून प्रत्यक्ष पैगंबराची सुद्धा कबर नाहीं. तसेंच मद्यपानासारख्या अनेक बाबतींत कुराणांत सक्त आज्ञा आहेत पण अनेक मुसलमान बादशहांनीं कुराणाच्या आज्ञाविरुद्ध आचरण केलेलें आहे त्यांनीं परधर्मी स्त्रियांशीं लग्नें केलीं, मद्यपानास उघड थारा दिला, अनेक व्यक्तींच्या तसबिरी व पुतळे करून त्यांनीं आपले वाडे व घर शृंगारिले ख्रिस्ती धर्मांतील कथानकांचीं चित्रेंहीं त्यांनीं आपल्या शृंगारांत घेतलीं ताबूत सुद्धा एक प्रकारची मूर्तिपूजाच होय. ह्याच प्रकार त्यांच्या नाण्यांतही घडून आला आहे अकबराचा तर मुसलमानी धर्मावरील विश्वास उडालाच होता, तेव्हां त्यानें नाण्यावर नानाप्रकारच्या प्रतिमा घातल्या ह्यांत नवल नाहीं ससाणा, बदक, तिरंदाज वगैरेंचीं चित्रें त्याच्या नाण्यावर आटळतात जहांगीरनें बापावर ताण केली त्यानें आपला स्वत:चा मुखवटा नाण्यावर घातला. नाण्यावर त्याच्या हातांत केव्हां पुस्तक, केव्हां दारूचा पेला वगैरे आहे कित्येक नाण्यावर बादशहा हातांत दारूचा प्याला घेऊन मांडी घालून बसल्याचें चित्र आहे, आणि दुसऱ्या बाजूस वर सूर्य व खालीं सिंह आहे कदाचित हीं नाणीं व्यापाराच्या देवघेवींकरितां नसून फक्त बक्षीस किंवा नजर देण्याकरितां पाडिलेलीं असतील. बारा राशी खोदलेलीं नाणींही जहांगीरनें पाडिलीं होतीं हीं राशींचीं नाणीं गोळा करण्याचा पुष्कळास मोठा छंद होता. तीं जवळ बाळगिलीं असतां ग्रहांची पीडा

होत नाहीं, असा पुष्कळांचा समज असे. पण त्यांत बनावट नाण्यांची भेसळ पुष्कळ असल्यामुळे खरी कोणती व खोटी कोणती हें ठरविणें शक्य नाहीं.

जहांगीर बादशहाच्या वेळेपासून 'निसार' नावाचीं काहीं नाणीं मोगल बादशहानीं पाडिलेली होतीं. हीं नाणीं ते कित्येक समारंभात गरिबास वाटीत असत. अनेक प्रसंगीं लोकांची गर्दी झाली असता त्यांजमध्ये अशीं नाणीं उधळण्याचा प्रघात होता. कित्येक नाणीं आकाराने फारच मोठी होतीं. औरंगजेबास पैसे साठवून ठेवण्याचा मोठा नाद होता, आणि साठविण्यासाठीं म्हणून मुद्दाम मोठी अवाढव्य नाणी तयार करून तीं त्याने दिल्ली येथील राजवाड्याच्या तळघरांत साठवून ठेविली होतीं. हिंदुस्थानात कवड्या, बदाम वगैरे अनेक पदार्थ निरनिराळ्या ठिकाणीं नाण्यांच्या ऐवजीं चालत असल्यामुळे, मोगलाच्या वेळेस तांब्याची नाणी फार नव्हतीं. चांदीसोन्याचीं मात्र पुष्कळ होतीं.

ईस्ट इं. कंपनीची नाणीं हिंदुस्थानात राजरोसपणे स. १८३५ त सुरू झालीं, तरी त्यापूर्वी कंपनीचे व्यापारी निरनिराळ्या ठिकाणीं आपली नाणी पाडीत असत. मुंबई बेट इंग्रजांच्या ताब्यात आल्यावर त्यांनी येथें स. १६७१ त दुसऱ्या चार्लस् राजाच्या परवानगीने आपली नाणी पाडण्यास सुरुवात केली. ही गोष्ट औरंगजेबास खपली नाहीं. परंतु ही फक्त आपल्या मुंबईच्या टापूपुरतीच आहेत असे सांगून, इंग्रजांनीं त्याचे समाधान केले. पुढे मोगलांच्या नाण्यांसारखीं नाणीं इंग्रज आपल्या टांकसाळीत पाडूं लागले, त्याजबद्दल पुष्कळ तक्रारी झाल्या. इंग्रजांनी आपले चांदीसोने मोगलांच्या टांकसाळीत पाठवून तेथे त्यांचीं नाणी पाडून घ्यावी, अशाबद्दल मोगल अधिकाऱ्यांनीं पुष्कळ वेळा इंग्रजास सांगितले, पण इंग्रजानी आपल्या टांकसाळींत नाणीं पाडण्याचे काम बंद केले नाहीं. इंग्रज लोक मोगल नाण्यांची हुबेहूब नक्कल करीत असल्यामुळे इंग्रजांनी पाडलेलीं नाणीं कोणतीं व मोगलांचीं कोणती हें कळण्यास आज मार्ग नाहीं. मात्र इंग्रजांची नक्कल वजनानें व किंमतीनें मोगल नाण्यांशीं तंतोतंत मिळती असल्यामुळे, इंग्रजाची नाणीं सर्व ठिकाणीं निर्वेध चालत. हा घोटाळा बंद करता येईना. तेव्हा स. १७१७ त फर्रुखसेयर बादशहानें इंग्रजांस मुंबईत मोगलांचीं नाणीं पाडण्याचें उघड फर्मान दिलें. हा नाण्यांचा इतिहास मोगल बादशाहीच्या र्‍हासाचा चांगला निदर्शक आहे. स. १७५९ त इंग्रजांनी कल-

कत्त्यास आपली टाकसाळ घातली. स १७६५ त इंग्रजास बंगालची दिवाणी मिळाल्यापासून त्याचा हा नाण्याचा उद्योग राजरोस सुरू झाला तथापि पुढे काही दिवस बंगालचा नबाब व इंग्रज अशा दोघांची नाणी सुरू होती. स १७९३ त इंग्रजांनी नबाबाची व बादशहाची नाणी बंद करून आपला रुपया चालू केला पण ही व्यवस्था स १८३५ त कायमची अमलात आली ( Lane Poole's coins )

**३ फारशी इतिहास व हिंदु लोक**—इतिहास लिहून ठेवण्याची खरी आवड मुसलमानासच होती फारशी भाषेत अशा ग्रंथांचा भरणा अतिशय मोठा आहे इजिप्टपासून चीनपर्यंतच्या सर्व देशात जेवढे म्हणून पराक्रमी राजे व पुरुष झाले, त्या सर्वांची चरित्र उपलब्ध आहेत मोगल बादशहाच्या अमदानीत तर, अशा ग्रंथास जणू काय ऊतच आला होता. त्यापैकी बरेचसे ग्रंथ फारशींत छापलेले आहेत बहुतेक अजून हस्तलिखित स्थितींत आहेत. फार थोड्यांची इंग्रजीत भाषांतरं झाली आहेत एल्यटने कित्येक ग्रंथांची इंग्रजींत भाषांतरे करून, त्यांतील वचने घेऊन आठ पुस्तकांचा एक मोठा संच छापलेला आहे फेरिस्ताचा इतिहास, अबुल्फज्लचे ग्रंथ, पादशहानामा, आलमगीरनामा वगैरे दुसरे अनेक ग्रंथ महत्त्वाचे असन. कित्येक पुरुषांची आत्मचरित्रे मोठीं मोलवान आहेत बाबर व जहांगीरची आत्मचरित्रे युनिव्हर्सिटीच्या परीक्षास ठेविलेली असतात अलीकडेस मराठ्यांच्या इतिहासाचे कित्येक अस्सल कागदपत्र प्रसिद्ध होत आहेत परंतु फारशी इतिहासाच्या तोडीचे मराठ्यांचे इतिहास त्यांत फारसे आढळत नाहींत निर्विकार-दृष्टीनं बोलावयाचे, म्हणजे इतिहास लिहून ठेवण्याची बुद्धि आम्हा हिंदूंत क्वचित्‌च दिसून येते इतिहास म्हणजे ऐहिक पराक्रमाचे व घडामोडींचे चित्र होय ज्या राष्ट्रास स्वत्वाची व पराक्रमाची घमेंड वाटत नाहीं, त्यास स्वतःचा इतिहास तरी कोठून असणार ! मोगल बादशहाच्या वेळेस मुसलमानाचे जीवन जागृत होते दररोजच्या घडामोडी लिहून ठेवण्याकरिता सरकातून पगारदार नोकर ठेविलेले असत अशा सरकारी लेखात जरी सर्वच खरा प्रकार दिला जात नसे, तरी एकंदर मोठमोठ्या घडामोडी व तत्संबंधीं सरकारची बाजू समजण्यास त्या लेखाचा अत्यंत उपयोग होतो दररोज सर्व प्रांतांतून हजारो हकीकतींची पत्रें ( वाकिया ) बादशहास येत, आणि त्यावर बादशहाचे जबाब

जात व हुकूम सुटत, ते सर्व जमेस धरून सरकारी इतिहास लिहिला जाई. अर्थात् त्यांत बादशहाची बरीचशी स्तुति असून विरुद्ध बाजू गाळलेली असे. अबुल्फजल्चे ग्रंथ जरी असे स्तुतिप्रचुर आहेत, तरी त्याच्या थोर विद्वत्तेची व मार्मिक टीकेची खूण त्यात जागोजागी दिसून येते. जहांगीरचे चरित्र अशा बाबतींत विचित्र आहे. जहांगीरनें छपवाछपवी मुळींच केलेली नाही. त्याला लाज व भीड वाटतच नसे. म्हणून जसा प्रकार घडला, तसा ह्यानें अक्षरशः नमूद केला आहे. त्याचें आत्मवृत्त त्यानें स्वतः सांगून लेखकांनीं लिहिलेलें दिसते. पहिल्या १९ वर्षांची हकीकत त्याने स्वतः तपासलेली आहे: आणि त्या पुढच्या तीन वर्षांची हकीकत इतर लेखकांनीं पुरी केली आहे शहाजहानचा इतिहासही अशाच प्रकारें संपूर्ण आहे, त्यास शहाजहाननामा, किंवा पादशहानामा असे म्हणतात. औरंगजेबाच्या पहिल्या दहा वर्षांचा इतिहास वरच्याप्रमाणे लिहिला गेला. त्यापुढें त्यानें सरकारी इतिहास लिहिण्याचें काम बंद ठेविलें. औरंगजेब मरण पावल्यावर त्याच्या कारकिर्दीतील ठळक ठळक गोष्टींचें एक पुस्तक लिहिण्यांत आलें तसेंच खाफीखान हा नेहमीं औरंगजेबाबरोबर होता, आणि त्यानें त्या बादशहाच्या कारकिर्दीचा सुंदर इतिहास लिहिला· पण खाफीखान शिया होता, म्हणून औरंगजेब मरण पावल्यावर, त्यानें आपलें पुस्तक प्रसिद्ध केलें. साराश, बाबरपासून औरंगजेबपर्यंतच्या दोनशें वर्षांच्या मोंगल बादशाहींचा इतिहास पूर्णपणें भरवसेलायक, व घडलेल्या गोष्टी प्रत्यक्ष पाहणारानीं लिहिलेला उपलब्ध आहे. औरंगजेबानें जरी पूर्वींची तवारीख पुढें चालविली नाहीं, तरी त्याचीं स्वतःचीं सुमारें तीनहजार पत्रें उपलब्ध आहेत. राज्यकारभाराच्या कामाचीं व्यवस्थित पत्रें अशीं औरंगजेबानेच लिहिलीं. त्याच्या पूर्वींचे बादशहा फक्त कारणपरत्वें दुसऱ्या दरबारास सलामालकीचीं वगैरे पत्रें लिहीत. औरंगजेबाच्या प्रत्येक पत्राच्या तीन प्रति उपस्थित आहेत: एक अस्सल पत्र, दुसरी पाठविलेल्या ठिकाणी ठेवलेली नक्कल, व तिसरी पैवस्तीची नक्कल. ह्यांशिवाय औरंगजेबाच्या कारकिर्दीचे हिंदूंनीं लिहिलेले दोन इतिहास फारशी भाषेत उपलब्ध आहेत, एक पट्टणचा ईश्वरदास नागर ह्यानें लिहिलेला, व दुसरा भीमसेन बऱ्हाणपुरी ह्यानें लिहिलेला. औरंगजेबाच्या नंतर बहादूरशहा व महंमदशहा ह्यांनीं तवारिखा चालू ठेविल्या होत्या, परंतु प्रांतिक अंमलदार स्वतंत्र होऊन, नियमितपणें आपले वृत्तान्त पाठवीनातसे झाल्या-

मुळे, त्या तवारिखाचा इतिहासाचे कामीं फारसा उपयोग होत नाहीं. मोगल बादशहाविषयीं तपशीलवार माहिती किती विपुल मिळते, हे प्रो० सरकार ह्याच्या औरंगजेबावरील लेखानीं चांगल व्यक्त होते. ब्लॉक्मन म्हणतो.—' फारशी भाषेत मुसलमानाचे पुष्कळ इतिहास आहेत, ही गोष्ट खरी परंतु त्यात तत्कालीन लोकस्थितीसंबंधाने माहिती बहुधा मिळत नाहीं जो तपशील आज महत्त्वाचा असा आपणास वाटतो, तो त्या ग्रंथकाराना निरर्थक वाटत असेल हिंदु लोक इतिहासलेखक नाहींत खरे. तरी प्राचीन पुतळे, लेणीं, स्तंभ इत्यादिकावरून, व नाट्यादि ग्रंथावरून प्राचीन हिंदूंची बरीच माहिती मिळते परंतु मुसलमानात नाटक किंवा खोदकाम नसल्यामुळे, त्याच्या वेळच्या समाजस्थितीची माहिती दुष्प्राप्य झाली आहे विशेषतः मुसलमानीं अंमलाखालीं हिंदूंची स्थिति कशी होती, हे कळण्यास साधन नाहीं मुसलमानाकडून हिंदु लोक जिंकिले गेले, पण जिंकलेल्याची संख्या अतिशय मोठी असल्यामुळे, त्याचा नि पात होऊं शकला नाहीं मुसलमानाचे काही योद्धे व विद्वान् लोक एवढेच फार तर बाहेरून हिंदुस्थानात आले परंतु हरएक प्रकारचे कसब, शेती व नोकरी हिंदूंच्याच हातात राहिली वसूल गोळा करण्याचे काम सर्वस्वी हिंदूंकडे होते मुसलमानाना मोठमोठ्या जहागिरी देण्यात आल्या, पण त्या जहागिरींची व्यवस्था हिंदूंशिवाय होणे शक्य नव्हते हिंदुस्थानात वाटलेले मुसलमान बहुधा हिंदूंचेच आचारविचार पाळीत फिरोज मुघलखने बाटविलेले लोक शहाजहानच्या वेळेस, हिंदूंच्या सतीप्रमाणे, विधवास नवऱ्याबरोबर जिवंत पुरीत जिझिया कर वसूल करण्यास फार मारामार पडे. त्यासाठीं मुसलमानाना दरखेपेस नवीन युक्त्या काढाव्या लागत

' साराश हिंदूंशिवाय मुसलमानांचे पावलोपावली अडत असे, तरी त्याना असूने दिवस काढणे मोठें कठीण काम झालें होते अकबराच्यापूर्वी मोठ्या नोकऱ्या त्यास मुळींच मिळत नसत भर मुलतानांचा दिवाण हिम् एवढा एकच पुरुष अकबराच्यापूर्वी मोठ्या योग्यतेस चढलेला दिसतो हिंदूंना फारशी भाषा प्रथम अवगत नव्हती, हे आणखी एक त्याच्या कमीपणाचे कारण होते धर्माची उणीव भरून काढण्याजोगी नव्हती, परंतु भाषेची उणीव हिंदूंनी लवकरच भरून काढिली परक्याची भाषा उच्चारणे आरंभीं त्याना पाप वाटे सरकारी हिशेबाचें कच्चे काम स्थानिक भाषातच चाले मात्र दर-

बारांतून चालणारा पत्रव्यवहार फारशींत करीत. परंतु मुसलमानांचें वास्तव्य हिदुस्थानांत दोनशें वर्षे झाल्यावर, फारशी भाषेविषयीं हिंदूंचा दुराग्रह नाहींसा होत गेला. ते फारशी भाषा शिकूं लागले. हिंदूंनीं सन १५०० त लिहिलेलीं फारशी पुस्तकें उपलब्ध आहेत. हळूहळू हिंदु लोक, त्या भाषेंत इतके प्रवीण होत गेले, कीं मुसलमानास ती भाषा शिकविण्यास व त्यांचे अनेक ग्रंथ लिहिण्यास हिदूंचाच उपयोग होऊं लागला. अकबराच्या आरंभीं सांबर येथील एक राजा फारशी कवि म्हणून नावाजलेला होता. मनोहर नावाचा दुसरा एक उत्कृष्ट फारशी कवि झाला, त्यास मीर्झा मनोहर असें म्हणत. तो बाटलेला नव्हता. ' राज्याचे हिशेब फारशी भाषेत ठेवावे, ' हा तोडरमल्लानें काढिलेला हुकूम एकदम अंमलात आला, ह्यावरून लोकांस तो फेरफार जाचक झाला, असे वाटत नाहीं. आपल्या जातभाईंनीं राज्यकर्त्यांच्या बरोबरीला यावें, भाषेची अडचण असेल, तर ती त्यांनीं मेहेनत करून दूर करावी, राज्यकर्त्यांना आपल्या तंत्राने वागवावयाचें असल्यास, त्यांची भाषा आपण बिनतक्रार शिकली पाहिजे, हे समजून त्यानें तो हुकूम दिला. हिंदु लोक आपल्या बरोबरीला आले, ही गोष्ट मुसलमानास आवडली नाहीं. तोडरमल्लाबद्दल त्यानीं केवढा गहजब केला, हें आपणांस विदित आहेच. चितोडगडावर जेव्हां मानसिंगाची रवानगी झाली, तेव्हा पुष्कळ मुसलमान सरदारांनीं मानसिंगाच्या हाताखालीं नोकरी करण्याचें नाकारिले. फारशी भाषेत हिंदु लोक तरबेज झाल्याबरोबर दरबारचा सगळा पत्रव्यवहार त्यांच्या हातीं आला. शहाजहानचा वजीर सादुल्लाखान मरण पावल्यावर रायरघुनाथ व चंद्रभान हे दोघे पत्रव्यवहाराचें काम पाहूं लागले. त्याच्या इतका पत्र लिहिण्यांत हुषार दुसरा कोणी नव्हता. हिंदूंनीं फारशीची व्याकरणें, कोश व इतर मार्मिक विवेचनें लिहिलीं.

सरकारी नोकरींत हिंदुमुसलमानांचें प्रमाण किती होते, हें समजण्यास मार्ग नाहीं. सन १५९० त पांचशेंपासून पंचहजारींपर्यंतच्या २५२ मनसबांपैकीं ३१ हिंदूंना मिळाल्या होत्या. पुढे पन्नास वर्षांनीं शहाजहानच्या कारकिर्दींत पांचहजारांवरील बारा मनसबदारांत एकही हिंदु नव्हता. परंतु पांचशेंपासून पांचहजारापर्यंतच्या ६०९ मनसबदारांत ११० हिंदु होते. ह्यावरून फार तर इतकेंच म्हणतां येईल, कीं पुढे पुढे हिंदूंस मोठ्या जागा जरी मिळेनाशा झाल्या, तरी खालच्या जागांत त्यांचे प्रमाण वाढलें. जहांगीरच्या वेळेस सर्व मोठमोठ्या जागा

नूरजहानच्या नातेवाइकानी पटकाविल्या होत्या शहाजहानच्या मनसबदारात जसवंतसिह, जयसिह व राणा जगत्सिह ह्यांचे नंबर अनुक्रमे सतरा, एकोणीस व चोवीस असे होते औरंगजेबाला हिदूंचा हा भरणा मुळीच आवडला नाहीं त्याने सर्व हिदु नोकरीतून कमी करावे म्हणून हुकूम केला मात्र तो सर्वस्वी अंमलात येणे शक्य नव्हते बादशहानी हिदु स्त्रियाशी लग्ने केल्यामुळेही हिदूंचे महत्त्व बरेच वाढले जहागीर, खुस्रू, शहाजहान, बहादूरशहा, कामबक्ष, अजीमुश्शान, दुसरा आलमगीर ह्यांच्या आया हिदु होत्या मुसलमानाच्या मुली मात्र हिदूंकडे आल्या नाहींत, ह्याचे कारण रजपुतानी त्या केल्या नाहींत इतकेच नव्हे, तर आपल्या मुली हिदूंना देणे मुसलमानानाही आवडले नाहीं (Blochmann, Condition of the Hindus under Mogals, Cal Rev. 1871.)

४ **राजघराण्याचें शिक्षण व विद्वत्ता**—मोगल बादशहास विद्या-कलाचा मोठा नाद व अभिमान होता हे तर सुप्रसिद्ध आहे त्याच्या पदरी अनेक विद्वान् मौलवी, पंडित, कवी, हकीम, व तत्त्वज्ञानी पुरुष होऊन गेले, त्यांची हकीकत वर ठिकठिकाणीं आलाच आहे बाबर बादशहा स्वत मोठा विद्वान् होता त्यास आरबी, फारशी, तुर्की व हिंदी ह्या भाषा चागल्या अवगत होत्या, 'वाकियाती बाबरी' नावाचे त्याचे आत्मचरित्र व कित्येक कविता सुप्रसिद्ध आहेत स्वत लिहिलेल्या कुराणाची एक प्रत त्याने मक्केस पाठविली. शिवाय कायदे, साहित्य, इत्यादि विषयावर त्याचे ग्रंथ आहेत बादशहा हुमायून गणित व इतर शास्त्रात पारंगत होता त्यास ज्योतिषाचा मोठा नाद असे फारशी व तुर्की भाषा त्यास चागल्या येत होत्या तो कवितेचा भोक्ता असून, अनेक कवीस त्याचा आश्रय होता हुमायूनचा भाऊ कामरान ह्याची गणना थोर कवींत होत आहे सर्वांत थोर बादशहा अकबर हा मात्र निरक्षर राहिला हे आश्चर्य आहे हुमायूनने चार निरनिराळे शिक्षक त्याजकरिता नेमिले तथापि काहीं एक न शिकता, त्याचे बाळपण खेळात गेले तो बहुश्रुत होता पण अखेरपर्यंत निर्विद्यच राहिला

जहागीर शिकलेला असून मोठा रसिक होता त्यास तुर्की भाषाही चागली येत होती त्याचा आत्मवृत्तान्त, बराचसा तोंडाने सागून दुसऱ्यांनी लिहिलेला, व काहीं त्याने स्वत लिहिलेला आहे शहाजहान शिकलेला होता कवींस व साधूंस त्याचा मोठा आश्रय असे कित्येक प्रसंगीं त्याचे हुकूम स्वत. लिहिलेले

असत कामदारांकडून आलेलीं पत्रें व हकीकत तो स्वतः वाची. जवळ वाचक मंडळी ठेवून त्याजकडून तो अनेक ग्रंथ वाचवून ऐकत असे. जहांगीरच्या पेक्षां शहाजहानचें हस्ताक्षर सुंदर होतें. शहाजहानचा मुलगा दारा हा चांगलाच विद्वान् होता. हिंदूंच्या तत्त्वज्ञानाचा त्यानें उत्कृष्ट अभ्यास करून, अकबराप्रमाणेंच दोन धर्मांची सांगड घालण्यासाठीं त्यानें अनेक ग्रंथ रचिले. त्यानें उपनिषदांचें फारशींत भाषांतर करून साधूंचीं चरित्रें व ग्रंथ लिहिले. दाराशेखचे कित्येक ग्रंथ पाटणा येथील खुदाबक्ष संग्रहांत आहेत.

तथापि सर्वांत विद्वान् पुरुष म्हणजे औरंगजेब होय. स्वधर्माचा त्याचा अभ्यास उत्कृष्ट होता. फतवा-इ-आलमगिरी म्हणून मुसलमानी कायद्याचा उत्तम ग्रंथ औरंगजेबानें लिहिलेला आहे. त्या कामीं पुष्कळ विद्वान् मौलवी खपत होते. त्यांत मौलाना शेख निजाम हा मुख्य होता. औरंगजेबास कुराण तोंडपाठ येत होतें; आणि त्याचा अर्थ चांगला कळत होता. त्याचें हस्ताक्षर सुंदर होतें. त्यास कवितेची आवड नव्हती. मुसलमानी धर्मशास्त्रांतील त्याची विद्वत्ता अप्रतिम होती, असें मोठमोठ्या विद्वानांनीं म्हटलें आहे. औरंगजेबाचा मुलगा बहादूरशहा हा आरबी व फारशी जाणत असे. शेवटचा बादशहा दुर्दैवी शहाआलम हा विद्वान् व रसिक होता. दुसरा अकबर (१८०६–३७) व शेवटचा बहादूरशहा ( १८३७–५७ ) हे ऊर्दु व फारशी भाषांत कविता करीत. ( Journel of the Moslem Institute, March 1907.)

मोगल बादशाहींत जनानखान्याचें प्रस्थ केवढें होतें, त्याचें वर्णन मागें ठिकठिकाणीं आलेंच आहे. एकंदरींत जनानखान्यांतल्या बहुतेक स्त्रिया कर्तृत्ववान् होत्या. राजपुत्रांचें संगोपन व घरचे व्यवहार स्त्रियांच्या हातांत असत. बहुतेक स्त्रिया शिकलेल्या व विद्वान् असत. आठ वर्षांचें वय झाल्याबरोबर प्रत्येक राजपुत्रास व राजकन्येस शिकविण्यासाठीं पृथक् शिक्षक ठेविलेले असत. स्त्रीशिक्षक इराणी असत. परंतु पुरुष हिंदु व इराणी दोनही असत. कित्येक स्त्रिया कविता वगैरे करीत व उत्तम लेखक असत. आग्र्याच्या किल्ल्यांत जहान्-आराचा एक मोठा पुस्तकसंग्रह होता. झेबुन्निसा ही कवि म्हणून प्रसिद्ध आहे. मुलींचीं लग्नें चांगली प्रौढपणीं होतः आणि विधवांचे पुनर्विवाह होण्यास अडचण नसे. जनानखान्यांतील वृत्तान्त लिहिण्यास स्त्रीलेखक व

पुस्तक वाचण्यास स्त्रीवाचक असत जनानखान्याच्या निरनिराळ्या भागावर निरनिराळे स्त्रीदरोगे होते

अकबराच्या वेळेस जनानखान्यातील स्त्रियाच्या नेमणुका फार थोड्या होत्या पण शहाजहान-औरंगजेबाच्या वेळेस त्या नेमणुका पुष्कळ वाढल्या मुम्ताज-महल्‌ची सालाची नेमणूक दहा लाख रुपये होती, तिच्या वडील मुलीस प्रत्येकीं सहालाख रुपये होते, पैकीं तीनलाख रोख असून, तीनलाखाची जमीन होती औरंगजेबानें आपली मुलगी बेगमसाहेब इला बारा लाखांची नेमणूक दिली होती. जहागीरच्या मृत्यूनंतर शहाजहाननें नूरजहानला सालाचें दोनलाख रुपये निवृत्तिवेतन करून दिलें होतें.

युरोपात सामाजिक व व्यावहारिक बाबतींत सुधारलेले प्रचार प्रथम फ्रेंच लोकात सुरू होऊन तेथून ते इतर राष्ट्रास मिळतात, असा सामान्य सिद्धान्त आहे फ्रान्सचा हा मान आशियाखंडात इराणला मिळत असे मोगल बादशहाच्या वेळची बरीचशी संस्कृति मूळ इराणातून आली असून तिच्या परिणामाचें वर्णन वर ठिकठिकाणीं आलेंच आहे बहामनी राज्यात कारभार करणारा महंमदगवान, व त्यानंतर मीर-जुम्ला या दोघानीं इराणी वळण दक्षिणेंत बरेंचसें वाढविलें शिल्पकलामर्मज्ञ अलीमर्दानखान, हकीम अबुल फत्त इत्यादि विशिष्ट धंद्याचे गृहस्थही इकडे पुष्कळच आले, आणि हिंदुस्थानच्या कारभारात त्यानी आपलीं नांवें चिरंतन करून ठेविलीं

हे वजन पुरुषाकडूनच आलें असें नाहीं कित्येक संस्कृत व विदुषी स्त्रियाही इराणातून पुष्कळ इकडे आल्या हमीदाबानू, नूरजहान व इतर स्त्रियाचीं नावें वर आलींच आहेत इराणच्या एका विद्वान् घराण्यांतील सती-उन्निसा नावाची एक स्त्री होती, तिचा भाऊ तालीब-आमली हा उत्कृष्ट कवि व मार्मिक लेखक असून जहागीर बादशहाचे पदरी राहत होता सती-उन्निसाचें लग्न नासीर नावाच्या एका विद्वान् हकिमाशीं होऊन नवऱ्यापाशीं ती जास्तच हुषार झाली पण नवरा लवकरच मरण पावल्यामुळे सती-उन्निसानें मुम्ताज महल्‌च्या पदरीं नोकरी पत्करली तिचें गोड व अदबीचें सभाषण, वैद्यक वगैरे संसारातील अनेक उपयुक्त विषयाचें तिचें ज्ञान इत्यादि गुणानीं मुम्ताज-महल्‌ला ती इतकी प्रिय झाली, कीं तिच्याच ताब्यात राज्याचे शिक्कामोर्तब राहत असे वाटेल ते उत्कृष्ट पुस्तक वाचावें असे तिनेंच, शहा-

जहानास विद्या शिकविण्याचें काम तिजकडे सोंपविलेलें होतें. मुम्ताजमहल्चें हरएक काम तिच्या मार्फत चालत असे. पुष्कळ गरीब मुलींस व निराश्रित स्त्रियांस राणीपुढें आणून सती-उन्निसा त्यांचा परमार्ष घेववीत असे. मुम्ताज-महल्च्या प्रेताबरोबर ही बाई बऱ्हाणपुराहून आग्र्यास आली. तेथें राणीचें दफन वगैरे झाल्यावर बादशहाच्या जनानखान्याचें पुढारीपण जहान्-आरा-कडे आलें. राजघराण्यांतील मुलामुलींचीं लग्नें जुळविणें, स्त्रियांना मेजवान्या देणें, आप्त-संबंधी मंडळींचा परमार्ष घेणें वगैरे अनेक बाबती जनानखान्या-मार्फत चालत. ह्या कामांत जहान्-आरास सती-उन्निसा मदत करी. राज-पुत्राच्या विवाहप्रसंगीं वधूच्या घरीं नजरनजराणे नेण्याचें व राजपुत्रास येणाऱ्या नजराण्याची व्यवस्था पाहण्याचें काम तिच्याकडेच होतें. शहाजहा-ननें तिला सर्व जनानखान्यावर मुख्य नेमिलें होतें. बादशहाच्या खान्यावर तिची देखरेख असे. तिला मूल नव्हतें. तिनें आपल्या भावाच्या दोन मुली पाळून त्यांना जवळची सर्व संपत्ति देऊन टाकिली. ही बाई स. १६७६ त मरण पावली. शहाजहाननें तिची कबर ताजमहालचे जवळ पश्चिम बाजूस बांधिलेली आहे. (मॉडर्न रि. जून १९०७).

अमीरखान नांवाचा इराणांतील यज्द् येथील एक हुषार व शूर सरदार औरंगजेबाचे वेळेस अफगाणिस्तानच्या कारभारवर होता, (स. १६७७–९८). त्याची बायको साहेबजीबाई ही मुम्ताज-महल्ची भाची असून नवऱ्याप्रमाणेंच हुषार होती. नवरा मरण पावल्यावर दोन वर्षेपावेतों तिनें अफगाणिस्तानचा कारभार बिनबोभाट करून तेथें उत्कृष्ट बंदोबस्त ठेविला. तें काम सुटल्यावर तिनें मक्केची यात्रा करून तेथें मोठा दानधर्म करून लौकिक मिळविला.

१ मोगल बादशाही आणि रोमन बादशाही या दोहोंच्या ऱ्हासांत पुष्कळ साम्य आहे. मात्र गिबननें जसा रोमन बादशाहीचा तात्त्विक व चर्चात्मक इतिहास तयार केला, तसा मोगल बादशाहीचा होणें जरूर आहे.

**५. राजाप्रजांचे एकमेकांवर परिणाम.**—हिंदुमुसलमानांच्या कर्तव-गारीचा तुलनात्मक विचार अनेक विद्वानांनीं व विचारवंतांनीं ठिकठिकाणीं केला असून, त्याजबद्दल मतभेदही पुष्कळ आहे. तथापि मुसलमानांच्या हिंदुस्थानांतील कर्तवगारीसंबंधानें खालील संक्षिप्त मुद्दे विद्यार्थ्यांनीं ध्यानांत

ठेवण्यास हरकत नाहीं हे मुद्दे केवळ अपूर्ण व विचारसूचक आहेत. त्यांचें विस्तृत विवेचन करूं लागल्यास प्रत्येकावर निराळा ग्रंथ होईल

(१) **पेहराव** मोगलबादशहाचें सामर्थ्य व ऐश्वर्य हीं कितीही मोठीं असलीं, तरी तत्कालीन लेखावरून एक गोष्ट व्यक्त होते, ती ही, कीं एकाही राज्य-कर्त्यानें प्रजेची खरी उन्नति करण्याचा प्रयत्न केला नाहीं सर्व लेख वाचून हा शोचनीय परिणाम मनावर नि संशय राहतो. युरोपात रोमन व इतर राज्यें पूर्वीं झालीं, त्यानीं जसे रयतेच्या उन्नतीकडे व सुखवृद्धीकडे लक्ष दिलें, तसे मोगल बादशहानीं दिले नाहीं रजपूत राजाना त्यानीं जोरानें दाबून टाकिले. दोन पक्षाना एकमेकाविरुद्ध लढवून राज्य सुरक्षित ठेवण्याचा प्रघात मोगलानीं उच-लिला होता, आणि परकी अंमलाच्या जोराखालीं येथील लोकाचे सर्व तेज लोपून गेले बाबरच्या पूर्वीच्या अफगाण राज्यापेक्षा मोगलाचें राज्य पुष्कळच चागले होते ह्यात संशय नाही अफगाणापेक्षा मोगल लोक बुद्धीने ज्यास्त थोर होते शिवाय मोगलाच्या वेळेस राज्यात स्थिरता उत्पन्न झाल्यामुळे, त्याचे येथील रीतरिवाजाशीं संमेलन झाले विशेषत शहाजहानच्या वेळेपासून रीतरिवाज, पेहराव, भाषा वगैरे बहुतेक हिंदूंच्याच गोष्टी बादशहानीं व दरबारी मंडळींनीं स्वीकारिल्या हिंदूंचीं पागोटीं, उर्दू व हिंदी भाषा,हिंदी वंदनाचे प्रकार, इत्यादि काहीं काहीं बाबती त्यानी येथील घेतल्या दाराशेखो व शहाजहान ह्याच्या लग्नसमारंभाचीं त्या वेळचीं चित्रे उपलब्ध आहेत, त्यावरून त्या वेळच्या पोषाखाची बरीच कल्पना होते मुंडावळ्या वगैरे चेहऱ्यावर करण्याचे शृंगार मुसलमानानीं हिंदूंतून घेतले. मध्यआशियातील बायकाची टोपी-इजार जाऊन त्या ठिकाणीं साडी आली पुरुषाची टोपी जाऊन हिंदुस्थानची पगडी व पागोटे आलें तयमूरलंग व शहाजहान ह्या दोघाचे पोषाख तुलना करून पाहण्यालायक आहेत मध्यआशियातला एबा अकबरानें टाकून देऊन हिंदु-स्थानातला जामा घेतला असे होता होता शहाजहानच्या वेळेस तर हिंदु व मुसलमान सरदार केवळ पोषाखावरून ओळखू येईनातसे झाले पडद्याची चाल मुसलमानापासून हिंदूंनीं घेतली असा सामान्य समज आहे, तो रा ब वैद्य ( Epic India ) ह्याच्या मते खरा नाहीं भारतीय काळीं स्त्रियास पडदा नव्हता, परतु इ स पू ३०० च्या सुमारास स्त्रियानीं उघडपणें पुरुष-समाजात न येता अंत पुरात राहवें, असा सामान्य प्रघात सुरू झाला होता.

बुरखा व पडद्याचें अलीकडचें प्रखर स्वरूप मुसलमानांच्या वेळेस हिंदूंमध्यें शिरलें असावें. दाराशेखोनें तर 'अल्ला' हें नांव बदलून 'प्रभु' हें देवाचें नांव स्वीकारिलें. दारा राज्यावर आला असता तर कदाचित् हिंदुमुसलमानांचा एक धर्म करण्याचें अकबरानें हातीं घेतलेलें काम त्यानें तडीस नेलें असतें. बादशहांचे जनानखान्यांत राजपुत स्त्रियांचा प्रवेश झाल्यापासून, मोगलांच्या स्त्रियांचे मध्यआशियातले रीतरिवाज नाहींसे होऊन, हिंदी रिवाज ते स्वीकारूं लागले, हें त्या वेळच्या तसविरींवरून व दुसऱ्या अनेक गोष्टींवरून सिद्ध होतें. इंग्लंडांतल्या पहिल्या दोन जॉर्जांप्रमाणें बाबर-हुमायून हे हिंदुस्थानास परकी होते, तसा प्रकार शहाजहान-औरंगजेबाचा नव्हता. बोलतांना औरंगजेब दारास दाराभाई म्हणून हांक मारी, व मुरादास भाई मुरादबक्ष म्हणे. शहाजहान ऊर्दू भाषेंत कवनें करी. सारांश, मोगल लोकांचा स्वभावच दुसऱ्यांचें चांगलें घेऊन, नेहमीं प्रगति करावी अशा प्रकारचा संग्राहक होता, त्याचा परिणाम एकंदरीत हितावह झाला. इकडे हिंदूंनीं राज्यकर्त्यांचें अनुकरण करण्यास कमी केलें नाहीं. हल्लींप्रमाणेंच त्या वेळींही राज्यकर्त्यांची भाषा शिकून व अन्य तऱ्हेनें त्यांस खुष करून नोकरीच्या वगैरे बाबतींत आपला फायदा करून घेण्याचा प्रयत्न हिंदु लोकांनीं केला. फारशी भाषेंत हिंदूंनीं लिहिलेले अनेक ग्रंथ आहेत. वसुलावर नेमलेले कामदार बहुतेक हिंदु असत, आणि त्याचा सर्व व्यवहार फारशी भाषेंत चाले. औरंगजेबानें वसुलाचें काम हिंदूंस न देण्याचा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं.

(२) **युद्धकला** मुसलमानांनीं हिंदुस्थानांत ऊर्जित दशेस आणिली. (क) पूर्वींचे हिंदुराजे सेनांचे 'मालक' होते, पण 'नायक' (Commanders) नव्हते. लाखों लोकांची फौज व्यवस्थितपणें वागवून, व तिजवर हुकमत चालवून काम घेणें, ही गोष्ट मोगल बादशहांनींच केली. खरें युद्धकलानैपुण्य दाखविण्याचे प्रसंग बादशहांस आले. बहुधा प्रत्येक बाबतींत मोगल लष्कराची व्यवस्था परिपूर्ण होती. (See, Irvine's History of the Mogul Armeis). लष्कराच्या सोयीचे रस्तेही देशभर मोगलांनींच बांधिले. तसेंच (ख) शहरासभोंवतीं मजबूद तटबंदी बांधून बंदोबस्त करण्याची पद्धत, जरी पूर्वीं येथें ठाऊक असली, तरी ती तत्कालीन सुधारणांनीं परिपूर्ण करण्याचें काम मोगलांनींच केलें. आग्रा, दिल्ली, अहंमदाबाद, सुरत, लाहोर, अलाहबाद

इत्यादि वाटेल तितक्या शहराचीं उदाहरणे त्यासंबंधीं देता येतील (ग) घोडे-स्वाराचे माहात्म्य वाढून, पायदळ फौज निकामी ठरली

(३) शकडो वर्षे मुसलमानाचा अंमल हिंदुस्थानावर चालू राहिल्यामुळें त्याचा **बुद्धिप्रभाव** अनेक बाबतींत स्पष्ट दिसून येतो (क) हिंदु राजेरजवाड्यांनीं आपल्या दरबारात व राज्यकारभारात पूर्वीचे प्रघात बदलून, सर्वथैव मुसलमानी प्रघात सुरू केले (ख) दरबारी मंडळीच्या सणावाराच्या वगैरे पोशाखात मुसलमानी चाली घुसल्या सामान्य रयतेने मात्र हे अनुकरण फारसे केले नाहीं. (ग) ऊर्दू भाषेचा प्रचार सार्वत्रिक झाला, आणि फारशी व आरबी शब्द, हिंदुस्थानातील हिंदी, बंगाली, मराठी वगैरे भाषात अतोनात शिरले (घ) लष्करी खेळ, बाज पक्ष्याची व इतर सर्व प्राण्याची शिकार इत्यादि गोष्टींचे स्वरूप व तत्संबंधाची परिभाषा हीं सर्व बदलून त्यास मध्य आशियातील व इराणी वळण लागल (ङ) मोगलाची वसुलाची पद्धत व विशेषत तत्संबंधीं नवीन परिभाषा सर्व हिंदुस्थानभर प्रचारात आली (च) गायनकला व हस्तिविज्ञान त्या दोन बाबतींत मात्र काहीं एक फरक झाला नाहीं त्या सर्वथैव मूळच्याच कायम राहिल्या (छ) पुस्तकाची व इतर आरास, नृत्य, सुगंधि द्रव्ये, इत्यादि ललितप्रकारात मुसलमानी तऱ्हा शिरली· आणि त्यात बादशाही दरबारचा कित्ता बाहेर सर्वत्र पसरला. (ज) फारशी कवितेचा स्वीकार हिंदूंनी बहुधा केला नाहीं हिंदची कविता व तिची रचना व हिंदूंचे तत्त्वशास्त्र हीं जशींच्या तशीच राहिलीं एखाद दुसरी आख्यायिका दाखला, किंवा एखाद दुसरी म्हण एवढीच फार तर मुसलमानातून हिंदु कवितेत आली असतील (झ) मुसलमानी कायद्याचे एकीकरण होऊन त्यास नवीन चलन मिळाले हिंदूंनीं आपल्या स्मृति कायम ठेविल्या (ञ) भोजनाचे व फराळाचे अनेक नवीन पदार्थ मुसलमानापासून हिंदूंनीं स्वीकारिले. मासाचे पदार्थ तर पुष्कळच आले अरबस्तानात खजूर हेंच लोकाचें मुख्य अन्न होते. तेथून ते इराणात आले. तेव्हा हिंग वगैरे मसाल्याची व इतर रुचिकर कृतींची भर पडून सूपशास्त्राची भरभराट झाली आणि हिंदुस्थानात आल्यावर उभयताच्या मिश्रणानें पाककला जास्तच वृद्धि पावली (ट) मुसलमान लोक हिंदूंहून जास्त गुलहौशी व ठाकठिकीचे असून, त्याची राहणी जास्त ऐषआरामाची व थाटाची असल्यामुळें, व्यसनात काय किंवा सत्कर्मात

काय, पुष्कळ नवीन उद्योगधंदे व नवीन कला अस्तित्वांत आल्या. (ठ) मुसलमान हे मूळचे भटकणारे असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं स्वदेशप्रेम वास करीत नव्हतें; तथापि जातीचा किंवा प्रांताचा एकलकोंडेपणा त्यांच्यांत नव्हता. म्हणून स्वतःच्या संपर्कानें व उदारपणानें हिंदु लोकांचा प्रांतिक व जातिविशिष्ट एकलकोंडेपणा त्यांनीं बराच मोडिला. हिंदु लोक दक्षिणेंतून बंगाल्यांत, व बंगाल्यांतून अफगाणिस्तानांत जाऊं येऊं लागले. (ड) मुसलमान साधूंच्या वार्षिकोत्सवप्रसंगीं हिंदु लोक मुसलमानांशीं अतिशय मिसळूं लागले. (ढ) जत्रा, बाजार, स्वारी इत्यादिकांत एकमेकांचें दळणवळण अतिशय वाढलें. (ण) हिंदूंच्या वैद्यशास्त्रास चलन व आश्रय नसल्यामुळे, त्याची वाढ खुंटली; आणि मुसलमान हकिमाची भरभराट झाली; कारण त्यास दरबारीं आश्रय मिळून हिंदुस्थानबाहेरील देशाशीं त्यांचा व्यवहार घडून त्यांच्या ज्ञानांत भर पडत असे. (त) हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं हिंदूंच्या चालीरीती, त्यांच्या धर्मसमजुती व लग्नविधि इत्यादि पुष्कळ बाबतींचा स्वीकार केला. बादशहांची सुवर्णतुला वगैरे विधि मूळचे हिंदूंचे आहेत. ज्योतिष, काव्य, नाटक, न्यायशास्त्र, तत्त्वज्ञान, व कृषि ह्या बाबती हिंदूंच्या होत्या तशाच कायम राहिल्या; त्यांत मुसलमानांच्या योगानें फेरफार झाले नाहींत.

(४) व्यापाराच्या निमित्तानें परदेशीं **प्रवास** करणारे बहुधा मुसलमानच होते. प्रवासानें त्यांचीं मनें विकास पावत, आणि त्यांच्या ठिकाणीं व्यावहारिक शहाणपण व उपयुक्त संस्कार तयार होत, ते स्वदेशांतच कोंडून राहणाऱ्या हिंदूंच्या ठिकाणीं सहसा उत्पन्न झाले नाहींत. 'मर्द–इ–जहान्–दीदा' म्हणजे 'पृथ्वीवर फिरलेला मनुष्य' ही मुसलमानांत म्हणच पडून गेली होती.

(५) **शिल्पकला**—विशेषतः मोगलांनींच भरभराटीस आणिली. बादशहांचे राहण्याचे वाडे, बागा, मशिदी व मुकरबे ऊर्फ कबरी, हीं विशिष्ट बांधकामें मोगलांचीं आहेत. पूर्वीचीं हिंदु बांधणीचीं कामें म्हणजे मुख्यतः देवळें होतीं, परंतु सुखोपभोग, ऐषआराम, दरबार, राज्यकारभार इत्यादिकांस उपयोगी पडणारे भव्य वाडे मोगलांचेच आहेत. कमान, व आवाज घुमणारे घुमट हे दोन विशिष्ट प्रकार मुसलमानी बांधणींत नवीन आहेत. वाड्यांच्या सभोंवार विस्तृत व शोभिवंत बागा तयार करण्याचा प्रघात मोगलांनीं व विशेषतः इराणी सरदारांनीं स्वदेशांतून येथें आणिला. बागांत

कारंजीं, फुलाचे ताटवे, व सहल करण्याच्या सुंदर वाटा हे प्रकार हिंदुस्थानात इराणातून आलेले आहेत बादशाहींतील अनेक मोठमोठ्या सरदारानीं सुद्धा ठिकठिकाणीं आपले वाडे, व बागा उभारिल्या. आग्रा, दिल्ली, लाहोर, लखनौ वगैरे शहरात अशा खासगी इमारती पुष्कळच आहेत मुसलमानी शिल्पकलेवरील Havel's Indian Art, Modern Review मधील लेख व Archaeological Survey चीं पुस्तकें पाहिलीं असता हा विषय स्पष्ट समजेल

**मूर्तिकला व चित्रकला** मूळ येथें बौद्धाच्या वेळेस उत्कर्ष पावल्या आणि बौद्धधर्माबरोबरच त्या चीन, जपान, जावा इत्यादि ठिकाणीं पसरल्या पुढें अफगाण अंमलात ह्या कलाचें हिंदुस्थानातून उच्चाटन झालें कारण चित्र काढणें किंवा प्रतिमा करणें ह्या गोष्टी मुसलमानी धर्मांत मना असल्यामुळे, आरंभीच्या कडव्या मुसलमान राज्यकर्त्यानीं त्या येथें चालू दिल्या नाहींत पुढें मोगल बादशाही स्थापन झाली मोगलास ह्या कलाचा शोक होता हिंदुस्थानात येण्यापूर्वी चीनच्या बाजूनें मोगलावर बौद्धधर्माचा परिणाम झालेला होता इस्लामाच प्रखर पाणी त्याच्या ठिकाणीं नव्हतें तेव्हा अकबरानें हिंदुस्थानात ह्या कलास पुनरपि आश्रय दिला त्यानें चीन व इराण ह्या दोनही ठिकाणचे कारागीर आणवून चित्रानीं व नकशीनें इमारती सुधारण्याचा क्रम सुरू केला. हा प्रघात वाढता वाढता शहाजहानच्या वेळेस अतिशय वृद्धि पावला (पहा, Painting in Ancient and Medieval India, Cal. Rev. July 1903 ) मुसलमानाच्या बांधकामाविषयीं मागें ठिकठिकाणीं उल्लेख आलेच आहेत मशिदी, वाडे, बागा, विहिरी वगैरे लोकोपयोगी कामें करण्याकडे मुसलमान राज्यकर्त्यांची व इतर स्त्रीपुरुषाची विशेष प्रवृत्ति होती बागा बहुधा सार्वजनिक नसत सणावाराच्या वगैरे नैमित्तिक प्रसंगीं त्या सर्व लोकास खुल्या ठेवीत. हिंदु लोकानी अशा कामें केलीं नाहींत नद्याचे घाट, धर्मशाळा व मंदिरें हीं मात्र हिंदूनींच बांधिलेली आहेत मोगलानीं बांधिलेले रस्ते मजबूद व उत्कृष्ट होते रस्त्यावर खडी ठोकून कायमचे भक्कम रस्ते करण्याची युक्ति स्काट्लंडात मॅकॅडमन (Macadam) स १७७०-८० च्या वेळेस काढिली त्यापूर्वी पुष्कळ दिवस ही गोष्ट हिंदुस्थानात ठाऊक होती मुसलमानाच्या लोकोपयोगी कामात विहिरी व सराया ह्याचें महत्त्व मोठें आहे सर्व मोठमोठ्या

रस्त्यांवर प्रवाश्यांच्या सोयीसाठीं देशभर सराया बांधिलेल्या होत्या. सराया म्हणजे विस्तृत धर्मशाला. त्यांत ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणें व गरजेप्रमाणें सर्वांस उतरण्यास जागा मिळे. सराईच्या सभोंवार मजबूत तट असून, त्याजला कायमचा पहारा असे. आवारांत एक मोठी चांगल्या पाण्याची विहीर असे. चोरांच्या वगैरे भीतीस्तव रात्र झाली म्हणजे सर्व गाडे, जनावरें व सामान तटाचे आंत घेऊन मुख्य दरवाजा बंद करीत. सरकारचे कामदार राज्यांत वारंवार फिरत आणि त्यांच्या बदल्या होत, त्यांस मुक्कामासाठीं अशा सरायांचा उपयोग फार होत असे. शिवाय डांकवाले, व्यापारी, फिर्यादी व अपिलें करण्यासाठीं प्रवास करणारे, ह्या सर्वांस या सरायांची जरूर अतिशय असे. सर्वांत सराया बांधणारा मोठा पुरुष औरंगजेब झाला. त्याच्या पूर्वी शेरशहा व फिरोजशहा ह्यांनीं तशींच कामें थोडीबहुत केलीं. कित्येक सराया खासगी लोकांनीं परोपकारार्थ बांधिलेल्या असत. त्यांच्या खर्चासाठीं जमिनी लावून दिलेल्या असत, किंवा बांधणाराचे वंशज आपल्या उत्पन्नातून रोख रक्कम देत. सरायांत प्रवाश्यांस जागा बहुधा फुकट मिळे; कदाचित् कित्येक ठिकाणीं कांहीं अल्प रक्कम प्रवाश्यांपासून घेत. जैन लोकांनीं सरायांचा व लोकोपयोगी कामांचा हा पूर्वीचा कित्ता अद्यापि चालविला आहे.

(६) सरायांचे ठिकाणींच डांकेच्या घोड्यांचे व उंटांचे टप्पे असत. दोन मैलांवरून शिंग वाजे, ते ऐकिल्याबरोबर नवीन जनावरें तयार करीत. डांक आल्याबरोबर जुन्या जनावरांवरून ती नवीन जनावरांवर घालून लगेच पुढें चालू करीत. प्रवासी बहुधा घोड्यावरून प्रवास करीत; पण राजपुताना वगैरे वालुकामय प्रदेशांसाठीं उंट असत. सरकारी डांक फार जलद जात असे. पुरंदरावर शिवाजी जयसिंगाच्या स्वाधीन झाला ही बातमी औरंगजेबास दिल्ली येथें अकराव्या दिवशीं पोंचली. सरकारची डांक नियमित व व्यवस्थित चालू होती. मात्र तिचा उपयोग लोकांस फारसा होत नसे. सरकारी कचेरींत दोनही टोंकास कोणी मनुष्य असला, तर त्याच्या वशिल्यानें मात्र खासगी पत्रें सरकारी डांकेतून जात. पण बहुतेक मोठमोठ्या ठिकाणीं व्यापारी मंडळीची खासगी डांकेची तजवीज असे; आणि असे खासगी लोक पुष्कळदां आपली बातमी सांकेतिक खुणांनीं लिहून पाठवीत; म्हणून ती सर्व लोकांस कळत नसे. हल्लीं जशी तारेच्या मजकुराची सांकेतिक परिभाषा किंवा सायफर्स

असतात, तशी त्या वेळी व्यापारी लोकाची सांकेतिक परिभाषा होती बाबूची किंवा पत्र्याची नळकांडी करून त्यात कागद भरीत आणि ती घोड्यावर वगैरे पाठवून देत डाकेच्या चोरीबद्दल अत्यंत कडक शिक्षा होत असे

(७) हल्ली **दळणवळणाची साधनें** पुष्कळ आहेत, म्हणून त्या वेळी ती मुळीच नव्हती असे नाही दरसाल ठरीव वेळेस निरनिराळ्या ठिकाणी जत्रा, मेळे, उरूस वगैरे भरत, अशा प्रसंगी मालाची खरेदीविक्री तर चालेच; पण त्याशिवाय साधु, विद्वान् व कवी वगैरेंची संमेलने होऊन अनेक विषयावर चर्चा व वादविवाद होत तसेंच अनेक धार्मिक कृत्ये यज्ञयाग व समारंभही होत असत. त्या वेळीं निरनिराळ्या मंडळींच्या भेटी होऊन नवीन परिचय घडत

(८) **कारागिरी** स १६०५ पासून १६५७ पर्यंत हिंदुस्थानातला काल अति भरभराटीचा गेला पृथ्वीवरील नानाविध कसबे, हुन्नर, विद्या इत्यादिकाचा दरबारात भरपूर प्रवेश होऊन, त्याची उन्नति होत गेली त्या वेळीं व पुढेही निरनिराळ्या प्रांतात व्यापाराची व कलाकौशल्याची अनेक ठिकाणे होती, अहंमदाबाद येथे किनखापाचें, डाका येथे मलमलीचें, व काश्मीरात शालीचे काम उत्कृष्ट होत असे त्या कामास प्रत्यक्ष बादशहाचा व इतर श्रीमान् मंडळीचा आश्रय मोठा होता बादशहा स्वत पगारदार कारागीर ठेवून व सामान देऊन, जो माल तयार होई तो ते स्वत घेत स्वत च्या वापरास व निरनिराळ्या ठिकाणीं पोशाख पाठविण्यास व नजर देण्यास जसा माल पाहिजे असे, तसा ते मुद्दाम काढवीत. दूरदूरच्या देशांतील राजास व दरबारास पोशाख पाठवावे लागत असे कारखाने सरकारीच असल्यामुळे, त्यातला माल बाहेर बाजारात फारसा विक्रीस येत नसे पण सरकारचेच कारागीर फावल्या वेळात खासगी रीतीने माल तयार करीत, व पुष्कळदा खासगी मजूर कामास लावीत, आणि अशा रीतीनें तयार झालेला माल बाजारात येई तेव्हा तो लोकास मिळे एकंदरींत हल्लींच्या सारखी अशा मालाची भरबाजारात खुली विक्री क्वचितच होई बादशहाची व श्रीमंताची जरूर भागून राहिलेला माल बाहेर येई पूर्वी हिंदुस्थानातील रेशीम, कापूस वगैरे कोणताच कच्चा माल बाहेर जात नसे कच्च्या मालाचे सर्व जिन्नस येथेच तयार होऊन ते बाहेर जात त्या योगाने व्यापारास व देशास मोठा फायदा होत असे; आणि त्यावरच देश विशेष सधन होता. कच्चा माल बाहेर न

जाण्याचें एक कारण असें होतें, कीं त्या वेळीं आगगाड्या व आगबोटी वगैरे नसल्यानें भारी वजनाचा व मोठ्या आकाराचा माल बाहेर नेण्यास रस्त्याची मजुरी फार पडे. म्हणून थोड्या वजनाचे, लहान आकाराचे व मोलवान जिन्नस तेवढेच येथें तयार होऊन बाहेर जात. दगडांवर, धातूंवर व लांकडावर नकशीचीं व बाह्य भरावाचीं कामें, कशिद्याचीं कामें, व निरनिराळया रंगांच्या मुलाम्यांचीं कामें येथें पुष्कळ तयार होत असत. हिंदुस्थानचे कारागीर उत्तम कसबी म्हणून नांवाजलेले होते. भोज्य पदार्थांची सवंगाई व स्वस्त मजुरी ह्यांमुळे एकंदरींत कारागिरीचे जिन्नस फारसे महाग नसत. हल्लीं कापड स्वस्त असून तें पाहिजे तेथें आपल्या दारावर मिळतें, तसा प्रकार तेव्हां नव्हता. कापड बरेंच महाग असे, आणि तें ठरीव पेठांतून अगोदरपासून मागवून व तयार करवून आणावें लागे. ह्यामुळें डाक्काची, बनारसी, पैठणी, चंदेरी, बऱ्हाणपुरी, वगैरे नांवें कापडास मिळालीं. बादशहाच्या व ऐषआरामी श्रीमंताच्या गरजा पुष्कळ असल्यामुळें, हरएक प्रकारच्या कारागिरीस उत्कृष्ट आश्रय मिळे, म्हणून कला भरभराटीस आल्या. जगांतील सर्व लोकांची उडी हिंदुस्थानांतील मालावर असे, त्यामुळें प्रत्येक कसब अगदीं पूर्णतेस गेलें. बादशाहीच्या भरभराटीचें व ऐश्वर्याचें जें वर्णन वर ठिकठिकाणीं आलें आहे, यावरून एकंदर व्यापारास व कारागिरीस त्या वेळीं केवढें उत्तेजन मिळालें असलें पाहिजे, ह्याची कल्पनाच होईल. नुसतें कागदांचें उदाहरण घेऊं. कागद तयार करण्याचीं कित्येक ठिकाणं ठरलेलीं होतीं. आठव्या व दहाव्या शतकांतील कागद आज आपणास उत्कृष्ट व मजबूत. असलेले आढळतात. रासायनिक क्रियेनें कागदास कीड-वाळवीची सुद्धां बाधा होऊं नये अशी तजवीज करीत. पाटणा येथील खुदाबक्ष ग्रंथसंग्रहासारख्या ठिकाणीं ह्या जुन्या कागदांवरील लेख पाहण्यास मिळतात. एक पुस्तक लिहिण्यास निरनिराळया अनेक कसबी मंडळीचें साह्य लागे. पुस्तक आंखणारा निराळा, त्याच्या किनारीवर वेलबुट्टी काढणारा निराळा, नंतर मुख्य लेखक निराळाः मध्यें लाल किंवा इतर रंगांचीं अक्षरें येतात, तीं लिहिणारा निराळाः वेलबुट्टींत अनेक रंग भरणारे, व मधून मधून चित्रें वगैरे येतात तीं तयार करून त्यांचे रंग भरणारे, अशा अनेक असामींच्या हातांतून प्रत्येक पान जाई, तेव्हां एखादा समग्र ग्रंथ तयार होई. अथपासून इतिपर्यंत सर्व अक्षर एकसारखे

असून, त्यात खोडाखोड किंवा अव्यवस्था यत्किंचित नसे अलीकडे छापण्याची कला निघाल्यामुळे, हस्तलेखनकलेचा वास्तविक लोपच झाला आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं.

खनिज द्रव्याची वृद्धि सुद्धा पुष्कळ झाली लोखंड, सोनें, हिरे, माणक कथील, शिसे, गंधक, सोरा, मीठ, हरएक प्रकारचे दगड, इत्यादिकाचा उपयोग व त्यावर होणारा व्यापार पूर्वी फारच मोठा होता टॅव्हर्नियरच्या पुस्तकात अशा खनिज द्रव्याचें पुष्कळ वर्णन आहे

६ **गादीच्या वारसांविषयीं अनिश्चय**—सामान्यत असे दिसून येतें, कीं मोगल बादशहाचे मुलगे आपल्या बापावर उठत बाप जिवंत असता त्यास मारून अगर पदच्युत करून स्वत राज्यापहार करण्यास ते सदैव तत्पर असत. बादशहास वृद्धापकाळीं विशेष दु ख पोटच्या मुलापासून होई याजविषयीं कित्येक असामी बादशहास असा दोष देतात, कीं त्यानीं आपल्या मुलास मोठमोठे अधिकार दिले, ही त्याची चूक होय परंतु ही सर्वस्वी चूक होती असें म्हणता यावयाचें नाहीं बहुतेक शहाजादे पराक्रमी व कर्तृत्ववान होते राज्य भरभराटीस आणण्यात त्याचें अंग विशेष होतें बाबराचे मुलापासून राज्यास पुष्कळ बळकटी आली होती. खुस्रु व शहाजहान यासारखे कर्तृत्ववान मुलगे थोडेच निपजतील औरंगजेबाचे सर्व भाऊ आरंभापासून दूरदूरच्या प्रातात शहाणपणानें बंदोबस्त राखीत होते, म्हणूनच शहाजहानची अव्वल कार्किर्द शाततेची व भरभराटीची झाली तेव्हा मुलास मोठमोठे अधिकार दिल्याबद्दल बादशहास दोष देणें वाजवी नाहीं बादशहाच्या मृत्यूनंतर कोणी गादीवर बसावें ह्याविषयीं नियम बांधिलेला नव्हता ही गोष्ट शोचनीय होय. बळी तो कान पिळी असा प्रकार असल्यामुळे, बादशहाच्या मरणप्रसंगीं बंडाळी सुरू होई, अकबरासारख्या शहाण्या पुरुषानीं ह्याविषयीं काहीं व्यवस्था बाधून देण्याचें श्रेय घेतलें असतें, तर असे घोटाळे माजले नसते तथापि तो काळच पुष्कळ अंशीं खटपटीचा होता; आणि अशी धामधूम जगातील बहुतेक भागात त्या वेळीं सुरू होती मोगल घराण्यांतील शहाजाद्यास जन्मभर कारागृहवास अगर अत्यंत हीन मृत्यु सहन करावा लागला, अशीं उदाहरणें इतरही पुष्कळ आहेत. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर हा प्रकार विशेषच वाढला शहाजहान व औरंगजेब ह्यांनी आपल्या राज्यारोहण-

प्रसंगीं कुटुंबांतील सर्व राजपुत्रांची कत्तल केली. हे प्रकार पाहून ' देवा, राजघराण्यांत जन्म देऊं नको, ' असें त्यांस होऊन गेलें असेल. बिचाऱ्यांस सुखाने मरणही नाहीं ! जणूं काय जगांत इतरांप्रमाणे उद्योग करून जगण्याचा त्यांस हक्कच नाहीं. प्रत्यक्ष बादशहांची सुद्धां मरणसमयीं तीच दशा. कोणी मुलगा किंवा आप्त जवळ नाहीं; जिवंत असूनही तो जवळ यावा असें वाटावयाचें नाहीं. काय हें दुर्भाग्य ! कुटुंबांत सर्व नातेवाइकांच्या समक्ष मरण येणे ही भाग्याची गोष्ट समजली जाते, पण ती ह्या बादशाही घरण्यांत साध्य नव्हती. जो बलवान असेल त्यानें राज्य बळकावून आपणास अडथळा करणाऱ्या सर्व भाईबंदांस ठार मारावें असा निर्घृण प्रकार वारंवार घडत असे !

मुसलमानांत संतानाभावामुळें वंशवृद्धि खुंटली असें फारसें झालेलं नाही, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. त्यांचा जनानखाना मोठा असून लग्नाचे नियम जातिभेदास अनुसरून हिंदूंच्या सारखे सक्त नसत. त्यांच्यांत स्त्रियांचा पुनर्विवाह होतो; जवळच्या नातेवाइकांचीं एकमेकांशीं लग्नें होतात. आणि एखाद्या बाईवर कोणाची मर्जी बसली, तर ह्यांचा निका सहज होतो. लग्न न करितां, तिला तो स्वतःच्या घरीं आणून ठेवण्यास कमी करीत नाहीं. हिंदूंचा प्रघात थोडासा निराळा आहे. राख असली तरी तिला तो स्वतःच्या घरीं बहुधा आणून ठेवणार नाहीं. सारांश, बादशहा मरण पावला म्हणजे पुढें तख्तावर बसण्यास कोणी नाही असा प्रसंग सहसा येत नसे. लॉर्ड डलहौझीच्या वेळेस दत्तकाचा प्रश्न महत्त्वाचा होऊन औरस संतति नसल्यामुळें अनेक हिंदु राष्ट्रें खालसा झालीं, तसा प्रकार मुसलमानांच्या संबंधानें घडला नाहीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

नेहमीं असें आढळतें, कीं राज्य स्थापन करणारा पुरुष अक्कलवान, व शहाणा असतो. तसा नसला तर त्याच्या हातून कदापि राज्य कमावलें जाणार नाहीं. कोणत्याही देशांत पाहिलें, तरी पहिला पुरुष हुषार असतो, तितके त्याचे पुढील पुरुष नसतात. गज्नवी महंमूदच्या मागून निपजलेले बहुतेक पुरुष दुर्बळ व बुद्धिमंद निघाले. शिवाजी राजाप्रमाणें शिवाजीचे वंशज कर्तत्ववान नव्हते. अशीं आणखी शेंकडों उदाहरणें सांपडतील. परंतु या नियमास मोंगल वंश बऱ्याच अंशीं अपवादकारक आहे. बाबर बादशहा फारच हुषार होता. तो ज्यास्त दिवस वांचता, तर सर्वांत त्याचेंच नांव कदाचित् पाहिलें

आले असते त्याचा मुलगा हुमायून अगदी टाकाऊ नव्हता, तरी पण शेर-शहा सूरसारख्या विशेष कर्तबगारीच्या पुरुषाशीं त्याची गाठ पडल्यामुळे त्याजपुढे हुमायूनचा टिकाव लागला नाही त्यापुढील पुरुष एकसारखे शहाणे व प्रजापालनदक्ष निघाल्यामुळे, मोगल बादशाहीचे नाव अखिल जगाच्या इतिहासात चिरस्मरणीय झाले आहे एकामागून एक सहा पुरुष भाग्यशाली निपजल्याचे उदाहरण इतिहासात नाही औरंगजेबाने दुराग्रह धारण करून सर्वस्वाचा नाश करून घेतला तसे वर्तन केले नसते, तर मोगल बादशाहीचा कीर्तिध्वज पुष्कळ काळ फडकत राहिला असता असे पुष्कळांचे मत आहे अकबराच्या मागून दुसरा अकबरच निपजणे जरी अशक्य असले, तरी जहांगीर अथवा शहाजहान निपजणे कठीण नव्हते अकबराचाच कित्ता औरंगजेबाने व त्याचे वंशजानी चालू ठेविला असता, तर आज जशी चीनची स्थिति आहे, तशी तरी हिंदुस्थानची राहती, असा कित्येकानीं तर्क केला आहे मोगल बादशाही आजपर्यंत कायम असती, व पाश्चात्य राष्ट्रांचा अंमल स्थापला गेला नसता, तरी पाश्चात्य सुधारणेपुढे मोगलाचा टिकाव लागता ना, आणि अंतर्यामी कोरम झालेल्या जुनाट वृक्षाप्रमाणे मोगल बादशाही लहानशा धक्क्याबरोबर पडून जाण्यास पात्र झाली असती ह्या ऐतिहासिक प्रश्नाचे मार्मिक विवेचन तज्ज्ञानीं करणे अवश्य आहे

मोगल बादशहा धर्मसंबंधात हिंदूवर जुलम करीत नसत, याचे कारण, रजपुतांबरोबर त्यांचे लग्नसंबंध झाले हे होय, असे कित्येक ग्रंथकार म्हणतात. राजपूत राण्यांचे वजन आपल्या नवऱ्यावर विशेष असे त्यांच्यामुळे बादशहाच्या मनातील हिंदूंविषयीं द्वेषबुद्धि पुष्कळ कमी झाली शिवाय मोगल लोक अफगाणासारखे दुराग्रही नव्हते, म्हणून त्याजपासून रयतेवर धर्माच्या बाबतींत तितका जुलूम झाला नाही अनेक प्रसंगी हिंदूंचा त्यांनी बचाव केल्याची उदाहरणे आहेत. बाबराने संग-राण्याविषयी अत्यंत पूज्यबुद्धि व्यक्त केली आहे गुजराथच्या बहादरशहाने स १६२३ त चितोडगड काबीज केला, तेव्हा संगराण्याची धायको कर्णावती हिने हुमायून बादशहास राखी पाठवून त्याचे साह्य मागितले, तो प्रकार मागे सांगितलाच आहे. ह्या राखीनें केवळ हुमायूनच एकटा चितोडच्या राणीचा भाऊ झाला असे नाहीं, तर त्याचे पुढील वंशज अकबर वगैरे अनुक्रमे चितोडगडच्या राणीचे राखीबंध

भाई झाले. हिंदूंचा परमद्वेष्टा औरंगजेब यानेंही राणीस पत्र पाठवून आपलें स्वसृप्रेम उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. ( लोकहितवादीकृत राजस्थानचा इतिहास, पान १३० ).

विशिष्ट कारणानीं हिंदुमुसलमानांचे तंटे व निकराचे झगडे होत, ते सोडून दिले तर हिंदूंच्या धर्माचरणास मुसलमानाकडून फारसा उपद्रव होत नसे. हिंदूंना ते तुच्छ समजत व त्यांची अवहेलना करीत, पण त्यांजवर सारखा जुलूम करीत नसत. आरंभीं हिंदूंच्या कित्येक देवळाचा विध्वंस झाला, पण खासगी धर्माचरणास किंवा पूजा-अर्चा करण्यास त्यांजकडून प्रतिबंध झाला नाहीं. पुजारी व उपाध्याय वर्गावर मुसलमानांनीं शस्त्र धरिलें नाहीं. मुसलमानांच्या प्राथमिक शाळा बहुतेक सर्व ठिकाणी होत्या. तेथें कुराण, स्थलमाना-प्रमाणें फारशी, आरबी, ऊर्दू वगैरे भाषा, व हिशेबापुरतें गणित इतके विषय शिकवीत. हिंदूंच्या कित्येक शाळा असत, परंतु त्यांस सरकारी आश्रय नसे. श्रीमंत व आस्तिक लोक त्या शाळा स्वखर्चानें चालवीत. अशा खासगी शाळांस सर्व लोक दरसाल यथाशक्ति मदत करीत. निरनिराळ्या ग्रंथांच्या नकला करून ज्ञानाचा फैलाव करण्याची बुद्धि मुसलमानात होती, तितकी हिंदूंत नव्हती. हिंदु लोक आपले विशिष्ट ज्ञान बाहेर फोडण्यास बहुधा नाखुष असत. धर्मांत शिरलेले नवीन नवीन वेडेचार सोडून देऊन पूर्वींचा अस्सल आरबी धर्म होता तसा शुद्ध करण्याचे मुसलमानांत अनेक प्रयत्न झाले. ते सर्वच सिद्धीस गेले नाहींत, तरी मुसलमानांस योग्य मार्गाकडे वळ-विण्यास त्यांचा बराच उपयोग झाला. ह्याच विषयावर मागें प्रकरण ३ कलम ९, प्रकरण ४ कलम ५, व प्रकरण १९ पैकीं कलमें २।३।४।८ यांत आलेलें विवेचन पाहवें.

**७. अनियंत्रित सत्तेचीं नियंत्रणें**.—मोगल बादशहांची सत्ता सर्व-तोपरी अनियंत्रित होती. प्रजेचें जीवित, मालमत्ता, व स्वातंत्र्य ह्यांचें नियमन केवळ त्यांच्या मर्जीवर अवलंबून असे. तो राज्यांतील सर्व जमिनीचा अनन्य मालक होय असा सार्वत्रिक समज असून, कोणत्याही प्रकारचे नवीन कर बसविणें व जुने काढून टाकणे हें करण्यास त्यास यथेच्छ मुभा होती. इजारे किंवा मक्ते देऊन देशांतील व्यापार त्यास आपल्या ताब्यांत ठेवितां येई. एका गांवच्या किंवा देशाच्या लोकांना ‘ आपली वस्ती सोडून दुसऱ्या ठिकाणीं

जाऊन रहा,' असे सांगण्यास त्यास अधिकार पोंचे राज्याच्या सर्व खात्यांतील नोकऱ्या त्याच्या हातांत असत रावाचा रंक व रंकाचा राव ही गोष्ट तो क्षणमात्रांत करूं शके दंड, कैद, हालहाल करून ठार मारणे, इत्यादि सर्व प्रकारच्या शिक्षा करण्यास त्यास संपूर्ण अधिकार असे ह्या प्रचंड राजकीय हक्काचे अक्राळ विक्राळ स्वरूप लोकांच्या मनावर ठसण्यास त्या वेळची परिस्थिति अनुरूपच होती अकल्पनीय राज्यविस्तार, दरबारचा देदीप्यमान डामडौल, अगणित सेना व तिची अपरंपार सामुग्री, यामुळे सेनेवरील मोठमोठे अधिकारी, प्रांतावरील सुभेदार व दरबारांत हजर असणारे प्रधान मंडळ, इत्यादि वरिष्ठ अधिकाऱ्यांनींही बादशहापुढे अत्यंत नम्रता दाखविण्याचा परिपाठ पडला बादशहानें मोठमोठीं भपकेदार नावें धारण करण्याची पद्धति; आणि निदान औरंगजेबापर्यंतच्या सर्व पुरुषांनीं व्यक्त केलेलें राजनीतिनैपुण्य, इत्यादि अनेक कारणांचा एकत्र मिलाफ झाल्यानें बादशहाच्या अनियंत्रित सत्तेस पुष्टि येत गेली शिवाय मोंगलांनी आपले राज्य तलवारीच्या जोरावर कमाविलें होतें पाश्चात्य देशांत मोठमोठे जमीनदार अस्तित्वांत येऊन प्रसंगविशेषीं ते प्रत्यक्ष राजासही धाब्यावर बसवीत तसे स्वतंत्र पिढीजाद सरदार मोंगलाच्या राज्यांत नव्हते तसेंच सामान्य जनसमूहाच्या ठिकाणीं स्वत्व कायम नसल्यामुळें बादशहावर लोकांचा मुळींच दाब नव्हता. राजानें आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केल्यास लोकांनीं एकमत करून त्याजला आळा घालण्याची कल्पना प्राच्य हवेंत रुजलीच नाहीं कदाचित् त्या कल्पनेचें दुर्मीळ बीज पश्चिमेकडील जमिनींत पडलें, आणि इकडे ते उपलब्धच नसेल प्राक्कालीन मुसलमानी किंवा हिंदु रियासतींत तसें बीज पोसण्याची सोय नव्हती असें कित्येकांचें मत आहे, म्हणूनच राजा म्हणजे जिंकिलेल्या प्रदेशाच्या बंदोबस्तासाठीं ठेविलेल्या फौजेचा नायक, असा समज इकडे सार्वत्रिक झाला

वर सांगितल्याप्रमाणें बादशहाची सत्ता अनियंत्रित होती, तरी तिचें नियमन करणारीं यंत्रें मुळींच नव्हतीं असें कोणी समजूं नये एक तर मोंगल बादशहाची परिस्थिति चमत्कारिक होती विधर्मी लोकांमध्यें तो येऊन पडला होता. हे विधर्मी लोक अगदींच नेभळे व बलहीन नव्हते पूर्वापार उत्तम लढवय्ये अशी त्यांची ख्याति होती. शिवाय हिंदुस्थानचे बहुतेक मुसलमान अफगाण

जातींचे असून ते नेहमीं मोगलांस शिरजोरपणा दाखवीत. मोगलांच्या पूर्वी अफगाणांचाच ह्या देशावर अंमल होता हे ते विसरले नव्हते. हाताखालचे अधिकारी बादशहापुढें नमून असत ही गोष्ट खरी, तरी पण राज्यकारभार व हुकमत व्यवस्थितपणें चालण्यास बादशहा सर्वथैव त्यांजवरच अवलंबून असे. स्वतःच्या लष्करावर त्याची सर्व भिस्त असल्यामुळें, त्याच्या स्वेच्छाचारास बराच आळा पडे. तिसरे, सामान्यतः लोकांस आपण आवडतों की नाहीं ह्याची चाड बादशहास बाळगावी लागे. लोक आपल्याविरुद्ध गेले, की आपलें दैव फिरलें असें त्यास त्या काळीं वाटणें साहजिक होतें. चवथें, एक चमत्कारिक बंधन मोगलांच्या वागणुकीनेंच उत्पन्न झालें होतें. एकीकडे लढत असतां, दुसरीकडे देशांत स्वस्थता करण्याचे बाबरानें केलेले प्रयत्न, अकबराच्या हुषारीनें त्या प्रयत्नांस मिळालेलें कायमचें सुस्वरूप, आणि एकंदरींत मोगलांचा अंमल न्यायाचा व सुखाचा आहे असा सार्वत्रिक झालेला समज, इत्यादि कारणांनीं सर्व प्रकारच्या लोकांमध्ये राज्यकर्त्यांबद्दल एक विलक्षण अभिमान व आवड उत्पन्न झाली. लोकांच्या ह्या समजास हरताळ लावणारें वर्तन करणें विशेष जोखमाचें होतें. शेवटचे बंधन मोगलांच्या स्वाभाविक गुणांतून उत्पन्न झालें होतें. त्यांची हुषारी, आत्मसंयमन, व उदार वर्तन इत्यादिकांमुळें त्यांच्याबद्दल लोकांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. सारांश, बादशहांची सत्ता अनियंत्रित असूनही तिचे दुष्परिणाम लोकांस फारसे सहन करावे लागले नाहींत.

औरंगजेबाच्या अखेरीस बरीच दुर्व्यवस्था झाली, तरी एकंदरीनें मोगलांच्या कारकिर्दींत देशांत बंडावे फारसे नव्हते. सरहद्दीवरील झगडे मात्र सारखे चालू होते. क्वचित् प्रसंगीं बंडखोर लोकांस क्रूर शिक्षा सहन करावी लागे; आणि गुन्हेगारांस तांत्रिक चौकशीनें शिक्षा मिळत. यत्किंचित् संशयावरून मोठमोठ्या कामदारांवरही जुलूम व अन्याय होई. असा प्रकार थोडाबहुत चालू असतांही, 'मोगलांच्या कारभाराचें सामान्य स्वरूप पूर्वीच्या प्राच्य रियासतींप्रमाणे जुलमी नव्हतें; एवढेंच नव्हे, तर अर्वाचीन अगर प्राचीन काळीं पाश्चात्य देशांत निपजलेले मोठमोठे बादशहा, आपणांस समाजसंरक्षक म्हणवून घेणारे मोठमोठे धर्माचार्य, प्रचंड सेनांचे पराक्रमी नायक, अगर जातिविशेषाचे वीर, ह्यांजशीं मोगल बादशहांची तुलना शोभण्यासारखी आहे.' मोगलांच्या राज्यकारभाराचा अंदाज करितांना दुसरी एक गोष्ट अवश्य

ध्यानात ठेविली पाहिजे, ती अशी, की औरंगजेब बादशहा मरण पावला त्या वेळेस, प्रत्यक्ष इंग्लंडात पूर्वीच्या जुलमी स्टुअर्ट राजाची कारकिर्द फिरून सुरू होण्याची भीति गेली नव्हती औरंगजेबाच्या वेळेस इंग्लंडात सुरू असलेले कायदे, विशेष बुद्धि खर्च करून लोकाचा छळ करण्याकरिताच उत्पन्न केले आहेत की काय, असें वाटणारे असून, ते त्या कडक स्वभावाच्या औरंगजेब बादशहास सुद्धा दुष्ट व अमानुष वाटले असते, आणि औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शेसवाशे वर्षेपर्यंत तसल्या कायद्याचा डाग इंग्लंडच्या कायदेसंग्रहातून धुतला गेला नव्हता ( ओवेन पृष्ठ ४९ ).

बादशहाच्या जुलमास आळा घालणाऱ्या कित्येक गोष्टी वर सांगितल्या त्याचें थोडेसे ज्यास्त स्पष्टीकरण करणें अवश्य दिसतें बंडे किंवा खून होण्याची भीति राज्यकर्त्यास असल्यामुळे त्याची लहर अगदींच विशृंखल होत नसे खाणेपिणें व इतर व्यवहार याजविषयीं अबुल्-फज्ल्च्या ऐने-अकबरींत इतके सूक्ष्म नियम सापडतात, कीं त्याजवरून बादशहावर विषप्रयोग व अन्य घोर प्रसंग येण्याची भीति पावलोपावली व्यक्त होते परंतु असले प्रसंग प्रत्यक्ष घडून आल्याचीं उदाहरणें मोगलाच्या इतिहासात फारशीं आढळत नाहींत. यावरून बादशहाचें वर्तन जुलमी अगर क्रूर नव्हतें असें मानण्यास जागा आहे. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर असे दुष्ट प्रकार वारंवार घडूं लागले, आणि राज्यकर्त्यांच्या नेभळेपणाचा परिणाम सर्वांसच भोवला प्रसिद्ध इतिहासकार ऑर्म ह्यानें अनेक दुष्ट घातपाताचीं वर्णनें आपल्या पुस्तकात दिलीं आहेत. विषप्रयोगाशिवाय बादशहास दुसरी भीति एखाद्या अपमान झालेल्या सरदाराची किंवा जातिविशेषाची असे विधर्मी लोकास दुखविणें सोपें नव्हतें. अफगाण लोकाच्या अनावर दुष्ट स्वभावास ताब्यात ठेवण्यासाठीं बादशहास विशेष जपावें लागे म्हणूनच सर्वांस संतुष्ट राखण्याचा कांहीं तरी मार्ग शोधून काढण्याकडे अकबरानें आपलें बुद्धिकौशल्य खर्चिलें त्यानें स्थापिलेल्या नवीन धर्मपंथाचा धार्मिक रीत्या विशेष उपयोग नव्हता, तरी राज्यव्यवस्था कायम राखण्यास त्याचा फारच उपयोग झाला अकबरानें निष्पक्षपाताची व्यवस्था सुरू केली, म्हणूनच पुढील राज्यकर्त्यांचा अल्प जुलूमही सहन करण्यास लोक नाखूष असत एकवार चांगल्याची गोडी लागल्यावर वाइटाचें दुःख विशेष वाटतें. ओवेनचें मत तर असें आहे, कीं औरंगजेबाच्या ज्या जुलमी

वर्तनास त्रासून राजपूत लोक त्याचे शत्रु बनले, जाठ लोक चिडून गेले, आणि मराठे लोकांच्या अंगीं नवीन त्वेष उत्पन्न होऊन शिवाजीस स्वतंत्र राज्य स्थापितां आलें, तें जुलमी वर्तन पाश्चात्य देशांतील त्या वेळच्या स्थितीशीं ताडून पाहतां, काहींच नव्हतें, आणि बादशहाच्या सामर्थ्यानें व बुद्धीनें त्या जुलमाचा प्रतिकार सहज होण्याजोगा होता. तरी अकबरानें लावून दिलेली सुखाशाच मोगलांस बाधक झाली. यावरून अकबराचें सद्वर्तन दूषणीय, व औरंगजेबाचें असद्वर्तन स्पृहणीय, असें समजावयाचें नाहीं. सद्वर्तन कायम ठेवून प्रजेस संतुष्ट राखणें हेंच राज्यकर्त्यांस भूषणावह आहे.

मोगलांच्या राज्यपद्धतीची रचनाच त्यांच्या स्वेच्छाचारावर दाब राखणारी होती. हाताखालच्या अंमलदारांस स्वातंत्र्य धारण करण्यास पाहिजे तितकी सवड असल्यामुळे बादशहास फार च जपून वागावें लागे. प्रधानांच्या सल्ल्याबाहेर त्यास वर्तन करिता येत नसे. मोठमोठे अधिकार, योग्यता आणि वाकबगारी असलेले, घरंदाज व पिढ्यानुपिढ्या काम केलेले उमराव लोक नेहमीं बादशहाजवळ असत. त्यांची सल्ला घेणें व तदनुसार वागणें बादशहांस अपरिहार्य असे. उमराव, खान किंवा बहादूर इत्यादि किताब व मानमरातब देणें हें जरी सर्वथैव बादशहाच्या मर्जीवर असे, तरी होतां होईपर्यंत असे मानमरातब वंशपरंपरा चालविणें बादशहास भाग पडे. अगदींच अयोग्य माणसास मोठेपणा क्वचित् प्राप्त होई. युरोपांतही असाच प्रकार घडून आल्याचें प्रसिद्ध इतिहासकार हॅलम ह्याने लिहिले आहे. घरंदाज वंशजांकडे सरदारी चालविल्यानें ते सरदार बादशहाशीं अनुरक्त राहत, आणि तेणेंकरून बादशहाची शक्ति वाढे. या पद्धतीचा उलट दिशेनें शेवटीं वाईट परिणाम होत गेला. तो असा, कीं राज्यांतील सर्वच नोकऱ्या वंशपरंपरेनें चालू झाल्या. युरोपांतही अशीच स्थिति झाली. एखादा मनुष्य केवळ स्वपराक्रमानें योग्यतेस चढल्यावर तो मेला असतां त्याची नेमणूक वंशपरंपरा न चालवितां ती खालसा करण्याचा मोगलांचा नियम ठरलेला होता. तरी स्वतःच्या फायद्यासाठींच मयत सरदाराच्या मुलांबाळांची तर्तूद करून त्यांजकडून बापाचें काम घेणें सोयीचें असे. देशांतील सर्व जमीन नांवानें बादशहाची असे. मोठमोठीं इनामें व जहागिरी तोडून दिल्यामुळें युरोपांतल्याप्रमाणें इकडेही लहान लहान सरदार व जहागीरदार अस्तित्वांत येऊन त्यांचें साह्य बादशहास मिळूं लागलें. राजपूत

सरदाराची स्थिति तर सर्वथैव युरोपातील मध्यकालीन जमीनदाराच्या स्थिती-सारखीच होती. जमीनदारास नाखुष करणें जसें यूरोपच्या राजास जड जाई, तद्वतच राजपूत राजास औरंगजेबानें दुखविल्याबरोबर बादशाहीचा अंत झाला

तथापि प्रत्यक्ष रीतीनें लोकांचे राज्यकारभारात अंग नव्हतें. मुकाट्यानें हुकूम ऐकून घ्यावा व स्वस्थ बसावें, ह्यापेक्षा दुसरा मार्ग त्यास नव्हता क्वचित् प्रसंगीं अगदीं हलक्या माणसाची सुद्धा बादशहाकडे दाद लागून कामदारांनीं केलेल्या अन्यायाचें निरसन होई परंतु अशी दाद मागण्याचा रस्ता इतका अवघड व संकटमय होता, कीं त्यामुळें लोकांना अन्यायनिरसनाचें साधन होतें असें म्हणता येत नाहीं असे असूनही धर्मस्वातंत्र्य, मालमत्तेचें संरक्षण, व ग्रामसंस्था, इत्यादि विषयास उद्देशून कित्येक प्रचार लोकांत चालत आले असून, आपण करूं ती पूर्वदिशा, असें करण्याचें मनांत आणिलें, तरी तसल्या प्रचारास झुगारून देणें बादशहास शक्य नसे औरंगजेबानें 'गरीब बिचाऱ्या हिंदु' स मनसोक्त दुखविल्यानें केवढा भयंकर प्रसंग गुदरला, हे मराठ्यांच्या इतिहासावरून कळून येतें

अकबरासारखा एखादा बादशहा लोकांस पितृस्थानीं वाटला, तरी सामान्यत मोगल बादशहाचें स्वरूप मोठ्या सेनानायकाप्रमाणें होतें त्यांनीं धारण केलेलीं भपकेदार नांवें लष्करी बाण्याचीं द्योतक होतीं राज्यांत बादशहाच्या लगेच खालचा मनुष्य म्हणजे मुख्य सेनापति होय सेनानीत्वाच्या लायकीवरच लोकांस प्रांताच्या सुभेदाऱ्या मिळत त्याचें लक्ष बहुतेक लष्कराच्या व्यवस्थेंत गुंतलेलें असे. इंग्लंडचा राजा पहिला वुइल्यम याचे सरदार, क्रॉम्वेलच्या हाताखालचे सेनानायक, व नेपोलियन बोनापार्टानें निरनिराळ्या देशांत नेऊन बसविलेले नवीन राजे, या सर्वांशीं मोगल सुभेदारांचें पुष्कळ साम्य आहे. उमराव वगैरे पदव्या क्वचित् प्रसंगीं इतर हुषारीवर जरी मिळत, तरी सन्मान, संपत्ति व सत्ता ह्यांच्या भांडाराची मुख्य किल्ली मिळण्यास लष्करी कसब अंगांत असावें लागे तो काल धामधुमीचा होता, हल्लींच्या सारखा शांततेचा नव्हता, म्हणून सरकारी नोकरांसच नव्हे, तर इतर सर्व लोकांसही स्वसंरक्षणार्थ बहुधा स्वत वरच अवलंबून राहवें लागे. राजपूत राजांस मोगल दरबारांत एवढा मान मिळूं लागला, आणि त्यांच्या मुलींचा जनानखान्यांत प्रवेश झाला, याचें इंगित असें आहे, कीं राजपूत लोक सामान्यत उत्तम लढवय्ये होते. तेव्हां वरील

योजनेनें बादशहास मदत करणारे भरंवशाचे लोक मिळूं लागले. दरबारची व्यवस्था, बादशहाचे व इतर लोकांचे सामान्य व्यवसाय त्यांवरूनही लष्करी बाणाच पदोपदीं व्यक्त होणारा होता. दररोज फौजेची झडती व हजिरी घेण्यांत, त्यांच्या सामानसुमानाची देखरेख करण्यांत, व अंमलदारांची योग्यायोग्यता तपासण्यात, प्रत्यक्ष बादशहाचा पुष्कळ काळ निघून जाई. द्वंद्वयुद्धें, साठमाऱ्या, क्रुद्ध जनावरांच्या टकरा, इत्यादि मनोरंजनाचे व वीर्योत्तेजक प्रकार बादशाही आगडांत एकसारखे सुरू असत. शिकारीचा नाद तर त्यांस अतोनात होता. ऐने-अकबरींत ह्याविषयीं पुष्कळ वर्णन आहे. राज्यकारभाराच्या इतर शाखांचें काम लष्करी पद्धतीवर बांधिलेलें असे. न्यायमंदिराचा देखावा हुबेहुब कोर्टमार्शल म्ह० लष्करी न्यायकोर्टासारखा असे. हल्लीं जीं कामें पोलीस लोक करितात, तीं त्या वेळेस लष्करी लोक करीत. इंग्रजांच्या अव्वल कारकिर्दींचें पोलीस सुद्धां अर्ध लष्करी असे, हे विदितच आहे. राजाचें अवाढव्य उत्पन्न लष्कराच्या खर्चाकडे खपून जाई. जेव्हां औरंगजेबानें मराठ्यांशीं प्रचंड युद्ध आरंभिलें, तेव्हां अकबरानें बांधून दिलेली खर्चाची पद्धति बिघडली; आणि त्या अपरिसमाप्य युद्धांत पैशाचा चूर होऊन लष्करास पगार वेळेवर मिळेनासा झाला, तेव्हांच मोगलांचा अंत समीप येऊन ठेपला. अबुल्फज्लनें जमिनीची मापणी केली, तेव्हां प्रत्येक प्रांतानें किती लोक लष्करांत पाठविले पाहिजेत, हें ठरवून दिलें. बहुतेक बादशहा युद्धकलेंत निपुण होते, हे मागें सांगितलेंच आहे.

८. **अधिकारविभागणी.**—प्रधानमंडळाची व्यवस्थाही अगदीं साधी होती. बादशहाजवळ नेहमीं चार प्रधान असत. ते चार व बादशहा मिळून एक कौन्सिल म्हटलें तरी हरकत नाहीं. पहिला वजीर म्हणजे मुख्य प्रधान: दुसरा, अमीर-उल्-उमरा म्हणजे मुख्य सेनापतिः तिसरा, दिवाण म्हणजे जमाबंदी कामदार (अकाउंटंट जनरल); आणि चवथा, कोतवाल म्हणजे पोलीस व खासगी मंडळ ह्यांचा मुख्य. पुष्कळ वेळां बादशहा बाहेरच्या सभ्य व वाकबगार लोकांची सल्ला घेई, तथापि वरील चार मुख्यतः जबाबदार असत. प्रांतांतील अधिकाऱ्यांवर शेवटचें अपील बादशहाकडे होई, आणि त्याचा निकाल करण्याकरितां तो दररोज वाड्यांतलि न्यायमंदिरांत येऊन बसत असे. त्या वेळच्या मानानें बादशहा हा सर्व मुसलमान प्रजाजनांचा मुख्य

खलीफा किंवा धर्माध्यक्ष, म्हणजे युरोपातील पोपसारखा होता असे म्हणण्यास चिंता नाहीं ह्या अधिकारामुळेच अकबरास नवीन धर्म स्थापण्यास अवसान आलें तथापि बादशहा सुनीपंथी असल्यामुळें शिया लोक त्यास मान देत नसत राजधानी शहरात दुसरे न्यायाधीश असत, ते काही प्रसंगीं बादशहास सल्ला देण्यास येत, आणि काही प्रसंगीं काजीच्या मदतीने स्वतंत्र न्याय करीत त्याशिवाय कमीजास्त कामदार नेमणे बादशहाच्या मर्जीवर असे

एकदर राज्याचे जे मोठे विभाग केलेले असत, त्यास ' सुभे ' अशी संज्ञा होती त्याजवरील अंमलदारास ' सुभेदार ' म्हणत अकबराच्या वेळेस राज्याचे पंधरा सुभे होते औरंगजेबाच्या वेळेस तीन सुभे वाढले त्यापैकीच कित्येक सुभेदार पुढे स्वतंत्र झाले राज्य सुव्यवस्थित चाललें होतें, तोपर्यंत प्रत्येक प्रांताची व्यवस्था सुभेदार जातीनिशीं आपल्या प्रांतात राहून पाहत असे. परंतु औरंगजेबानंतर राज्याचा ऱ्हासकाल सुरू झाला आणि पूर्वीच्या व्यवस्थेत कित्येक वाईट फेरफार घुसले बादशहाचें वजन कमी होऊं लागलें, तेव्हा प्रत्येक सुभेदार आपापसात वाढलेली स्पर्धा व वैमनस्यें याचा प्रतिकार करण्यासाठी राजधानींत बादशहासन्निध राहून नानातऱ्हेच्या खटपटी करूं लागला असे होऊं लागलें, तेव्हा प्रांताचा कारभार चालविण्यास डेप्युटी अगर दुय्यम नेमण्याची चाल पडली तसेंच एका इसमाकडे दोन दोन तीन तीन कामें सांगण्याचा अनिष्ट प्रघातही ह्या वेळेसच सुरू झाला पुढे प्रसिद्धीस आलेला निजामुलमुल्क् हा एकाच वेळीं माळवा, गुजराथ व दक्षिण ह्या तीन प्रांताची सुभेदारी व बादशहाची वजिरी, अशी नानाविध कामें स्वतःच्या नावाखालीं चालवीत होता ह्याचा अर्थ इतकाच, कीं धन्यात धनीपणा कायम न राहिल्यामुळे, हाताखालचे अंमलदार वाटेल तसे शिरजोर झाले अयोध्येच्या सुभेदाराकडे बादशहाची वजिरी वंशपरंपरा चालल्याचे त्याच्या वजीर ह्या किताबावरूनच व्यक्त होत आहे

कर्नल डो लिहितो, कीं ' बादशहाचे हुकूम प्रत्येक प्रांतात पाठविण्यात येत, तेथें ते जाहीरपणे सर्वांस वाचून दाखविल्यावर, अंमलबजावणीकरिता न्यायकचेरींत लावून ठेवीत ' परंतु ते पाळले जात असत किंवा नाहीं हे समजण्यास आधार नाहीं बादशहा वारंवार आपल्या भरंवशाचे तपासणीकामदार प्रांतोप्रांतीं पाठवीत असत राज्यात होत असलेले अन्याय व अंदाधुंदी बाद-

शहास कळविणें हें त्यांचें काम असे. आरंभीं अशा कामदारांच्या हातून चांगलीं कामें झालीं असतील; परंतु बर्नियरचें म्हणणें खरें धरिलें, तर औरंगजेबाचे तपासणी कामदार दुर्वृत्त होते असें दिसून येतें.

मोगलांच्या उत्तरकाळांत प्रांतावरील मुख्य अंमलदारास 'नबाब' म्हणण्याचा प्रघात पडला: आणि दोन चार प्रांत मिळून एक इलाखा अगर सुभा समजला जाऊन, त्याजवरील अंमलदारास सुभेदार अशी संज्ञा मिळाली. अर्थात् नबाब म्हणजे हल्लींच्या जिल्ह्याचा मुख्य अंमलदार, व सुभेदार म्हणजे हल्लींच्या इलाख्याचा मुख्य अंमलदार असें समजण्यास हरकत नाहीं. नर्मदेच्या दक्षिणेस मोगलांचे पुष्कळ जिल्हे असून, सर्व प्रांत मिळून एकच सुभा समजला जात असे. ह्याच दक्षिणच्या सुभ्याचें काम पाहत असतां निजामुल्मुल्क स्वतंत्र झाला, आणि कर्नाटकच्या नबाबास तो आपला अंकित समजूं लागला. प्रत्येक नबाबाच्या हाताखालीं फौजदार म्हणून लष्करी कामदार असत. ते सर्व प्रांतांतील लष्करी खर्चाची व ठाण्यांची देखरेख ठेवून आपल्या हद्दींतील बंडाचा वगैरे मोड करीत. दिवाण म्हणून दुसरे कामदार असत, त्यांचें महत्त्व इंग्रजांच्या भागांत समजणार आहे. सुभेदार, नबाब व फौजदार हे केवळ लष्करी पेशाचे इसम असल्यामुळें, सर्व प्रकारचें हिशेबी काम पाहण्यासाठीं प्रत्येकाजवळ दिवाण म्हणून एक कामदार असे. हा दिवाण म्हणजे हिशेबी कामदार किंवा अकौंटंट जनरल असें समजण्यास हरकत नाहीं. सुभेदाराजवळ असणाऱ्या दिवाणाचें वजन फार मोठें असे. सुभेदाराच्या हाताखालीं त्यास काम करावयाचें असे व त्याची नेमणूक बादशहाकडून होई. हिशेबी काम बिकट व विशेष अकलेचें असल्यामुळें दिवाणाची जागा प्रायः हिंदूंस देण्याचा प्रघात असे. म्हणून दिवाण हा सुभेदाराच्या वर्तनावर एक प्रकारें दाब ठेवणारा अधिकारी होता. राज्यांतील सर्वच नोकरांच्या नेमणुका खुद्द बादशहाकडून व्हावयाच्या असा नियम होता. कित्येक वेळां कामाच्या वगैरे सोयीसाठीं सुभेदारानें अगर इतर अधिकाऱ्यांनीं आपल्या हाताखालील नोकरांच्या नेमणुका तात्पुरत्या केल्या, तरी त्याजबद्दल कायमपणाचा हुकूम बादशहाकडूनच यावा लागे. असा मूळचा नियम व प्रघात असतांही, पुढील दुर्बळ बादशहांचे कारकिर्दींत प्रांतांवरील अधिकारी एकेक अधिकार बळकावूं लागले; तथापि त्यांनीं नेमिलेल्या इसमाचा कोणी प्रतिस्पर्धी वगैरे असल्यास, तो जाऊन बादशहाकडे

कागाळी करी आणि आपल्या दावेदाराची नेमणूक रद्द केल्याचें फर्मान बादशहाकडून घेऊन येई. डुप्लेच्या वेळीं इंग्रज व फ्रेंच यांजमध्ये प्रतिस्पर्धा सुरू झाली, तिचे मूळ बीज, ह्या हळू हळू बंद पडत जाणाऱ्या बादशहाच्या अधिकारात आहे एकाला काहीं कामगिरी मिळाली म्हणजे दुसऱ्याने ती हाणून पाडण्यासाठीं बादशहाकडे जाऊन खटपट करावी, आणि कैक वेळा खोटींच फर्मानें आणून वाद उपस्थित करावा, असा प्रकार घडूं लागला अशा प्रकारच्या तंट्यातच बंगाल प्रांताच्या दिवाणीचे काम ईस्ट इंडिया कंपनीस मिळाले

सुभेदार हा आपल्या ताब्यातील मुलखापुरते बादशहाचेच सर्व अधिकार वापरीत असे, आणि त्याच्या हाताखालील नबाब मुद्धा ठरलेला वसूल सुभेदारास दिला, म्हणजे आपल्या भागात प्राय स्वतंत्रच असे आरंभीं बादशहाची हुषारी व कडी नजर याजमुळे वरील व्यवस्थेत बरेच दिवस घोटाळा झाला नाहीं, तरी हाताखालचे माणसास वरिष्ठाचे हुकूम झुगारून देऊन सहज स्वतंत्र होता यावे अशा प्रकारचे त्या व्यवस्थेचे स्वरूप होते ह्या व्यवस्थेचा परिणाम वाईट होऊं नये, म्हणून मोगल बादशहा एक युक्ति योजीत असत वजीर, लष्करी कामदार, उमराव इत्यादिकास द्यावयाच्या जहागिरी त्याचा ज्या प्रांताशी काहीं एक संबंध नाहीं अशा प्रांतात देत. आणि त्यांच्या बदल्याही वरचेवर करीत अर्थात् जहागिरदार व सुभेदार किंवा नबाब ह्याचा एकमेकावर दाब पडावा अशी योजना करण्यात येई शिवाय बादशहाला दूरदूरच्या सर्व प्रांतातील इत्थंभूत बातमी दररोज लिहून पाठविणारे वाकनवीस मुद्दाम सर्वत्र भरपूर ठेविलेले होते त्याजकडून आलेलीं पत्रे वाचून जरूर ती व्यवस्था रोजच्या रोज करणे हे बादशहाचे मोठे महत्त्वाचें व निकडीचे काम असे प्रांतिक कामदाराच्या स्वैर वर्तनाला ह्या पत्रव्यवहाराच्या पद्धतीचा चागलाच आळा होता इंग्लंडचा राजा पहिला वुइल्यम ह्यानें आपल्या जहागिरदाराची अशीच योजना केली होती, हे इंग्लंडच्या इतिहासावरून कळून येणार आहे ऑर्मेचे मत असे आहे, कीं कामदारामध्ये परस्परात वैमनस्य असणे हे स्वत च्या संरक्षणाचे साधन असे बादशहा समजत हें जरी सर्वथैव खरे नसले, तरी पुढील नेभळ्या राज्यकर्त्यांच्या हातांतून थोडीथोडी सत्ता निघून जाऊं लागली, तेव्हा ते मुद्दाम परस्परांमध्यें द्वेषभाव वाढवून एकास दुसऱ्यावर उठवीत. पण अशा कृत्याने त्या भांडणातच स्वत चा

व आपल्या राज्याचा अंत होणार होता हें त्यांस दुर्दैवानें समजलें नाहीं. शिरजोर कामगारांच्या हातांत बाहुल्यांप्रमाणे खेळणारे ते बादशहा कशा हीन दशेस पोंचले होते हें ह्यावरून चांगलें व्यक्त होतें.

राज्यव्यवस्था सुरळीत होती, तोंपर्यंत सुभेदार व त्यांच्या हाताखालचे कामदार यांच्या जाग्यांवर लायक माणसाची नेमणूक होत असे. परंतु पुढें पुढें ही व्यवस्था बिघडल्यामुळे लोकांस त्रास झाला असावा यात संशय नाहीं. दूरदूरचे प्रांत व बादशहाचा मुक्काम ह्यांजमधील अंतर, पत्रव्यवहारास लागणारा विलंब, लांच वगैरे देऊन बादशहाच्या तपासणी-कामदारांची तोंडे बंद करण्याची युक्ति, नेमणुकींत कायमपणा नसल्यामुळें सद्दी आहे तोंपर्यंत हात मारून घेण्याची कामदारांची हांव, निरर्थक डामडौलास लागणाऱ्या खर्चाची पंचाईत, इत्यादि कारणांमुळें बादशाही कामदार रयतेस आपले त्राते असे न वाटतां, थोडे बहुत यमदूतांसारखे वाटत असत. बादशाहीच्या ऱ्हासकालांत तर लोकांच्या दुःखांस पारावार नाहींसा झाला. बादशहा केवळ नामधारी होऊन ते महत्वाकांक्षी व नयशून्य प्रधानाच्या हातांत बाहुल्यांसारखे खेळूं लागले, तेव्हां वरील कारणांचे परिणाम विशेष भयंकर झाले. सुभेदारांच्या नेमणुका करितांना चकचकीत लांच घेण्यांत येऊं लागला, तेव्हां तोच कित्ता त्यांनीं आपल्या प्रांतांत गेल्यावर सव्याज उचलावा यांत नवल काय? बर्नियर असें सांगतो, कीं औरंगजेबाच्या अव्वल कार्किर्दीत सुद्धां प्रांतांच्या सुभेदाऱ्या इजाऱ्यानें देण्याची वहिवाट होती. परंतु कर्नल डो आणि दुसरे ग्रंथकार यास हा प्रकार खरा वाटत नाही. सुभेदाऱ्या इजाऱ्यानें देण्याची वहिवाट वर्णितांना बर्नियरचा थोडा गैरसमज झाला असावा असेंच ओवेनचें मत आहे. सुभेदाराचा कित्ता त्याच्या हाताखालील नबाब, फौजदार, जमीनदार, पाळेगार वगैरेंनीं वळविला. अशा प्रसंगीं ग्रामसंस्थांची पद्धत जिकडे तिकडे अव्याहत चालू असल्यामुळें लोकांचें पुष्कळ तारण झालें. राजपुतांच्या राज्यांत मात्र असे घोटाळे विशेष माजले नाहींत. त्यांचे व्यवहार स्वतंत्रपणें व सुरळीत चालत.

वजिरी, सुभेदारी व लष्करी मनसबदारी, ह्या तीन बहुमोल कामांविषयीं सर्वांच्या तोंडास पाणी सुटत असे. तथापि ह्या तीनही नोकऱ्या बहुधा कायमच्या नसून केवळ बादशहाच्या मर्जीवर अवलंबून असत. परंतु मोगलांच्या

वसुलाची पहिली मुख्य बाब जमीनदस्त होय जमिनीचे मुख्य भाग दोन पहिला, सरकारी धाऱ्याच्या जमिनी, व दुसरा, इनाम किंवा जहागीर दिलेल्या जमिनी जमीन मापून ठरविलेल्या धाऱ्यास ‘ कमाल ’ म्हणजे उच्च दर अशी संज्ञा होती. अनावृष्टि वगैरे कारणांनीं जमिनींत उत्पन्न न झाल्यास सूट देण्यात येत असे कमाल दरातून सूट वजा जाऊन बाकी जे सरकार देणे ठरे, त्यास ‘ तनखा ’ म्हणत. दुसरी बाब सर्व प्रकारच्या मामूल हक्काची मयत जहागीरदाराची वतने त्याच्या वारसाकडे चालू करिताना सरकारात भरावयाचे नजराणे वगैरे बाबतीचा ह्यात समावेश होतो तिसरी बाब, इजारे व मक्ते यांची चवथी बाब व्यापाराच्या जिनसावरील जकातीची त्यास ‘ सायरदस्त ’ असे नाव देता येईल पाचवी व शेवटची बाब विशेष उत्पन्नाची आहे कोणीही इसम बादशहाकडे जाऊं लागला, म्हणजे रिकाम्या हाताने येण्याची त्यास मनाई असे नजराणा म्हणून त्यास काहीं तरी न्यावे लागेच अशा नजराण्याचे सालिना उत्पन्न लहान नव्हते अकबरासारखे सच्छील राज्यकर्ते मात्र आलेला नजराणा कोणत्या तरी रूपाने परत करीत

ह्या पाच बाबींपैकीं मुख्य बाब जमिनीची होय दर दहा वर्षांनीं जमिनीची पाहणी करून उत्पन्नाचा तिसरा हिस्सा सरकारात घ्यावयाचा अशी वहिवाट अकबराने घातली, तिचे वर्णन पूर्वी आलेले आहे

ह्या काळच्या सामाजिक स्थितीचे वर्णन पुष्कळ यावयास पाहिजे होते. परंतु तशी वर्णने उपलब्ध नाहीत सर्व प्रकारच्या लोकात सणावाराचे समारंभ मोठे डामडौलाचे होत असत बहुतेक घर व वाडे चौकटीचे असून सुंदर व मजबूद असत हल्ली ज्याप्रमाणे सरकारातून मोठमोठे किताब देण्याची वहिवाट आहे, त्याप्रमाणे त्या वेळीही असून चांगली नोकरी बजाविल्याबद्दल लोकास भूषणप्रद पदव्या मिळत कलाकौशल्य व व्यापार उदीम ह्याची किती भरभराट होती, त्याचे वर्णन ठिकठिकाणीं आलेच आहे एकंदरीत मोगल बादशहा प्रजेच्या सुखासाठीं झटणारे होते ह्यात संशय नाहीं

९. **संतमंडळ व तत्कृत ग्रंथसंग्रह** —मुसलमानी रियासतीच्या सहाशे वर्षांच्या काळात हिंदुस्थानात नानाप्रकारच्या राजकीय घडामोडी घडून आल्या त्याचप्रमाणे विद्या, धर्म, समाजस्थिति इत्यादि विषयामध्ये लोक केवळ निजून नव्हते ह्या बाबतींतही अव्याहत क्रान्ति चालू होती त्या

क्रान्तीचा प्रवाह कोणत्या प्रकारचा होता, म्हणजे तिचे परिणाम लोकसमुदायावर इष्ट घडत होते कीं अनिष्ट घडत होते, हे ठरविणें मात्र कठिण आहे. ह्या विषयीं खात्रीलायक माहिती उपलब्ध नाहीं. तथापि ह्या दिशेनें श्रम करूं इच्छिणारास अलीकडील नानाविध शोधांचा उपयोग मात्र पुष्कळ होईल यांत संशय नाहीं. आमचा धर्म व आमचा ग्रंथसंग्रह यांची सांगड फार निकट आहे. धर्मांच्या बाबतींत हिंदु लोकांत किती पंथ आहेत, याची नुसती कल्पना सुद्धां होणें दुर्घट आहे. त्याची थोडीबहुत कल्पना पाहिजे असेल तर वुइल्सनचे 'हिंदुलोकांचे धार्मिक पंथ' हे पुस्तक पाहवें. अनादिकालापासून चालत आलेला धर्म आपण पाळीत आहों, त्यांत आपण फेरफार केला नाहीं व करणारही नाहीं, असा जरी प्रायः लोकांचा समज होता, तरी अखिल सृष्टीच्या चलस्वभावास अनुसरून लोकांचीं धर्ममतें व आचार एकसारखे बदलत होते. कोणतीही गोष्ट स्थिर राहत नाहीं, तिच्यांत अव्याहत रूपांतरें चाललेलीं असतात. आपण होऊन तिचा ओघ इष्ट दिशेकडे वळविला नाही, तर तो कदाचित् अनिष्ट दिशेकडे जाईल, आणि त्याचे अनिष्ट परिणाम आपणास भोगावे लागतील. आपल्या धर्मसमजुतींत अनेक फेरफार आजपर्यंत झाले आहेत. सनातन हिंदुधर्मांतील व्यंगें दाखवून तीं दुरुस्त करण्याचे जसे आज प्रयत्न चालले आहेत, तसेच ते पूर्वींही चालले होते. जातिभेदाचे अनिष्ट परिणाम आजच आपणांस कळूं लागले असें नसून, शेंकडों वर्षांपासून ते मोडून टाकण्याकरितां पूर्वीं अनेक थोर पुरुषांनी जिवापाड खटपट केली. उपास्य देवतांची संख्या वाढलेली पाहून हळहळणाऱ्या अनेक साधुवर्यांनीं आपापल्यापरी खऱ्या परमेश्वरास ओळखण्याचे भिन्न भिन्न मार्ग प्रतिपादन केले. इकडे म्लेंच्छ लोकांचा ताबा ह्या देशावर बसून महंमदी धर्म हा नवीनच शत्रु हिंदुधर्मास उत्पन्न झाला. परंतु हिंदु व मुसलमान जसजसे एका ठिकाणीं राहूं लागले, तसतसें त्यांचें वैर कमी होऊन त्यांची एकमेकांविषयीं आदरबुद्धि वाढत चालली. दोनही धर्मांत ग्राह्य अंश पुष्कळ आहे असें उभय पक्षांकडील विद्वान् लोकांस वाटूं लागलें, आणि तदनुसार ह्या दोनही धर्मांचे एक रूप करण्याचा जबरदस्त प्रयत्न लोकांत चालू झाला. असे नानाविध प्रयत्न चालू असतां जे थोर पुरुष पुढें आले, त्यांनीं आपापलीं मतें स्थापित करण्यासाठीं अनेक सुंदर व मोलवान ग्रंथ लिहिले. संस्कृत, आरबी, फारशी, व हिंदुस्थानच्या सर्व देशी

भाषा याजमध्ये प्रचंड ग्रंथसंग्रह त्या काळीं निर्माण झाला अकबर बादशहाने सर्व धर्मांतील ग्राह्य भाग घेऊन नवीन धर्म स्थापिला हे मागे सांगितलेच आहे तो धर्म नवीनच स्थापण्यास त्यास स्फूर्ति झाली असे नाहीं धर्मक्रांति पाहिजे अशी त्या वेळीं चहूंकडे ओरड चालली होती तिकडे दुर्लक्ष करणे अकबरास अपरिहार्य होते लोकांच्या मागणीस त्याने अंत करणपूर्वक जबाब दिला एवढेच त्याचे कृत्य कांचीनगर, जगन्नाथ, द्वारका, काशी वगैरे मोठमोठीं नामांकित विद्यापीठे हिंदुस्थानातलि कित्येक भागात प्राचीन काळापासून अस्तित्वात होती अशा ठिकाणीं तयार झालेले विद्यार्थी सर्व देशात फिरत मोठमोठ्या राजदरबारात त्या विद्वानाची चहा होई येणेकरून विद्वान् लोकास पुढे येण्यास व कीर्ति प्राप्त करून घेण्यास त्या वेळी उत्तम साधने लोकाच्या हातात होतीं हल्लीं मुद्रणकला पुष्कळ फैलावली आहे, तरी ग्रंथप्रसिद्धि व्हावी तशी होत नाही नानाप्रकारचीं प्रसिद्धिपत्रे व वर्तमानपत्रातील जाहिराती सर्वत्र फडकत असता, व टपालाची उत्तम सोय उपलब्ध असता, त्या वेळीं एखादा खरा मोलवान ग्रंथ जितका पुष्कळ व जितका लवकर प्रसिद्ध होई, तितका आज होऊं शकत नाही, ही आश्चर्याची गोष्ट आहे. संस्कृत भाषा शिकण्याचे मोठे महत्त्वाचे दोन ग्रंथ म्हटले म्हणजे भट्टोजी दीक्षिताची 'सिद्धान्तकौमुदी,' व अमरसिंहाचा 'अमरकोश' हे होत त्या दोन ग्रंथावरून अध्ययन करण्याची पद्धति अद्यापि आहे व पूर्वी तर विशेष होती अमरसिंह सहाव्या शतकात व भट्टोजी दीक्षित चवदाव्या शतकात झाले. मुद्रणकलेच्या साह्याशिवाय व लेखनकलाही फारशी भरभराटींत नसता, हे दोनही ग्रंथ ग्रंथकर्त्यांच्या हयातींतच आसेतुहिमाचलपर्यंत प्रसिद्ध होऊन, अल्प काळात सर्वतोमुखी झाले यावरून त्या वेळीं पंडित लोकामध्ये अतिशय दळणवळण सुरू होते यात संशय नाही कांचीच्या पंडिताने एखादा नवीन ग्रंथ तयार करून काशीस जावे, तेथच्या विद्वानास तो पसंत पडला म्हणजे सर्वांनीं त्याचा स्वीकार करावा, आणि लगेच त्याची सर्व देशभर प्रसिद्धि व्हावी, असा त्या वेळचा प्रकार होता. सर्व प्रकारच्या शास्त्रामध्ये त्या वेळेस ग्रंथ निर्माण होत होते, तरी विशेषत: वेदान्त, भक्ति, उपासना, इत्यादि धर्मविषयक ग्रंथ तर अतिशय झाले एकाच जातीच्या लोकांनीं विद्यादेवीचे भांडार सांभाळणें समाजविघातक होय, म्हणून सर्वांस ज्ञान प्राप्त करून घेता यावे, जातिभेद

मोडून सर्वांनीं एकचित्तानें परमेश्वरास भजावें, परमेश्वराच्या दृष्टीनें सर्व प्राणी सारखे आहेत, उच्चनीच हा भेद त्याजकडे नाहीं, जेणेकरून ज्ञानवृद्धि होईल तो प्रकार सर्वांनी पत्करावा, इत्यादि मतें प्रतिपादन करणारे पुरुष व ग्रंथ दहाव्या शतकापासून निपजूं लागले. त्याच वेळेस एखाद्या सत्ताधीशानें वरील मतांस चांगले वळण देऊन, सर्वांस प्रिय अशा धर्माची कायम स्थापना केली असती, तर तें काम त्यास दुर्घट नव्हतें. परंतु तो काल अत्यंत धामधुमीचा होता. मोगल बादशहांचें राज्य स्थापन होईपर्यंत कोठेंच स्वस्थता नव्हती. अकबर राज्यावर येतांच देशांत स्वास्थ्य होऊं लागलें, आणि स्वभावतःच तो मोकळ्या मनाचा व लोकछंदानुसारी असल्यामुळे सभोंवार चाललेल्या प्रकारां-कडे त्यास डोळेझांक करवेना. त्यानें स्थापिलेला पंथ फार दिवस कां टिकला नाहीं हा प्रश्न निराळा, परंतु त्या वेळची लोकविचारांची स्थिति कशा प्रकारची होती, हें त्यावरून चांगलें व्यक्त होतें. अकबराच्या धर्मपंथात सर्व धर्मांतील चांगल्या मतांचा समावेश झाला होता खरा, परंतु सामान्य, अशिक्षित व अविवेकी जनसमूहाची इच्छा नुसत्या उच्च मतांनीं तृप्त होत नाहीं. त्यांची श्रद्धा बसण्यास त्यांत कांहीं तरी चमत्कृतीचा भाग पाहिजे, आणि नवीन घालून दिलेल्या नियमांचें त्यानीं उल्लंघन केल्यास त्यास काही तरी शासन पाहिजे. अकबरास अंतकाळीं विपन्नावस्था प्राप्त झाली, त्या योगें स्वतः त्याचें लक्ष त्या नवीन धर्मावरून थोडें बहुत उडालें. त्याच्या पुत्रपौत्रांनीं त्या बाबतींत विशेष विचार केला नाहीं. त्यामुळे तो धर्मपंथ जेथल्या तेथेंच राहिला. तथापि सर्व लोकांत ऐक्य उत्पन्न करण्याचा एक जबरदस्त प्रयत्न त्या वेळीं झाला ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे.

अकबर मरण पावल्यावर विचारी व विद्वान् लोकांचे धर्मसुधारणेचे प्रयत्न बंद पडले नाहींत. ब्रिटिश रियासतीच्या आरंभापर्यंत ते तसेच चालू होते; आणि ब्रिटिश अंमलांतही ते चालूच आहेत. दहाव्या शतकापासून निरनिराळ्या भाषांत ग्रंथवृद्धि होत होती असें सांगितलें, त्यावरून त्याच्या पूर्वी ती होत नव्हती असें नाहीं. परंतु तत्पूर्व कालाचा विचार करण्याचें प्रयोजन येथें नाहीं. ग्रंथसंग्रह निरनिराळ्या भाषांतून होत होता. आरबी व फारशी भाषास प्रत्यक्ष राज्यकर्त्यांचें भरपूर पाठबळ असल्यामुळे त्यांतील ग्रंथसंग्रह फारच वाढला. संस्कृत भाषा बोलण्यांत नव्हती, तरी तींतील ग्रंथरचना झपाट्यानें चालू

होती. आणि त्या शिवाय हिंदी, मागधी, बंगाली, मराठी, कानडी, तेलगू इत्यादि सर्व भाषात ग्रंथ लिहिण्याचे काम झपाट्याने चालले. ते समजण्याकरिता आपल्या धर्मपंथाचे थोडेसे विवेचन करणे अवश्य आहे. मराठी संतमंडळाचे विवेचन मराठ्याच्या भागात येईल येथे फक्त प्रकरण १९ कलम ६ चेच अनुसंधान करावयाचें आहे

आजकाल हिंदु लोकात जे धर्मपंथ प्रचलित आहेत, त्यांतील मुख्य हे. शंकराचार्यानीं घालून दिलेला वेदान्त मार्ग अनुसरणारे व सनातन हिंदुधर्म पाळणारे ह्याचा भरणा मोठाच आहे दुसरा वर्ग वैष्णवांचा, तिसरा शैवाचा; चवथा शाक्तांचा. पाचवा नानकशाही किंवा शीख लोकाचा, आणि सहावा जैनाचा. ह्याशिवाय गाणपत, सौरपत, सत्नामी, शून्यवादी इत्यादि अनेक पंथ आहेत, परंतु त्याच्या अनुयायाचा भरणा फारसा मोठा नाहीं वरील प्रत्येकात नानाविध पोटभेद आहेत ते येथे सागण्याचे प्रयोजन नाहीं. मोठे पुरुष व त्याचे ग्रंथ एवढ्याचा येथे विचार कर्तव्य आहे

**शंकराचार्यां**चा अवतार स १८८–८२० पावेतो झाला. येथें त्याने धर्मसुधारणेच्या कामीं पुष्कळ खटपट केली त्याने प्रचलित असलेल्या नानापंथाचे खंडण करून त्याने आपलं मत स्थापिले शंकराचार्यांच्या वेळेस शैव व वैष्णव हे दोनही पंथ भरभराटीत होते वैष्णवामध्ये जे पोटभेद आहेत, त्यात श्रीसंप्रदायी पंथ विशेष महत्त्वाचा आहे त्याची स्थापना बाराव्या शतकात **रामानुजाचार्या**ने केली ह्या पुरुषाविषयीं अनेक इतिहास प्रसिद्ध आहेत. तो दक्षिण हिंदुस्थानात राहणारा होता तत्पंथी लोक त्याला शेषाचा अवतार समजतात त्याचा काल स. ११५० पासून १२५० चे दरम्यान आहे. त्याचा जन्म पेरंबूर येथे होऊन काचीवरं येथे त्याने अध्ययन केले त्याचा पुढील काल कावेरी नदीवर श्रीरंगं येथे गेला. त्याने सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून शैव पंथाचे खंडण केले म्हैसुरात मैलकोटै किंवा दक्षिणबद्रिकाश्रम म्हणून देवालय आहे ते त्याने स्थापिले म्हैसूरचा जैनपंथी राजा वेतालदेव हा त्याचा अनुयायी झाला. रामानुजाने एकंदर ७०० मठ स्थापिले शिवाय त्याने स्थापिलेल्या अनेक गाद्या अद्यापि दक्षिणेत चालू आहेत ह्या पंथाचे लोकास दुसऱ्याने पाहिलेले अन्न चालत नाही, म्हणून ते एकातात भोजन करितात. त्याजमध्ये अनेक उपयुक्त ग्रंथ आहेत. प्रत्यक्ष

रामानुजानें व्याससूत्रांवर टीका म्हणून श्रीभाष्य, गीताभाष्य, वेदार्थसंग्रह, वेदान्तप्रदीप, वेदान्तसार वगैरे ग्रंथ लिहिले. व्यंकटाचार्य नांवाचा दुसरा एक पंडित झाला, त्यानें केलेले स्तोत्रभाष्य, शतदूषिणी, चंडमारुतवैदिका, त्रिशद्ध्यान व नारदाचा पांचरात्र वगैरे ग्रंथ नामांकित आहेत. पुराणांपैकीं तत्पंथी लोक विष्णुपर सहा पुराणें मानितात. बाकीचीं बारा पुराणें ते तामस समजतात. वर सांगितलेले सर्व ग्रंथ संस्कृत आहेत. परंतु मद्रासेकडील देशी भाषांत अनेक ग्रंथ झालेले आहेत. गुरुपर म्हणून एक ग्रंथ असून त्यांत रामानुजाचें चरित्र लिहिलें आहे.

चवदाव्या व पंधराव्या शतकाच्या दरम्यान दक्षिणेंत **रामानंद** म्हणून दुसरा एक विद्वान् साधु पुरुष निघाला. तो रामानुजपंथीच होता, पण शेवटीं त्यानें स्थापिलेला पंथ रामानुजीयांचा एक पोटभेद झाला. रामानंदी हे रामभक्त आहेत. स्वतः रामानंद सर्व हिंदुस्थानभर वैष्णवपंथाचें प्रतिपादन करीत फिरला. काशी येथें पंचगंगा घाटावर रामानंदाचा मठ होता, तो मुसलमानांनीं मोडिला; तथापि त्याच्या अनुयायांचे पुष्कळ मठ तेथें असून एक पंचायतसभा आहे. उत्तर हिंदुस्थानांतील वैष्णवाचे व्यवहार या सभेपर्यंत चालतात. रामानंदाच्या अनुयायांस रामावत अशी संज्ञा आहे.* रामानंदाचे बारा शिष्य पुढें फार प्रसिद्धीस आले. त्या सर्वांची संतमंडळींत गणना असून त्यांनीं जातिभेद व कित्येक अनाचार मोडून, धर्मांत पवित्रता आणण्याविषयीं फार खटपट केली. ते बारा शिष्य येणेंप्रमाणें—आशानंद, कबीर कोष्टी ( १४४०–१५१८ ), रोहिदास चांभार, रजपूत राजा पीपा, सुरसुरानंद, सुखानंद, भवानंद, धन्ना जाठ, सेना न्हावी, महानंद, परमानंद आणि श्यानंद. यांमध्यें सर्व जातीच्या मंडळींचीं नावें आहेत. त्यावरून रामानंदाच्या पंथांत सर्व जातीचा समावेश होत होता असें दिसतें. भक्तमाला नांवाचा हिंदी भाषेत एक मोठा सर्वमान्य ग्रंथ आहे, त्यांतही असें सांगितलें आहे, कीं रामानंदी पंथांत जातिभेद मानिला जात नाहीं. रामानंदानें आपल्या अनुयायांस 'अवधूत' अशी संज्ञा दिली. याचा अर्थ असा आहे, कीं संसार व समाज यांचे पाश जो तोडितो, त्यास माणसामाणसांत उच्चनीचत्व मानतां यावयाचें नाहीं.

* Historieal Position of रामानंद by Farguher J. R. A. S. 1920.

सारांश, हिंदूच्या रूढ आचारांच्या मुळाशींच रामानंदानें जबरदस्त प्रहार केला शंकराचार्य व रामानुज यानीं आपले ग्रंथ केवळ संस्कृत भाषेंत लिहिले. ब्राह्मणांशिवाय इतरास त्यानी आपल्या पंथात घेतले नाही परंतु रामानंदाने हा भेदाभेद मोडून टाकिला. त्याने स्वत लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध नाहींत. तरी त्याच्या अनुयायानीं सर्व देशी भाषात ग्रंथ लिहिले असून, पाहिजे त्या जातीच्या माणसास बैरागी, गुरु किंवा महंत होतां येते. रामानंदाला आणखीही पुष्कळ शिष्य होते, परंतु त्यांनीं निराळे पंथ स्थापिले नाहींत, म्हणून त्यांचीं नावे पुढे आलीं नाहींत.

वर सागितलेला पीपा हा गाग्रौणचा राजा असून देवीभक्त होता. संसारत्याग करून तो रामानंदाबरोबर फिरूं लागला त्याची बायको सीता ही त्याच्यासारखीच साध्वी असून, त्याच्याबरोबरच संन्यास-वृत्ति धारण करून राहत होती पीपा व इतर भक्त ह्याच्या लीलाचे सुरस वर्णन भक्तमालेमध्ये आहे. रामानंदानंतर आशानंद हा त्याच्या गादीवर बसून महंत झाला

भक्तमाला हा ग्रंथ **नाभाजी**ने लिहिला. नाभाजी हा जातीचा डोंब असून जन्माध होता अग्रदास व कील ह्याच्या प्रसादाने त्यास साधुत्व प्राप्त झाले अकबराचा सरदार जयपुरचा राजा मानसिंह याच्या वेळेस म्हणजे सतराव्या शतकाच्या आरंभी तो होता नाभाजीप्रमाणेच **सुरदास** हाही एक मोठा कवि असून तो जन्माध होता (१४८३–१५५०), तो रामानंदपंथी असून त्याने पुष्कळ कवने केलीं आहेत भजनाच्या वेळेस सुरदासाचीं पदे लोक मोठ्या आवडीने गातात. आंधळे भिकारी भिक्षा मागत फिरत असता सुरदासाची पदे गातात, म्हणून अशा भिकाऱ्यास सुरदासी म्हणण्याचा प्रघात आहे सुरदासाने एकंदर सव्वालक्ष पदे लिहिली बनारसच्या उत्तरेस शिवपुर येथे त्याची समाधि आहे. **तुलसीदास** म्हणून दुसरा एक साधु (१५३२–१६२४) वेळेस होऊन गेला. त्याच्या बायकोने त्याचे मन रामभक्तीकडे वळविलें तोही मोठा कवि असून देशोदेशीं फिरत असे जुने दिल्ली शहर सोडून नवीन शहर वसविण्याविषयीं त्याने शहाजहान बादशहापाशीं विनंति केली, आणि तदनुसार शहाजहान बादशहाने हल्लीचे दिल्ली शहर नवीन वसविले असे म्हणतात नाभाजीबरोबर तुलसीदास हा वृंदावन येथे राहत असे या ठिकाणी राहून त्यानें लोकामध्ये सीतारामाची भक्ति वाढविली तुलसीदास हा मूळचा सर्यार्थ जातीचा

ब्राह्मण असून चित्रकूटनजीक हाजीपुरचा राहणारा होता. मोठा झाल्यावर हा कांही दिवस बनारसच्या राजाजवळ दिवाण होता. तुलसीदासानें हिंदी भाषेत प्रचंड ग्रंथ लिहिले आहेत. तुलसीदासाइतके सर्वमान्य कवि संस्कृत भाषेंतही थोडेच आहेत. एकतीस वर्षांचा असतांना ( स. १५७५ त ) त्यानें रामायण रचण्यास सुरुवात केली. तुलसीदासाचें रामायण अत्यंत सुरस असून पुष्कळ लोक मोठ्या आवडीने वाचतात. सप्तशति, रामगुणावलि, सीतावलि, विनय-पत्रिका व अनेक पदें आणि इतर कवनें तुलसीदासानें लिहिलेली आहेत. त्यानें बांधिलेलें सीतारामाचें देऊळ व मठ अद्यापि बनारस येथें आहेत. तुलसीदास स. १६२४ त मरण पावला. ह्यावरून शहाजहानची व त्याची भेट झाली असल्यास, त्या वेळीं शहाजहान हा बादशहा झालेला नव्हता.

खाकी, मलूकदासी, व दादूपंथी असे वैष्णवात आणखी पोटभेद आहेत; परंतु ते फारसे प्रसिद्ध नाहींत. आपल्या अंगांस व कपड्यांस खाकी रंग लावीत असल्यामुळें त्यांस खाकी हें नांव प्राप्त झालें. हा पंथ कील ह्यानें स्थापन केला. मलूकदास हा मोठा साधु होऊन गेला. जगन्नाथ येथें त्याची समाधि आहे. दादूपंथाचा पुरस्कर्ता दादू हा जातीचा पिंजारी असून अहंमदाबादेस जन्मला होता. तो अकबर व जहांगीर ह्यांच्या वेळेस होता. मारवाड व अजमीर इकडे दादूपंथी लोकांचा भरणा बराच आहे. **रोहिदास** चांभार यास रविदास असेंही म्हणतात. दक्षिणेंतील रोहिदास चांभार प्रसिद्ध आहे, तोच हा असावा. चितोडची राणी ‘ झाली ’ ही ह्या रविदासाची शिष्य होती. **सेना न्हावी** हाही रामानंदाचाच शिष्य. पण ह्याने पृथक् पंथ स्थापिला. बांधवगडचे राजे ह्याच्या शिष्यांपैकीं होते. ह्याजविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं.

येथवर सांगितलेले वैष्णवपंथ रामोपासक व बहुतेक संन्यासवृत्ति धारण करणारे आहेत. परंतु सुखवस्तु सामान्य लोकांचा विशेष भरणा राधाकृष्णाची पूजा करणारा असून ते **वल्लभाचार्या**स आपला संस्थापक मानितात. वल्लभाचार्य हा तैलंग ब्राह्मण. हा सोळाव्या शतकाचे आरंभीं झाला. मथुरेच्या पूर्वेस तीन कोस यमुनेच्या वामतीरीं गोकुळ म्हणून स्थळ आहे, तेथें हा आरंभी कांहीं दिवस राहत असे. पुढें लोकांस उपदेश करीत हा सर्व हिंदुस्थानभर फिरला. विजयनगरचा राजा कृष्णदेव ह्याजकडे तो स. १५२० च्या सुमारास

होता त्या ठिकाणी त्याने शैव गुरूंना वादात हरविले, तेव्हापासून त्यास लोक आपला आचार्य म्हणूं लागले पुढे उज्जनी, वृंदावन इत्यादि ठिकाणीं त्याने अनेक दिवस घालविले कृष्णाच्या पूजेची प्रसिद्धी करणारा हा पहिला मोठा पंडित होय. मनुष्याचे सुखविलास परमेश्वरासही आवडतात व ते सर्वांनीं अवश्य करावे, ही गोष्ट मूळ वल्लभाचार्यांने शिकविली निरनिराळ्या कृष्णलीला व गोपीनृत्य हींही यानेच सुरू केलीं या पंथाचे लोक भागवतपुराण प्रधान मानितात. ह्या पुराणावर ‘ सुबोधिनी ’ नांवांची टीका वल्लभाचार्यांने लिहिलेली आहे शिवाय व्याससूत्रावरील भाष्य, सिद्धान्तरहस्य, आणि एकात-रहस्य वगैरे ग्रंथ वल्लभाचार्यांचे आहेत त्याच्या शिष्यमंडळींनीं लिहिलेले ग्रंथही अनेक आहेत, जसें व्रजविलास, वार्ता इत्यादि वल्लभाचार्यांचा मुलगा विठ्ठलनाथ हा त्याचे मागून मोठा उपदेशक झाला विठ्ठलनाथास पुष्कळ पुत्र असून ते भक्तमंडळात नावाजलेले आहेत ह्या पंथाच्या लोकाचा भरणा गुज-राथ व माळवा या प्रातात विशेष आहे जगन्नाथ, द्वारका, काशी, वृंदावन इत्यादि ठिकाणीं ह्याचे मोठे मेळे भरतात.

मेडताचा राजा रतनसिंह याची मुलगी **मीराबाई** इची गणना भक्तमंडळात असून तिचा ज १४९९ त व मृ १५४४-४७ चे दरम्यान झाला. लहान पणा-पासून तिची प्रवृत्ति ईश्वरभजनाकडे होती राणासंगाचा वडील मुलगा भोजराज याच्याशीं तिचे लग्न स. १५१६ त झाले पण नवरा लवकरच वारला व राणा-संगाचा पराभव होऊन हिंदूंची वाताहत झाली, त्यात मीराबाईस सासरीं जाच होऊं लागला तेव्हा स १५२८ त ती काशी वृंदावनचे यात्रेस गेली आणि तेथून स १५३२ त द्वारकेस जाऊन कायमची राहिली तिनें अनेक भक्तिपर-कवनें मारवाडी, मेवाडी, व्रज व गुजराथी अशा चारही भाषांत केलीं तीं फार प्रेमळ आहेत अकबर व तुलसीदास याच्या मीराबाईशीं भेटी झाल्याचा समज आहे तो खरा नाहीं

वैष्णवामध्ये **मध्वाचार्य** म्हणून दुसरा एक मोठा पंडित निपजला. त्याचा जन्म इ. स ११९९ त झाला. तोही मोठा कृष्णभक्तच होता त्याने भगवत्-गीतेवर भाष्य लिहिले मध्वाचार्यांचा पंथ मोठा आहे तो आरंभीं शैव असून मागाहून वैष्णव झाला असावा असे वाटते उत्तरहिंदुस्थानातील राधाकृष्णाची पूजा करणारे कित्येक वैष्णव निंबादित्य नांवाच्या साधूस भजणारे आहेत.

बंगालप्रांतांतील वैष्णव, इतर भागांतील वैष्णवांपेक्षां बरेच भिन्न आहेत. पंधराव्या शतकाचे अखेरीस नदिया व शांतिपुर येथें अद्वैतानंद व नित्यानंद नांवाचे दोन मोठे विद्वान् ब्राह्मण लोकांस धर्मोपदेश करीत असत. त्यांस **चैतन्य** नांवाचा तिसरा एक ब्राह्मण उपदेशक मिळाला. चैतन्याचीं अनेक चरित्रे बंगाल प्रांतांत प्रसिद्ध आहेत. तो सोळाव्या शतकांत होता. वल्लभाचार्यांच्या मुलीशीं चैतन्यानें लग्न केलें असें लिहिलेलें आहे. मथुरा, जगन्नाथ व बंगाल-प्रांत इत्यादि ठिकाणीं कृष्णोपासना शिकवीत तो फिरत असे. तो सन १५२७ त वारला. बंगालचे वैष्णव वर सांगितलेल्या तीन पंडितांस आपले प्रभु समजतात. चैतन्याच्या उपदेशाचा मुख्य विषय भक्ति होय. मुसलमानांस सुद्धां तो आपल्या पंथांत घेत असे. जातिभेद न मानितां सर्व माणसें सारखीं आहेत असें तो शिकवी. वरील पंडितत्रयानें लिहिलेले ग्रंथ उपलब्ध नाहींत, तरी या पंथानें आधारभूत मानिलेले अनेक ग्रंथ संस्कृत व बंगाली भाषांत आहेत. रूप व सनातन असे चैतन्याचे दोन पट्टशिष्य होते. त्यांनीं शेंकडों ग्रंथ लिहिले आहेत. शिवाय चैतन्याच्या शिष्यांत सहा गोसावी म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांनींही अनेक ग्रंथ लिहिले. बंगाली ग्रंथसंग्रहांत हे विशेष महत्त्वाचे आहेत.

**चरणदास** म्हणून दिल्ली शहरांत दुसऱ्या आलमगीरच्या वेळेस एक विद्वान् वैश्य व्यापारी होता. लोकांस उपदेश करूं लागल्यावरून त्याचाही वैष्णवात एक निराळाच पंथ झाला आहे. ह्या पंथाचा ग्रंथसंग्रहही मोठा असून प्रत्यक्ष चरणदासानें लिहिलेले कित्येक ग्रंथ आहेत. ह्यांशिवाय वैष्णवांचे आणखी पुष्कळ पंथ आहेत. आतां शैवांत मोठमोठे पुरुष कोण झाले. तें पाहवयाचें.

शिवाला भजणारे लोक वैष्णवांहून जुने खरे. दक्षिण हिंदुस्थानांत त्यांचा प्रसार पुष्कळ होता. ब्राह्मणांशिवाय इतरांचा शैवपंथांत फारसा प्रवेश झालेला नाहीं. शैव लोक शंकराचार्यास आपला मूळ उत्पादक समजतात. शंकराचार्यांनें प्रतिपादिलेलीं मतें प्रसिद्ध करणारे त्याचे स्वतःचे ग्रंथ पुष्कळ आहेत. शिवाय आनंदगिरी, माधवाचार्य हेही या पंथाचे ग्रंथकार मोठे झाले. माधवाचार्यांचें वृत्त मागें विजयनगरप्रकरणीं आलेंच आहे. दत्तात्रेयाची पूजा करणारेही शैवांत गणले जातात. तथापि दत्तात्रेयाला भजणारे वैष्णवही नाहींत असें नाहीं. कानफाटे जोगी किंवा योगी या नांवाचा शैवांचा एक पोटभेद उत्तर हिंदुस्थानांत विशेष प्रसिद्ध आहे. ते गोरखनाथास भजतात. गोरखपुर येथें ह्या

साधूचे देवालय आहे गोरखनाथ व कबीर हे एका वेळेस म्हणजे पंधराव्या शतकाच्या आरंभीं होते. **गोरखनाथ** हा मत्स्येन्द्रनाथाचा मुलगा, व आदिनाथाचा नातू तो बराच विद्वान् होता. संस्कृत भाषेंत लिहिलेले त्याचे दोन ग्रंथ आहेत. एक गोरक्षशतक व दुसरा गोरक्षकल्प जंगम म्हणून आणखी एक पंथ आहे, त्याचे ग्रंथ कानडी व तेलगू वगैरे भाषात पुष्कळ आहेत. लिंगायत हा जंगमाचाच एक भाग होय. हे म्हैसुराकडे पुष्कळ आहेत. व्यासाच्या सूत्रावर नीलकंठाचे भाष्य आहे ते उत्तरेकडे जंगम लोक आधारभूत मानितात शाक्त किंवा देवीभक्त म्हणून एक पंथ आहे, त्याची प्रवृत्ति पूर्वी फार होती धर्माचरणाच्या नावावर ते पुष्कळ अनन्वित कृत्यें करीत व तसलीं दुष्कृत्ये समर्थन करणारे ग्रंथही त्या वेळेस पुष्कळ झाले ते तंत्रग्रंथ ह्या नावाने प्रसिद्ध आहेत तंत्रग्रंथानीं लोकामध्ये अनेक प्रकारचा अनाचार वाढविला शैवामध्ये आणखी लहान पोटभेद पुष्कळ आहेत, पण त्याचे महत्त्व अलीकडे अगदींच कमी होऊं लागले आहे.

शैव आणि वैष्णव याच्याशिवाय हिंदुस्थानात विशेष प्रसिद्धीस आलेला धर्मपंथ शीखाचा होय त्याचा संस्थापक गुरु **नानक** हा स.१४६९त जन्मला शीखाची हकीकत अन्यत्र द्यावयाची असल्यामुळे येथे पुनरावृत्तीची जरूर नाही हिंदुमुसलमानाचें ऐक्य करून नवीन राष्ट्रीय जोम लोकात उत्पन्न करणारा मुख्य पंथ हिंदुस्थानात शीखाचाच होय. शीखाचे ग्रंथही बहुत आहेत, आणि त्याचा लोकाच्या मनावर निःसंशय मोठा परिणाम झाला. त्या वेळच्या इतर साधूंचे ग्रंथही शीख लोक मानितात

दुसरा मोठा पंथ जैनाचा होय जैनाची उत्पत्ति फार प्राचीन आहे त्यांचा उत्पादक महावीर वर्धमान हा बुद्धाचा समकालीन होता जैनाचा ग्रंथसंग्रह मोठा व तो बहुतेक सर्व भाषात आहे. त्याचीं स्वतःचीं पुराणे आहेत, जसे आदिपुराण, उत्तरपुराण, चामुंडरायपुराण, चतुर्विंशतिपुराण, वगैरे. **हेमचंद्र** नावाचा एक मोठा जैन ग्रंथकार बाराव्या शतकात होऊन गेला दक्षिणेतील जैन पुराणे नवव्या शतकात झाली कल्पसूत्र नावाचा ग्रंथ बाराव्या किंवा तेराव्या शतकात लिहिला असावा नवव्या व दहाव्या शतकात धार येथें मुंज आणि भोज हे राजे राज्य करीत असता त्याच्या पदरीं मोठमोठे जैन पंडित होते. अकबराच्या वेळेसही जैन ग्रंथ पुष्कळ होत होते. जिनपतिसूरि,

जिनेश्वर, जिनचंद्र वगैरे अलीकडचे मोठे जैन उपदेशक होत. **जिनचंद्र** अकबराचे वेळेस होता. हर्षसूरि वगैरे कित्येक सत्राव्या शतकांतले आहेत.

ह्यांशिवाय इतर पंथ, साधु व ग्रंथ अनेक आहेत. जहांगिरच्या वेळेस माळव्यांत **बाबालाल** म्हणून एक क्षत्रिय जन्मला. हा मोठा साधु असून दाराशेखो ह्याचा गुरु होता. ह्या गुरुशिष्यांचे संवादग्रंथ फारशी भाषेंत लिहिलेले आहेत. **प्राणनाथ** म्हणून दुसरा एक क्षत्रिय साधु औरंगजेबाचे उत्तर कार्किर्दीत होता. त्यानें हिंदुमुसलमानांचें ऐक्य करण्याची खटपट करून नवीन पंथ स्थापिला. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल ह्याजवर त्याचें विशेष वजन होतें. बीरभान नांवाचा दुसरा एक साधु १६५८ चे सुमारास उपदेश करीत होता. औरंगजेबाच्या कार्किर्दीत सत्नामी नांवाच्या बैराग्यांनीं दंगा केला असें सांगितलें आहे, त्या सत्नामी पंथाचा उत्पादक जगजीवनदास म्हणून एक अयोध्या प्रांतांतला क्षत्रिय साधु होता. त्यानें हिंदी भाषेंत बरेच ग्रंथ लिहिले आहेत. शिवनारायणी म्हणून दुसरा एक पंथ आहे, त्याचा उत्पादक शिवनारायण हा महंमदशहाचे वेळेस झाला. त्याचे ग्रंथ पुष्कळच आहेत. नादीरशहानें हिंदुस्थानावर स्वारी केली, त्या वेळचे ते आहेत.

येथवर धर्मप्रवर्तक ग्रंथांचें दिग्दर्शन झालें. यांशिवाय न्याय, व्याकरण, अलंकार, तत्त्वशास्त्र, धर्मशास्त्र वगैरे विषयांवर झालेले ग्रंथ विपुल आहेत. ब्राह्मणेतर संस्कृत ग्रंथकार फारसे आढळत नाहींत. चोहोंकडे राज्यांची उलथापालथ, बंडाळी व रक्तपात ह्यांची सतत आवृत्ति चालू असतां, मध्यें असले थोर थोर ग्रंथकार निपजत होते. सभोंवार चाललेल्या भानगडींची त्यांस दाद नसून, त्यांची परवा न करितां, ग्रंथकारांनीं आपला उद्योग चालू ठेविला, हें नवल आहे. एकंदरींत मुसलमानी रिसायतीच्या काळाची लोकस्थिति व वाङ्मय ह्यांचा इतिहास, शोधक व विचारी विद्वानांच्या हातून लिहिला जाईल, तर त्याचा राष्ट्रास मोठा उपयोग होईल.

---

# प्रकरण अठ्ठाविसावें



## मोगल बादशाहीवर प्रवाशांचे अभिप्राय

१. पाश्चात्य प्रवासी, रे. टेरी  २. पीट्रो डिला व्हेल
३. मंडेल्स्लो व बर्नियर  ४. जॉन बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर.
५. डॉ. जॉन फ्रायर.  ६. थिवेनॉट, कॅ. हॅमिल्टन
७. कार्स्टन नीबर

**१ पाश्चात्य प्रवासी रे० टेरी.**—सामान्य जनसमूहाची स्थिति मोगलांच्या वेळेस कशी होती हे समजण्यास फारसा मार्ग नाही. तथापि युरोपीय प्रवाशांनीं लिहिलेली बरीच माहिती आहे. मोगलांच्या वेळेस युरोपीय राष्ट्रांतील पुष्कळ लोकांनीं हिंदुस्थानांत प्रवास करून परत गेल्यावर आपलीं प्रवासवृत्तें प्रसिद्ध केलीं. सामान्यतः एतद्देशीय लेखापेक्षा पाश्चात्यांचें वर्णन तिऱ्हाईत या दृष्टीनें विशेष मार्मिक असतें. पुष्कळ प्रवासी जिज्ञासु व धूर्त होते. हे प्रवासी निरनिराळ्या उद्देशानें हिंदुस्थानांत आले. कित्येकांचीं नांवें मागें आलीं आहेत. रे० टेरी नांवाचा एक प्रॉटेस्टंट इंग्रज पाद्री, डिला व्हेल नांवाचा एक रोमचा सुखवस्तु गृहस्थ, टॅव्हर्नियर नामक एक फ्रेंच जवाहिऱ्या, थिवेनॉट म्हणून एक फ्रेंच गृहस्थ, फ्रायर नांवाचा इंग्रज शस्त्रवैद्य, अलेक्झांडर हॅमिल्टन नामक जहाजाचा नाखवा, कार्स्टन नीबर नांवाचा एक प्रसिद्ध जर्मन कारागीर, इत्यादि प्रवाशांचीं वर्णनें उपलब्ध आहेत. हे सर्व निरनिराळ्या वेळीं इकडे आले. निरनिराळ्या हेतूंनीं व दृष्टींनीं त्यांनीं आपलीं वृत्तें लिहिलीं, त्यांनीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत भिन्न काळीं पर्यटन केलें. ह्यामुळें त्यांचे लेख बरेच महत्त्वाचे व मनोरंजक झाले आहेत. बऱ्याच लेखांच्या हल्लीं इंग्रजींत सुंदर आवृत्त्याही निघाल्या आहेत.

**रे० टेरी**, हा सर टॉमस रोच्या वकिलातीबरोबर पाद्री होता, तो सन १६१५ पासून १६१८ पर्यंत इकडे राहिला. हिंदुस्थानामध्ये हरएक-

प्रकारचे भोज्य पदार्थ अत्यंत स्वस्त व विपुल आहेत, हें पाहून त्या सशक्त भोजनभाऊ भिक्षुकास फारच आश्चर्य वाटलें. तो लिहितो कीं हिंदुस्थानांत गहूं, तांदूळ व दुसरीं सर्व प्रकारचीं धान्यें उत्तम प्रकारचीं होऊन तीं फार स्वस्त मिळतात. येथील गव्हांची भाकर विलायतेंतल्यापेक्षां शुभ्र होते. इकडे लोक लोखंडी तव्यावर ताज्या पोळया भाजून खातात, आणि दहीं घुसळून लोणी काढितात, ह्याचा त्यास मोठा चमत्कार वाटला. बहुतेकांच्या घरीं गाई, मेंढ्या, बकऱ्या वगैरे दुभतीं जनावरें असून हरिण, ससे वगैरे अनेक जनावरांचे मांस विपुल मिळतें. अशा खाद्य जनावरांस पाळींव अरण्यांत राखण्याचें कारण पडत नाहीं. सर्व देशभर जंगलांतून त्यांची वस्ती विपुल आहे. पाहिजे त्यास शिकार करण्याचें सामर्थ्य व मोकळीक असल्यामुळें त्या जंगली जनावरांचा शेताभातांस उपद्रव होत नाहीं. तरी विंचू, माशा, मगर, मच्छरें इत्यादिकांचा त्रास फार आहे. सर्व प्रकारच्या खाद्य पक्ष्यांची व मत्स्यांची विपुलता आहे. हे प्राणी विपुल असल्यामुळें व बऱ्याच लोकांत मांसाहार निषिद्ध असल्यामुळें, मांस बहुतेक बिनमोल मिळतें असें म्हणण्यास चिंता नाहीं. पण हिंदुस्थानांतला बहुतेक माल त्यांस रोख चांदी देऊन विकत घ्यावा लागतो. देशांत पैसा येण्याचीं अनेक द्वारें सतत वाहत असून, येथील पैसा बाहेर नेणें हा मोठा गुन्हा समजला जात असे. हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत त्या वेळीं ह्या गुन्ह्याबद्दल सक्तीचे कायदे केलेले होते.

टेरीच्या मतें लोकांच्या वाटेस कोणी गेलें नाहीं, तर ते फार सौजन्यानें वागतात. कांहीं दिवसांनीं रे० टेरी सुरतेहून मांडवगडास गेला. त्याबरोबर बादशहास देण्याचे नजराणे असून, वीस एतद्देशीय शिपाई व सहा गाडे एवढा सरंजाम होता. हा प्रवास सुमारें चारशें मैलांचा होता. रात्रीं मंडळींचा मुक्काम रस्त्यावर होई, तेव्हां सभोंवार गाडे लावून मध्यें राहुट्या लावीत. रात्रभर पाळीपाळीनें त्यांस पहारा करावा लागे. विशेष धोक्याचा प्रसंग वाटल्यास शेजारच्या गांवांतून घोडेस्वारांचा पहारा मिळण्याविषयीं त्यांजजवळ परवाना होता. परंतु अडचणीचा प्रसंग आल्याशिवाय त्यांचा प्रवास तडीस गेला. एके टिकाणीं मात्र गांवचे लोक, नको म्हणून सांगितलें असतां बळजबरीनें पहारा करण्यास आलेः आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं मजुरी मागूं

लागले ती देत नाहीं म्हटल्यावर तीनशें लोकानी मिळून टेरीचे गाडे अडविले. तेव्हा एका इंग्रजानें आपली बंदूक रोखिली तिकडे त्या लोकानींही आपले धनुष्यबाण सज्ज केले इतक्यात असें समजलें, कीं दीड रुपया बक्षीस दिल्यास सर्व लोक खुष होऊन जातील लगेच त्याप्रमाणें बक्षीस घेऊन लोक चालते झाले

परंतु माडवगड व सुरत यामधील पहाडी प्रदेशात दरवडेखोराची वस्ती असल्यामुळें, प्रवासी लोकास बलुची, पठाण, राजपूत इत्यादि जातींच्या भिपाड लोकाचा पहारा बरोबर घ्यावा लागे हे लोक इतके इमानी असत, कीं ताब्यातील मालाचें व माणसाचे रक्षण करण्यात ते स्वत मरण्यास तयार असत टेरी असें सागतो, कीं असा पहारा असला म्हणजे सोनें व जवाहीर घेऊन सुद्धा पाहिजे त्या परकी इंग्रज मनुष्यास सुरतेहून लाहोरासही सहज एकटे जाता आलें असतें, आणि पहारेकऱ्यास त्याची ठरीव मजुरी दिली, म्हणजे त्यानी सुतळीच्या तोड्यास सुद्धा हात लाविला नसता हिंदुस्थानातील नोकरलोकाचें इमान विलक्षण आहे, असें रे० टेरी सागतो सामान्यत त्याचा पगार सुमारें अर्धाच रुपये दरमहा असून तो बहुशः दर प्रतिपदेस आगाऊ द्यावा लागे. फौजेत असंख्य लोक आहेत तिजवरील अधिकारी युद्धकलेंत निष्णात नाहीत सेनानायकास युद्धकलेचें ज्ञान नसल्यामुळें फौज लंगडी आहे.

बादशहा आपल्या प्रातावरील सुभेदारास वरचेवर बदलितो, एका ठिकाणीं फार दिवस कोणास राहूं देत नाहीं कोणीही डोईजड होऊं नये, म्हणून बहुधा दरसाल त्याची बदली करण्यात येते बादशहा व सुभेदार यास मृत्यूची शिक्षा देण्याचा अधिकार आहे ऋणकोनें कर्जाची फेड न केल्यास जामिनासह त्यास कैदेची शिक्षा होते, किंवा बायकामुलासह त्यास विकण्यात येतें

**२ पीट्रो डिला व्हेल, (अ) सुरत.**—हा इटलींतील गृहस्थ रोमन-कॅथोलिक पंथाचा अभिमानी होता तो इकडे व्यापाराच्या उद्देशानें आला नसून, विद्वान् व चौकस असल्यामुळें इजिप्ट व हिंदुस्थान ह्या देशातील धर्मात कांहीं साम्य आहे कीं काय, हे पाहण्याकरिता इकडे आला होता प्रवासात त्याची आवडती बायको मरण पावल्यामुळें त्यास अतोनात दु.ख झाले, आणि तिचें शव मसाला भरून त्यानें बरोबर घेतलं होतें तो स १६२३ च्या

फेब्रुवारी माहन्यांत सुरत येथे येऊन उतरला. त्या वेळीं त्याचें वय ३७ वर्षांचें होतें. डिला व्हेलबरोबर एक त्याच्या घरांत पाळलेली सुशील मुलगी होती, सुरतचे अधिकारी बंदरावरील उतारूंचें सामान फारच कसोशीनें तपासतात, अशी बहुतेक सर्वांची ओरड असे. परंतु वरील मुलीशीं ते अधिकारी फारच सभ्यपणानें वागले. तिला कोणत्याही प्रकारचा उपद्रव त्यांनीं होऊं दिला नाही. त्या वेळच्या युरोपीय व्यापाऱ्यांमध्यें एक विलक्षण प्रकार दृष्टीस पडतो. हिंदुस्थानास येणारे बहुतेक इंग्रज व्यापारी अविवाहित असत. ईस्ट इंडिया कंपनीनें असा एक सक्तीचा नियम केला होता, कीं हिंदुस्थानास जाणाऱ्या लोकांनीं आपल्या बायका बरोबर घेऊन जातां नये. डच लोकांच्या संबंधानेंही पूर्वी असाच नियम होता. परंतु अलीकडेस त्यांनीं जावा बेटांत न्यू बटेव्हिया नांवाची एक वसाहत स्थापिली असून, तेथें सहकुटुंब जाऊन राहणाऱ्यांस पुष्कळ सवलती दिल्या होत्या. म्हणून बहुतेक डच व्यापारी विवाहित असत; आणि ज्यांचीं लग्नें झालेलीं नसत, ते कसें तरी करून बायका मिळविण्याच्या खटपटीस लागलेले असत. युरोपीय स्त्रिया न मिळाल्या, तर आर्मिनियन, सिरियन, अगर हिंदु बायका मिळाल्या तरी ते त्यांजबरोबर लग्न करीत. मात्र ती मूळची ख्रिस्ती नसली, तर तिला ख्रिस्तधर्म स्वीकारावा लागे. कित्येकदां असें घडे, कीं डच लोक बाजारांत गुलाम म्हणून विक्रीस आलेल्या मुली विकत घेत, आणि ख्रिस्ती करून त्यांजशीं लग्न लावीत व जावा येथें जाऊन राहत.

डिला व्हेल सुरतेस आला, त्या वेळीं तेथील एका श्रीमान डच गृहस्थाकडे तो जाऊन राहिला. डच व इंग्रज ह्यांच्या वखारींचे मुख्य अध्यक्ष मोगल सरदारांप्रमाणेंच मोठ्या थाटानें बाहेर निघत. त्यांजबरोबर निशाणें, वाद्यें व धनुष्यबाण घेतलेल्या शिपायांचा तांडा चालत असे. हा थाट केवळ शोभेकरितां होता. एतद्देशीय नोकरांची मजुरी फार थोडी असे. दरमहा तीन रुपये दिले, म्हणजे चांगल्या कुटुंबांतले नोकर मिळूं शकत. पण गुलाम विकत घेतले म्हणजे तर नोकरांची चंगळ उडे. मासे व तांदूळ विपुल असल्यामुळें त्यांच्या खाण्याचा खर्चही विशेष नसे. डिला व्हेल यास हिंदु लोकांचे आचारविचार पाहण्याची विशेष आवड होती. सुरतेस हिंदु स्त्रियास सती जाण्याची बंदी असे, तरी सुभेदाराची विशेष परवानगी घेऊन सती जाणें शक्य होतें. सुरत येथें पार्वतीदेवीची पूजा डिला व्हेलच्या दृष्टीस पडली. त्या देवीचा चेहेरा एका झाडावर

खोदून तिची लोक पूजा करीत ती देवी नवसास पावते असा सार्वत्रिक समज होता जवळच एक लहानसें देऊळ असून तेथील गुरूच्या प्रसादानें वाझ बायकास मुले होतात अशी ख्याति होती सुरत येथे काहीं दिवस राहून व्हेल खंबायतेस गेला तेथे एका डच व्यापाऱ्याने त्याची उत्तम बर्दास्त ठेविली खंबायत येथ लंगड्या व आजारी जनावरास व पक्ष्यास पोसण्याचा आणि त्यास औषधोपचार करण्याचा एक पाजरापोळ असून त्याचा खर्च हिंदु लोक मोठ्या भक्तीने चालवीत तेथे उंदीरही पाळले जात असत त्याचप्रमाणे बकरेमेढ्याचा दवाखाना तेथे असून मुसलमान खाटकास पैसे देऊन, हिंदु लोक ह्या जनावराची सुटका करीत पाजरपोळात निराश्रित गाईही ठेविलेल्या होत्या खंबायत येथील महाजनमंडळीनें बादशहाकडे रकमा भरून गोवध बंद करविला होता ह्या नियमाविरुद्ध तेथे कोणी मुसलमानाने गोवध केल्यास त्यास मृत्यूची शिक्षा होत असे

( आ ) **गोवें**—ता २४ मार्च स १६२३ रोजी व्हेल सुरतेहून निघाला, तो ता ८ एप्रिल रोजीं गोव्यास पोंचला गोव्यास पाद्री लोकाचा भरणा विशेष होता. तेथचे एतद्देशीय लोक कृष्णवर्ण असून चिऱ्या परिधान केलेले होते पोर्तुगीझ लोकाची संख्या थोडीच होती पूर्वी वैभव भोगून अलीकडे डच व इंग्रज याच्या वैरामुळे ते अगदीं खालावले होते. तरी पण हलक्या नोकऱ्या पतकरण्यास ते राजी नसत, निदान बाह्यत तरी तसे दाखवीत रात्रीं निखालस भिक्षा मागत, परंतु दिवसभर त्याच्या डामडौलात कमतरता नसे. देश समृद्ध असल्यामुळे त्याचे कसेबसे तरी चाले य कश्चित् नोकर सुद्धा अंगावर रेशमी वस्त्रे घेऊन तलवार लटकावून बाहेर पडत ह्यासंबंधी त्याच्या समजुतींत इतका विक्षिप्तपणा शिरला होता, कीं डिला व्हेलबरोबर स्वत च्या मुलीसारखी पाळलेली जी बाई होती, तिजला स्वत जवळ त्याने ठेवणे त्यास अप्रशस्त वाटून, लोकसमाधानार्थ गोव्यास तिला दुसऱ्या एका गृहस्थाच्या घरीं ठेवणे व्हेल यास भाग पडले नेहमींच्या व्यवहारात सुद्धा बायकापुरुषानीं एकत्र होऊं नये, असे कायदे त्या वेळेस गोव्याच्या पोर्तुगीझ लोकात केलेले होते. त्याने आपल्या मृत बायकोचे शव रोम येथे नेऊन मोठ्या समारंभाने पुरिले, आणि नंतर त्या बाळगिलेल्या बाईशींच लग्न लाविले इकडे आलेले पोर्तुगीझ लोक आपला मूळचा क्रिस्ती धर्म पुष्कळ अंशी विसरून एतद्देशीय

लोकांच्या धर्तीवर ते आपले धर्मोत्सव करूं लागले होते, तें व्हेल यास आवडलें नाहीं.

डिला व्हेलनें पुढें निरनिराळ्या हिंदु चालीरीतींचा बराच वृत्तांत दिला आहे. त्या वेळेची स्थिति समजण्यास तो बराच उपयुक्त होतो. ता. ११ मे रोजीं स्पेन देशाहून एक पोर्तुगीझ गृहस्थ तुर्कस्तानांतून पायवाटेनें गोव्यास आला. ऑक्टोबरच्या अखेरीस मॅड्रिड शहरीं लिहिलेलीं पत्रें त्यानें बरोबर आणिलीं. हा प्रवास त्यानें फार जलद केला, असें त्या वेळीं म्हणत. गोवें शहरांत जितके उत्सव आणि समारंभ होत, तितके जगांतील दुसरे कोणत्याही शहरांत होत नसतील. याचें कारण तेथें धर्मपंथच पुष्कळ असून, पाद्री लोकांची संख्या जरूरीपेक्षां पुष्कळच ज्यास्त व सधन होती. गोव्याचे क्रिस्ती लोक आळशी व निरुद्योगी असल्यामुळें अशा उत्सवांत कालक्षेप करणें त्यास आवडे. क्रिस्ती लोकांची नीतिमत्ता किती बिघडली होती, हें दाखविण्यास डिला व्हेलनें एक उदाहरण दिलें आहे. क्रिस्ताच्या मरणाच्या उत्सवांत त्याचें चित्र दाखविण्यांत आलें, तेव्हां जमलेले सर्व बायकापुरुष मोठमोठ्यानें रडूं लागले. बायकांना तर रडण्याचा असा कांहीं आवेश आला होता, कीं त्या आपल्या बरोबरच्या दासींना सुद्धां रडण्यास सांगत. इतकेंही करून दासी न रडल्या तर, त्यांस मोठमोठ्यानें मारीत; तेणेंकरून त्यांचें रडणें दूरवर ऐकूं येई. गोव्याहून डिला व्हेल पुढें कर्नाटकांत गेला.

डिला व्हेल यास हुकेरी येथें पुष्कळ मजा पहाण्यास सांपडली. गौरी-पूजेच्या वेळीं कित्येक बायांनीं केलेला टिपऱ्याचा नाच त्यास मोठा गमतीचा वाटला. कित्येक जंगम लोक एका बहालावर आपणास टांगून घेऊन देहास शासन करून घेत होते. तो देखावा फारच हृदयद्रावक होता. पाठीच्या चामड्यांत दोरी घालून ती बहालाच्या आंकड्यास टांगीत; व खालीं तोंड करून ते झोके घेत; आणि तोंडानें ईश्वरभजन करीत. एका नाचणाऱ्या बाईनें अगदीं अकल्पनीय कसरत करून दाखविली. हुकेरी शहरांत एके दिवशीं रात्रीं एक बाई सती गेली. तिचा निश्चय, धैर्य व ऐहिक सुखाच्या क्षणभंगुरत्वाविषयीं तिनें आवेशानें केलेला उपदेश, इत्यादि तिचे गुण पाहून, डिला व्हेल यास तिची धन्यता वाटली. हुकेरी शहरांत अघोरेश्वराचें मोठें देवालय होतें. देवाची मूर्ति षोडशभुजा

होती त्याच्या पालखीची मिरवणूक एके दिवशीं रात्रीं निघाली, ती डिला व्हेल यास पाहण्यास सापडली दुसऱ्या दिवशीं प्रतिपच्चंद्राचा उत्सव झाला हिंदु लोकांची देवपूजा म्हटली म्हणजे गायन, वादन, नर्तन इत्यादिकांनीं मनुष्याप्रमाणें देवाची शुश्रूषा करणें, असा डिला व्हेलचा ग्रह झाला. प्रार्थना किंवा अध्ययन यांजमध्यें कालक्षेप करितांना फारसे लोक त्यास आढळले नाहींत साधुवृत्ति धारण करणाऱ्या जंगम साधूंचीही त्यास मोठी गंमत वाटली

( इ ) **ओलाझा.**—मंगळूरच्या हद्दीवर ओलाझा नामक शहर होतें तेथें डिला व्हेल गेला हिंदूंच्या वस्तींत प्रवास करणें त्यास फार कष्टप्रद वाटे हिंदु लोकांचे आचार त्यास फार विक्षिप्त वाटले मत्स्य किंवा मांस यांचा आहार तिकडे निषिद्ध मानिला असून, तांदूळ, तूप, दूध वगैरे पदार्थ मिळण्यास सुद्धां प्रयास पडत डिला व्हेल तेथून मंगळुरास गेला मंगळूर येथें असतां तो योगिराजास भेटला योगिराज म्हणून योगी लोकांचा राजा असून त्यास सालिना तीस हजार रुपयांचा प्रदेश तोडून दिलेला होता हा राजा बहुतेक शेतकऱ्यांच्या धर्तीवर राहत असे तो वृद्ध व हुषार दिसला, परंतु त्यास विद्येचा गंध नव्हता

( उ ) **कालिकोट.**—मंगळुराहून डिला व्हेल कालिकोटच्या झामोरीन राजास भेटण्यास गेला. त्या वेळीं पोर्तुगीझ लोकांचा वकील कालिकोट व कोचीं येथील राजांचा तंटा मिटविण्यास जात होता राजवाड्यांत राजानें त्यांची सत्कारानें भेट घेतली राजा सुमारें तीस वर्षांचा असून सोन्यामोत्यांनीं मढविलेला होता शेजारीं बहिणीच्या दोन मुली बसल्या होत्या त्या बहिणीस राणी हा किताब होता पण सर्वांचीं अंगें कंबरेशिवाय बाकी अगदीं उघडीं होतीं. कालिकोट येथें दुसरी विशेष हकीगत घडली नाहीं. गोव्यास परत येऊन डिला व्हेल सन १६२४ च्या मार्च महिन्यांत बसरा व आलेपो ह्या मार्गानें युरोपास निघून गेला त्या वेळीं इंग्रजांनीं कांहीं मोगलांचीं जहाजें पकडलीं, त्याजबद्दलचा बादशहानें सूड घेतला, ती हकीकत ब्रिटिश रियासतींत दिलेली आहे

**३ जॉन ऑलबर्ट ड मंडेलस्लो.**—जॉन आल्बर्ट ड मंडेल्स्लो हा इकडे आला, तेव्हां २४ वर्षांचा होता. हॉल्स्टेनच्या ड्यूककडून इराणच्या शहाकडे आलेल्या वकिलातीबरोबर तो इराणांत आला, आणि इराणांतून

निघून सुरत बंदरीं तो इ. स. १६३८ च्या एप्रिल महिन्यांत उतरला. तेथील अधिकाऱ्यांनीं त्याचा सर टॉमस रो प्रमाणेंच सत्कार केला. सुरत येथील इंग्रज वसाहतीच्या प्रेसिडेंटाच्या घरीं तो राहिला. इंग्रज व शहाजहान यांजमध्यें चांगला स्नेहभाव वसत होता. सेप्टेंबर महिन्यांत सुरतेहून एक काफला निघाला. त्याजबरोबर तो अहंमदाबादेस गेला. बरोबर चार इंग्रज व्यापारी होते. त्याजबरोबर बारा युरोपियन शिपाई व बारा एतद्देशीय शिपाई इतका पहारा होता. इंग्रज व डच व्यापाऱ्यांनीं एतद्देशीय पोशाख केला होता. कारण परकी लोकांस रस्त्यावर भीति विशेष असे. वाटेत त्यांनीं भडोच व बडोदें येथें मुक्काम केला. अहंमदाबाद येथें आरबखान नांवाचा मोगलांचा सुभेदार होता, त्यास राजा हा किताब असून तो मोठा धनाढ्य होता. त्याची मुलगी शहाजादा शुजा ह्यास दिली होती. त्याच्याजवळ बारा हजार फौज व पन्नास हत्ती होते. मंडेल्स्लोनें दोन वेळ आरबखानाची भेट घेतली. तो आरबखानास फार आवडला. आरबखानाच्या आग्रहास्तव मंडेल्स्लोने इकडील चालीचा पोशाख केला. आरबखानाने त्यास मेजवानी दिली. दुसऱ्या भेटीच्या वेळेस आरबखान फार कामात होता. त्या वेळच्या मोगली सुभेदारांत आरबखान हा शूर व लायक मनुष्य होता. इंग्रज व डच व्यापाऱ्यांच्या देखत त्यानें आठ नाचणारणींस फांशीची शिक्षा दिली. त्यांचा अपराध इतकाच होता, कीं हुकुमाप्रमाणें त्या हजर झाल्या नाहीत. ह्या कडक शिक्षेबद्दल त्या युरोपियन गृहस्थांनीं आश्चर्य प्रदर्शित केलें. त्या वेळीं आरबखान म्हणाला, 'गृहस्थहो, माझा हुकूम जर लोक पाळीनातसे झाले, तर ह्या सुभेदारीचें काम पळभर देखील माझे हातून निभणार नाहीं.' दुसऱ्या एका काफल्याबरोबर मंडेल्स्लो आग्र्यास गेला. रस्त्यांत रजपूत लोकांशी त्याचे अनेक झगडे झाले. आग्रा शहराची शोभा पाहून मंडेल्स्लो चकित झाला. बहुतेक देशांचा आग्र्याशीं व्यापार चालत असे. येणाऱ्या व जाणाऱ्या मालावर दहा टक्के जकात घेण्याची वहिवाट होती. शहरचे रस्ते चांगले रुंद होते. प्रवाश्यांकरितां तीनतीन मजली अशा ऐशीं धर्मशाळा होत्या. प्रत्येक धर्मशाळेंत तळघरें, तबेले वगैरे होते; आणि एक अधिकारी नेमलेला असे, तो प्रवाश्यांस दाणावैरण व इतर सामान पुरवी. लवकरच मंडेल्स्लोला आग्र्यांतून पळ काढून जावें लागलें. कारण इस्पहान येथें अस

ताना त्यानें एका मनुष्याशी कलह करून त्यास ठार मारिले होते त्या मेलेल्या माणसाचा कोणी नातेवाईक त्यास आग्र्यास भेटला, तेव्हा कदाचित् एखाद्या वेळीं गाठून तो आपणास ठार मारील, ह्या भीतीने मंडेल्स्लो ताबडतोब निघून सुरतेस आला तेथें ईस्ट इंडिया कंपनीने त्यास योग्य रीतीनें वागविले सन १६४० त तो इंग्लंडास गेला, आणि तेथून जर्मनींत कांहीं दिवस लष्करात नोकरी करून पॅरिस येथे देवीच्या आजाराने मरण पावला.

**फ्रान्सिस बर्नियर** हा शहाजहान बादशहा दिल्लींत असतां हिंदुस्थानात आला, त्या वेळी त्याचे वय तीस वर्षांचे होते राजदरबारच्या कामात मंडेल्स्लोपेक्षा तो ज्यास्त कुशल होता स १६५५ पासून १६६७ पर्यंत १२ वर्षे तो हिंदुस्थानात होता आरंभीं युरोपात अनेक विद्वान् गृहस्थाजवळ राहून अभ्यास केल्यावर तो फ्रान्स देशातून इजिप्टमध्ये गेला तेथें कांहीं दिवस राहून तो स १६५५ त सुरतेस उतरला त्याने लिहिलेली हकीकत विशेष महत्त्वाची आहे फज्लखान नामक सरदाराची व त्याची ओळख होऊन त्याजपाशीं बर्नियर राहिला हा फज्लखान फार सज्जन गृहस्थ असून औरंगजेबाचा मुख्य वजीर होता फज्लखान यासच दानिष्मंदखान असे दुसरे नांव असावे असें वाटतें दानिष्मंदखानाच्या आश्रयास बर्नियर दिल्ली येथे राहिला होता, त्याचे दुसरे नाव नेमतखान अली अस असून त्याने अनेक ग्रंथ केले आहेत. त्याचें भाषण मोठे थट्टेखोर असे बर्नियरने फज्लखानास यूरोपच्या भाषा शिकविल्या, आणि त्याजकरिता अनेक सुंदर लॅटिन ग्रंथाची भाषांतरे केलीं. बर्नियर जाऊं लागला, तेव्हा त्याजकडून फज्लखानाने नानातऱ्हेचे सुंदर ग्रंथ युरोपातून मागवून घेतले औरंगजेबाने राज्यप्राप्तीकरिता जीं कारस्थाने केलीं, त्याचें हुबेहूब व चित्तवेधक वर्णन बर्नियरने केलें आहे ते वर्णन त्यानें युरोपात परत गेल्यावर लिहिले ह्याशिवाय टॅव्हर्नियर म्हणून एक फ्रेंच जव्हेरी सन १६४० पासून १६६७ पर्यंत हिंदुस्थानात फिरत होता त्याने मोगल रियासतीचें वर्णन केले आहे, त्याचे तात्पर्य असे

४ **जॉन् बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर**.—हा एक प्रसिद्ध फ्रेंच जव्हेरी असून सन १६४१ पासून १६६८ चे दरम्यान म्हणजे डिला व्हेल गेल्यावर वीस एक वर्षांपासून हिंदुस्थानात व्यापारोद्देशाने फिरत होता तो केवळ व्यापारी असल्यामुळे, त्याचें प्रवासवृत्त धंदाउदीम करणाराच्या उपयोगाचे आहे, तितके

निघून सुरत बंदरीं तो इ. स. १६३८ च्या एप्रिल महिन्यांत उतरला. तेथील अधिकाऱ्यांनीं त्याचा सर टॉमस रो प्रमाणेच सत्कार केला. सुरत येथील इंग्रज वसाहतीच्या प्रेसिडेंटाच्या घरीं तो राहिला. इंग्रज व शहाजहान याजमध्यें चांगला स्नेहभाव वसत होता. सेप्टेंबर महिन्यांत सुरतेहून एक काफला निघाला. त्याजबरोबर तो अहंमदाबादेस गेला. बरोबर चार इंग्रज व्यापारी होते. त्याजबरोबर बारा युरोपियन शिपाई व बारा एतद्देशीय शिपाई इतका पहारा होता. इंग्रज व डच व्यापाऱ्यांनीं एतद्देशीय पोशाख केला होता. कारण परकी लोकास रस्त्यावर भीति विशेष असे. वाटेत त्यांनीं भडोच व बडोदें येथें मुक्काम केला. अहंमदाबाद येथें आरबखान नावाचा मोगलाचा सुभेदार होता, त्यास राजा हा किताब असून तो मोठा धनाढ्य होता. त्याची मुलगी शहाजादा शुजा ह्यास दिली होती. त्याच्याजवळ बारा हजार फौज व पन्नास हत्ती होते. मंडेल्स्लोनें दोन वेळ आरबखानाची भेट घेतली. तो आरबखानास फार आवडला. आरबखानाच्या आग्रहास्तव मंडेल्स्लोनें इकडील चालीचा पोशाख केला. आरबखानानें त्यास मेजवानी दिली. दुसऱ्या भेटीच्या वेळेस आरबखान फार कामांत होता. त्या वेळच्या मोगली सुभेदारांत आरबखान हा शूर व लायक मनुष्य होता. इंग्रज व डच व्यापाऱ्यांच्या देखत त्यानें आठ नाचणारणींस फाशीची शिक्षा दिली. त्यांचा अपराध इतकाच होता, कीं हुकुमाप्रमाणें त्या हजर झाल्या नाहीत. ह्या कडक शिक्षेबद्दल त्या युरोपियन गृहस्थांनीं आश्चर्य प्रदर्शित केलें. त्या वेळीं आरबखान म्हणाला, 'गृहस्थहो, माझा हुकूम जर लोक पाळीनातसे झाले, तर ह्या सुभेदारीचें काम पळभर देखील माझे हातून निभणार नाहीं.' दुसऱ्या एका काफल्याबरोबर मंडेल्स्लो आग्ऱ्यास गेला. रस्त्यांत रजपूत लोकांशीं त्याचे अनेक झगडे झाले. आग्रा शहराची शोभा पाहून मंडेल्स्लो चकित झाला. बहुतेक देशांचा आग्ऱ्याशीं व्यापार चालत असे. येणाऱ्या व जाणाऱ्या मालावर दहा टक्के जकात घेण्याची वहिवाट होती. शहरचे रस्ते चागले रुंद होते. प्रवाश्यांकरितां तीनतीन मजली अशा ऐशीं धर्मशाळा होत्या. प्रत्येक धर्मशाळेंत तळघरें, तबेले वगैरे होते; आणि एक अधिकारी नेमलेला असे, तो प्रवाश्यांस दाणावैरण व इतर सामान पुरवी. लवकरच मंडेल्स्लोला आग्ऱ्यांतून पळ काढून जावें लागलें. कारण इसपहान येथें अस-

ताना त्यान एका मनुष्याशी कलह करून त्यास ठार मारिले होते त्या मेलेल्या माणसाचा कोणी नातेवाईक त्यास आग्र्यास भेटला, तेव्हा कदाचित् एखाद्या वेळी गाठून तो आपणास ठार मारील, ह्या भीतीने मंडेल्स्लो ताबडतोब निघून सुरतेस आला तेथे ईस्ट इंडिया कंपनीने त्यास योग्य रीतीने वागविले सन १६४० त तो इंग्लंडास गेला, आणि तेथून जर्मनीत काहीं दिवस लष्करात नोकरी करून पॅरिस येथे देवीच्या आजाराने मरण पावला.

**फ्रान्सिस बर्नियर** हा शहाजहान बादशहा दिल्लींत असता हिंदुस्थानात आला, त्या वेळी त्याचे वय तीस वर्षांचे होते राजदरबारच्या कामात मंडेल्स्लोपेक्षा तो ज्यास्त कुशल होता स १६५५ पासून १६६७ पर्यंत १२ वर्षे तो हिंदुस्थानात होता आरंभी युरोपात अनेक विद्वान् गृहस्थाजवळ राहून अभ्यास केल्यावर तो फ्रान्स देशातून इजिप्टमध्ये गेला तेथे काहीं दिवस राहून तो स १६५५ त सुरतेस उतरला त्याने लिहिलेली हकीकत विशेष महत्त्वाची आहे फज्लखान नामक सरदाराची व त्याची ओळख होऊन त्याजपाशी बर्नियर राहिला हा फज्लखान फार सज्जन गृहस्थ असून औरंगजेबाचा मुख्य वजीर होता फज्लखान यासच दानिष्मंदखान असे दुसरे नाव असावे असे वाटते दानिष्मंदखानाच्या आश्रयास बर्नियर दिल्ली येथे राहिला होता, त्याचे दुसरे नाव नेमतखान अली असे असून त्याने अनेक ग्रंथ केले आहेत त्याचे भाषण मोठे थट्टेखोर असे बर्नियरने फज्लखानास यूरोपच्या भाषा शिकविल्या, आणि त्याजकरिता अनेक सुंदर लॅटिन ग्रंथाची भाषांतरे केली बर्नियर जाऊं लागला, तेव्हा त्याजकडून फज्लखानानें नानातऱ्हेचे सुंदर ग्रंथ युरोपातून मागवून घेतले औरंगजेबाने राज्यप्राप्तीकरिता जीं कारस्थाने केलीं, त्याचे हुबेहूब व चित्तवेधक वर्णन बर्नियरने केले आहे ते वर्णन त्याने युरोपात परत गेल्यावर लिहिले ह्याशिवाय टॅव्हर्नियर म्हणून एक फ्रेंच जव्हेरी सन १६४० पासून १६६७ पर्यंत हिंदुस्थानात फिरत होता त्याने मोगल रियासतीचे वर्णन केले आहे. त्याचे तात्पर्य असे

४ **जॉन् बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर.**—हा एक प्रसिद्ध फ्रेंच जव्हेरी असून सन १६४१ पासून १६६८ चे दरम्यान म्हणजे डिला व्हेल गेल्यावर वीस एक वर्षांपासून हिंदुस्थानात व्यापारोद्देशानें फिरत होता तो केवळ व्यापारी असल्यामुळे, त्याचें प्रवासवृत्त धंदाउदीम करणाराच्या उपयोगाचे आहे, तितके

इतरांच्या उपयोगी नाहीं. तो युरोपांतून पायरस्त्याने इराणपर्यंत येऊन पुढें जलमार्गानें हिंदुस्थानास त्यानें अनेक खेपा केल्या. शेवटच्या वेळीं परत जाताना मात्र तो आफ्रिकेस वळसा घालून जलमार्गानें गेला. इस्पहान शहरांतून निघून तो पायरस्त्यानें कंदाहार, काबूल, लाहोरवरून आग्र्यास येई, आणि क्वचित् इराणच्या आखातातून सुरतेस उतरे. आग्रा व सुरत ही त्याचीं हिंदुस्थानांत उतरण्याचीं मुख्य ठिकाणें होतीं. सुरतेहून आग्र्यास जाणें झाल्यास तो कधीं बऱ्हाणपुर, इंदूर, ग्वाल्हेरकडून जाई आणि कधीं बडोदा, अहंमदाबादेवरून जाई. बंगाल्यातही अलाहाबाद, बनारस, पाटणा, राजमहाल, डाक्का, हुगळी इत्यादि ठिकाणीं तो खेपा करीत असे. सारांश, इराण, अफगाणिस्तान, व हिंदुस्थानचा बहुतेक भाग ह्यात तो हिंडला होता. सुरतेहून देवगडच्या वाटेनें गोवळकोंड्यास व तेथून पूर्वेस मच्छलीपट्टण येथें जाऊन, पुढें दक्षिणेंत डच वसाहत पुलिकत, इंग्रजाचें बंदर मद्रास व पोर्तुगीझ लोकाचें बंदर सेंट टामे इत्यादि पाहून, पुनः कर्नाटकातल्या गंडिकोट्याच्या मजबूत किल्ल्यावरून गोवळकोंड्यास तो गेला. पश्चिमेकडील मलबार व कानडा ह्या भागांची मात्र त्यास विशेष माहिती नव्हती.

हिंदुस्थानांत आगगाडी होण्यापूर्वी प्रवासाची पद्धति म्हटली, तर दररोज नेमके कोस चालून ठरीव मुक्कामावर जाऊन उतरावयाचे. त्या वेळीं हिंदुस्थानांतला प्रवास जितका सोयीचा व सुखकर होता, तितका फ्रान्स व इटली या देशांत नव्हता, असें टॅव्हर्नियरचें म्हणणें आहे. युरोपातल्याप्रमाणें येथें घोडी किंवा गाढवें नसत. येथें बैलगाडींत, पालखींत, किंवा बैलावर बसून लोक प्रवास करीत. शिग्रामास दोन बैल जोडले जात असून त्यांत दोन माणसें बसत. परंतु टॅव्हर्नियरसारख्या सुखवस्तु गृहस्थास एका गाडींत एकटेंच जाणें बरें वाटे. गाडींत पुरतें सामान राही. टॅव्हर्नियरनें आपली स्वतःची गाडी ठेवली होती. गाडी व दोन बैल मिळून सर्व संचास सहाशें रुपये खर्च आला. रोज सुमारें चाळीस बैल पळत जाऊन, साठ साठ दिवस ते बैल एकसारखा प्रवास करीत. अर्ध्या दिवसाची मजल झाल्यावर तूप व गुळसाखर ह्यांत गव्हांची कणीक तिंबवून तिचे रोंठ बैलांस खाऊं घालीत. अशी गाडी भाड्यानें केली असतां, दिवसास एक रुपया भाडें पडे. सुरतेहून आग्र्यास किंवा गोवळकोंड्यास जाण्यास चार दिवस लागत, आणि प्रत्येकीं ४०–४५ रुपये भाडे पडे. ज्यांना

जास्त खर्च करण्याचे सामर्थ्य असे, ते मेण्यातून जात मेणा सुंदर दिसत असून मखमने मढविलेला असे त्यास सहा भोई लागत, आणि एक असामी छत्री धरून बाजूला चाले ते बहुधा पुष्कळ जलद चालत. दर असामीस दरमहा चार रुपये पगार द्यावा लागे साठ दिवसाहून जास्त लांबीचा प्रवास असल्यास ते पाच रुपये पगार घेत आपला मोठेपणा लोकास दिसावा, म्हणून पंचवीस तीस तिरंदाज बरोबर घ्यावे लागत कित्येकाजवळ लहान बंदुकाही असत केव्हा केव्हा लोक बरोबर निशाण घेऊन फिरत. डच व इंग्रज व्यापारी आपापल्या कंपनीच्या खुणेसाठीं नेहमी निशाणे बरोबर नेत तिरंदाज लोक पहाऱ्याच्याही उपयोगी पडत, आणि रात्रीं मुक्कामावर पाळीपाळीनें जागत बसत हे पहारेकरी आपल्या नोकरींत कधीं कसूर करीत नसत. कारण ज्या ठिकाणाहून ते घेतले जात, तेथील त्याचा अंमलदार त्याच्या इमानीपणाबद्दल जामीन धरला जात असे अशा रीतीने त्याने आपणास जामीन राहवे म्हणून दरएक असामी अंमलदारास दोन रुपये देत असे मोगलाच्या वेळेस हिंदुस्थानातील रस्ते फार चागले होते रोमन लोकाप्रमाणे रस्ते साफ ठेवण्याकडे मोगलाचे विशेष लक्ष असे. शिवाय दूरदूरच्या प्रातावर अंमल राखणे, व बंडावे मोडणे ह्या गोष्टी चागले रस्ते असल्याशिवाय करिता येत नसत उत्तरेकडील रस्त्याइतके थेट दक्षिणेकडील रस्ते चागले नव्हते हैदराबादेपासून मच्छलिपट्टणास जाणारा मोठा रस्ता गोवळकोंडा येथील सुलतानाच्या ताब्यात होता त्या प्रदेशात नद्या, तलाव व पर्वत विशेष असल्यामुळे रस्ता बराच अडचणीचा होता. हैदराबादेहून कन्याकुमारीस जाणारा रस्ता हिंदुराजाच्या प्रदेशात होता तो पुष्कळ वाईट असल्यामुळे बहुतेक माल बैलाच्या पाठीवरून न्यावा लागे. कित्येक ठिकाणी गाडी चालण्यास अडचणी असल्यामुळे मेण्यातून जाणे भाग पडे परंतु तिकडे भोई फार जलद चालत असल्यामुळे, अगदी दक्षिणेकडचा प्रवास उत्तरेपेक्षा लवकर व सुखकर होत असे मुसलमानी प्रदेशात मास वगैरे विकत मिळण्याची सोय असे, तशी कित्येक हिंदु प्रदेशात नसे काही गावात मासाहार वर्ज्य समजला जात असल्यामुळे, दूध व धान्य याशिवाय दुसरे काही मिळत नसे निदान युरोपीय प्रवाश्यास तरी ही मोठी अडचण वाटे थंडीच्या दिवसात लोक बहुतेक प्रवास दिवसाच

करीत; पण उन्हाळ्यांत दिवसास ऊष्णतेमुळें बाहेर पडण्याची सोय नसल्यानें घरीच मजल रात्रीची करावी लागे. चोराच्या वगैरे भीतीस्तव तटबंदी गांवाचे दरवाजे रात्र पडल्याबरोबर बंद होत; आणि मग आंतल्या लोकांस बाहेर व बाहेरच्या लोकास आंत जाता येत नसे. कोणत्याही ठिकाणीं चोरी व दरवडा पडल्यास तेथच्या अंमलदारावर सर्व जबाबदारी असल्यामुळे, शहराचे दरवाजे बंद करणे भाग पडे. म्हणून प्रवास करितेवेळीं टॅव्हर्नियर सायंकाळीं खाणें बरोबर घेऊन दिवस बराच असता बाहेर पडे; आणि मग रात्रीं प्रवास करी. टॅव्हर्नियरच्या सांगण्यात त्या वेळेस टपालाची व्यवस्था चांगली होती असे दिसते. त्या व्यवस्थेने टपाल घोड्यांपेक्षा लवकर जाई. रस्त्यावर दर सहा मैलावर झोंपड्या बांधिलेल्या असून, त्यात पायीं पळणारे टपालवाले तयार राहत. मागच्या पळणाऱ्यानीं टपाल आणून टाकिल्याबरोबर, नवीन लोक तें घेऊन पुढील मुक्कामास पळत जात. अशा प्रकारची बहुतेक राज्यांत टपालाची व्यवस्था होती. ज्या ठिकाणीं रस्ते बांधिलेले नसत, तेथें झाडाच्या खाणाखुणावरून वाटा ध्यानात ठेवण्याचा प्रचार असे. ज्या प्रदेशात झाडें नसत, तेथें पांचशे पावलांच्या अंतरावर दगडांची रास करून ती चुन्यानें सारवीत. तेणेंकरून अंधाऱ्या रात्रीं व पावसाळ्याच्या काळोखात सुद्धां टपालवाल्यांस रस्ता सांपडण्यास अडचण पडत नसे. वर सांगितलेले दगडांचे गडगे दुरुस्त ठेवणें व त्यास सफेती चढविणें, हें काम त्या त्या गावच्या लोकांकडे सोंपविलेलें असे. बहुतेक व्यापार बैलांच्या पाठीवरून अगर मोठमोठ्या गाड्यावरून चाले. घोडे व गाढवे फारशीं नसत. उंटांचा उपयोग मोठ्या वजनाचे सामान नेण्यास करीत. मालाची नेआण लमाणें करीत. गहूं, तांदूळ, डाळ, मीठ इत्यादि जिनसांनीं भरलेले दहा दहा बारा बारा हजार बैल एकदम निघत, आणि ज्या ठिकाणी जो माल पिके तेथें त्याचा मोबदला करीत. अरुंद वाट आली म्हणजे असा तांडा चालत असतां, रस्ता खुला होईपर्यंत दोन दोन तीन तीन दिवस प्रवाश्यास मुक्काम करावा लागे. अशा लमाणवाल्यांस मणेरी असें म्हणत. कित्येक ठिकाणीं त्यांस वणजारी असें म्हणण्याचाही परिपाठ होता. ते नेहमीं तंबूंत राहत; आणि सर्व मुलेंमाणसें बरोबर बाळगीत. गहूं, तांदूळ, डाळ व मीठ हे चार मुख्य जिन्नस नेणाऱ्या चार मुख्य जाती होत्या. प्रत्येक जातींत सुमारें एक लाख माणसें होती. दर-

एक जातीचे लोक एकाच जिनसाची नेआण करीत प्रत्येकीचा एक एक म्होरक्या असून त्याचा रुबाब राजासारखा असे त्याच्या गळयात मोत्याचा कंठा असे दोन तांडे एकत्र भेटले म्हणजे प्रथम वाट मिळण्यासाठी कैक वेळा युद्धप्रसंग झाल्याशिवाय राहत नसे असे युद्धप्रसंग घडून आल्यानें व्यापारास फार धक्का बसतो असें पाहून, औरंगजेब बादशहाने मीठ व गहूं याच्या म्होरक्यास भेटून पुष्कळ बंदोबस्त केला, आणि त्यास बक्षीस देऊन वाटेस लाविले. चार जिनसाचे चार तांडे आपल्या कपाळावर निरनिराळी चिन्हे धारण करीत. लिंगाईत वाण्याप्रमाणे त्याच्या गळयात एक लहानसा डबा असे आपल्या गुरावर त्याची अमर्याद ममता असे विशेषत ज्यास मूल नसे, ते तर जनावरास मुलासारखेच समजत बायका आपल्या अंगावर निरनिराळ्या फुलाचे आकार गोंदून घेत दररोज सकाळीं पुरुष जनावरावर ओझा ठेवीत, बायका तंबू वगैरे सामान आटपून घेत, आणि सर्व असामी देवाची पूजा करून बाहेर पडत प्रत्येक तांड्यांत देव व पुजारी बरोबर असन देवास वाहून नेणारा सुंदर बैलही नेमिलेला होता गाड्याचा तांडा असल्यास त्यात शभर दोनशे गाडे असत प्रत्येक गाड्यास दहा बारा बैल जोडलेले असन, संरक्षणार्थ चार शिपाई असत, ते गाडे धरून दोनही बाजूंस चालत, आणि गाडा कलंडून पडूं नये म्हणून त्याच्या दोऱ्या धरून ठेवीत

टॅव्हर्नियरने आणखी पुष्कळ माहिती आपल्या पुस्तकात लिहिली आहे. तो स्वत शिकलेला किंवा विद्वान् नसल्यामुळे, पसा व व्यापार ह्याबाहेर त्याने फारसें लिहिलेले नाहीं तसेंच त्याचे वर्णन पुष्कळ ठिकाणीं कंटाळवाणे व नीरस झालें आहे हिंदुस्थानातील निरनिराळ्या जागीं कोणते जिन्नस कसे उत्पन्न होतात, आणि त्याची काय योग्यता आहे, इत्यादि व्यापारोपयोगी माहिती त्याच्या पुस्तकात विपुल आहे हिंदुस्थानच्या व्यापाराची तत्कालीन स्थिति समजून घेण्याची ज्याची इच्छा असेल त्यानीं ते पुस्तक अवश्य वाचावे हिंदूंची सती, बैरागी, फकीर, हत्ती, वाघ, पशु, पक्षी, देवालयें, तलाव, मशिदी इत्यादि नानाप्रकारच्या विषयवर्णनानीं त्याचे पुस्तक भरलेलें आहे परंतु त्यात टेरीची अक्कल व डिला व्हेलची जिज्ञासा दिसून येत नाहीं पुस्तकाचा तर्जुमा इंग्रजींत छापलेला आहे

५. **डॉक्टर जॉन फ्रायर**, (एम डी केंब्रिज,)— हा थिवेनॉटच्या

नंतर सहा सात वर्षांनीं म्हणजे स. १६७३ त हिंदुस्थानात आला. त्या वेळीं इंग्रज व डच यांचें युद्ध सुरू झाल्यामुळें इंगजांची दहा जहाजें लढाईचें सामान घेऊन मद्रासेस आलीं. त्या वेळीं त्या युद्धांत कंपनीचा डॉक्टर म्हणून हा हिंदुस्थानांत आला. इंग्लंडांतून ग्रेव्हसेंड येथून जहाजें निघालीं, तीं सहा महिन्यांनीं स. १६७३ च्या जून महिन्यांत सिंहलद्वीपास वळसा घालून मद्रासेस आलीं. मद्रासच्या दक्षिणेस तीस मैलांवर सद्रास येथील किल्ल्यावर डच लोकांचीं निशाणें दिसलीं, आणि मद्रासच्या आजूबाजूस डच लोकांचीं जहाजें फिरत असल्याचें दिसल्यामुळें, डॉ० फ्रायरचीं जहाजें उत्तरेस मच्छलिपट्टणास जाऊन उतरलीं. मच्छलिपट्टण येथें इंग्रजाच्या वखारी होत्या, तरी तें शहर गोवळकोंड्याच्या सुलतानाचे ताब्यांत होतें. त्या वेळीं युरोपांतून जहाजें आलीं, म्हणजे वखारींत मोठा आनंद प्रदर्शित करीत. जहाजातून तोफांची सरबत्ती होऊन तुताऱ्या वाजत. परंतु वखारींतील लोकांना जबाब तोफा सोडतां येत नसत. कारण परकी व्यापाऱ्यांनीं तोफा बाळगूं नयेत व आपसांत लढूं नये, असा सुलतानाचा कडक हुकूम त्यास होता. यास्तव त्यांजपाशीं असलेल्या तोफा ते गुप्त ठेवीत. तसाच प्रसंग पडल्याशिवाय त्या उडवीत नसत. विलायतेहून खजिना आला होता. तो सुरक्षितपणे वखारींत येऊन पोंचला. एतद्देशीय लोकांचा काळाकुट्ट वर्ण, डोकीं तासलेलीं असून मध्येंच एक लांब शेंडी, कमरेच्या लंगोटीशिवाय सर्व उघडें शरीर व कानांतील सोनेरी मुद्या, इत्यादि प्रकार पाहून डॉ० फ्रायर यास मौज वाटली. ही हलक्या मजूर लोकांची गोष्ट झाली. परंतु बंदरावर वरिष्ठ प्रतीचे व सभ्य पोषाख केलेले लोक बरेच असून ते ह्या परदेशस्थ लोकांचीं कामें करण्यास तयार असत. त्यांस इंग्रजी भाषा अवगत होती. मच्छलिपट्टण कृष्णानदीच्या उत्तरकांठावर आहे. दक्षिणकांठाकडील प्रदेश पूर्वी हिंदु राजाच्या ताब्यात होता. अलीकडे त्या प्रदेशावर गोवळकोंड्याच्या कुत्बशहानें स्वारी करून तिकडे आपला अम्मल बसविला होता. सुलतानानें मद्रासच्या इंग्रजावर हल्ला केला, पण सेंट जॉर्ज किल्ल्यावरील तोफांनीं त्यास मागें हटविलें, तेव्हां सुलतानानें चारपांच मैल दक्षिणेस जाऊन पोर्तुगीझ लोकांची वसाहत सेंट टॉमे ही काबीज केली, आणि त्यांच्या सर्व तोफा घेतल्या. तेव्हां पोर्तुगीझ लोक इंग्रजांच्या सेंट जॉर्ज किल्ल्यावर जाऊन राहिले. अशा

स्थितींत फ्रेंच लोकाचें एक आरमार कारोमाडल किनाऱ्यावर आलें सुलता-नाशीं लढून फ्रेंचानी सेट टॉमे ठिकाण परत घेतले या युद्धात डच लोकानीं सुलतानास मदत करण्याची तयारी चालविली मच्छलिपट्टणास हिंदु व मुसल-मान ह्या दोघाचीही वस्ती होती चीट तयार करण्याचे काम ह्या बदरीं चागलें होई जमिनीवर कापड पसरून लहान लहान मुले सुद्धां इतक्या जलदी त्याजवर छापा उठवीत, कीं नजर ठरत नसे काहीं दिवसानीं डच लोकाचा फ्रेंचानीं पराभव केला, तेव्हा डॉ फ्रायर यास खजिना घेऊन मद्रासेस येता आले ह्या वेळी मद्रासचा व्यापार जरा खालावला होता. सेट टॉमे परत घेण्याकरिता सुलतानाने इंग्रज व डच ह्याची मदत मागितली तेव्हा मद्रासचा गव्हर्नर लॅगहॉर्न् यास मोठी पंचाईत पडली कारण युरोपात त्या वेळेस इंग्रजाचे फ्रेंचाशीं सख्य असून डच लोकाशीं युद्ध सुरू होते इकडे फ्रेंचानींही इंग्रजाची मदत मागितली होती सुलतानास मदत करावी, तर इंग्लंड व फ्रान्स येथील राजाचा डोव्हर येथे तह झाला होता, त्यास हर-ताळ लागतो. आणि फ्रेंचास मदत करावी, तर सुलतानाशीं वाकडे येणार ह्या भानगडी पुढे यावयाच्या आहेतच फोर्ट सेट जॉर्ज किल्ल्यात त्या वेळेस सुमारे पन्नास घरें होतीं इंग्रज गोरे लोकाची संख्या सुमारे तीस होती पोर्तुगीझ लोक सेट टॉमे सोडून मद्रासच्या किल्ल्यात राहिले होते. त्याची संख्या तीन हजार होती किल्ल्याच्या बाहेर ‘काळे शहर’ वसलेलें होते, त्यात सर्व एतद्देशीय लोक राहत त्याचे एक देवालय असून त्यात ते लोक आपला सर्व खजिना ठेवीत येथ हिंदूंची संख्या मोठी असून मुसलमान फारसे नव्हते ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीत एकंदर तीस हजार एतद्देशीय लोक असून त्याजवर कंपनीचा अंमल होता शहराबाहेर शेतें व बागा विपुल असून स्वत इंग्रज लोकही पुष्कळ लागवड करीत किनाऱ्यावर अनेक ठिकाणी परकीय लोकाची तटबंदी हिंदुस्थानातील राजानी करूं दिली, ह्याचे कारण डॉ फ्रायर असे सागतो, कीं त्या राजाजवळ आरमार बहुधा नसत, म्हणून शत्रु आला असता बंदरावरील ठिकाणे राखण्यास कठीण पडे, तेव्हा युरो-पियन लोक येऊन राहिल्यानें आयतेच आपले संरक्षण होईल, आणि त्याच्याशीं स्नेहाने वागलें असता, प्रसंगीं त्याची आपणास मदतच होईल, असे त्या राजास वाटे ह्या युरोपियन लोकाची शक्ति विशेष आहे,

आणि हेंच पुढें आपले धनी होतील हें त्या वेळेस कोणाच्याही ध्यानांत आलें नव्हतें.

सन १६७३ च्या ऑक्टोबर महिन्यांत मद्रास सोडून डॉ० फ्रायर मुंबईस आला. त्या वेळेस मुंबई बेट पोर्तुगीझ लोकांकडून इंग्रजाचे ताब्यांत आल्यास थोडींच वर्षे झालीं होतीं. तेथील हवा फार खराब असून इंग्रज लोकांस मानवत नसे. शिवाय ते लोक फार अत्याचार करीत. त्यांना आपल्या बायका इकडे आणण्याची परवानगी मिळाली, तथापि त्यांची संतति निःसत्त्व व हीन निपजूं लागली. मुंबईहून डॉ० फ्रायर सुरतेस गेला. औरंगजेबाच्या जुलमी राज्यपद्धतीनें सुरतेच्या व्यवस्थेंत अलीकडे पुष्कळ फरक पडला होता. सुरतेस मुसलमान लोकाचें राहणें थाटाचें असे. हिंदु लोक धनाढ्य असले, तरी डौलानें राहत नसत, कारण त्याजवर मुसलमान अधिकाऱ्याचा डोळा असे. फकीर व दुसरे मुसलमान भिक्षेकरी यांचा सुळसुळाट अतोनात होऊन ते वाटेल त्या गृहस्थावर भररस्त्यात झडप घालीत. 'हे परमेश्वरा, आम्हीं हीनवस्त्र रस्त्यांत हिंडावें, आणि ह्या ख्रिस्ती काफरानी मोठ्या थाटानें घोड्यावर बसून जावें, असा तुझ्या घरीं अन्याय का बरें असावा!' असे शब्द ते ओरडत. तथापि ह्या फकिरांपासून श्रीमंत मुसलमानास विशेष त्रास होत असे. स्वतः औरंगजेब फकीरवृत्तीनें राहत असल्यामुळें लोकही तसेंच करूं लागले. ईश्वरभक्तीच्या नांवावर ते पाहिजे तीं निंद्य कृत्यें करीत. कोणी म्हणे, आपणास मशीद बांधावयाची आहे. तीस लागणारा खर्च मिळेपर्यंत तो आपणास झाडावर उलटा टांगी. अशाच कित्येक पैसे उपटण्याच्या गोष्टी दुसरे लोक करीत. गरीब हिंदु लोकांनीं सुद्धा त्यांस धर्म न केला, तर तो गुन्हा होऊन काजीसमोर दंड भरावा लागे, नाहीं तर मुसलमानी धर्म पत्करणे भाग पडे. सावकार किंवा दुकानदार याजकडे जाऊन हे फकीर त्रागा करूं लागत, आणि तेणेकरून पैसे उपटीत. प्रत्यक्ष नबाबाचेंही त्यांजपुढें कांहीं चालत नसे. शिवाजीच्या स्वारीविषयीं डॉ० फ्रायरनें काहीं मजकूर लिहिला आहे. सुरतेच्या खाडींत मोगलांचीं मोठमोठीं पुष्कळ जहाजें होतीं. तीं बहुतेक इकडे आलेल्या गरीब इंग्रज मजुरांनीं तयार केलीं होतीं. उत्तम जहाजें सुमारें शंभर होतीं, आणि लहान लहान पुष्कळच होतीं. जहाजें असली तरी युरोपियन लोकांचा परवाना व तांडेल बरोबर घेतल्यावांचून त्यांस प्रवास करण्याची छाती नव्हती. पोर्तु-

गीझ, डच व इंग्रज ह्या तिघाचेही परवाने जवळ असल्यावर त्यास रस्त्यात त्या लोकाकडून लूट होण्याची भीति नसे मोगलाच्या गलबतावर तोफा असत, परतु त्या बहुतेक दिखाऊ असत मक्केस यात्रेकरूंची नेआण करण्याकरिता चार मोठीं जहाजे नेहमी वावरत होतीं सुरत बंदर गुजराथच्या सुभेदाराच्या ताब्यात होत मीर जुम्लाचा मुलगा महंमद अमीनखान हा त्या वेळेस गुजराथचा सुभेदार होता तो अहंमदाबादेस राहत असे मराठे, रजपूत व कोळी इत्यादिकाचा गुजराथेत विशेष उपद्रव होता. नाहीं तर, सुरतेच्या बंदरास त्या वेळेस जगाच्या व्यापारात पहिले पद मिळाले असते औरंगजेब बादशहा मोहोरमचे वेळीं शिया लोकास ताबूत वगैरे करून हसनहुसेनची मिरवणूक काढू देत नसे हिंदूंच्या मूर्तिपूजेसारखे वेडेचार त्यात आहेत असे तो म्हणे हिदु लोकासही त्याने विशेष छळिले हा छळ त्यानीं का सोसला, ह्याचे फ्रायर यास मोठें नवल वाटले

स १६७६ त डॉ० फ्रायर सुरतेहून मुंबईस गेला तेथून जुन्नरच्या मुसलमान नबाबाने जनानखान्यातील एका बाईस औषध देण्याकरिता बोलाविल्यावरून तो जुन्नरास गेला नबाबाने त्याचे आतिथ्य उत्तम प्रकारे केले सुमुहूर्त मिळेपर्यंत रोग्याची व त्याची गाठच पडली नाही चागला दिवस आल्यावर नबाबाने डॉ० फ्रायर यास जनानखान्यात नेले तेथे सभोवार पडदे सोडलेला असा पलंग होता फ्रायरने पडद्यातून आपला हात आत घालून पलंगावरील माणसाची नाडी तपासली ती चागल्या माणसाची अशी त्यास दिसली पाठीमागून त्यास समजले, कीं वैद्याची परीक्षा पाहण्यासाठी एका सशक्त मोलकरणीचा हात प्रथम त्यास दाखविण्यात आला होता नंतर आजारी बाईचा हात त्याने पाहिला तिची त्याची दृष्टभेट झाली नाहीं फ्रायरने रक्त काढून त्या बाईचे दुखणे बरे केले पुन दुसरे प्रसंगीं एका बाईसपाहण्यासाठीं डॉ० फ्रायर गेला असता पडदे सुटून खाली पडले, तेव्हा सर्व बाया एकदम त्याच्या दृष्टीस पडल्या पण कोणी पळून गेल्या नाहींत त्यानीं आपल्या हातानी आपले चेहरे झाकिले, आणि बोटाच्या फटींतून डॉ० फ्रायरकडे त्या पाहूं लागल्या तेथे फळाच्या साली व शिवणकामाचे तुकडे जिकडे तिकडे पडले होते, त्यावरून त्या बाया घरचीं कामे करीत असाव्यात असे फ्रायरने ताडिलें. जुन्नरच्या नबाबाशी फ्रायरची लवकरच चागली सलगी झाली त्या वेळच्या

स्थितीविषयीं उभयतांची पुष्कळ बोलणी झालीं. त्यानें व्यापारांत लक्ष घात-ल्यास चांगला फायदा आहे, असें फ्रायरनें त्यास सांगितलें. परंतु नबाबास व्यापाराविषयी पर्वा वाटली नाहीं. कोणीकडून तरी मराठ्यांशीं मोगलाचा तह न होतां उभयतांचें युद्ध कायम राहवें, एवढाच नबाबाचा हेतु होता. याचें कारण इतकेंच, कीं जोंपर्यंत युद्ध चालू आहे, तोंपर्यंत वाटेल तितक्या फौजेचा आंकडा कागदावर दाखवून मोठमोठ्या नेमणुका बादशहाच्या तिजोरींतून घेतां येत असत. शिवाजीबरोबर तह झाला असतां फौज कमी होऊन आपली प्राप्ति जाईल अशी सर्वांस भीति असल्यामुळें, औरंगजेबाच्या सरदारांनीं तह घडवून आणण्याची दिशाच घेतली नाहीं. जुन्नरच्या किल्ल्याचा अधिकारी वेगळा होता. तो मूळचा ब्राह्मण असून मुसलमान झाला होता. औरंगजेबाची त्याजवर मर्जी होती. शिवाजीस त्यानें अनेक वेळा फसविलें. लवकरच डॉ० फ्रायर मुंबईस परत येऊन कारवारास गेला. शिवाजीनें कारवार व आसपासचा प्रदेश विजापुरकरांपासून काबीज केला असून, कारवारास इंग्रजांच्याही वखारी होत्या. कारवाराहून डॉ० फ्रायर गोव्यास गेला. पोर्तुगीझ बायका स्वरूपानें सुंदर असून पडद्यांत राहिल्यामुळें त्यास निःसत्त्व दिसत होत्या. त्या उत्तम स्वयंपाक तयार करीत. गोव्यासही मराठे लोक येऊन पोंचले होते. त्यामुळें विशेषतः गाईचें मांस मिळण्याची पोर्तुगीझ लोकास मोठी पंचाईत पडूं लागली. तसेंच हिरेमाणकें, जळाऊ व इमारतीचीं लांकडें इत्यादि जिनसांचा व्यापार पोर्तुगीझ करीत असत, तोही मराठ्यांच्या येण्यानें बंद पडला. कांहीं दिवसांनीं डॉ० फ्रायर कारवारचे दक्षिणेस गोकर्ण येथें गेला. गोकर्ण हें हिंदु लोकांचें पवित्र स्थान मानिलें असून तेथें दरसाल हजारों यात्रा जात असे. तेथे ब्रह्मवृंद मोठा असून विद्यार्जनासाठीं अनेक विद्यार्थी येऊन राहिले होते. पण बहुतेक लोक विद्यार्जनाऐवजीं ईश्वरभक्तींत निमग्न असलेले दिसले. गोकर्णाहून मुंबईस परत येऊन डॉ० फ्रायर इराणांत गेला, आणि तेथून परत येऊन स. १६८१ त युरोपास चालता झाला. मोगल इतिहासास निराळें वळण लागलें, त्याच सुमारास तो हिंदुस्थान सोडून गेला.

६. **थिवेनॉट, हॅमिल्टन वगैरे.**--थिवेनॉट जास्त योग्यतेचा होता. तो कुलीन घराण्यांतला असून पॅरिसच्या विश्वविद्यालयांत त्यास शिक्षण मिळालें होतें. तो जानेवारी स. १६६६ त सुरत येथें उतरला. त्या वेळीं

त्याचें वय ३४ वर्षांचें होतें तो फक्त एक वर्ष हिंदुस्थानात राहिला. परंतु तेवढ्या वेळात त्याने केलेलें सूक्ष्म अवलोकन त्याचा शहाणपणा दाखविल्याशिवाय राहत नाहीं अहमदाबाद येथे थिवेनाटने एक मशीद पाहिली पूर्वी तेथें हिंदु देवालय असून ओरंगजेबानें तें मोडिलें आणि त्याची मशीद केली त्या वेळीं त्या ठिकाणीं बादशहानें पुष्कळ गाई मारवून ती जागा विटाळून पुन हिंदूंच्या निरुपयोगी करून टाकिली सभोवारच्या संगमरवरी भिंतीवर जैन मूर्ति खोदलेल्या होत्या मुसलमानास मूर्ति पसंत नसल्यामुळे बादशहानें सर्व मूर्तीचीं नाकें तोडून टाकिलीं डिला व्हेलने वर्णिलेलीं पशुपक्ष्यांचीं शुश्रूषागृह थिवेनॉटनें अहमदाबादेस पाहिली तो पुन परत सुरतेस आला रस्त्यांत गिराशिये लोकाचा उपद्रव होता तेव्हा चोऱ्यामाऱ्याचा त्रास होऊं नये म्हणून चारण लोकास बरोबर घेण्याची वहिवाट होती. भाटामध्ये चारण म्हणून एक जात आहे, त्यास लोक पवित्र समजून त्याच्या वाटेस कोणी जात नसत चारणास जो कोणी ठार मारील, त्यास लोक जातिभ्रष्ट समजत म्हणून प्रवासी लोक आपणाबरोबर चारण जातीचा एक पुरुष व बायको दररोज दोन रुपये देऊन बाळगीत प्रवाश्यावर हात टाकण्यास कोणी आला असता हे चारण त्रागा करून आत्महत्त्येस प्रवृत्त होत असत, म्हणजे अर्थात् लुच्चे लोकास आपल्या दुष्कर्मापासून पराङ्मुख व्हावें लागे परंतु थिवेनॉटने चारणास बरोबर घेतलें नाहीं चारण लोक स्वत च लबाडी करूं लागले आहेत, अशी थिवेनॉटची समजूत होती रस्त्यात एकदा गिराशिये चोरांनीं त्यास गाठिलें, तेव्हा थोडे पैसे दिल्यावर चोरांची समजूत झाली. दुसऱ्या एका ठिकाणीं एक गिराशिया लोकाचा राजा सर्व प्रवाश्यापासून अर्धा रुपया कर वसूल करीत असे तो कर दिला म्हणजे त्याच्या टप्यात चोरी झाली तर तो माल भरून देई विशेषत व्यापाऱ्यास त्याचा फार उपयोग होई चोरांनी नेलेला माल जशाचा तसा तो मालकास परत देववी तोच राजा सुरतेहून आग्ऱ्यास जाणाऱ्या लमाणातील प्रत्येक इसमापासून दहा रुपये कर घेई, व त्याजबद्दल तो सर्व लोकास मेजवानी देऊन त्यास खुष करी, आणि आपली हद्द संपेपर्यंत स्वत चे स्वार बरोबर देऊन त्यास पोचतें करी खंबायतपासून भडोचपर्यंत सर्व प्रदेशाचा तो मालक असून तेथील लोकास गिरा-

शिये म्हणत. सुरत येथील मुसलमानांच्या न्यायपद्धतीचें वर्णन थिवेनॉटनें केलें आहे. इतर ठिकाणांप्रमाणेंच मुफ्ती किंवा मुल्ला आणि काजी ह्यांजकडे इन्साफाचें काम असे. वाकेनवीस म्हणून एक कामदार असे, तो शहराची सर्व हालहवाल बादशहास लिहून कळवी. सुरतेस दोन नबाब होते. एकाकडे किल्ल्याचें संरक्षण असून दुसऱ्याकडे शहराची व्यवस्था होती. दोघांचीं कामें बरोबर वांटलेलीं असत. शहराच्या नबाबाकडे सर्व दिवाणी कज्यांचें काम असे. लोकांना ताबडतोब निकाल मिळत असे. बहुतेक काम शपथेवर चाले. हिंदु इसमास ' गाईची शपथ घेऊन खरें सांगतो, खोटें बोलल्यास गोमांस भक्षण केल्यासारखें होईल, ' अशी शपथ घ्यावी लागे. हिंदु लोक सहसा शपथ वाहत नसत. शपथ घेण्यापेक्षां कज्जा बुडालेला बरा असें त्यांस वाटे. फौजदारी गुन्हे कोतवालाकडे जात. न्यायाधीश, पोलिस, तुरुंगाचा सुपरिंटेंडेंट व शहराचा माजिस्ट्रेट हीं सर्व कामें कोतवालाकडे असत. नबाब किंवा कोतवाल ह्यास देहान्त शिक्षेचा अधिकार नसे. तो अधिकार स्वतः बादशहाकडेस असे. खटल्याचा तपास करून त्याची हकीकत बादशहास कळविल्यावर तिकडून हुकूम येईल तशी शिक्षा देण्यांत येई. कोतवाल रात्रीं शहरात तीन वेळ गस्त घाली, नऊ वाजता, बारा वाजता व तीन वाजता. सर्व नाक्यांवर पहारा असे. रात्रीं रस्त्यावर कोणी इसम सापडल्यास त्यास एकदम कैद करून फटके वगैरे मारल्याशिवाय सोडीत नसत. चोऱ्या पकडून देण्याबद्दल कोतवाल जबाबदार असे. शहराबाहेरील आसपासच्या बंदोबस्ताचें काम फौजदाराकडे असे. शिवाजीनें सुरतेस लूट केली, तिची हकीकत थिवेनॉटनें दिली आहे. शिवाजीपाशीं तोफा नसून क्रिस्ती लोकांनीं आपल्या वखारीसभोंवती तोफा लाविल्या असल्यामुळें, तो त्यांच्या वाटेस गेला नाहीं, असें थिवेनॉटचें म्हणणें आहे. शिवाजी दिल्लीस गेला, तेव्हांची हकीकत थिवेनॉटनें लिहिली आहे. औरंगजेबाचा शिवाजीस ठार मारण्याचा विचार होता, परंतु रजपूत राजांची बाहेदारी शिवाजीस असल्यामुळें, ते बंड करतील असे वाटल्यावरून, बादशहानें शिवाजीस ठार मारिलें नाहीं. दिल्लीपासून लाहोरच्या रस्त्यावर ठग लोकांचा उपद्रव होता. नायर व पोळिया लोकांची थोडीबहुत हकीकत थिवेनॉटनें दिली आहे.

**हॅमिल्टन व ऑर्म.**—कॅ० अलेक्झांडर हॅमिल्टन हा स्कॉट्लंडांत राह-

णारा असून स १६८८ पासून १७२३ पर्यंत हिंदुस्थानात व्यापार करीत होता. ईस्ट इंडिया कंपनीशी त्याचा संबंध नव्हता. त्या कंपनीस हिंदुस्थानच्या व्यापाराचा संपूर्ण मक्ता देण्यात आला होता, तो त्याने मानला नाहीं सिंध प्रांतात तो बराच फिरला हा सरहद्दीवरचा प्रांत असल्यामुळे त्यास दोहोकडच्या लोकांचा उपद्रव होत असे या किनाऱ्यावर मोठें बंदर वसलेले नव्हते मुख्य शहर ठठ्ठा असून ते बरेंच आत होतें स. १६९९ त एक मोठा काफला ठठ्ठा येथे गेला, त्याजवर आसपासच्या लुटारू लोकांनीं छापा घालून शेकडों व्यापाऱ्यास निर्दयपणे कापून काढले, आणि सर्व माल लुटून नेला पुढे तीन महिन्यानी कॅप्टिन हॅमिल्टन मलबारहून सुमारे एक लाख रुपये किमतीचा माल घेऊन सिंध प्रांतांत गेला तो माल विकत घेण्यास पुष्कळ लोक राजी होते परंतु माल ठठ्ठा येथे सुरक्षित पोचावा कसा, ही पंचाईत होती ठठ्ठाच्या नवाबापासून स्वार मिळाले असते, पण त्या स्वारांचेंही लुटारू लोकांशीं संधान असे शेवटीं आपले सर्व खलाशी सशस्त्र बरोबर घेऊन, दुसरा एक काफला ठठ्ठा शहरीं जात होता, त्याजबरोबर हॅमिल्टन निघाला रस्त्यात लुटारू लोकांशीं त्याचा झगडा होऊन पुष्कळ जंगली लोक मारले गेले, आणि हॅमिल्टन ठठ्ठा येथे सुरक्षित पोचला लुटारू लोकांचा समाचार घेतल्याबद्दल ठठ्ठाच्या लोकांनीं त्याचें उत्तम स्वागत केलें नबाबाने त्यास नजराणे पाठविले. त्याच्या मालावरील जकात त्याने माफ केली, आणि मालाच्या विक्रीमध्ये त्यास काहीं अडचणी आल्यास त्या दूर करण्याचेंही त्याने वचन दिले सिंध प्रांतातून गुजराथेत येऊन हॅमिल्टन मलबारात गेला. रस्त्यावर चाचे लोकांचा उपद्रव भारी असे मोगलांचे व इंग्रजांचे वाकडेंच होते महाराष्ट्र व कर्नाटक येथील लोक इंग्रजास मिळून नव्हते दिल्ली येथें स. १७१५ त बादशहास त्याने शस्त्रक्रिया करून व्याधिमुक्त केलें, त्याबद्दल ई० ई० कं० साठीं त्याने जकातीची माफी मिळविली

बंगाल प्रांताविषयीं काहीं माहिती रॉबर्ट ऑर्म व बर्नियर यानीं दिली आहे ऑर्मने मराठ्यांचा इतिहास लिहिला असून तो सन १७५० च्या सुमारास काहीं वर्षे बंगाल प्रांतात राहत होता बंगाल्यातील जमीन फार सुपीक होती थोड्या श्रमानें पुष्कळ उत्पन्न देणारा प्रांत बंगाल्याप्रमाणें सर्व पृथ्वींत दुसरा नव्हता. येथे तांदुळाचे पीक मुख्य त्या वेळीं फुटकळ विक्रीत पैशास

शेर ( ४० तोळे ) तांदूळ मिळत. दुसरीं धान्यें, भाज्या, फळफळावळ ह्याची तर लयलूट होती. उंसाची साखर जिकडे तिकडे होत असे, आणि मांसाहार करणाऱ्यांसाठीं सर्व प्रकारचे भक्ष्य प्राणी, व दूध, मीठ, इत्यादि जिनसांची विलक्षण समृद्धि होती. येथें येऊन व्यापार करणाऱ्या इंग्रजास तर ही सुबत्ता पाहून पराकाष्ठेचा आनंद होई रुपयाच्या वीस कोंबडी विकत मिळत. मेंढरें कोकरें तशींच स्वस्त होतीं. येथील स्त्रिया स्वरूपानें सुंदर व स्वभावानें मनमिळाऊ असल्यामुळें, त्या वेळच्या युरोपियन लोकांत एक म्हण पडून गेली होती, तिचा आशय असा होता, कीं बंगाल्यांत येणाऱ्या परकी लोकांस शंभर दरवाजे खुले आहेत, परंतु एकदां आंत आल्यावर बाहेर जाण्यास एक सुद्धां मार्ग नाहीं. तेथची व विशेषतः समुद्रकाठच्या प्रदेशाची हवा परकी लोकांस मानवत नसे. आरंभीं इंग्रज व डच ह्यांचे लोक भडाभड मरूं लागले. तेव्हांपासून असा नियम करण्यांत आला, कीं हिंदुस्थानांत होणारी व सर्वत्रांस आवडणारी पंच नांवाची दारू व परस्त्रीसंग ह्या गोष्टी सोडून द्याव्यात, आणि पानसुपारीच्या दुकानावर कोणी जाऊं नये. शिवाय बोर्डो, कॅनेरी व शिराज येथील मद्य घेतलें असतां हवा बाधत नाहीं असें त्या लोकांस कळून आलें; आणि पुढें पुढें लोक कमी मरूं लागले. बंगाल प्रांत कालवे व खाड्या ह्यांनीं भरलेला होता. पूर्वीच्या लोकांनीं व्यापाराचे सोयीसाठीं सर्व प्रांतांत मोठमोठे कालवे पुष्कळ श्रम व खर्च करून तयार केले होते. त्यांतील पाणी पिण्यास अति उत्तम असें लोक मानीत. कालव्यांच्या दोनही बाजूंस गांवें वसलेलीं होतीं. ते लोक कालव्याच्या पाण्यावर सर्व प्रकारचीं पिकें उत्पन्न करीत. ऊंस व रेशमी किड्यांचीं झाडें यांचे मोठमोठे मळे असत. सभोंवारच्या कालव्यांमध्यें हे मळे म्हणजे लहान लहान सुंदर बेटेच वाटत. आराकानचे पोर्तुगीझ लोक किनाऱ्यावरील लोकांस वारंवार लुटीत, म्हणून तेथची बेटें ओसाड पडलीं होतीं. अर्थात् वाघ, डुकर, इत्यादि रानटी प्राण्यांचें तें वसतिस्थान झालें होतें. तथापि बंगाल्यांतील निःसत्त्वकारक हवेचा परिणाम लोकांच्या प्रकृतीवर चमत्कारिक झाला, असें ऑर्मचें म्हणणें आहे. हिंदुस्थानांतली हवा एकंदरीत लोकांस निःसत्त्व करणारी आहे; त्यांतून बंगालची तर विशेष. सर्व हिंदुस्थानांत बंगालचे लोक अशक्त काटीचे व दुर्बळ होते. शौर्य, सोशिकपणा, शक्ति इत्यादि गुणांचा त्यांच्या अंगीं अभाव होता. लोकवस्ती दाट असून

रेशमी व सुती कापड तयार करण्याचा धंदा इतक्या जारीने चालू होता, की मोगल बादशाहींत बंगाल्यातल्या इतके चांगले विणकाम दुसरे कोठेही होत नसे

७ **कार्स्टेन नीबर**—नीबर नामक एक रोमचा प्रसिद्ध इतिहासकार आहे, त्याचा बाप कार्स्टेन नीबर हिंदुस्थानात आला होता तो जर्मनींत हानोवर येथें जन्मला असून, डेन्मार्कचा राजा पांचवा फ्रेड्रिक याच्या नोकरींत इजिप्ट देशास आला तेथून सन १७६३ त तो मुंबई व सुरत येथे येऊन सन १७६७ त परत गेला मुंबई बेट मात्र इंग्रजांचे ताब्यात असून आसपासचा सर्व प्रदेश मराठ्यांचे ताब्यात होता मुंबईत सर्व जिन्नस सार्ष्टी नावाच्या सुपीक बेटांतून अगर इतर ठिकाणाहून आणावे लागत सार्ष्टी मराठ्यांच्याच ताब्यात असून त्याजवर युरोपियन लोकांचा डोळा होता मुंबईची हवा हळूहळू निवळत चालली होती, परंतु युरोपातून येणारे नवीन लोक गोमांस, डुकराचे मांस, मद्य इत्यादि पदार्थांचे सेवन बेसुमार करीत, आणि एकाएकी मृत्युमुखी पडत युरोपियन कपडे मुंबइतील ऊष्ण हवेस योग्य नसल्यामुळे त्यांची शरीरे भाजून जात नीबर असे लिहितो, की 'एतद्देशीय लोकांस रोगराई बाधत नाहीं व ते पुष्कळ दिवस जगतात, त्याचे कारण असे, की 'ते लोक अंगासभोंवतीं मोकळी हवा खेळेल असे सैल व पायघोळ कपडे वापरितात, मांसाहार व मद्यपान करीत नाहींत, आणि रात्रींचे भोजन दिवस मावळल्यावर पुष्कळ वेळाने करितात ' युरोपियन आचारविचार हिंदुस्थानास लागू पडत नाहींत, हे त्या वेळच्या लोकांसही कळून चुकले होते मुंबईची लोकवस्ती एक लक्ष चाळीस हजार होती, ती अलीकडच्या वीस वर्षांत फार वाढली होती. त्यात युरोपियन लोक फार थोडे होते सुरतची लोकसंख्या त्या वेळेस तीन लाख होती सुरत येथ मनुष्यांचे दवाखाने मुळींच नसून निरुपयोगी व निराश्रित जनावरांसाठीं मात्र हिंदूंचे दवाखाने होते, हे पाहून यास मोठे आश्चर्य वाटले

अशा प्रकारची पाश्चात्य प्रवाश्यांनीं लिहिलेली माहिती नानाविध आहे. येथे नुसते त्रोटक दिग्दर्शन केले आहे हिंदु लोकांच्या त्या वेळच्या अंतःस्थितीविषयीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं, हे शोचनीय होय. हिंदु राज्यनीतीसंबंधीं पाश्चात्यांनीं विशेष हकीकत दिलेली नाहीं कॅप्टिन हॅमिल्टनने आपले मत दिले आहे, ते असे 'स्वराज्यापेक्षा मोगलाच्या अंमलास राहणे

हिंदु लोकांस बरें वाटे, कारण मोगलांनीं लोकांवर करांचें ओझें विशेष लादलें नाहीं; जो कर द्यावयाचा तो अधिकाऱ्यांच्या मर्जीवर अवलंबून नसून ठरीव होता, आणि तो प्रत्येकास आगाऊ माहीत असे. हिंदु राजे मर्जीप्रमाणें लोकांवर कर बसवीत. मनांतील द्रव्यलोभ हेंच लोकांपासून पैसा वसूल करण्याचें प्रमाण. ते क्षुल्लक कारणावरून शेजाऱ्यांशीं भांडण उपस्थित करीत; तेणेंकरून त्यांच्या महत्त्वाकांक्षेचा व मूर्खपणाचा परिणाम सर्व रयतेस भोगावा लागून, देहद्वारा व वित्तद्वारा त्यांस अतोनात नुकसान सोसावें लागे.' एकंदरींत, सामाजिक, व सांपत्तिक हीं जीं इतिहासाचीं दोन मुख्य अंगें, त्यांजबद्दल विश्वसनीय माहिती मिळविण्यासाठीं अद्यापि पुष्कळच संशोधन झालें पाहिजे.



# प्रकरण एकुणतिसावें



## मोगलबादशाहीचा ऱ्हास

### स १७०७-१७४८

१. बहादूरशहा, (स १७०७-१२) २ शीख लोकांचा उदय.
३ जहादरशहा, (स १७१२) ४ फर्रुखसेयर, (स १७१३-१९).
५ महंमदशहा, (स १७१९-४८) ६ चिंकिलीजखान, निजामशाहीचा उदय.
७ नादिरशहाची स्वारी (१७३८-३९) ८ प्रांतिक अंमलदारांचे स्वातंत्र्यधारण.

**१ बहादूरशहा,** (१७०७-१२)—मोगल बादशाहीचा ऱ्हासकाल म्हणजे अठराव्या शतकाचा इतिहास होय हिंदुस्थानच्या इतिहासात हे शतक अनेक कारणांनी अतिशय महत्त्वाचे आहे मराठे, शीख, इंग्रज इत्यादिकांचा जोर त्याच शतकात झाला सांपत्तिक व जगाच्या परिस्थितींत मोठमोठ्या धडामोडी त्याच वेळच्या आहेत तथापि त्या ठिकाणी तपशीलवार विवेचनास जागा नाहीं फक्त मोगलबादशाहीचा उपसंहार येथे करावयाचा आहे

औरंगजेबाने मरणापूर्वी मृत्युपत्र करून सर्व राज्य आपल्या तिघां मुलांस वाटून दिले होते परंतु ती व्यवस्था अमलात न येता, ते तिघे आपसांत लढूं लागले. वडील मुलगा मुअज्जम हा त्या वेळीं काबूलच्या सुभ्यावर होता. धाकटा कामबक्ष हा विजापुरच्या कारभारावर असून तिसरा अज्जम हा मरण-समयीं बापाजवळ होता, आणि त्याच्याच ताब्यात सर्व फौज होती वजनदार सेनापति झुल्फिकारखान याची त्यास मदत होती बापाचें मृत्युपत्र झुगारून देऊन तो आपणास सर्व राज्याचा बादशहा म्हणवूं लागला तसेंच सर्व फौज घेऊन तो दिल्लीकडे निघाला मुअज्जम यास ही खबर लागताच तोही काबुला-हून आपल्या भावाचा समाचार घेण्याकरिता चालून आला. त्याचा वडील मुलगा मोइझ्-उद्दीन हा मुलतानास, व दुसरा अजीम-उश्शान्

बंगाल्यांत होता. त्यांस त्यानें त्वरेनें आपणास येऊन मिळण्याविषयीं लिहिलें. अज्जमशहा दिल्लीपावेतों येऊन दाखल होण्यापूर्वीच मोइझ्‌-उद्दीन व अजीम्‌-उश्शान्‌ हे बापास मिळाले. अज्जमशहा त्वरा करीत ग्वाल्हेरपर्यंत गेला. त्याचा तोफखाना व पायदळ बरोबर येऊं न शकल्यामुळे मागें राहिलें. आपला भाऊ आग्र्याजवळ उतरला आहे, असें ऐकून तो तसाच त्याजवर चालून गेला. मेवाड व मारवाडचे राजे मुअज्जम यास मिळाले. ता. ३१ मे स. १७०७ या दिवशीं उभयतांची गांठ जाजव येथें पडली. लढाई मोठ्या निकराची झाली. अज्जमशहा इतका लवकर येऊन दाखल होईल असें मुअज्जम यास वाटलें नव्हते. म्हणून तो शिकारीस गेलेला होता. परंतु त्वरेनें परत येऊन त्यानें लढाईस तोंड दिलें. याप्रमाणे दोनही दळे शिकस्त करून लढत असतां, एकदम जोराचा वारा सुटून दिशा धुंद झाल्या; आणि अज्जमशहाच्या फौजेच्या डोळ्यांत धुळीचे लोट शिरले. त्यामुळे त्याचें दैव फिरलें. ‘क्षणभर कच खाऊन निघून जा, मागे राहिलेली फौज येऊन मिळाल्यावर पुनः लढाई करूं.’ इत्यादि गोष्टी झुल्फिकारखानानें अज्जमशहास सांगितल्या, पण त्या त्या राजपुत्रास रुचल्या नाहींत. तेव्हां झुल्फिकारखान निघून गेला. पुढें अज्जमशहा तसाच लढत असतां बातमी लागली, कीं त्याचे दोन मुलगे बेदर-बख्त व वल्लीजा डाव्या व उजव्या बाजूस लढत होते ते, व दतिया, कोटा येथील राजे आणि दुसरे हाताखालचे मोठमोठे सरदार लढाईंत पडले. अशा स्थितींत निराशेनें त्यानें आपला हत्ती गर्दींत घातला, त्याबरोबर लगेच तो शत्रूंच्या हातून मारला गेला. त्याचा धाकटा मुलगा अली-तेहार हा मुअज्जमच्या हातांत जिवंत सांपडला, पण त्यास मुअज्जमनें मोठ्या ममतेनें वागाविलें. लढाई संपल्यावर मुअज्जमनें बादशाही पद धारण केलें, आणि आपणास बहादूरशहा असें म्हणवूं लागला. झुल्फिकारखान, त्याचा बाप आसदखान व अज्जमशहाचे दुसरे सर्व सरदार त्यास शरण आले. त्यांस बहादूरशहानें क्षमा केली. रजपूत राजांकडे तर मूळपासून बहादूरशहाचा विशेष ओढा होता.

कामबक्ष अजून दक्षिणेंत होता. त्यास बहादूरशहाचें करणें पसंत पडलें नाही, तेव्हां बहादूरशहास सवड मिळतांच तो दक्षिणेंत त्याजवर चालून आला. ता. १३-१-१७०९ रोजीं हैदराबादनजीक उभयतांची गांठ पडली.

कामबक्ष लढाईत मारला गेला, तेव्हा अर्थात् सर्व राज्य बहादूरशहाच्या ताब्यात आले त्या वेळेस इंग्लंडात ॲन राणी राज्य करीत होती

बहादूरशहाच्या कार्किर्दीत महत्त्वाच्या गोष्टी दोन घडल्या एक, संभाजीचा पुत्र शाहू याची सुटका होऊन त्यास मराठ्याचे राज्य मिळाले, आणि दुसरी, शीख लोकाशीं तंटे पहिलीची हकीकत मराठ्याचे भागात आली आहे ह्या वेळीं झुल्फिकारखानाकडे दक्षिणचा कारभार होता परंतु स १७०९ अखेर बादशहा दिल्लीकडे जाऊं लागला, तेव्हा झुल्फिरखानास त्याने आपणाबरोबर घेतले सबब दाऊदखान पन्नी नामक एका हुषार कामदारास झुल्फिकारखानाचा दुय्यम म्हणून त्याने दक्षिणेत नेमिले, आणि बादशहा दिल्लीकडे निघून गेला रस्त्यात रजपूत राजाशीं त्याला भाडावे लागत होते, परंतु पंजाबाकडे शीख लोकानीं दंगा केला आहे असे वर्तमान आल्यामुळे, रजपुताच्या मागण्या कबूल करून त्याजबरोबर त्याने सख्य केल हे वर्तमान १७०९ त घडले

**२ शीख लोकांचा उदय**—शीख लोकाचे नाव ह्या कार्किर्दीत प्रथमच आले आहे तेव्हा प्रस्तुतच्या त्याच्या कृत्याचे वर्णन करण्यापूर्वी त्याची येथें थोडीशी पूर्वपीठिका देणे जरूर आहे

मागच्या प्रकरणात धार्मिक स्थितीविषयी थोडेसे विवेचन करण्यात आले आहे, त्यावरून अलीकडे दोनतीनशे वर्षात धर्मसुधारणेकडे सर्व लोकाचे लक्ष लागले होते, आणि जातिभेद वगैरे समाजविघातक प्रचार मोडून, नवीन धर्मस्थापन करण्याचे प्रयत्न चालू होते, हे कळून आले असेल शीखाचा पंथ अशा प्रयत्नाचाच परिणाम होय त्याचा संस्थापक बाबा नानक ऊर्फ नानकशहा हा इ स १४६९ सालीं देहरा गावीं जन्मला. हे गाव लाहोरपासून तीस कोसावर रावी नदीच्या काठीं आहे आरंभीं तो हिंदु असून धान्याचा वगैरे व्यापार करीत असे. पुढे तो कबिराचा शिष्य बनला, आणि लोकास एकेश्वरमताचा उपदेश करूं लागला त्या वेळेस दिल्लीस बुह्लोल लोदी राज्य करीत होता त्याच्या ताब्यात पंजाब प्रातात लहान लहान हिदु जमीनदार राजे राज्य करीत होते, त्यापैकीं एका राजाने नानक यास आपल्या मुलखात धर्मोपदेश करण्याची परवानगी दिली व तो उपदेश करीत दैविक चमत्कार दाखवीत सर्व हिदुस्थानभर फिरला तसेच मक्का, मदीना, येथेही तो गेल्याचे सागतात धर्माच्या

कामांत आग्रह नसावा, कोणीही मनोभावानें केलेली सेवा ईश्वरास सारखीच आवडते, हा त्याच्या शिकवणीचा मुख्य मुद्दा होता. ह्या उपदेशाचा विशेष परिणाम पंजाबांतच झाला. त्याच्या अनुयायांस शीख हें नांव मिळालें. 'शीख' हा शब्द संस्कृत 'शिष्य' शब्दाचा अपभ्रंश आहे. नानकाचे 'शिष्य' ते शीख झाले. नानकानें आपल्या शिष्यांचा एक नवीन पंथ काढिला. हा पंथ आचरणारांनी सर्व माणसांशीं मैत्रीनें वागावें असा कटाक्ष होता. अंगद नांवाचा नानकाचा एक मुख्य शिष्य होता, त्याजकडे त्यानें ह्या नवीन पंथाचें आधिपत्य दिलें. अंगदानंतर अमरदास हा शीखांचा मुख्य झाला. अमरदासानें कजरावळ नामक किल्ला बांधिला. त्याच्या मनांत स्वतंत्र राज्यस्थापना करण्याचें होतें, परंतु राज्यप्राप्तीच्या नादास लागल्यानें धर्म बुडतो असे वाटून पुष्कळांनीं अमरदासास सोडिलें, आणि ते नानकाचा नातू धर्मचंद यास भजूं लागले. या नवीन पोटशाखेस 'उदासी' व 'निर्मल' अशीं नावे मिळालीं. हिंदुस्थानातील मोठमोठ्या शहरीं शीखपंथाचे उपदेशक प्रसिद्धीस आले, ते ह्या उदासी व निर्मल शाखेतील असून राजकीय गोष्टींत मन घालीत नाहींत. शीखाच्या धर्मग्रंथास 'आदिग्रंथ' अशी संज्ञा असून तो पंजाबी व हिंदी ह्या भाषात लिहिलेला आहे. त्यांतील कित्येक भाग स्वतः नानकाचे व कित्येक कबीर, रामनंदन वगैरे सत्पुरुषाचे आहेत. नानकापासून पांचवा गुरु अर्जुनमल्ल म्हणून जहांगीरचे वेळेस झाला, त्यानें हा आदिग्रंथ सर्व एकत्र जमविला. आरंभाचे मोगल बादशहा धर्माचे बाबतींत आग्रही नसल्यामुळें त्यांच्या वेळेस शीखांचें महत्त्व पुष्कळ वाढलें. पंजाबातील सुपीक दुआबांत ते वस्ती करून राहिले. पांचवा गुरु रामदास याजवर अकबर बादशहाची विशेष मर्जी होती, (पृ. ९८ पहा). ह्याच साधूच्या नावानें पंजाबातील रामदासपुर नांवाचें शहर प्रसिद्ध आहे. रामदासानें एक मोठा लोकोपयोगी तलाव बांधिला, त्यास अमृतसर असें नाव मिळून, त्याजवरून हल्लींच्या अमृतसर शहराचे नांव पडलें. ह्या शांततेच्या काळात शीख लोक धनाढ्य झाले. अशा प्रकारें वाढत चाललेलें शीखांचें वजन पुढील आग्रही मुसलमानांस खपेनासें झालें. स. १६६० या वर्षी अर्जुनमल्ल ह्यास त्यांनीं पकडून ठार मारिलें. ह्या कृत्यानें शीख लोक चवताळून गेले. अर्जुनमल्लाचा मुलगा हरगोविंद यास पुढारी करून ते आपल्या शत्रूंचा सूड घेऊं लागले. परंतु ह्या बंडाकडे त्या वेळच्या

मुसलमान अधिकाऱ्याचे विशेष लक्ष गेले नाहीं त्यास उत्तरेकडील पहाडात हाकून दिल्याने बंडाचा तात्पुरता बंदोबस्त झाला परंतु तेव्हापासून शीखानीं आपल्या आचरणात पुष्कळ फरक केला नानकाने शिकविलेला शाततेचा बाणा सोडून देऊन ते लढाऊ बनले, आणि आसपासच्या मुलुखात लुटालूट करून स्वसंरक्षणाच्या तयारीस लागले तसेच त्याच्यात आपसातही कलह उत्पन्न होऊन शिवाय मोगल अधिकाऱ्यानीं त्याजवर शस्त्र धरिले ह्या आपसातील वैमनस्याचा परिणाम असा झाला, कीं स. १६७५ त गुरु तेघबहादूरचा वध झाला तेघबहादूरच्या वधाचे वेळीं औरंगजेबाने शीखाचा बहुतेक नायनाट केला होता

तेघबहादूरनंतर त्याचा मुलगा गुरुगोविंद हा शीखाचा दहावा गुरु स १६६० त जन्मला हा धोरणी व चलाख असून त्याच्या वेळेपासन शीखाच्या पंथात नवीन मन्वंतर सुरू झाले लष्करी पद्धतीवर शीखाचे एक नवीन प्रजासत्ताक मंडळच त्यानें स्थापिले, असे म्हटल्यास चालेल उत्कृष्ट उपदेशक व शूर योद्धा याचा उत्कृष्ट मिलाफ त्याचे अंगीं असल्याने लोकास शिकविण्याकरिता त्याने नवीन प्रघात घातले जातिभेद साफ नाहींसा केला, सर्व लोकास सारखे वागविण्याचे नियम केले, आपल्या अनुयायास एक नवीन लष्करी पोषाख दिला शिपाईगिरीची खूण म्हणून प्रत्येकाने आपल्याजवळ लोखंड बाळगावे, अंगावरील केस न काढता ते वाढूं द्यावे, असे त्याने ठरविले. हिंदूंस खुष ठेवण्याकरिता गोवधाची मनाई करून हिंदूंच्या देवतास मान देणें व ब्राह्मणाची प्रतिष्ठा राखणे इत्यादि गोष्टी ठरवून दिल्या साराश, आजतागाईत शीखाची शौर्याबद्दल ख्याति आहे, तिचा उत्पादक हा गुरुगोविंद होय विचित्र नाटक म्हणून शीखामध्ये एक प्रसिद्ध ग्रंथ आहे, त्यात ह्या पुरुषाच्या कृत्याचे वर्णन आहे त्यास 'दशम पादशहाका ग्रंथ' असेही म्हणतात लढाईच्या प्रसंगीं 'वा गुरुजीका खालसा,' 'वा गुरुजीकी फत्ते,' अशा शब्दाचा उच्चार करण्याविषयीं गुरुगोविंदाने ताकीद दिली 'खालसा' शब्दाचा अर्थ एकी असा आहे म्हणून आपण सर्व लोक एक असून गुरूशी आपलें संगनमत आहे, असा वरील शब्दाचा अर्थ होतो यावरूनच शीख फौजेस 'खालसा फौज' म्हणण्याचा प्रघात पडला 'गुरुमता' नावाचे एक शीख सरदाराचे मंडळ गुरुगोविंदाने स्थापिले हे मंडळ अमृतसर येथे वेळो-

वेळीं जमत असे; त्या वेळीं शीखांच्या उन्नतीचे उपाय काय करावे, ह्याचा विचार होई. ह्या मंडळांतील सभासदांची निवडणूक कोणत्या तत्त्वावर होत असे हें बरोबर समजत नाहीं, तरी लष्करी कामांत हाताखालीं चार लोक बाळगून जे लोकनायक म्हणून कांहीं सरदारी गाजवीत, त्यांस या सभेंत बसण्याचा अधिकार असे. प्राच्य लोकविचारांत लोकनियुक्तत्व दाखल झाल्याचें हें पहिलेंच उदाहरण, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचे धाकटे दोन मुलगे जोरावरसिंग व फत्तेसिंग हे सरहिंद येथें भिंतींत चिणून ठार मारिले गेले. वडील दोन मुलगे पूर्वींच लढाईंत मारले गेले होते. अशा रीतीनें आपल्या वंशाची वाताहत झालेली पाहून गुरुगोविंदाच्या आईनें मस्तक पिटून जीव दिला. येणेंप्रमाणें तेघबहादूरच्या संकेतानुसार त्याच्या वंशाचा हृदयद्रावक रीतीनें शेवट झाला. औरंगजेबाच्या लष्कराशीं लढतांना गुरुगोविंद अगदीं टेंकीस आला. अखेरीस मोगल फौजेनें गुरुगोविंदाचीं सर्व ठाणीं घेतलीं; आणि नानाप्रकारें छळ करून त्याच्या पक्षाची अगदीं वाताहत करून टाकिली. तो अगदीं हतवीर्य होऊन रानोमाळ भटकूं लागला आणि शेवटीं दक्षिणेंत गोदावरीचे कांठीं नांदेड येथें त्याचा एका शत्रूनें खून केला, (७-१०-१७०८, कार्तिक शु० ५ संवत् १७६५, अर्व्हिन १-९० ). गुरुगोविंद हाच शीखांचा शेवटचा धर्मोपदेशक होय. त्याच्या नंतरचे पुरुष सेनानायक म्हणून प्रसिद्ध आहेत, धर्मोपदेशक नव्हते. इतउत्तर शीखांचें धर्मस्वरूप पार नाहींसें होऊन केवळ लष्करी स्वरूप वृद्धिंगत झालें. औरंगजेबाचे कारकिर्दींत शीखांचा जो छळ झाला, त्याचा सूड त्यांनी लौकरच उगविला. बंदा म्हणून कोणी एक क्रूर, साहसी, व धीट असा बैरागी गुरुगोविंदाचा प्रिय शिष्य होता. त्याच्या हाताखालीं जमाव करून शीख लोक चवताळून मोगलांच्या राज्यांत शिरले. पंजाबातील मुलूख उद्ध्वस्त करीत ते मोगलांवर चालून आले. त्यांनीं मुसलमानांच्या मशिदी मोडिल्या. मुल्ला मंडळीची व स्त्रीपुरुषांची त्यांनीं कत्तल केली. दयामाया वगैरे कांहीं एक मनांत न आणितां, त्यांनीं मनस्वी क्रौर्य करून शहराचीं शहरें कापून काढिलीं. मेलेल्यांचीं प्रेतेंही उकरून काढून तीं पशूंस खावयास दिलीं. हा प्रकार मुख्यत्वेंकरून सरहिंद येथें घडला. असें आचरण करीत ते थेट दिल्लीकडे येऊं लागले. ह्या वेळीं जे मुसलमान शीख धर्म पत्करून त्याच्यांत येऊन मिळाले, त्यांना मात्र त्यांनीं

जीवदान दिलें शेवटीं बहादूरशहाने त्याच्यावर स्वारी करून त्यास पहाडात हाकून लाविले, आणि बंदा यास सरहिंद येथे वेढिले अनेक संकटे आलीं असताही शीखानीं बादशहाच्या फौजेस दाद दिली नाहीं शेवटीं अन्नसामुग्रीचा तोटा पडून लोक जिवावर उदार होऊन मोगलाच्या वेढ्यातून पार निघून गेले, आणि किल्ला मोगलाच्या हातीं लागला तरी शीखाचा बंदोबस्त होण्या-पूर्वी बहादूरशहास मृत्यूने गाठिलें तो सन १७१२ च्या फेब्रुआरि ता १७स लाहोर येथे मरण पावला त्या वेळीं त्याचें वय ७० वर्षांचे होतें

बहादूरशहाची कार्किर्द एकंदरीने शाततेत गेली तो दयाळु व विचारी होता त्याचे भाऊ त्याजविरुद्ध लढून नाहक मरण पावले, तरी त्याच्या मुला-बाळास त्याने ममतेने वागविले. तो बुद्धिमान, सारासारविचारी, अनुभवी व मनमिळाऊ असल्यामुळे कोणतेही काम तडीस नेण्यास समर्थ होता औरंग-जेबाचे वेळेस माजलेली अव्यवस्था मोडण्यास तो लायक होता पुढे आणखी काहीं दिवस वाचता तर त्याने मोगलाचें वैभव पुन स्थापिले असते त्याच्यात हिंमत किंवा साहस विशेष नव्हते, परंतु तसेंच क्रौर्यही नव्हते राज्य-प्राप्तीच्या वेळेसच तो वयोवृद्ध असल्यामुळे, राज्यात विशेष ढवळाढवळ कर-ण्याची त्यास ताकद राहिली नव्हती

**२ जहांदरशहा**, (स १७१२)--बहादरशहास चार मुलगे होते मोइझ्-उद्दीन, अज्जुद्दीन, अजीम-उश्शान्, खुजिस्ता आख्तार आणि रफी-उल्-कदर बादशहा मरण पावताच त्या मुलामध्ये तख्ताबद्दल तंटे सुरू झाले दुसरा मुलगा अजीम-उश्शान् याजवर बापाची विशेष मेहेरबानी होती बादशाही खजिना व मोतब त्याच्याच ताब्यात असल्यामुळे फौजबंद होऊन त्याने सर्व सत्ता धारण केली परंतु इतर तिघा मुलास झुल्फिकारखानाने फूस देऊन अजीम-उश्शान्शीं लढण्यास लाविलें त्या युद्धात अजीम-उश्शान्चा मोड झाला, आणि तो झपाट्याने निघून जाण्याचा प्रयत्न करीत असता रावी नदींत पडून मेला पुढे राहिलेल्या तिघा बंधूंत झगडा लागला खुजिस्ता आखीर हा लढाईत मारला गेला, आणि मोइझ्-उद्दीन हा जहादरशहा असे नाव धारण करून बादशहा झाला दुसऱ्याच दिवशीं राहिलेला धाकटा शहा-ज्ञादा रफी-उल्-कदर हा जहादरशहाशीं लढून मरण पावला जहादर-

शहानें ता. ९ जून स. १७१२ रोजीं दिल्ली शहरांत विजयानंदानें प्रवेश केला.

जहांदरशहा बादशाही सत्ता धारण करण्यास लायक नव्हता. त्याच्याइतका दुर्वृत्त व क्रूर स्वभावाचा बादशहा मोगलांमध्यें झाला नाहीं. त्याच्या भावाचीं व चुलत्यांचीं जीं मुलें हयात होतीं, त्या सर्वांचा त्यानें वध करविला. आसद-खान व झुल्फिकारखान यांस मात्र त्यानें मोठ्या योग्यतेस चढाविलें. लालकुवर नामक त्याची एक राख होती. तिच्या हलकट नातलगांस बहुमान देऊन त्यानें दरबारच्या सर्व मंडळींचीं मनें दुखविलीं. झुल्फिकारखानाच्या हातांत सर्व सत्ता होती. त्याची गर्विष्ठ व जुलमी वागणूक कोणासही आवडेनाशी झाली. इकडे बादशहाचें छंदानुवर्तन झुल्फिकारखानास आवडेनासें होऊन दोघांमध्ये वितुष्ट पडलें. इतक्यांत बंगाल प्रांतांत गडबड झाली. शहाजादा अजीम–उश्शान् हा पूर्वी बंगालचा सुभेदार होता. तो बहादूरशहास येऊन मिळाला, तेव्हां त्यानें आपलीं मुलेमाणसें बंगाल्यात राजमहाल येथें ठेविलीं होतीं. फर्रुख्सेयर नांवाचा त्यास एक मुलगा असून, तो दूर असल्यामुळें जहांदरशहाच्या तावडींतून सुटला होता. बारा सय्यद * नावाचें एक मोठें पिढीजाद घराणें अकबरापासून हिंदुस्थानात नांदत होतें, त्यांपैकीं सय्यद हुसेनअली व सय्यद अब्दुल्ला हे दोन सरदार त्याच्या पक्षास मिळाले. हे दोघे भाऊ असून हुसेनअली बहारचा व अब्दुल्ला अलाहाबादचा सुभेदार होता. त्यांनीं आपल्या फौजा एकत्र केल्या. तेव्हां बादशहा झुल्फिकारखानास बरो-बर घेऊन स्वतः त्यांजवर गेला. ता. २८ डिसेंबर, सन १७१२ रोजीं उभय-पक्षांची गांठ आग्र्यानजीक पडली. लढाई होऊन जहांदरशहाचा पराजय झाला, आणि लालकुवरला घेऊन तो पळून गेला. पराभव झालेल्या फौजेची जमवाजमव करून झुल्फिकारखान दिल्लीकडे आला. तेथें जहांदरशहा आसदखानाच्या घरीं जाऊन लपलेला त्यास आढळला. परंतु इतक्या अवधींत दरबारची मंडळी फर्रुख्सेयर ह्यास जाऊन मिळाली. तेव्हां एकट्यानेंच जहांदरशहास मदत करणें झुल्फिकारखानास उचित वाटलें नाहीं. ता. ११ जानेवारी, सन १७१३ रोजीं फर्रुख्सेयरनें

* टीप–म. रि. म. वि. १ पृ. ७४ पहा. येथून पुढें मराठेमुसलमानांचे जे विशिष्ट व्यवहार घडले, त्यांचे तपशील मराठ्याच्याच भागांत पाहवे.

बादशाहीपद धारण केले ज्यानीं ज्यानीं त्यास मदत केली होती, त्या सर्वांस त्याने मोठमोठ्या जागा दिल्या त्यातच चिकिलीजखान याची हुषारी पाहून त्यास त्याने निजामुल्मुल्क असोफजा असा किताब दिला नंतर तो समारंभाने दिल्लीस येऊं लागला, तेव्हा आसदखान व झुल्फिकारखान त्यास सामोरे गेले त्याचा फरुखसेयरने चागला सत्कार केला परंतु मीर-जुम्ला नावाचा एक हलका मनुष्य वजीर होता, त्यास ते दोघे शत्रुसमान वाटत होते त्याच्या लोकानी झुल्फिकारखान व जहादरशहा यास पकडून ठार मारिले (११-२-१७१३) आणि वृद्ध आसदखानाच्या देखत त्याचीं प्रेते हत्तीच्या पायास बाधून दिल्ली शहरात मिरविलीं. इतर मंडळीचीही कत्तल झाली. जहादरशहा मेल्यामुळे कोणास वाईट वाटले नाहीं, पण झुल्फिकारखानासारखा इभ्रतीचा व लायक मनुष्य नाहींसा झाल्यामुळे सर्व लोक हळहळले

**शीखांशी युद्ध**—बादशाहीमध्ये अशी अंदाधुंदी चालल्यामुळे मध्यंतरीं शीख लोकाचे चागलेच फावले त्याचा मुख्य नायक बंदा हा लाहोरच्या ईशान्येस शंभर मैलावर लोहगड नावाच्या किल्ल्यात जाऊन राहिला होता तेथून तो बाहेर आला आणि खाली मैदानात येऊन पूर्वीपेक्षाही जास्त त्वेषाने मोगली राज्यात धुमाकूळ करूं लागला शेवटीं अब्दुलसमीद नावाच्या हुषार सरदारास फरुखसेयरने त्याजवर पाठविले त्या सरदाराने शीखाचा पराभव करून पुष्कळास जागच्याजागींच ठार मारिले, आणि बंदासुद्धा ७४० लोकास पकडून दिल्लीस पाठविले. त्या लोकाची कत्तल दिल्ली शहरात सात दिवस सारखी चालू होती बंदाची तर त्यानी विशेष विटंबना केली इतर सर्व लोकाची कत्तल झाल्यावर त्याला उंची पोषाख घालून व पिंजऱ्यात कोंडून चवाठ्यावर आणिले सभोवार त्याच्या अनुयायाचीं शिरें भाल्यावर टोचून ठेविलीं होतीं प्रथमत त्याच्या मुलास त्यानीं जाळून मारिले, आणि शेवटीं तापलेल्या चिमट्यानीं त्यास विदारून त्यानीं त्याचा प्राण घेतला बंदा शेवट-पर्यंत मोठ्या धैर्याने वागला, आणि ईश्वरावर भरंवसा ठेवून सर्व हाल त्याने शात वृत्तीने सहन केले याशिवाय अनेक तऱ्हानीं शीख लोकाचा त्या वेळेस निःपात करण्यात आला कित्येक शीखाचे असे मत आहे, कीं बंदा मुसल-मानाच्या हातात न सापडता सिंध प्रातात गेला, आणि तेथे स्वधर्माचा उपदेश करीत पुष्कळ वर्षे शाततेने राहिला

नंतर सुमारें तीस वर्षेपर्यंत शीखांनीं वर डोकें काढिलें नाहीं. नादिरशहानें हिंदुस्थानावर स्वारी केली, ही संधि साधून पुनः शीख लोक मुलखांत उपद्रव करूं लागले. लवकरच राज्यस्थापनेचें काम त्यांनीं हातीं घेतलें. लाहोरच्या सुभेदारास न जुमानतां ते लोकांकडून वसूल गोळा करूं लागले. काबूलचा सुलतान अहंमदशहा अब्दाली यानें हिंदुस्थानांत उपद्व्याप मांडिला, तो त्यांच्या चांगला पथ्यावर पडला. पुढें अहंमदशहाही मरण पावला; अफगाणिस्तानांत अव्यवस्था झाली; आणि मोगल बादशहा सर्वस्वी पराधीन झाला. अशा स्थितींत शीखांनीं पंजाबच्या पूर्वभागात सतलज व रावी यांजमधील दुआबात आपलें राज्य स्थापिलें. त्यांच्यामध्यें नवीन स्वराष्ट्राभिमान उत्पन्न झाला. त्या वेळेस शीखाचीं अनेक लहान लहान राज्यें अस्तित्वांत आलीं. त्यापैकीं कित्येक अद्यापि हयात आहेत. शत्रूंपासून आपला बचाव करण्याकरितां शीख लोकांस एक प्रकारची विशिष्ट व्यवस्था अंमलांत आणावी लागली. त्यांच्या लहान लहान टोळ्या स्थापन झाल्या; आणि प्रत्येक टोळीनें आपली अंतर्व्यवस्था पाहिजे तशी ठेवावी, परंतु प्रसंगीं सर्वांनीं एक होऊन लढाईस यावें असा प्रघात पडला. ह्या प्रत्येक टोळीस 'मिसल' अशी संज्ञा असून सर्व सरदारांची सभा भरे तीस 'गुरुमता' असें नांव होतें. शीखांचें प्रजासत्ताक राज्य भरभराटींत होतें, त्या वेळेस अशा मिसली बारा होत्या. परंतु रणजितसिंह नामक जो पराक्रमी शीखराजा पुढें निपजला, त्यानें सतलज नदीच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील मिसली नाहींशा केल्या, आणि स्वतःच सर्वांचा राजा झाला. तसेंच सतलज व यमुना याजमधील मिसलींनीं इंग्रजांचा आश्रय केला, तेणेंकरून त्याही लवकरच मोडून गेल्या. सन १८०५ सालीं शीखांची गुरुमता भरली होती, तीच शेवटची. त्यानंतर पुढें त्यांची सभा भरली नाहीं. इतकी माहिती प्रस्तुत भाग समजण्यास पुरे आहे. हिंदुस्थानच्या इतिहासांत शीखांचें माहात्म्य विशेष आहे. त्यांच्या हातून पुढें पराक्रम घडले त्यांचें वर्णन ब्रिटिश रियासतींत येईल.

४. **फर्रुखसेयर,** ( स. १७१३–१९ ).—सय्यदांच्या मदतीनेंच फर्रुख्सेयर यास सिंहासन प्राप्त झालें होतें. अर्थात् त्यांचे उपकार फेडण्याकरितां त्यानें सय्यद अब्दुला यास वजीर नेमून हुसेनअलीस सेनापति केलें. हे सय्यद पराक्रमी व उच्च वर्णाचे असल्यामुळें बादशहास नामशेष करून सर्व अधि-

कार स्वत चे हातात ठेवण्याचा त्याचा विचार होता बादशहास हा प्रकार आवडला नाहीं त्याच्या मर्जीतले म्हणून काहीं लोक होते ते सय्यदाच्या विरुद्ध खटपटी करूं लागले बंगाल्यातील डाक्का शहरच्या काजीवर बादशहाची मर्जी होती, त्यास त्याने मीर-जुम्ला असा किताब देऊन स्वत जवळ ठेविले. हा मनुष्य सय्यदाविरुद्ध वागण्याची बादशहास भर देऊं लागला.

सन १७१५ त कलकत्तेकर इंग्रजांनीं दिल्लीस बादशहाकडे वकील पाठवून बंगालच्या सुभेदाराविरुद्ध पुष्कळ गाऱ्हाणीं नेलीं त्याची विशेष दाद लागण्यास एक चमत्कारिक कारण झाले बादशहास काळपुळी होऊन जबर दुखणे लागले, व सर्व वैद्याचे उपाय थकले अशा वेळीं इंग्रज वकिलाबरोबर हॅमिल्टन नावाचा एक शस्त्रवैद्य होता. त्याजला औषध देण्याची विनंति करण्यात आली तेव्हा शस्त्रप्रयोग करून त्याने अल्पकाळात बादशहास चागले बरे केले. ह्या दुखण्यामुळेच बादशहाचे अजितसिहाच्या मुलीशीं ठरलेलें लग्न खोळंबून राहिलें होते, ते बादशहा बरा झाल्यामुळे निर्विघ्नपणे तडीस गेले हॅमिल्टनचे उपकार बादशहास फारच मोठे वाटले परंतु हॅमिल्टननें स्वत साठी बादशहाकडून काहीच घेतले नाहीं. त्याने अर्ज केला, कीं बंगालच्या सुभेदाराविरुद्ध कंपनीने ज्या तक्रारी केल्या आहेत, त्या बादशहाने कबूल कराव्या अशा फर्मानाने परिणाम काय होईल याची बादशहास काहींच कल्पना नव्हती त्याने कंपनीच्या मागण्या कबूल करून तीस व्यापाराची सनद करून दिली, *तिचा उल्लेख ब्रिटिश रियासतींत आहे

**रजपूत युद्ध** --औरंगजेब बादशहा मरण पावताच रजपूत राजे मोगलाचा सूड घेण्याच्या कामास लागले बहादूरशहास त्यानीं दाद दिली नाहीं, आणि स्वतःचे सामर्थ्य ओळखून तोही त्याच्या मागण्या कबूल करून मोकळा झाला पुढे अंबेर व मारवाड येथील राजे उदेपुरास जाऊन राणा अमरसिहास भेटले, त्या वेळेस त्रिवर्गानीं एक तहनामा ठरविला, ( स. १७१० ). तो रजपुताच्या इतिहासात महत्त्वाचा आहे अकबराच्या वेळेपासून मोगलाशीं बेटीव्यवहार करून कित्येक रजपूत राजानीं आपल्या कुलाचे पावित्र्य नाहींसे केले होते, म्हणून तशा घराण्याशीं उदेपुरच्या घराण्याचा शरीरसंबंध होत नसे हा निषेधात्मक नियम त्यानी ह्या वेळेस मोडून असे ठरविले, कीं ( १ ) इत पर कोणीही आपल्या मुली मुसलमानास देऊं नयेत, ( २ ) आप-

सांतला बेटीव्यवहार पूर्ववत् चालू करावा; इतकेंच नाहीं, तर ( ३ ) उदेपुरच्या मुलीपासून जयपुर व जोधपुर येथें पुत्रसंतति झाली असेल, तर तिचा त्या राज्यांत गादीवर ज्यास्त हक्क आहे असें समजून, इतर मुलींपासून झालेल्या संततीस तेथील राज्य मिळूं नये. सारांश, नष्ट वैभव परत मिळविण्यासाठीं ऐक्य व्हावें, म्हणून रजपूत राजांनीं हा तह मुद्दाम केला, आणि तो पाळण्याच्या शपथा घेतल्या. ह्या तहानें इष्टकार्यसिद्धी न होतां पुष्कळ अनिष्ट परिणाम झाले. हा तह मोडण्याचा पहिलाच प्रसंग फर्रुखसेयरच्या कार्किर्दीत आला. रजपूत राजे स्वतंत्र होऊन मोगलांस करभार देईनातसे झाले, ही गोष्ट दिल्ली दरबारास न रुचून, त्याचे पारिपत्य करण्याचा विचार चालला. मारवाडचा राजा अजितसिंह राठोड याजवर चालून जाण्याचा हुकूम हुसेन अली यास मिळाला. परंतु हुसेनचाच नाश व्हावा असें बादशहाच्या मनात असल्यामुळें, त्यानें अजितसिंहास सांगून पाठविलें, कीं 'होतां होईल तों खटपट करून हुसेनचा पाडाव करावा.' दिल्ली दरबारांतील ही दुफळी पाहून अजितसिंहानें हुसेनशींच सल्ला केला; आणि बादशहास शरण जाऊन आपली मुलगी राणी इंद्रकुमारी फर्रुखसेयर यास देऊं केली. पुढें लवकरच हें लग्न दिल्ली येथें मोठ्या थाटानें झालें. हुसेन अली दिल्लीस परत आल्यावर त्यानें बादशहाकडून मीर-जुम्ला यास बहार प्रांताचा सुभेदार नेमून पाठविलें. येणंप्रमाणें सय्यद तात्पुरते निर्धास्त झाले. यापुढें सय्यदांचीं कारस्थानें कसकशीं झाली आणि त्यांत बादशहाचा अंत कसा झाला, त्याच्या तपशीलवार हकीकती मराठी रियासत मध्यें वि. १ यात पाहव्या.

सय्यदांनीं एका शहाजाद्यास नवीन किताब देऊन तख्तावर स्थापिलें, ( सप्टेंबर १७१९ ), व दोन महिन्यानीं त्यांनीं फर्रुखसेयरचे प्रथम डोळे काढून नंतर विष देऊन त्यास ठार मारिलें. ह्या राक्षसी कृत्यानें सर्व दिल्लीशहर हळहळलें. नवीन बादशहा तीन महिन्याच्या आंतच क्षयरोगानें मरण पावला. दुसरा एक राजपुत्र सिंहासनारूढ झाला, तोही लवकरच मरण पावला. तेव्हां रोशन-अख्तर नांवाचा बहादूरशहाचा एक नातू १८ वर्षांचा होता, त्यास महंमदशहा असा किताब देऊन सय्यदांनीं सिंहासनावर स्थापिलें. महंमदशहा शिकलेला असून त्याची आई हुषार होती. मधील दोन अल्पकालीन शहांचीं नांवें गाळून टाकण्यांत आलीं; आणि महंमदशहाचें आरोहण

फर्रुख्सेयरनंतर समजावे असे ठरले अशा प्रकारे ही राज्यक्रांति समाप्त झाली फर्रुख्सेयर फार दुर्बल होता त्याच्या कार्किर्दीत हिंदु व मुसलमान यांचा अहंमदाबादेस मोठा दंगा झाला तेथचा मुसलमान सुभेदार दाऊदखान पन्नी ह्यानें हिंदूंचा पक्ष घेतला होता तसेच शिया व सुन्नी ह्यांचेही अनेक दंगे ह्या कार्किर्दीत झाले

५ **महंमदशहा**—महंमदशहा गादीवर आला, तरी सय्यदांचे वजन कमी झाले नव्हते त्याचा ताबा एकदम झुगारून देणे अशक्य असल्यामुळे त्याच्याच तंत्राने बादशहा चालू लागला ह्या कामीं त्यास आईची चागली मदत होती आरंभीच मराठ्यांच्या सर्व मागण्या कबूल करून पेशवे बाळाजी विश्वनाथ व त्यांची फौज ह्यास त्याने दिल्लीतून काढून दक्षिणच्या वाटेस लाविले त्यांच्या मागण्या कबूल न करण्याइतकी ताकद बादशहात आता राहिली नव्हती बादशाही सहीशिक्क्यानिशीं जसे हक्क ह्या वेळीं मराठ्यास पूर्णपणे मिळाले, तसे पूर्वी कधीं मिळाले नसून, ह्याच जोरावर मराठ्यांचे पाऊल पुढे वाढले. या कार्किर्दीची दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे निजामुल्मुल्क याने स्वातंत्र्य धारण केले ही होय त्याचीही संपूर्ण हकीकत मराठी भागात दिली आहे स १७२० त दोघेही सय्यदबंधू मारले गेले, तेव्हा बादशहाने विजयानंदाने राजधानींत प्रवेश केला महंमद अमीनखान नामक बादशहाच्या प्रीतींतील एक सरदार सय्यदांचा पाडाव करण्यात प्रमुख होता, त्यासच बादशहाने वजिरी दिली सय्यदांचा पाडाव झाल्याने सर्व लोकास आनंद झाला निजामुल्मुल्क, सर्व प्रांताचे सुभेदार, युरोपियन व्यापारी व इतर मंडळी या सर्वांकडून बादशहास आनंदप्रदर्शक पत्रे आलीं येणेप्रमाणे ही राज्यक्रान्ति तडीस जाऊन बादशहाचा अंमल पुन सुरू झाला, असे क्षणमात्र बहुतेकास वाटले, आणि महंमदशहाची चहूंकडे वाहवा झाली.

६ **चिंकिलीजखान, निजामशाहीचा उदय**—उत्तरकालीन मोगलशाहींत निजामुल्मुल्क् हा मोठा कर्ता पुरुष निपजला तो शहाबुद्दीनखान ऊर्फ गाजी-उद्दीन याचा मुलगा औरंगजेबाने सन १६८३ त दक्षिणेत स्वारी केली, तेव्हा शहाबुद्दीनखान हा त्याजपाशीं एका तुराणी मोगलाचे टोळीचा मुख्य होता. खानदेशातील रामशेज नावाचा मराठ्यांचा किल्ला घेण्याकरिता बादशहाने त्यास पाठविले असता किल्लेदाराने त्याचा चागलाच समाचार घेतला.

पुढें बादशहाचा वडील मुलगा मुअज्जम याच्या मदतीनें शहाबुद्दीन यास कोकणांत पाठविलें असतां, रायगडाजवळ निजामपुर येथें संभाजीच्या एका टोळीचा शहाबुद्दीननें पराभव केल्यावरून, बादशहानें खुष होऊन त्यास गाजी-उद्दीन हा किताब दिला. त्याचा मुलगा कमरुद्दीनखान ह्यासच चिकिलीजखान अशी औरंगजेबाने पदवी दिली. तो सर्व मोहिमात हजर असून, त्याच्या शिस्तीत लहानपणापासून चांगला कसलेला होता. विजापुरचें राज्य खालसा झालें, तेव्हां तिकडील प्रदेशाचा कारभार बादशहानें ह्यास सांगितला. फर्रुख्-सेयर सिंहासनस्थ झाला, त्या वेळेस झुल्फिकारखानाशीं वांकडें असल्यामुळे चिकिलीजखानानें सय्यदांस मदत केली, त्यावरून त्यास निजामुल्मुल्क् व असोफजा हे किताब मिळाले. पुढें दरबारच्या सर्व गोष्टींत त्याचें थोडेंबहुत अंग असे. तथापि लहानपणापासून दक्षिणेंत त्याचा काल गेला असल्यामुळें, तिकडेच आपली महत्त्वाकांक्षा तृप्त करून घेण्याचा मूळापासून त्याचा विचार होता. दाऊदखान पन्नीची गुजराथेंत नेमणूक झाली, त्या वेळेस दक्षिणची सबंध सुभेदारी निजामुल्मुल्क्कडे आली. हा कारभार त्यानें फार हुषारीनें व शहाणपणाने हांकिला, अशी त्याची कीर्ति आहे. मराठ्यांच्या इतिहासाशीं ह्या पुरुषाचा व त्यानें स्थापिलेल्या घराण्याचा अत्यंत निकट संबंध आहे. त्याची हकीकत मराठ्यांचे भागांत येईल. मराठ्यांची सत्ता सार्वभौम करण्याचा विचार पेशव्यांचे मनांत मूळपासून होता; तद्वत्च मोगलशाहीचा दक्षिणभाग आपणा-कडे आणण्याचे भगीरथ प्रयत्न निजामाने केले. ह्यामुळेच पेशवे व निजाम ह्या घराण्यांचें सतत वैर दृष्टीस पडते. या वैराचा इतिहास उत्तरमराठशाहीच्या इतिहासाशीं समकालीन आहे. निजाम व मराठे ह्यांच्या मुलखामध्यें स्वाभा-विक हद्द नसल्यामुळें, त्या दोघांत सहजच कायमचा कलह माजला. शाहू व ताराबाई यांचें युद्ध चालू असतां निजाम ताराबाईस मिळाला. दाऊदखान पन्नीनें पेशव्याशीं सख्य ठेविलें हे त्यास आवडलें नाहीं. मराठ्यांमधील गृह-कलह कायम ठेवून आपला बचाव करणें ही निजामाच्या घराण्यानें आपली इतिकर्तव्यता मानिलेली दिसते. निजामाचा अंतस्थ हेतु फर्रुखसेयर यास व्यक्त झाला, व सय्यद हुसेन यास त्यानें दक्षिणच्या सुभ्यावर पाठविलें, तेव्हां निजामास मुरादाबादच्या सुभ्यावर नेमिलें. या योगाने निजामाचे बेत थोडेसे मागें पडले. सय्यदांची व बादशहाची राजधानींत झटापट चालली असतां

निजाम दिल्लीस आला परंतु तेथें सय्यदाचें व त्याचें जुळलें नाहीं, आणि सय्यदानीं त्याची माळव्याच्या सुभ्यावर नेमणूक केली त्यानें माळव्याचा बंदोबस्त चांगला केला परंतु लवकरच त्यानें आपली दृष्टि दक्षिणेकडे वळविली तिकडे त्याचे साथीदार पुष्कळ होते कोल्हापुरकर छत्रपतीची त्यास मदत होती मोगलाची फौज तेथें फारशी नव्हती सय्यदाकडून त्याचा बंदोबस्त होण्याचा विशेष संभव नव्हता तरी माळव्याच्या सरहद्दीवर निजामाच्या बंदोबस्तासाठीं सय्यदानीं थोडीशी फौज ठेवून दिलाच ह्या गोष्टीनें त्यास चीड आली, आणि तो स १७२० च्या एप्रिल महिन्यात माळवा सोडून उघडपणें दक्षिणेत आला अशीरगडचा किल्ला व बऱ्हाणपुर शहर त्याच्या ताब्यात सहज गेले वऱ्हाडचा सुभेदार घोसखान आपल्या फौजेसह त्यास मिळाला माळव्यात जी बादशाही फौज सय्यदानीं ठेविली होती, तिचा मुख्य दिलावर अलीखान हा निजामाचा पाठलाग करीत आला ता १९-६-१७२० रोजीं खाडवा येथें उभयताची लढाई होऊन दिलावरअली पडला, आणि त्याची सामुग्री निजामास मिळाली आलमअली नावाचा दुसरा एक मोगल सरदार दक्षिणेत होता तो हुसेन सय्यदाचा पुतण्या असून त्याच्या वतीनें दक्षिणचा कारभार पाहत होता त्यास दिलावरअलीची पराभव झालेली फौज जाऊन मिळाली, आणि तो लगेच निजामाशी सामना करण्याकरिता वऱ्हाडात गेला निजामाचाही बंदोबस्त विशेष होता उभयताची गाठ वऱ्हाडात पैनघाटात बाळापूर नावाचें लहान शहर आहे, तेथें पडली, ( ऑगस्ट ता १० स १७२० ). ह्या लढाईत आलमअली व मोगलाचे दुसरे शूर सरदार पडले; आणि निजामास जय मिळाला हीच लढाई निजामाच्या स्वतंत्रतेचा पाया होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं मराठ्याच्या संबंधानेही ही लढाई महत्वाची आहे सेनापति खंडेराव दाभाडे याच्या हाताखालीं शाहूनें मराठ्याची फौज आलमअलीच्या मदतीस ठेविली होती, आणि कोल्हापुरकर संभाजीची मदत निजामास होती ह्याच लढाईत दमाजी गायकवाडानें पराक्रम केल्यावरून त्याचें घराणें उदयास आलें ( निजामाची वंशावळ पहा, म रि म. वि १ पृ ७० )

याप्रमाणें निजामानें स्वतंत्र पंथ काढिला, हे वर्तमान दिल्लीस कळताच सय्यद हुसेनअली बादशहास बरोबर घेऊन जय्यत तयारीनें दक्षिणेत निघाला

रस्त्यांत त्याचा खून झाला. हुसेनअली मरण पावल्यावर निजामानें बादशहास संतोषदर्शक पत्रें पाठविलीं. सय्यद अब्दुल्लाचा पाडाव झाल्यावर महंमद अर्मानखान स. १७२१ च्या जानेवारींत मरण पावला. तेव्हां बादशहानें निजामास वजीर केलें, आणि अर्मानखानाचा मुलगा कमरुद्दीनखान यास मोठ्या योग्यतेस चढविलें. परंतु आपलें दक्षिणचें काम सोडून निजामास एकदम दिल्लीस जातां आलें नाहीं. स. १७२२ च्या आरंभीं तो दिल्लीस दाखल झाला. तेथें २०-२-१७२२ रोजीं त्यास वजिरीचीं वस्त्रें मिळालीं. परंतु बादशहाच्या अंगीं राज्यकारभारास लागणारें कांहींच चातुर्य नाहीं, तो व्यसनाधीन होऊन सर्वकाळ संवगड्यांच्या खुशामतींत दंग असतो, असें पाहून निजामानें त्यास ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. दरबारच्या लोकांसही निजामचें महत्त्व सहन झालें नाहीं. हैदर कुलीखान नांवाचा दुसरा एक हुषार सरदार गुजराथच्या सुभ्यावर होता, त्याजबरोबर निजामाची स्पर्धा चालू झाली. त्या भांडणांत निजाम व हैदर या दोघांचेंही वर्चस्व कमी करण्याचा बादशहानें बेत केला. त्यानें गुजराथचा सुभा निजामास दिला. तेव्हां निजाम लगेच फौजेनिशीं गुजराथेंत गेला, आणि हैदरकुलीचा पराभव करून त्यानें गुजराथ प्रांत आपल्या दक्षिणच्या सुभ्यास जोडिला. तसेंच गुजराथेंत आपला मामा हमीदखान यास ठेवून आपण स्वतः दिल्लीस परत आला. येणेंकरून निजामाची सत्ता अतोनात वाढली. त्याची शिस्त कडक असून राहणी साधी व नियमित होती. परंतु त्या स्वच्छंदी महंमदशहाशीं त्याचें मुळींच पटेनासें झालें, तेव्हां आजाराचें निमित्त करून त्यानें आपल्या कामाचा राजीनामा दिला, आणि कित्येक नवीन पदव्या संपादन करून आणि मुलगा गाजीउद्दीन यास वजिरीवर दाखल करून स. १७२४ च्या आरंभीं माळव्यांत व जुलईंत औरंगाबादेस पोंचला. तेव्हां दक्षिणेंत त्याचा पाय रिघूं नये अशी तजवीज दरबारांत चालली. मुबारीझखान नामक एक शूर मोगल सरदार हैदराबाद व कर्नाटक ह्या प्रांतांत काम करीत असून त्याचें व निजामाचें वैर होतें. त्याजला बादशहानें स्वदस्तूरचें पत्र पाठविलें, कीं 'निजाम हा शिरजोर होऊन स्वातंत्र्य धारण करीत आहे, तर त्याजबरोबर लढून त्यास ठार मारून टाकावें; आणि हें सिद्धीस गेल्यास दक्षिणचा कारभार तुमच्याकडे देण्यांत आला आहे असें समजावें.' निजामही दक्षिणेंत फार

त्वरेने गेला नाही, म्हणून मुबारीझखानास सर्व तजवीज करण्यास सवड सापडली सन १७२४ च्या सेप्टेंबर ९ रोजी वऱ्हाडात साकरखेर्डा येथे लढाई होऊन, मुबारीझखान व त्याचे दोन मुलगे मारले गेले निजामाने मुबारीझखानाचे शिर बादशहाकडे पाठवून उलट असा बहाणा केला, कीं हा बंडखोर मारला गेल्यामुळे राज्याचा एक शत्रु कमी झाला. बादशहाचें कपट त्यास ठाऊक होतेच जय प्राप्त झाल्यावर निजाम लगेच गोवळकोंडा व हैदराबाद येथे गेला, तेंव्हा दक्षिणचा सर्व भाग त्याच्या स्वाधीन झाला ह्यापुढे तो बादशहास कधी काळीं नजराणे वगैरे पाठवीत असे परंतु एकंदरीत सन १७२४ हे वर्ष निजामशाहीच्या स्वातंत्र्यस्थापनेचे होय, असे म्हणण्यास हरकत नाही बादशहाने २२-७-१७२४ रोजीं कमरुद्दीनखान यास वजीर नेमिले.

ह्या वेळी गुजराथ माळवा व दक्षिण ह्या तीनही प्रांताचा कारभार निजामाकडेच होता मुबारीझखान मेल्याचे वर्तमान बादशहास कळले, तेंव्हा त्याने गुजराथ व माळवा ह्या प्रांतावर स्वतंत्र कामदार नेमिले सरबुलंदखान नावाचा सरदार काबूलच्या सुभ्यावर होता, त्याची गुजराथ प्रांतावर नेमणूक झाली, आणि राजा गिरिधर याची माळव्यावर नेमणूक झाली परंतु निजामाचा मामा हमीदखान हा गुजराथचा कारभार सरबुलंदच्या स्वाधीन करीना कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड यास गुजराथची चौथाई व सरदेशमुखी देण्याचे कबूल करून त्याची मदत हमीदखानाने घेतली होती सुजायतखान म्हणून सरबुलंदचा सरदार पुढे आला होता, त्याचा हमीदखानाने मराठयाच्या मदतीने पराभव केला, आणि शेवटीं सरबुलंदखानासही मराठे सरदारानीं पराजित केले पण युद्धात मराठयाचा नाश बहुत झाला सरबुलंदखानाने मराठयाचे गुजराथेवरील हक्क चालू ठेवण्याचे कबूल केलें. तेंव्हा हमीदखानास गुजराथ सोडून जावे लागले, ( सन १७२६ ).

माळवा व गुजराथ हे दोनही प्रांत हातचे गेल्यामुळे निजामाचे बरेच नुकसान झाले त्या वेळीं मराठयामध्ये त्याच्याच तोडीचे पुरुष निपजले म्हणून त्याजपुढे त्याचे नीट चाललें नाही सरबुलंदखानाने स १७२९ त मराठयांस खंडणी देण्याचे कबूल केले, ते दिल्लीस पसंत न पडून सन १७३० त त्यास त्या सुभ्यावरून काढून बादशहाने जोधपुरचा राजा अभयसिंह यास गुजराथचा कारभार सांगितला त्याने सरबुलंदखानास पकडून दिल्लीस पाठविले.

परंतु मराठ्यांनीं अभयसिंहाच्या हातून गुजराथ प्रांत तेव्हांच हिसकून घेतला. गुजराथप्रांताप्रमाणेंच माळव्यांतही मराठे सरदारांनीं स. १७०९ पासूनच आपलें ठाणें बसविलें होतें. तेथचा अधिकारी राजा गिरिधरदास नागर याची सन १७२४ त चिमाजी आपाशीं सारंगपुर येथें लढाई होऊन तींत तो पडला. नंतर त्याचा चुलतभाऊ दयाराम याने मराठ्यांशीं कांहीं दिवस टक्कर दिली, पण तोही चिमणाजीआपा याजबरोबर लढत असतां ता. १२-१०-१७३१ रोजीं तिरला येथें लढाई होऊन मारला गेला. नंतर माळव्याचा कारभार बादशहानें महंमदखान बंगष नांवाच्या एका अफगाण सरदारास सांगितला. अलाहबादच्या सुभ्याचें कामही महंमदखानाकडेसच होतें. ह्या दोन प्रांतांच्या दरम्यान बुंदेलाराजा छत्रसाल याचा मुलूख होता. त्याजवर महंमदखानानें स्वारी केली असतां बाजीरावानें छत्रसालास मदत करून ता. ३०-३-१७२९ रोजीं जैतपुरच्या लढाईंत महंमदखानाचा पराजय केला. तेव्हां दिल्लीदरबारास मराठ्यांची फारच धास्ती पडली. असा कठीण प्रसंग आला, तेव्हां बादशहानें जयपुरचा राजा सवाई जयसिंह याजकडे माळव्याचें काम सांगितलें. जयसिंह बाजीरावाचा मित्र असून कलहप्रिय नव्हता. तेव्हां बादशहाची परवानगी घेऊन जुलई १७३६ त सर्व माळवा प्रांताचा कारभार त्याने मराठ्यांकडे सोंपविला. मराठे एवढ्यानेंच तृप्त झाले नाहींत. त्यांनीं आपला रोंख थेट दिल्लीवर धरिला. वजीर खानडौरान, तसेंच कमरुद्दीनखान व अयोध्येचा सुभेदार सादतखान यांनीं बाजीरावाचें पारिपत्य करण्याचा प्रयत्न केला; पण तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां निजामाच्या मुलुखांत शेकडा दोन टक्के चौथाई वसूल करण्याची बादशहाने बाजीरावास परवानगी दिली. ह्यांत बादशहाचा उद्देश इतकाच होता, कीं दक्षिणच्या मुलखावर स्वामित्व मिळाल्यानें बाजीरावानें एकदम तिकडे निघून जावें, आणि निजामानें परभारें बाजीरावाशीं वैर आरंभून त्याचा पाडाव करावा. बादशहाचा पहिला उद्देश तडीस गेला नाहीं. बाजीरावास ज्यास्त आशा लागल्यामुळें तो निघून जाईना. निजामानें मात्र त्याजबरोबर टक्कर मारण्याची चांगलीच तयारी केली. स्वतः स्वतंत्र होण्याकरितां दिल्लीदरबारचें वजन कमी करण्याची जशी आरंभीं निजामाची खटपट होती तशी आतां नव्हती. स. १७३७ च्या मार्चांत बाजीरावानें थेट दिल्लीवर चाल करून बादशाही फौजांचा पाडाव केला. तेव्हां बादशहा अग-

दींच दुर्बल होऊन मराठयांनीं त्यास पूर्णपणे ताब्यात आणून प्रत्यक्ष निजामासही गिळून टाकण्यास ते तयार झाले अशा आणीबाणीच्या प्रसंगीं निजाम व बादशहा याचा सलोखा होऊन दोघानींही मराठयाच्या बंदोबस्ताची जय्यत तयारी केली भोपाळनजीक १३ डिसेबर १७३७ पासून ८-१-१७३८ पावेतों मुसलमानाची व मराठयाची धावपळीची लढाई झाली. मोगलांचा व मराठयाचा हा शेवटचा निकराचा झगडा होय त्यात निजामाचा पराभव होऊन त्याने बाजीरावाशीं तह केला, त्या योगे सर्व माळवा प्रात आणि नर्मदा व चंबळ याजमधील मुलूख कायमचा मराठयास मिळाला

पुढे नादीरशहाने दिल्लीवर स्वारी केली असता निजाम राजधानींत होता. नादीरशहा स्वदेशीं गेल्यावर निजामाचे वजन फारच वाढले स १७४० चे अखेरीपूर्वी तो दिल्ली सोडून दक्षिणत आला येताना त्याने आपला वडील मुलगा गाजी-उद्दीन यास दिल्लींत बादशहासान्निध कांहीं महत्त्वाच्या कामावर ठेविले. शिवाय वजीर कम्रुद्दीनखान याचेही त्यास विशेष साहाय्य होतें. त्याचा दुसरा मुलगा नासिरजंग याने बंड करून त्यास बराच त्रास दिला. स १७४३ च्या जानेवारींत निजामाने कर्नाटकात स्वारी करून तेथचा बंदोबस्त केला पुढे त्याचे हातून विशेष महत्त्वाचे कृत्य घडले नाहीं स १७४८ ता २१ मे रोजीं बऱ्हाणपुर येथे हा पराक्रमी पुरुष मरण पावला त्या वेळीं त्याचे वय ७७ वर्षांचे होते त्याचा जन्म ११-८-१६७१ चा असल्यामुळे, त्याचे वय १०४ असल्याचे सागतात ते खरे नाहीं औरंगाबाद येथें शेख बुऱ्हाणुद्दीनच्या मशिदींत त्याच्या अस्थी पुरण्यात आल्या

मोगल बादशाहीच्या पडत्या काळात जे पराक्रमी पुरुष मुसलमानांत प्रसिद्धीस आले, त्याजमध्ये निजामुल्मुल्कची गणना आहे प्रस्तुतच्या निजामशाहीचा हा मूळपुरुष होय ऱ्हास पावणाऱ्या मोगल बादशाहीस टेका देऊन साभाळण्याची ताकद त्याच्या इतकी त्या वेळेस दुसऱ्या कोणात नव्हती. काहीं काळपर्यंत तं पडतं राज्य सावरून धरण्यास त्याने आपलें सामर्थ्य खर्च केले, परंतु इतर सर्व गोष्टी त्यास विरुद्ध असल्यामुळे त्याच्या प्रयत्नास यश न येऊन, शेवटीं स्वत चे राज्य स्थापण्याच्या उद्योगास तो लागला. ह्याच उद्योगाचे फळ साप्रतची निजामशाहीची गादी होय.

८. **नादिरशहाची स्वारी,** ( सन १७३८–३९ ).—अफगाणिस्तानांत कंदाहारच्या नजीकचे प्रदेशांत खिलजी व हिरातचे आसपास अब्दाली नांवाचे लोक राहत असत. ह्या अफगाण लोकांनीं इराण देशावर स्वाऱ्या केल्या. इराणांत सफावी वंशाचा हुसेनशहा राज्य करीत असतां महंमूद नांवाच्या अफगाण सरदारानें इस्पहान शहर हस्तगत करून हुसेनास कैद केलें आणि इराणचें राज्य बळकाविलें, ( १७२२ ). परंतु हा अफगाण लोकांचा अंमल इराण देशावर फार दिवस टिकला नाहीं. महंमूद स.१७२४ त मरण पावला; आणि त्याचा मुलगा अश्राफ् इस्पहानच्या तख्तावर अधिष्ठित झाला. ह्याच वेळीं उत्तरेकडून रशिया, पश्चिमेकडून तुर्क व पूर्वेकडून अफगाण हे तिघे इराण देश गिळून टाकण्याच्या बेतांत होते; उत्तरेकडे रशियांत ह्या वेळेस पराक्रमी पीटरराजा राज्य करीत होता. शहाहुसेन अफगाणांच्या हातांत सांपडला, त्या वेळेस त्याचा मुलगा तह्मास्प ईशान्येकडील पहाडी प्रदेशांत जाऊन स्वतंत्रतेनें राहूं लागला होता. त्यानें रशिया व तुर्कस्तान येथील बादशहांच्या मागण्या कबूल करून त्यांच्याशीं सख्य जोडिलें होतें. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. पुढें कास्पियन समुद्राच्या कांठावरील काजार नामक तुर्क टोळीच्या एका सरदारानें तह्मास्प यास मदत केली. हाच नादिरकुली होय. हाच पुढें नादिरशहा म्हणून प्रसिद्धीस आला. नादिरचा बाप मेंढ्यांच्या चामड्यांचे कोट, टोप्या वगैरे करून विकीत असे. लहानपणापासून नादिरचें आयुष्य अनेक प्रकारच्या साहसांत गेलें होतें. सतरा वर्षांचा असतांना तो उझबेगांच्या कैदेंत सांपडला. तेथून सुटल्यावर तो लुटालूट करून राहूं लागला. इकडे अफगाणांनीं इराण देश काबीज केला, त्या धामधुमींत कांहीं लोक जवळ बाळगून नादिरनें हिरातचा किल्ला हस्तगत केला; आणि त्याचा चुलता तेथील अंमलदार होता, त्यास त्यानें ठार मारिलें. हिरात येथें राहून तो शहा तह्मास्प यास मदत करूं लागला. प्रथमतः इराणी लोकांस पाठवून त्यांच्या ठिकाणीं त्यानें आवेश उत्पन्न केला; आणि सन १७३० च्या सुमारास अफगाण लोकांचा पराजय करून त्यानें शहा तह्मास्प यास इस्पहान येथें नेऊन त्याच्या तख्तावर स्थापिलें; आणि त्याच्या राज्यांत स्वस्थता करून रशियानें कास्पियन समुद्राच्या पुढें येऊं नये असा बंदोबस्त केला. आरब व तुर्क ह्या लोकांचें पाऊल पुढें पुढें येत होतें, तें त्यानें मागें हटविलें. येणेंप्रमाणें

अनेक युद्धप्रसंग करून पाच वर्षांच्या आंत इराणचे राज्याची हद्द त्याने प्राचीन काळी होती तितकी विस्तृत केली स १७३६ त शहा तह्मास्प यास बाजूस सारून इराणचे राज्य त्याने स्वतः बळकाविले नादिरशहा सुनी मताचा असून इराणदेश पूर्वीपासून पक्का शियापंथी होता. इराणचे राज्य स्वीकारिल्यावर त्याने थोड्याच दिवसात बहुतेक लोकास सुनी पथ स्वीकारण्यास भाग पाडिले. स. १७३७ त त्याने अफगाणिस्तान देश जिंकून इराणास जोडिला, आणि अफगाणांनीं जे अनर्थ केले होते, त्याचा पुरेपूर सूड उगविला तथापि पुढे सौम्य वृत्ति धारण करून त्या लोकाचा त्याने इतका फायदा करून दिला, कीं ते त्याजकरिता जिवास जीव देण्यास तयार झाले. ह्याप्रमाणे नादिरची सत्ता व अंमल हीं फार वाढलीं, आणि त्याच्या राज्याची हद्द मोगली राज्यास भिडली हिंदुस्थानात ह्या वेळेस मोठी गडबड चालली आहे हे त्यास कळले हिंदुस्थानावर स्वारी केली असता ( १ ) आपल्या गरीब व शूर शिपायास आयते काम मिळून, ( २ ) हिंदुस्थानच्या संपत्तीने इराणची गरिबी भरून काढिता येईल, आणि ( ३ ) हिंदुस्थानातील अव्यवस्थाही मोडेल, असे हेतु मनात धरून त्या कृत्यास काहीं तरी सबब तो शोधूं लागला ती सबब मिळण्यासही फारसा वेळ लागला नाहीं नादिरच्या ताब्यातील कित्येक अफगाण लोक गज्नीनजीक मोगल राज्यात जाऊन राहिले होते त्यास परत देण्याविषयी नादिरशहाने दिल्लीच्या बादशहास लिहिले ती मागणी कबूल करण्याइतके किंवा नाकारण्याइतके बादशहाचे सामर्थ्य नव्हते, म्हणून दिल्लीहून त्या पत्राचा कांहींच जबाब गेला नाहीं तेव्हा नादिरशहा एकदम बादशहाच्या मुलुखावर चालून आला, आणि गज्नी, काबूल इत्यादि शहरे काबीज करून, होड्याच्या पुलावरून सिंधुनदी उतरून अलीकडे आला मराठ्यांच्या व्यवहारात बादशहा गुंतला असल्यामुळे, त्यास नादिरशहाकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं रस्त्यात नादिरशहास कोठेच प्रतिबंध झाला नाहीं पंजाबातील फौज पराभव पावून परत आली, तेव्हा बादशहा आपले लष्कर जमवून बाहेर पडला. निजामुल्मुल्क त्यास मिळाला अयोध्येचा सुभेदार सादतखान यासही बोलावणे गेले. कर्नूळ येथे मोगल फौजेचा तळ पडला ह्या प्रसंगीं रजपूत राजांनीं बादशहास मदत केली नाहीं सादतखान व निजाम हेही आतून बादशहाशीं अनुकूल नव्हते स. १७३९ च्या फेब्रुवारी महिन्यात

मोगल बादशहा व नादिरशहा ह्यांची खडाजंगीची लढाई होऊन वजीर खान-डौरान मारला गेला, आणि सादतखान कैद झाला. तेव्हां निजामास नादिर-शहाकडे बोलणें करण्यास पाठवून मागाहून महंमदशहा स्वतः नादिरशहाच्या छावणींत जाऊन त्यास भेटला. नंतर ते दोघे बादशहा दिल्लीस राजवाड्यांत येऊन राहिले. नादिरशहानें सर्व शहरांत आपले पहारे बसविले, आणि नीट बंदोबस्त ठेवण्याबद्दल सक्त ताकिदी दिल्या. दिल्लीच्या लोकांस हें करणें आवडलें नाहीं. दोन दिवस सर्वत्र शांतता होती. तिसऱ्या दिवशीं नादिरशहा मेला अशी खोटीच गप्प शहरांत पसरली; त्याबरोबर दिल्लीचे लोक इराणी लोकांचे खून करीत सुटले. तेव्हां नादिरशहा संतापून शहरांत फिरण्यास गेला. तेथें इराणी लोकांचीं प्रेतें त्याच्या दृष्टीस पडलीं; आणि फिरत असता लोकांनीं आपल्या घरांतून त्याजवर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. एक गोळी जवळच्या एका उमरावास लागून तो मरण पावला. तेव्हां अतिशय त्वेष येऊन नादिर-शहानें दिल्लींतील सर्व लोकांची कत्तल करण्याविषयीं आपल्या लोकांस हुकूम सोडिला. त्या वेळीं जे अनर्थ त्या राजधानीवर कोसळले, ते ऐकूनही अंगावर रोमांच उभे राहतात. इराणी लोकांनीं शहर जाळून लुटून फस्त केलें. प्रेतांचे ढीग व रक्ताचे पाट ह्यांनीं सर्व रस्ते भरून गेले. तीस हजारांहून ज्यास्त माणसें प्राणांस मुकलीं. सर्व संहार होतो असें पाहून, महंमदशहा डोळ्यांत पाणी आणून नादिरशहाकडे गेला, आणि हा प्रकार बंद करण्याविषयीं त्यानें त्यास विनंति केली. 'हिंदुस्थानच्या बादशहाची मागणी विफल जाणार नाहीं,' असें म्हणून कत्तल बंद करण्याचा नादिरशहानें हुकूम दिला. तो एकदम अमलांत आला. पुढें दोन महिनेपर्यंत दिल्ली शहरांत नादिरशहानें लूट कर-विली. बादशहापासून यःकश्चित् झोपडीवाल्यापर्यंत ह्या लुटींतून कोणी सुटला नाहीं. सादतखान आरंभापासून त्यास मिळून होता. त्याजकडेही पैशाची मागणी होतांच त्या सरदारानें विष घेऊन प्राणत्याग केला. नादिरशहाच्या हातास किती मत्ता लागली, तें बरोबर सांगतां येत नाहीं. नऊ कोटींपासून तीस कोटी रुपयांपर्यंत निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळा अदमास केला आहे. शिवाय दिल्लींतील मयूरासन व कोह्-इ-नूर हिरा हीं नादिरशहानें इराणास नेलीं. जातांना त्यानें महंमदशहास बादशाहीपदावर स्थापिलें, आणि त्यास अनेक प्रकारचा चांगला उपदेश केला. 'बादशहाविरुद्ध बंड कराल, तर

मी पुनरपि येऊन तुमचा संहार करीन,' अशी सर्व लोकास जाहीर दहशत घालून, आणि दिल्लीच्या एका राजकन्येशीं आपल्या मुलाचे लग्न लावून, नादिरशहा परत गेला जाताना सिंधु नदीच्या पश्चिमेकडील सर्व मुलूख त्याने आपल्या राज्यात सामील केला पुढे मध्यआशियातील राज्ये त्याने जिंकिलीं. हिंदुस्थानात केलेल्या दुष्ट कृत्यामुळे नादिरशहाचा स्वभाव फारच निष्ठुर बनला उत्तरोत्तर तो आपल्या लोकास इतका छळूं लागला, कीं त्याच्या मनातील त्याजवरची भक्ति नाहींशी झाली प्रत्यक्ष आपल्या पराक्रमी मुलाचे त्याने डोळे काढिले, ( स. १७४३ ) शियाधर्मी इराणी लोकास तर कोठेच थारा राहिला नाहीं. अखेरीस त्याचे आवडते अफगाण लोकही त्यास कंटाळले. असे होतां होता एका अफगाण सरदाराच्या हातून त्याचा खून झाला, ( सन १७४७ ) नंतर त्या अफगाण लोकातील अहंमदखान अब्दाली नामक सरदाराने आपल्या लोकाचा पुढारीपणा स्वीकारून इराणचे ताब्यातून अफगाणिस्तानचा मुलूख सोडवून कंदाहार येथे आपणास राज्याभिषेक करून घेतला. त्याने आपले अब्दाली हे नाव फिरवून दुराणी असे नाव धारण केले. हाच पानिपतावर प्रसिद्धीस आलेला अहंमदशहा अब्दाली होय नादिरशहा फार परक्रमी पुरुष होऊन गेला त्याचा जन्म हलक्या कुळातला असून त्यास विद्याही काहीं येत नव्हती परंतु नशिबाच्या व अकलेच्या जोरावर अनेक राज्याची उलथापालथ करण्याचें त्यास सामर्थ्य आले 'त्याजविषयीं तेथीचे लोक गर्व वाहतात, परंतु त्याचे नाव घेताच ते कापतात व त्यास शाप देतात'

नादिरशहाच्या स्वारीने मोगल सत्तेस विलक्षण धक्का बसला दिल्ली शहरात आज अनेक शतकें वास करीत असलेली लक्ष्मी क्षणमात्रात नाहींशी झाली 'निद्रा व विश्रांति हीं शहरातून पळून गेलीं; प्रत्येक घरात व खोलींत दुःखाचे उसासे ऐकूं येऊं लागले, आणि सर्व उत्तरहिंदुस्थान शोकसागरात बुडून गेले त्या विपत्तींतून मोगलानीं आपले डोके वर काढिले नाहीं'

९. **प्रांतिक अंमलदारांचें स्वातंत्र्यधारण**—नादिरशहाने सिंधुनदीच्या पश्चिमेकडील मुलूख घेतल्यामुळे, अफगाणिस्तानातील मोगल सत्ता नष्ट झाली दक्षिणेत निजामुल्मुल्क स्वतंत्र राज्य करूं लागला महाराष्ट्र, गुजराथ, माळवा, वऱ्हाड इत्यादि अनेक प्रात मराठ्यानीं घेतले रजपूत राजे

आपापल्या हद्दींत स्वतंत्र झाले. पंजाब प्रांत शीखांनी घेतला. ह्या हकीगती वर येऊन गेल्याच आहेत. परंतु ह्या कारकिर्दीच्या अखेरीस दुसरे दोन मोठे प्रांत बादशहाच्या ताब्यांतून गेले, ते बंगाल व अयोध्या हे होत. कर्नाटक प्रांतावर निजाम व मराठे आपला हक्क सांगत होते. शिवाय जाठ व रोहिले यांनींही बादशाही मुलुखावर हात मारून घेतला. सारांश, सर्व देशांत एकछत्री अंमल कांहीं दिवस चालून पुनः त्याचे विभाग व्हावयाचे, हा जो क्रम अनेक वेळां मुसलमान रियासतींत दिसून आला, तोच मोगलांच्या अखेरीस खरा ठरून, ज्या स्वतंत्र शाखा ह्या वेळीं अस्तित्वांत आल्या, त्यांच्याशींच पुढें येणाऱ्या इंग्रजांचे बहुतेक झगडे झाले आहेत. म्हणून मोगल बादशाहीची हकीकत संपविण्यापूर्वी ह्या स्वतंत्र शाखांचें थोडेसें वर्णन करणें अवश्य आहे.

( १ ) **बंगाल प्रांत ( अ ) मुर्शीद कुलीखान.**—बंगाल प्रांत मूळपासून सधन होता. इंग्रज व्यापाऱ्यांस धनप्राप्ति विशेषतः ह्याच प्रांतांत झाली. उत्तर मोगलशाहींत या प्रांताचा इतिहास मुसलमानी भाषेत विशेष विस्तारानें लिहिलेला आहे. शिवाय हॉल्वेलनें त्या काळची बंगालची पुष्कळ माहिती लिहून ठेविली आहे. औरंगजेबाच्या उत्तर कारकिर्दीत बंगालच्या रयतेवर धर्मसंबंधीं जुलूम अतोनात झाला. तेथच्या सुभेदारानें बादशहाचे हुकूम अक्षरशः अमलांत आणिले. पुष्कळांनीं मुसलमानी धर्म घेतला; आणि अनेकांनीं बंडें केलीं. तेव्हां औरंगजेबानें तेथच्या सुभेदारास परत बोलावून आपला नातू अजीम-उश्शान् यास बंगाल, बहार व ओरिसा या तीन प्रांतांच्या निजामीचें काम दिलें; तसेंच मीरजाफरखान या नांवाचा एक मूळचा हिंदु असून बाटून मुसलमान झालेला गृहस्थ होता, त्यास त्या प्रांतांची दिवाणी दिली. अजीमचा कारभार स्मरणीय झाला नाहीं. तो बहुधा चैनबाजींत निमग्न असे. जाफरखानानें औरंगजेबाची मर्जी अनेक प्रसंगीं संपादिली होती. खर्च कमी करून वसूल वाढविण्याविषयीं त्याची ख्याति होती. पूर्वी तो वऱ्हाडांतील लहानशा कामावरून हैदराबादचा दिवाण झाला; आणि तेथून त्याची नेमणूक बंगाल्यांत झाली. अजीम व जाफरखान यांचें पटलें नाहीं. जाफरचा गुप्तपणें वध करण्याची अजीमने तजवीज केली, ती फुकट गेल्यावरून त्यास जाफरखानाची क्षमा मागावी लागली. तरी जाफरनें औरंगजेबाकडे गाऱ्हाणें केलें. तेव्हां बादशहानें अजीम यास कारभारावरून काढून जाफरखानाकडे निजामी

व दिवाणी अशी दोनही कामे दिली, ( १७०२ ), आणि त्याच वेळेस मुर्शीद-कुलीखान असा त्यास किताब दिला याच नांवाने तो पुढे प्रसिद्ध झाला मुर्शीदचा कारभार बंगाल्यात अनेक कारणानीं चिरस्मरणीय झाला त्याचा अंमल अत्यंत करडा होता सरकारचा वसूल गोळा करण्यात तो यत्किंचित् दयामाया दाखवीत नसे मुसलमानी धर्मांची वृद्धि करण्याविषयी त्याने दीर्घ प्रयत्न केले साराश, स्वजातीयानीं त्याच्या कर्तबगारीची अत्यंत तारीफ केली असून, विजातीय लोकानीं मात्र त्यास नावे ठेविली आहेत तरी आपल्या कामात हुषार व यजमानाच्या कल्याणाविषयीं दक्ष, अशी त्याची कीर्ति आहे इंग्रजाचे व त्याचे कधीं पटले नाहीं इंग्रज व्यापाऱ्यानीं हिंदुस्थानच्या व्यापारावर सधन होऊन परत जावे हे त्यास खपले नाहीं तो त्याच्या व्यापारास अतोनात अडथळे आणी त्याच्याच त्रासास कंटाळन स. १७१५ त फर्रुख्-सेयर बादशहाकडे इंग्रज व्यापाऱ्यानीं कागाळी केली तेव्हा त्यानें इंग्रजास पुष्कळ सवलती दिल्या मुर्शीदकुलीने आपला सर्व कारभार चोख ठेवून सरकारचे उत्पन्न पुष्कळ वाढविले महसुलाचा पैसा तो बादशहाकडे नियमितपणे रवाना करी यावरून बंगाल प्रातात त्याच्या कार्किर्दीस स्वतंत्र राज्य झाले असे म्हणता येत नाही त्याने प्रातातील मुलुखाचे निरनिराळे भाग करून त्यास चकले असे नाव दिलें. त्या प्रत्येक भागावर त्याने वेगवेगळे अंमलदार नेमिले हीच व्यवस्था कायम राहून त्याने नेमिलेल्या अंमलदाराकडची कामे वंशपरंपरेने चालू राहिलीं आणि तेच लोक आपणास जमीनदार राजे असे म्हणवूं लागले अद्यापिही हे जमीनदार राजे आपली वतनें उपभोगीत आहेत मुर्शीदकुलीखान १७२५ त मरण पावला. मुर्शीदाबाद हें गाव त्यानेच वसविले

( आ ) **शुजाखान** ( १७२६–१७३९ )—मुर्शीदकुलीस मुलगा नव्हता, फक्त एक मुलगी होती ती शुजाखान नावाच्या तुर्क गृहस्थास दिली होती मुर्शीदच्या हयातींत शुजाखानाकडे ओरिसा प्राताचा कारभार होता तो आपल्या बायकोसह कटक येथे राहत असे परंतु त्याच्याशीं तिचे पटले नाहीं, आणि ती लवकरच निघून बापाकडे आली तिच्या पोटीं सर्फराजखान नावाचा एक मुलगा शुजाखानास झाला होता तो आपल्या आजाजवळ राही. शुजाशीं मुर्शीदचा द्वेषभाव असून, सर्फराजखानावर त्याची मर्जी होती. आपल्या

पाठीमागून आपल्या जागीं सर्फराजखानाची नेमणूक दिल्लीदरबारनें करावी, अशी पुष्कळ खटपट मुर्शीदकुलीनें केली; परंतु ती सिद्धीस जाण्यापूर्वी तो मरण पावला, आणि त्याची सर्व धनदौलत सर्फराजखानास मिळाली. इकडे शुजाखानानें बंगालचा कारभार मिळविण्याची संपूर्ण तयारी केली, आणि एकाएकीं निघून तो मुर्शीदाबादेस आला. सर्फराजखान स्वतःस कारभार मिळेल अशी क्षणोक्षणीं मार्गप्रतीक्षा करीत बसला होता. नवीन कारभार मिळावयाचा म्हणजे बादशहाकडून झालर लाविलेली पालखी, मत्स्यचिन्ह-धारी जरीपटका, इत्यादि संरजाम येत असतो. तो सरंजाम शुजाखानाकडे आला. तदनुसार शुजाखानाने सुभेदारीपद धारण केलें, आणि त्याचा मुलगा सर्फराजखान त्यास शरण गेला. शुजाखानाजवळ हाजी महंमद व अलिवर्दी-खान हे दोघे भाऊ होते. हाजी महंमद हा वडील असून कारस्थानी होता. सुभेदाराची मर्जी संपादन करून त्यानेंच सर्व कारभार चालविला. धाकटा अलिवर्दीखान हा मूळपासून शिपाईबाण्याचा असून त्याजकडे सर्व फौजेचा अखत्यार असे.

ह्या दोघां भावांशिवाय शुजाखानास दोन वजनदार हिंदु व्यापाऱ्यांची मदत होती, एक आलमचंद व दुसरा जगत्शेट. आलमचंद यास रायरायण असा किताब असून त्यास सर्व कामांची चांगली माहिती होती. धन्याची मर्जी संपादून पैसा कसा संपादावा हें त्यास उत्तम अवगत होतें. जगत्शेट हा मुर्शीदाबाद येथील नामांकित व्यापारी असून त्यानें शुजाखानास पैशाचा मुबलक पुरवठा करून, त्यास सुभेदारी मिळवून दिली होती. शुजाखान स्वभावानें आळशी व ढिला होता. विशेष तंटेबखेडे न होतां कारभार सुरळीत चालावा, एवढीच त्याची इच्छा होती. मुर्शीदकुलीनें बसविलेले अनेक कर त्यानें माफ केले. परंतु वर सांगितलेल्या चौकडीवर सर्व कामें सोपवून तो स्वतः चैनबाजींत राहूं लागला. त्यानें बहार प्रांताची व्यवस्था अलिवर्दीखान याजला सांगितली. ह्या सर्व गोष्टी पाहून सर्फराजखानाचें पित्त खवळून गेलें. शुजाखानाचा नाश करण्याविषयीं वर सांगितलेले दोघे मुसलमान कारभारी टपून बसले होते. त्यांनीं आपलीं कामें बाह्यतः चांगलीं करून प्रजाजनांची मर्जी संपादन करून ठेविली. अलिवर्दीखानानें बहार प्रांतांतील डोईजड राजांची पुरी खोड मोडिली. पाटणा व मोंगीर यांचे दरम्यान चकवार नांवाचे

शूर हिंदु लोक राहत होते. त्याच्याशीं लढून अलिवर्दीखानाने पुष्कळ नवीन कर बसविले ह्या चकवाराच्या भीतिस्तव किनाऱ्यावर राहणाऱ्या युरोपीय व्यापाऱ्याना आपल्या बचावाकरिता आरमारे ठेवावीं लागलीं, कारण बरोबर फौजेचा जाबता असल्याशिवाय, त्याचा माल गंगानदींतून वर सुरक्षित जात नसे अलिवर्दीखानाने अनेक कपटे करून चकवार लोकाचा निपात केला मध्यंतरीं पुष्कळदा त्याच्या अफगाण फौजेनें शिरजोरपणा दाखविला असता, अलिवर्दीखानाने कपटाने सर्वाचा मोड केला. इकडे दिल्लीदरबारात लाच वगैरे भरून शुजाखानाच्या विरुद्ध त्याची खटपट चालूच होती शेवटीं सन १७३९ त दिल्लीहून परभारे अलिवर्दीखानाची नेमणूक बहार प्रातावर स्वतंत्रतेने झाली तेव्हा शुजाखान पस्ताव्यात पडला. आणि सूड घेण्याच्या विचारात असता एकाएकीं मरण पावला हाजी महंमद यानें विषप्रयोग करून त्यास ठार मारिले असे म्हणतात

शुजाखान हा संक्रमणकालातली पुरुष होय. मोगलाची राज्यव्यवस्था ढसळली असूनही जुन्या प्रघाताच्या जोरावर अद्यापि पुष्कळ व्यवस्था चालू होत मुर्शीदकुलीप्रमाणे शुजाखान हा जुलमी नव्हता सर्व पक्षांस खुष ठेवण्याविषयी तो विशेष जपत असे कोणीही पाहुणा त्याजकडे आला, तरी त्याची तो उत्तम बर्दास्त ठेवी एकंदरींत शुजाखानाचे कार्किर्दींत लोक सुखी होते

( इ ) **सर्फराजखान**, ( १७३९–१७४० )—शुजाखानाचे पश्चात् त्याचा मुलगा सर्फराजखान सुभेदार झाला तो सर्वाशीं उद्दामपणाने वागे बापाच्या वेळची चौकडी अधिकारावर ठेवूनही त्यास त्यानें वाईट रीतीनें वागविले जगत्शेटाची त्याने मानखंडना केली. अर्थात् जिकडे तिकडे सर्फराजविरुद्ध गुप्त बेत चालूं लागले अलिवर्दीखानास सुभेदाराची पदवी देण्याची खटपट सर्व लोक करूं लागले ह्या प्रसंगीं दिल्लीहून सर्फराजखानास पाठबळ मिळण्याचा संभव नव्हता नादिरशहाच्या स्वारीपासून दिल्लीदरबारात कांहींच अर्थ उरला नव्हता दोघा हिंदु सावकाराच्या सल्ल्यानें सर्फराजखानानें हाजीखान यास दरबारातून घालवून दिले, तेव्हा अनायासे तो आपल्या भावास जाऊन मिळाला तेथे उभयता बंधूंनीं पुढील कृत्याची सर्व सिद्धता केली; आणि दोघेही सर्व फौजेनिशीं मुर्शीदाबादवर आले रस्यांत अलिवर्दी-

खानाची अफगाण फौज पैशाकरितां त्याजवर उठली. ह्या प्रसंगीं उमीचंद ( उमेशचंद ) नांवाचा सावकार अलिवर्दीखानाच्या फार उपयोगी पडला. पुढें क्लाइव्हशीं ज्याचा व्यवहार घडला, तोच हा उमीचंद होय. त्यानें विलक्षण फसवणुकीनें अफगाण सरदारांची समजूत केली. पुढें लढाई होऊन सर्फराजखान मारला गेला, आणि बंगालची सुभेदारी अलिवर्दीखानास मिळाली, ( १७४० ). ह्या कामांत मुस्तफाखान नांवाच्या अफगाण सरदाराचें त्यास साह्याय्य झालें. आलमचंदराय यानें आपला यजमान सर्फराजखान याच्याशीं विश्वासघात करून अलिवर्दीखानास साह्य केलें, म्हणून त्या हिंदु सावकाराची सत्यनिष्ठ बायको त्यास इतके कठोर बोलली, कीं त्यानें हिरकणी खाऊन प्राण दिला. अलिवर्दीखानाची कार्किर्द ब्रिटिश रियासतींत पाहवी.

( २ ) अयोध्या.—अयोध्या प्रांत मोगलबादशाहीचा एक मोठा सुभा होता. महंमदशहानें त्या सुभ्याचें काम सादतखान नामक एका हुषार सरदाराकडे दिलें. हा सादतखान मूळचा खुरासन येथील एक व्यापारी असून, दिल्लीच्या दरबारीं प्रसिद्धीस आला होता. सय्यदांच्या विरुद्ध महंमदशहास त्यानें मनापासून साह्य केल्यामुळें बादशहाची त्याजवर मर्जी बसली. पुढें त्या कार्किर्दीतील अनेक मोहिमांत तो हजर असे. त्यानें आपल्या प्रांताचा कारभार बहुतेक स्वतंत्रपणें केला. नादिरशहाच्या स्वारींत निजामुल्मुल्कचा पाडाव करण्याच्या हेतूनें त्यानें कांहीं कपट केलें, आणि अंतस्थपणे तो नादिरशहास मिळून होता. कोणीकडून स्वतःचे द्रव्यास नादिरशहाने धक्का लावूं नये इतकाच त्याचा उद्देश होता; पण तो तडीस गेला नाहीं. शेवटीं नादिरशहानें त्याचें सगळें द्रव्य हिरावून घेतलें, आणि त्याची अत्यंत मानखंडना केली. तेव्हां त्यानें विष प्राशन करून आत्महत्त्या केली, ( १७३९ ). त्याचा मुलगा सफ्दरजंग हा बापाचे पश्चात् अयोध्येचा सुभेदार झाला. त्यानें कांहीं दिवस बादशहाच्या वजिराचें काम केलें. त्यावरून अयोध्येच्या सुभेदारास वजीर ही संज्ञा प्राप्त होऊन तीच पुढें पुष्कळ दिवस चालू राहिली. सफ्दरजंग सन १७५४ त मरण पावला. नंतर त्याचा मुलगा शुजा-उद्दौला अयोध्येचा सुभेदार झाला. त्याची हकीकत मराठ्यांचे व इंग्रजांचे भागांत येईल. हा स्वतंत्र झालेला अयोध्येचा सुभा परत दिल्लीच्या अंमलाखालीं आणण्याबद्दल बादशहांनीं प्रयत्न केले, पण ते सिद्धीस गेले नाहींत.

(३) **कर्नाटक**--कर्नाटक प्रांत दक्षिणच्या सुभ्याखाली मोडत असे. तेथे चंदासाहेब व अन्वरुद्दीन याजमध्ये तंटा लागून त्यास अनुक्रमे फ्रेंचांचे व इंग्रजांचे साहाय्य मिळाले तेणेकरून पाश्चात्यांचा दक्षिण हिंदुस्थानांत प्रवेश झाला, ती हकीकत ब्रिटिश रियासतींत आली आहे

(४) **महंमदशहाचा मृत्यु**, (सन १७४८)--नादिरशहाच्या स्वारीने बादशाहीची गात्रे बधिर झाल्यासारखी झाली इकडे मराठे लोक देश पादाक्रान्त करीत चालले वस्तुत हिंदुस्थानच्या कारभाराची मुख्य सूत्रे मराठ्यांनीच पुण्यातून बरेच दिवस खेळविली

स १७४८ त अफगाणिस्तानच्या अहंमदशहा अब्दालीने हिंदुस्थानावर स्वारी केली, त्याजवर बादशहाने वडील शहाजादा अहंमद यास पाठविले. सरहिंद येथे लढाई होऊन अहंमदने अफगाणाचा पराभव केला आणि त्यास स्वदेशीं घालवून दिले ह्या स्वारींत वजीर कमरुद्दीनखान त्याचा मुलगा मीरमनु, व मीरमनूचा मेहुणा गाजीउद्दीन, आणि अयोध्येचा सुभेदार अब्दुल मनसूरखान उर्फ सफ्दरजंग इत्यादि सर्व सरदाराची शहाजाद्यास मदत होती अशी संघशक्ति पुढे व्यक्त होती, तर बादशाहीचा बराच बचाव झाला असता. मीरमनु याजला पंजाब प्रांताचा कारभार मिळाला, तो त्याने चांगला चालविला याच संधींत दिल्ली शहरीं बादशहा आजारी पडून मरण पावला, (एप्रिल, सन १७४८) नादिरशहाच्या स्वारीपासून कमरुद्दीनखान हा त्याचा वजीर होता तो सरहिंदच्या लढाईत मारला गेला.

---

# प्रकरण तिसावें



## अखेर

### स. १७४८-१८०३



**१. अहंमदशहा व रोहिल्यांचें बंड.**—शहाजादा अहंमद यानें सरहिंद येथें अब्दालीचा पराजय केला, तेव्हांच त्यास बापाच्या मृत्यूची वार्ता कळली. लगेच परत येऊन तो तख्तावर बसला. सफ्दरजंग यास त्यानें आपला वजीर नेमिलें. त्याच्या कार्किर्दीचा आरंभ चांगला झाला. पण त्याचें सुदैव फार दिवस टिकलें नाहीं. निजामुल्मुल्कचा वडील मुलगा गाजीउद्दीन हा अमीरउमराव ह्या किताबानें सेनापति झाला. त्याचा धाकटा भाऊ नासिरजंग याजला दक्षिणची सुभेदारी मिळाली. बादशहानें राज्यकारभारांत स्वतः लक्ष घातलें असतें, तर कदाचित् फायदा झाला असता, पण चहूंकडे शत्रू उपस्थित झाले असतां, तो विषयनिमग्न राहिला. दिल्लीच्या आसपास मराठे सरदार धिरट्या घालीतच होते. शिवाय रोहिलखंड व पंजाब ह्या दोन प्रांतांत विशेष गडबड उडाली.

गंगायमुनांच्या पूर्वेस हिमालयाच्या लगत्यास **रोहिले** नांवाचे सुनीपंथी अफगाण लोक बरेच दिवसांपासून वस्ती करून राहिले होते. बाबर बादशहास हिंदुस्थानच्या स्वारींत त्यांनीं मदत दिली असल्यामुळें, त्यांस त्या बादशहानें वर सांगितलेला मुलूख तोडून दिला, त्यावरून त्यास रोहिलखंड हें नांव प्राप्त झालें. हा मुलूख अयोध्या प्रांताच्या पश्चिमेस आहे. रोहिले लोक शूर व कडवे होते. त्यांचीं लहान लहान स्वतंत्र राज्यें असून मुख्य शहर

बरेली होते. अयोध्येच्या सुभेदारास त्याची विशेष भीति वाटत असे तो स्वत शियाधर्मी असून रोहिले अफगाण सुनीपंथाचे होते, म्हणून त्याचे नेहमीं वाकडे होते अलीमहंमद नांवाचा रोहिल्याचा एक पुढारी होता. महंमदशहा राज्य करीत असता अलीमहंमदाने रोहिलखंडांतील मोगल अधिकाऱ्यास ठार मारून स्वतंत्र राज्य स्थापिले, ( १७४४ ) महंमदशहाच्या हातून त्याचा प्रतिकार झाला नाहीं. वजीर सफ्दरजंग याने त्यास बराच त्रास दिला १७४९ त अलीमहंमद मरण पावला. त्याचा मुलगा लहान होता, म्हणून दुंदीखान व हाफीज रह्मतखान हे दोन सरदार त्याचा कारभार पाहूं लागले रोहिल्यांचे पारिपत्य करण्याकरितां सफ्दरजंग बादशाही फौज घेऊन गेला, पण त्यात रोहिल्यानींच त्याचा पराजय केला. अशा अडचणीत बाशदहा वजिरानीं मराठ्यांशीं चौथाईचा करार करून त्याचे साह्य स्वसंरक्षणार्थ संपादिले म्हणजे इंग्रजानी तैनाती फौजेचे तह करून जसे पुढे निरनिराळे संस्थानिक आपल्या कक्षेत आणिले, तसाच हा चौथाईचा करार बादशहाशीं स १७५० सालीं मराठ्यानी केला या कराराने सर्व उत्तर हिंदच्या संरक्षणाची जबाबदारी त्यानीं आपल्या अंगावर घेतली. ही जबाबदारी पुरी करण्यास अडथळा आणण्याचा उपक्रम नजीबखान रोहिल्याने चालविला, आणि त्या कामीं त्याने अब्दालीचे साह्य मिळविले. अशा रीतीने मराठे व अब्दाली याचा झगडा जुंपला या सर्व पुढील भानगडींचे बीज हा चौथाईचा करार होय हे ध्यानात ठेविले पाहिजे • वरील कराराअन्वये स. १७५१ त शिंदे, होळकर व सुरजमल्ल जाठ या तिघाची मदत घेऊन वजिराने रोहिल्यांचा नाश केला, आणि त्यास थेट उत्तरेकडील पहाडी प्रदेशात हाकून लाविले त्या मदतीबद्दल वजिराने मराठ्यास रोहिलखंडावरील चौथाईचा हक्क व त्यांतील काहीं मुलूख कायमचा तोडून दिला. मराठे व रोहिले याचे पुढें वैर जुंपून रक्तपात झाले, त्याची ही सुरुवात होय रोहिल्याच्या चिथवणीनें अहंमदशहा अब्दालीने स १७५१ त पुन. पंजाबावर स्वारी केली, त्या वेळीं बादशहाने लाहोर व मुलतान हे दोन परगणे अब्दालीस देऊन त्यास वाटेस लाविलें ही गोष्ट वजीर सफ्दरजंग यास आवडली नाहीं

पुढें सफ्दरजंग वजीर व गाजीउद्दीन ह्या दोघांचे वाकडें आलें, आणि दोघाचा युद्धप्रसंग होण्याचा समय आला. गाजीउद्दीन यास मराठ्यांचे

साह्य होते. इतक्यांत दक्षिणची सुभेदारी आपल्या भावापासून आपण मिळवावी, अशा उद्देशानें गाजीउद्दीन मराठ्यांचें साह्य घेऊन दक्षिणेंत गेला. तिकडेच पुढें त्याचा खून झाला, ( १६-१०-१७५२ ). दक्षिणेंत जातेवेळीं त्यानें आपला सोळा वर्षांचा मुलगा शहाबुद्दीन यास दिल्लींत ठेविलें होते. त्यासच पुढें गाजीउद्दीन व अस्मद-उल्-मुल्क् असे किताब मिळाले. इतिहासांत तो दुसरा गाजीउद्दीन या नांवानें प्रसिद्ध आहे. पहिला गाजीउद्दीन दक्षिणेंत गेल्यानें वजीर सफ्दरजंग ह्यास पुष्कळ हलकें वाटलें; पण त्याचा मुलगा बापापेक्षांही ज्यास्त कारस्थानी निपजेल हे त्याच्या लक्षांत आलें नाहीं. सफ्दरजंग सर्व सत्ता बळकावितो असे पाहून गाजीउद्दीनने मराठ्यांची मदत घेऊन वजिराशीं युद्ध आरंभिलें. त्यांत सफ्दरजंगाचा पराजय झाला. कमूरुद्दीनखानाचा जांवई इतिज्म्-उद्-दौला ऊर्फ खानखानान यास बादशहानें आपला वजीर केलें. तेव्हां सफ्दरजंग अयोध्या प्रांतांत जाऊन स्वतंत्रपणें राहूं लागला. पुढें बादशहा व गाजीउद्दीन यांचें वांकडें आलें व गाजीनें वाड्यांत मोठा दरबार भरविला, आणि खालील भाषण केलें. ‘ ह्या बादशहास राज्य करण्याचें चातुर्य नाहीं. त्याच्यानें मराठ्यांचा बंदोबस्त होत नाहीं. मित्राशीं त्यानें विश्वासघात केला आहे. तर याला पदच्युत करून तयमूरशहाचा दुसरा योग्य वंशज तख्तावर स्थापणें हेंच योग्य आहे.’ हा बेत एकदम अमलांतही आला. गाजीउद्दीननें बादशहाचे डोळे काढून त्यास कैदेंत टाकिलें: आणि दुसऱ्या एका राजपुत्रास आलम्गीर असे नाव देऊन सिंहासनावर बसविलें, ( जुलै स. १७५४ ). त्याच वेळीं खानखानानची वजिरी जाऊन ती गाजीउद्दीन यास मिळाली. ह्या वेळीं बादशाही अंमलाखालीं विशेष मुलूख राहिला नव्हता. दिल्लीच्या आसपास फारच थोडा प्रदेश उरला होता.

२. **दुसरा आलमगीर व नजीबखान**.—यास नांव मात्र औरंगजेबाचें होतें, पण बिचाऱ्याचे हातांत काडीमात्र सत्ता नव्हती. गाजीउद्दीननें स्वतःच्या रक्षणाचा चांगला बंदोबस्त केला. अयोध्येचा सुभेदार सफ्दरजंग १७-१०-१७५४ रोजीं मरण पावल्यामुळें त्याचा एक शत्रु कमी झाला. खानखानान यास त्यानें अटकेंत ठेविलें. फौजेंतील लोकांनीं बंडावा केला, त्याजबद्दल कडक शिक्षा करून त्यानें चहूंकडे आपला वचक बसविला. बादशहासही त्याचा ताबा सोसेनासा झाला, यामुळें लवकरच दोघांचें वांकडें आलें.

येथून पुढे बादशाहीच्या इतिहासात एका रोहिले सरदाराचे नाव प्रमुखपणे पुढे आलेले आहे, तो नजीबखान होय. रोहिले पठाणात दुंदीखान नावाचा एक बडा सरदार होता, त्याचा नजीबखान हा जावई. तो ह्या वेळच्या धामधुमीत प्रसिद्धीस आला नजीबखान यास त्याच्या सासऱ्याने रोहिलखंडात थोडासा कारभार दिला सफ्‌दरजंग व गाजीउद्दीन याचे भाडणात, केव्हा याचा व केव्हा त्याचा पक्ष स्वीकारून तो प्रसिद्धीस आला बादशहा अहंमदशहा व वजीर खानखानान याजबरोबर युद्ध करिताना गाजीउद्दीनच्या हाताखाली नजीबखान काम करीत होता त्या धामधुमीत सहारणपुरनजीक काही मुलूख त्याने बळकाविला गाजीउद्दीनजवळ राहून तो योग्यतेस चढला असताही, गाजीचे व आलमगीरचे पटेनासे झाले, तेव्हा तो बादशहाच्या पक्षास मिळाला, आणि त्या पक्षाच्या मदतीकरिता त्याने अफगाणिस्तानचा अहंमदशहा अब्दाली यास हिंदुस्थानात बोलाविले अहंमदशहा सन १७५७ त इकडे आला, तेव्हा नजीबखान उघडपणे त्यास जाऊन मिळाला

२ **अहंमदशहा अब्दालीच्या स्वाऱ्या, (तिसरी)**—महंमदशहाचा वजीर कमरुद्दीनखान याचा मुलगा मीरमनु पंजाबात होता स १७५१ च्या स्वारीत अहंमदशहा अब्दालीस लाहोर व मुलतान हे परगणे मिळाले, त्याचाही बदोबस्त त्या अफगाण बादशहाने मीरमनूकडेच सोपविला होता हा मीरमनु हुषार असून सर्वास त्याचा कारभार विशेष पसंत पडला, आणि त्याने तिकडे उत्तम लौकिक संपादन केला सन १७५४ चे अखेरीस मीरमनू घोड्यावरून पडून मरण पावला तेव्हा अब्दालीने पंजाबची व्यवस्था मीरमनूच्या विधवेकडे सोपवून तिच्या अल्पवयस्क मुलास तो कारभार दिला. शिवाय अदिनाबेग नावाचा दुसरा एक गृहस्थ त्या विधवेस मदतनीस नेमलेला होता. अशी व्यवस्था सुरू असता, वजीर गाजीउद्दीनच्या मनात पंजाब प्रांत परत घेण्याचे आले सन १७५५ त मीरमनूच्या मुलीशी लग्न करण्याच्या इराद्याने तो पंजाबात गेला. शहाजादा अलीगौहर त्याजबरोबर होता मीरमनूच्या विधवेस व मुलीस छापा घालून त्याने पकडिले, आणि पंजाब प्रांत परत घेऊन तो ताबडतोब दिल्लीस आला ह्या कृत्याचा अब्दालीस त्वेष येऊन व नजीबखान रोहिल्याने भर दिल्यावरून तो जोराने चाल करून काही हरकत न होता एकाएकी दिल्लीपुढे आ . गाजीउद्दीन ह्यास मराठ्यांची मदत होती मरा-

त्यांनीं आपलें ठाणें दिल्लींत कायमचें दिल्यामुळें दिल्लींतील उमराव जळफळत होते. गाजीउद्दीन यास काढल्याशिवाय मराठे हालत नाहींत, असें त्यांस वाटत होतें. त्यामुळें बरीच मंडळी एकदम अहंमदशहा अब्दालीस जाऊन मिळाली. हिंदुस्थानचें सार्वभौम पद मिळविण्याची मराठ्यांची फार दिवसांची खटपट सफल होण्याचा योग नजीक आला होता; आणि हरप्रयत्न करून फार दिवस उपभोगिलेलें आपलें वैभव कायम राखावें, म्हणून एकंदर मुसलमान व विशेषतः कडवे अफगाण प्रयत्न करीत होते. ह्या अफगाणांच्या हातांत सत्ता जाणें गाजी-उद्दीन यास फायदेशीर नसल्यामुळें तो मराठ्यांचे बाजूस होता. अयोध्येचा सुभेदार शियाधर्मी असून अफगाणांशीं विशेष अनुरक्त नव्हता, म्हणून त्याचा ओढा बऱ्याच अंशीं मराठ्यांकडे होता. अफगाण अंमल हिंदुस्थानांत चालू झाल्यास आपला निभाव लागणार नाहीं, हेंही तो जाणून होता. म्हणून होईल तितकें तटस्थ राहून स्वतःचा बचाव करण्याचा त्याचा इरादा होता. सारांश, ह्या अब्दालीच्या स्वाऱ्या म्हणजे हिंदुस्थानच्या राज्यप्राप्तीबद्दल हिंदु व मुसलमान यांजमध्यें झालेला झगडा होय. या झगड्याचा निकाल पुढें चार वर्षांनीं पानिपतच्या समरभूमीवर झाला. अब्दाली येतांच त्याजवर चालून जाण्याकरितां गाजीउद्दीननें नजीबखानास पाठविलें. परंतु तो तर उघड रीतीनें जाऊन अब्दालीस मिळाला. तेव्हां मात्र वजीर घाबरून गेला. अब्दालीनें दिल्ली सर करून बादशहास व गाजीस कैद केले, ( जानेवारी सन १७५७ ). गाजीउद्दीन यास आतां कांहीं उपाय राहिला नव्हता. त्यानें मीरमनूच्या मुलीशीं लग्न केले होतें, तेव्हां सासूची मर्जी संपादन करून तिच्या मार्फत त्यानें अब्दालीची माफी मागितली. परंतु विपुल लांच घेतल्याशिवाय अब्दाली गाजीस सोडीना. शेवटीं ‘ दुआब प्रांत लुटून आपणास भरपूर पैसा आणून देतों, ’ असें कबूल करून तो सुटला आणि दुआबांत निघून गेला. अब्दालीनें आपला सरदार जहानखान यास जाठांचा मुलूख लुटण्यास पाठविलें, आणि स्वतः दिल्लींत राहून, तेथें लूट व कत्तल करून अनर्थ उडविला. दुआबांतून गाजीनें थोडीबहुत लूट आणिली, परंतु जाठांनीं मात्र अफगाणांची पुरी खोड मोडिली. तसेंच आग्र्याच्या किल्लेदारानेंही अब्दालीस दाद दिली नाहीं. त्याचा सूड घेण्यासाठीं अब्दालीनें पुरातन व धनाढ्य क्षेत्र मथुरा याजवर मोर्चा फिरविला. त्या क्षेत्रावर एकाएकीं छापा घालून, हजारों ब्राह्मण,

साधुसंत, तापसी, बैरागी, बायकामुले, वगैरे जे जे पुढें आले, त्यांची त्यानें कत्तल केली; लोकाची घरे व देवालये लुटलीं; स्त्रियाची अप्रतिष्ठा केली; गाई मारून त्याच्या रक्ताने देवांस स्नान घातले.

दिल्लींतील लोकाच्या यातना तर अनिर्वाच्य झाल्या. नादिरशहापेक्षा अब्दालीचे अफगाण ज्यास्त कडवे होते शिवाय त्याची धनतृष्णा भागविण्याची लोकांची ताकदही सर्व खलास झाली होती. अब्दालीने दोन महिने दिल्लींत मुक्काम केला, तितक्या अवधींत त्याने लोकांस केवळ पिळून काढिलें. नंतर तो गंगेच्या काठीं अनुपशहर येथे आपल्या छावणींत गेला, आणि तेथें त्याने दिल्लीच्या राजयाची व्यवस्था केली नजीबखानास त्यानें अमीर-उल्-उमराव नेमिले अमीर-उल्-उमरावाकडे वाड्याची व फौजेची व्यवस्था असे. गाजी-उद्दीनला त्याने वजिरी दिली, आणि आपला मुलगा तयमूरशहा यास पंजाबात ठेवून, स्वत चे व तयमूरशहाचे लग्न दिल्लीच्या दोन राजकन्यांशीं करून, तो स १७५७ च्या उन्हाळयात स्वदेशीं गेला.

**चवथी स्वारी** —अब्दाली गेल्याने गाजी-उद्दीन यास आपल्या शत्रूंचा सूड घेण्यास चागले फावले आपल्या हाताने वाढविलेला नजीब-उद्दौला हा त्याचा प्रमुख शत्रु होता गाजीने मराठ्याच्या मदतीने नजीबास त्याच्या अधिकारावरून काढून स्वदेशी घालवून दिले, आणि त्याच्या दुसऱ्या साथीदारास प्रतिबंधात ठेविले शहाजादा अलीगौहर मात्र त्याच्या तावडीतून सुटून पळून गेला तो प्रथम सिकंद्रा येथे नजीबखानाकडे गेला, आणि तेथून लखनौस जाऊन शुजा-उद्दौल्याच्या मदतीने त्याने बंगाल्यातील इंग्रजावर आपला मोर्चा फिरविला इकडे राघोबादादा मराठ्याची मोठी फौज घेऊन उत्तर हिंदुस्थानात गेला दिल्लींत त्याने गाजीचा अंमल बसविला, आणि पंजाबांत जाऊन तयमूरशहास घालवून दिले. मराठ्याचा यशस्वी भगवा झेंडा त्याने अटक येथे रोविला, ( सन १७५८ ) तिकडे दुसऱ्या एका मराठ्याच्या फौजेने नजीबखानासही त्याच्या मुलुखांत घालवून दिले

या गोष्टी ऐकून अहंमदशाहा अब्दालीचा राग अनावर झाला. हिंदुस्थानातील मुसलमानासही आपले वैभव मराठे हिसकावून घेतात असे वाटून, सर्वांनीं मिळून एकमतानें अब्दालीचे साह्य करण्याचें मनात आणिलें. नजीबखान व इतर सरदारानी अहंमदशहास बोलावणे पाठविले. तेव्हा पंजाबचा

बंदोबस्त चांगला ठेवून तेथेंच अहंमदशहास अडविणें व नजीबखानास कैद करून त्याचे कट फोडणें, या दोन महत्त्वाच्या गोष्टींविषयी मराठ्यांनीं अगदीं हयगय केली. त्याचे फळ त्यांस मिळाल्याशवायि राहिलें नाहीं. सन १७५९ च्या हिवाळ्यांत अहंमदशहा चवथ्यानें इकडे आला. एकामागून एक पंजाबां-तील मराठ्यांची ठिकाणें त्यानें घेतलीं, तेव्हां गाजी-उद्दीन फारच घाबरला. त्यास काय करावें हे सुचेना. स्वतःचा बचाव करण्याकरितां त्याने बादशहास एका साधूच्या दर्शनास म्हणून बाहेर काढून ठार मारविलें. पुढे दुसरा राज-पुत्र सिंहासनावर स्थापून तो स्थिरस्थावर करणार, इतक्यात अहंमदशहा येऊन पोचला. तेव्हां गाजी-उद्दीन हा पळून जाटाचे मुलुखात जाऊन राहिला. तेथून कांही दिवसांनी तो दक्षिणेंत आला. परंतु निजामशाहींत त्यास थारा न मिळतां, मराठयांनीं त्याचे निर्वाहास काल्पी येथें जागीर दिली. तेथें तो स. १८०२ च्या मे महिन्यात मरण पावला. अखेरपर्यंत त्याच्या उलाढाली दिल्लीच्या बादशाहींत चालू होत्या.

दुसऱ्या आलमगिरचा मुलगा बंगाल्याकडे पळून गेलेला शहाजादा अलीगौहर ह्यानें शहाअलम असें नाव धारण करून पुष्कळ वर्षे कंठिली. त्याचे कष्टमय चरित्रानें पुढील चाळीस वर्षांचा बादशाहीचा इतिहासात बनतो.

**४. अलीगौहर ऊर्फ शहाआलम.**—अब्दालीनें या स्वारींत इकडे दीड वर्ष मुक्काम केला. स. १७६० च्या जानेवारीत त्यानें दत्ताजी शिंद्यास दिल्ली येथें यमुनेच्या घाटावरील लढाईत ठार मारिलें, आणि पुढें पेशव्याचा सरदार सदाशिव रावभाऊ चालून आला असता त्याचा पराभव होऊन फार दिवस चाललेल्या हिंदुमुसलमानाच्या युद्धाचा पानिपतच्या समरभूमीवर ता. १४-१-१७६१ रोजीं निकाल लागला. मुसलमानाचा मात्र या विजयानें फायदा झाला नाहीं. मुसलमानांच्या शक्तीचाही पानिपतच्या युद्धांत निःपात झाला. अब्दालीनें स्वदेशीं परत जातांना शहाजादा अलीगौहर यास निरोप पाठ-विला, कीं 'दिल्लीस येऊन तुम्हीं आपलें राज्य करावें.' त्यानें नजीब-उद्दौल्यास अमीर-उल्-उमरावगिरी देऊन शुजा-उद्दौला यास वजिरी दिली; आणि अली-गौहरचा मुलगा मीर्झा जवानबख्त याजकडे दिल्लीचें राज्य सोंपवून अब्दाली मार्च १७६१ त परत स्वदेशी गेला. त्यापुढें त्यानें हिंदुस्थानच्या कारभारांत ढवळाढवळ केली नाहीं.

शहाजादा अलीगौहर ज (१४-६-१७२८) हा अयोध्येचा सुभेदार शुजा-उद्दौलो याजकडे गेला असें मागें सांगितलेंच आहे शुजा धोरणी व कार्यसाधु असल्यामुळे तो ह्या दुर्बल शहाजाद्याच्या नादास लागून स्वत चे नुकसान करून घेणारा नव्हता त्याने त्यास साहाय्य दिलें नाहीं, तेव्हा शहाजादा अलाहबादेस गेला अलाहबादचा परगणा महंमद कुलीखान नामक शुजाच्या एका नातलगाकडे होता बंगाल प्रांतात त्या वेळेस इंग्रज व सुभेदार मीरजाफर याजमध्ये कलह लागला होता अशा संधींत बंगाल प्रांताची सुभेदारी महंमद कुलीस देऊं करून, उभयतांनीं मिळून त्या प्रांतात प्रवेश केला, (नोव्हेंबर १७५९). बहार प्रांतात कनोटी गावीं अलीगौहर यास आपल्या बापाचा खून झाल्याचें वर्तमान कळलें लगेच 'शहाआलम' असें नाव धारण करून तो आपणास बादशहा म्हणवूं लागला, (२२-१२-१७५९) शुजा-उद्दौला यास वजिरी देऊन नजीबखानास त्याने सेनापतीचें काम दिलें त्या वेळीं त्याचें वय ४० वर्षांचें होतें तो देखणा व बावसूद असून मनाचा थोर व उदार होता परंतु कार्य व निश्चयाचें धाडस यांपेक्षा दया व सहनशीलता हे गुण त्याच्या ठिकाणी असल्यामुळे फाटलेल्या आभाळास ठिगळ लावून भागलें नाहीं शहाआलमनें प्रथम बहार प्रांताचा कारभारी रामनारायण याचा पराभव केला, (१७६०), आणि पुढें मुर्शिदाबादेवर जाण्याचा त्यानें दोन वेळा प्रयत्न केला, पण इंग्रज व मीरजाफर यानी त्यास पुढें येऊं दिलें नाहीं चंद्रनगर येथील फ्रेंचाचा मुख्य मि लॉ यानें बादशहास मदत केली परंतु बादशहाच्या अनुयायात एकवाक्यता नसल्यामुळे लॉ याचे प्रयत्नास यश आलें नाहीं तो म्हणतो, 'शुजाउद्दौल्यासारखी मंडळी मनापासून ह्या कामीं मला साह्य करतील, तर मी इंग्रजास घालवून देईन, इतकेच नाहीं, तर राज्याची सुव्यवस्था लावून देईन' पाटणा शहर घेण्याचा प्रयत्न करीत असता दोनदा बादशहाच्या फौजेचा मोड झाला त्या वेळी इंग्रजाचा सेनापति कॅप्टन नॉक्स हा होता. इकडे महंमद कुलीखान हा अलाहबादेस परत गेला असता शुजा-उद्दौला यानें त्यास ठार मारून तो प्रांत स्वत कडे घेतला स १७६१ च्या आरंभीं इंग्रजानीं बादशहाचा आणखी एक वेळ पराभव करून लॉ यास कैद केलें तेव्हा इंग्रज व बादशहा याजमध्यें सख्य होऊन तह ठरला इंग्रजानी मीरजाफरास काढून मीरकासीम यास बंगालची सुभेदारी दिली होती. ह्या व

दुसऱ्या अनेक कृत्यांस बादशहाची मंजुरी पाहिजे होती, म्हणून पाटणा येथील वखारींत जेवणाऱ्या मेजांचें एक लहानसें सिंहासन बनवून तेथें इंग्रजांनीं दरबार भरविलाः आणि बादशहापासून जरूर ते करार करून घेतले, ( सन १७६१ ). इंग्रजांनीं बादशहास बंगाल प्रांताबद्दल २४ लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. आपणास दिल्लीस नेऊन पोंचविण्याविषयीं बादशहानें इंग्रजांस निकड लाविली. परंतु त्यांनीं तें काम पत्करिलें नाहीं. इकडे पानिपतावर मराठ्यांचा नाश होऊन गाजीउद्दीनची भीति उरली नाहीं. तेव्हां शहाआलम याची दिल्लीस आणून स्थापना करावी, असे हुकूम अब्दालीनें शुजा-उद्दौला व नजीबखान यास दिलेले ऐकून शहाजादा इंग्रजांस सोडून शुजाकडे गेला. शुजानें त्यास बनारस, अलाहबाद इत्यादि ठिकाणीं दोन वर्षे नादीं लावून ठेविलें. इतक्यांत मीरकासीम यासही इंग्रजांनीं काढून लाविल्यामुळें तो, व त्याचा युरोपियन नोकर, वॉल्टर रेन्हार्ट ऊर्फ सुमरू, असे दोघे शुजास मिळाले. त्या सर्वांनीं स. १७६४ त बहार प्रांतांतील पाटणा हस्तगत करण्याकरिता स्वारी केली. परंतु बक्सार येथें निकराची लढाई होऊन बादशहाचा पराभव झाला. ( ऑक्टोबर १७६४ ). पुढें इंग्रज व बादशहा यांचा तह ठरला. बादशहानें बंगाल प्रांताची दिवाणी इंग्रजांस दिली. इंग्रजांनीं कुरा व अलाहबाद हे अयोध्येच्या वजिराचे परगणे बादशहाकडे परभारें दिले. शुजास ही व्यवस्था न आवडून त्यानें मराठे व रोहिले यांची मदत घेऊन पुनरपि बंगालवर स्वारी केली; परंतु इंग्रजांनीं त्यास दाद दिली नाहीं. इतकेंच नाहीं तर उलट अयोध्येचा मुलुखही ते काबीज करितात कीं काय, अशी शुजास भीति पडली; तेव्हां त्यानें बादशहाबरोबर झालेल्या तहास मुकाट्यानें कबुली दिली, (१७६५). येणेंप्रमाणें इंग्रज कंपनी बादशहाची नोकर बनली. (पहा ब्रि. रि. प्रकरण २३).

या वेळेपासून बादशहा अलाहबाद येथें राहूं लागला. त्यास दिल्लीस नेऊन पोंचविण्याचें धाडस शुजा करीना. ह्या वेळीं मीर्झा नजफ्खान नांवाचा एक सत्यनिष्ठ इराणी सरदार बादशहाजवळ होता, त्याचा बादशहास अखेरपर्यंत चांगला उपयोग झाला. तो पूर्वी महंमद कुलीचा दोस्त असून, इंग्रजांच्या शिफारशीवरून बादशहाजवळ नोकरीस राहिला होता. सालीना एक लाखाची नेमणूक देऊन कुरा प्रांताचा कारभार बादशहानें त्याजला सांगितला होता. शुजानें आपला मुलगा सादत-अल्ली यास बादशहाची वजिरी दिली.

**५ नजीबखान जाठ व मराठे**—बादशहा पूर्वेकडे हिंडत असता, अब्दालीच्या व्यवस्थेप्रमाणे त्याचा मुलगा जवानबख्त व रोहिला नजीब-उद्दौला हे दिल्ली येथे राहून बादशहाची सत्ता कायम करीत होते पानपता-वरील घोर प्रसंगामुळे उत्तरहिंदुस्थानाकडे लक्ष देण्यास मराठयास सात आठ वर्षे सवड झाली नाहीं दरम्यान मराठयाची दुअबातील ठाणीं नजीबाने परत घेतलीं त्याचप्रमाणे सुजरमल्ल जाठानेही मराठयाचीं ठाणीं उठवून आपला अधिकार वाढविला सुमरूने ह्या सुरजमल्लाची नोकरी पत्करिली आरंभीच नजीबखानास ह्या जाठावर शस्त्र धरावे लागले काहीं वेळ युद्धप्रसंग चालून नजीबच्या फौजेने पुष्करनजीक ता २५-१२-१७६३ रोजीं एकाएकीं जाठावर छापा घातला, आणि सुरजमल्लाचे शीर कापून आपल्या धन्याकडे नेलें अशा कठीण प्रसंगी जाठानीं सुरजमल्लाचा मुलगा जवाहीरसिह याजला आपला राजा करून, मल्हारराव होळकराशीं सख्य केलें परंतु त्याचा उपयोग न होता जाठानीं नजीबखानाशीं तह केला पुढे जवाहीरसिहाने जयपुरचा राजा माधव-सिह याजवर स्वारी केली. परंतु त्या स्वारींत जवाहीरचा खून झाला, आणि पुढे जाठाचे राज्यात बराच घोटाळा होऊन, काहीं दिवसानीं सुरजमल्लाचा शेवटचा मुलगा रणजितसिह भरतपुरच्या गादीवर बसला रणजितसिंहाने जाठाचे राज्य ऊर्जित दशेस आणिलें, आणि स्वस्थता केली.

स १७६६ त बादशहाने अलाहबादेहून मराठ्याकडे बोलणे लाविले, कीं आपणास दिल्लीस नेऊन तख्तावर बसवावे बादशहाच्या ह्या कृतीने इंग्रजास विशेष धास्ती पडली मराठ्यानी बादशहाचा पक्ष स्वीकारणे त्यास हानिकारक वाटले पण त्या वेळेस मराठ्यानाही ती कामगिरी उचलता येईना दिल्ली येथे नजीबखानास पुष्कळ शत्रु उत्पन्न झाले होते, म्हणून त्याने बादशहाकडे लक्ष दिले नाहीं स १७६७ त शीखानी नजीबखानास विशेष त्रास दिला, तेव्हा अफगाणिस्तानच्या अहंमदशहानें त्यास मदत करून, शीखास परत फिरविल ह्या वेळीं शुजाउद्दौल्यास अहंमदशहाने धमकी दिली, परंतु त्या धूर्त वजिराने ती जुमानिली नाहीं.

माधवराव पेशव्याने रामचंद्रपंत कानडे, विसाजी कृष्ण बिनीवाले, महादजी शिंदे व तुकोजी होळकर यास सन १७६८ त उत्तर हिंदुस्थानात पाठविलें महादजी व नजीबखान रोहिला याचे हाडवैर होते जाठाकडून खंडणी घेऊन

रोहिलखंडांत धुमाकूळ उडवून व दुआब प्रांत हस्तगत करून मराठे सरदार दिल्लीवर आले. नजीबखानास कांहींच आधार उरला नव्हता. तो ता. ३१-१०-१७७० रोजीं मरण पावल्यानें महादजीचे तावडींतून सुटला; नाहीं तर अनेक विश्वासघातकी कृत्यांबद्दल त्याने ह्या हिकमती पठाणाचा चांगलाच सूड घेतला असता. तशांत होळकराचे साहाय्य नजीबखानास असल्यामुळें त्याचा बराच बचाव झाला.

मुसलमानांच्या पडत्या काळांतील नजीबखान हा शेवटचा मुत्सद्दी होय. तो शूर, धोरणी, व चलाख होता. मुसलमानशाहीचा अभिमान धरून काफर मराठ्यास वर चढूं न देण्याविषयीं त्याने जबरदस्त खटपट केली. पानिपताचा घोर युद्धप्रसंग मराठ्यांवर त्याच्यामुळेंच आला. एका इंग्रज ग्रंथकारानें नजीबखानाविषयीं खालील अभिप्राय दिला आहे. ' मोठेपणा व सौजन्य हे गुण एका व्यक्तींत वास करितात असें उदाहरण हिंदुस्थानांत फक्त नजीबखानाचें आहे. केवळ स्वतःच्या अंगच्या उत्तम शौर्यानें, प्रामाणिकपणानें व दृढनिश्चयानें तो पन्नास स्वारांच्या अंमलदारापासून प्रस्तुतच्या मोठेपणास चढला. त्याला लिहितां वाचतां वगैरे येत नव्हतें, तरी जगाचा अनुभव व अंगची हुशारी यामुळें त्यास कांहीं कमी पडलें नाहीं. त्याच्या मनाचें औदार्य व दिलदारपणा यांनीं त्याचें हीन व हलकें कूळ झाकून गेलें होतें. हल्लीं त्याचें वय सुमारें ६० वर्षांचें असून तो दुखण्यानें जर्जर होऊन श्रमानें थकून गेला आहे. ' ( व्हेरेल्स्टचें कोर्ट आफ डायरेक्टरास पत्र, मार्च २८, सन १७६८ ). नजीबखानाचे पश्चात् त्याचा मुलगा झबेताखान हा बापाचें काम पाहूं लागला. दुंदीखानही याच सुमारास मरण पावला. रोहिल्यांपैकीं हाफीझ् महंमदखान मात्र उरला होता.

६. **शहाआलमची दिल्लीस स्थापना.**—नजीबखान मरून गेला. त्याचा मुलगा झबेताखान तर नेहमीची खंडणी सुद्धां बादशहास देईना. शुजाउद्दौला व इंग्रज हे बादशहास दिल्लीस पोंचविनात. तेव्हां नाइलाजास्तव मराठ्यांनीं बादशहाशीं [illegible] बादशहास भाग पडलें. मराठे व बादशहा यांचा तह [illegible] द्यावे व मराठ्यांनीं बादशहास दिल्लीस पोंचवावें असें ठरलें. बादशहाचे कुरा व अलाहाबाद हे परगणेही मराठ्यांचे मनांत घ्यावयाचे होते. सन १७७१ च्या आरंभीं वरील कृत्याविषयीं

बादशहाने कलकत्त्यास वकील पाठवून इंग्रजाची सल्ला विचारिली इंग्रजांनीं तर मराठ्याची मदत स्वीकारणें अत्यंत अविचाराचें आहे, असे होईल तितक्या जोराने त्यास परत कळविलें बादशहाबरोबर एक लहानशी फौज होती, तिचा मुख्य मॅडेक नावाचा फ्रेंच गृहस्थ असून एकंदर सैनापत्य मीर्झा नजफ्खान याजकडे होतें मे महिन्यात बादशहा अलाहाबाद सोडून निघाला. कुराप्रांताचे सरहद्दीपर्यंत इंग्रजाची एक टोळी त्यास पोचविण्यास आली तिच्या अंमलदारानें बादशहास पुन बजाविले, कीं ' मराठ्याची संगत धरूं नका. ' परंतु तो ' डोळे मिटून ' पुढ गेला ता २५ डिसेंबर रोजीं पाटीलबावा महादजीस बरोबर घेऊन बादशहाने दिल्ली शहरात प्रवेश केला मोगलाच्या पूर्व वैभवाचा अनुभव घेतलेल्या मंडळींचीं मनें आपला बादशहा परत आलेला पाहून, त्या वेळीं आनदानें भरून गेलीं फार वर्षे वनवास भोगिल्यावर शहाआलम यास आपण बादशहा आहों असें एकदाचें वाटलें.

मराठ्याचा अंमल पुनरपि दिल्लींत बसला, ही गोष्ट मुसलमानास रुचली नाहीं शुजा-उद्दौला व इंग्रज तटस्थ राहून आपआपला लाग कसा साधतो हे पाहत होते इकडे झबेताखान बादशहाविरुद्ध दाडगाई करीतच होता तेव्हा बादशहाच्या आगमनानंतर एक महिन्याच्या आत मराठ्यानीं झबेताखानावर शस्त्र धरिलें ह्या स्वारीत बादशहाच्या पक्षाकडे मीर्झा नजफ्खान होता हा जातीचा इराणी, शुजा-उद्दौल्याचा नातलग होता झबेताखानाचा पराभव होऊन तो पळाला आणि त्याचीं बायकामुलें बादशहाच्या हातात सापडलीं त्या वेळेस झबेताखानाचा मुलगा गुलाम कादर याचें बादशहाने पुरुषत्व नाहींसे केलें असें म्हणतात झबेताखानापासून दीडलाख दंड घेऊन त्यास मराठ्यानी त्याचे प्रातात परत पाठविलें ह्या दंडाची रक्कम झबेताखानास शुजा-उद्दौला याने कर्ज दिली सर्व रोहिलखंड ह्या वेळेस मराठ्यानी काबीज केलें असते, पण त्यास मीर्झा-नजफ्खान आड आला. पुढे रोहिले व शुजाउद्दौला याजमध्ये अनेक व्यवहार घडून शेवटी युद्ध सुरू झाले त्यात इंग्रजानीं शुजाचा पक्ष घेतला ह्या रोहिला युद्धाची हकीकत इंग्रजाचे भागांत वॉरन हेस्टिंग्स्च्या कार्किर्दीत यावयाची आहे

शिंद्याच्या मनात बादशहाचा बंदोबस्त चागला करावयाचा होता. परंतु मध्यंतरीं निराळेंच विघ्न आले पुण्यास माधवराव पेशवे १८-११-१७७२ रोजीं

मरण पावला व पुढील ३० ऑगस्ट रोजीं नारायणरावाचा खून झाला. तेव्हां दिल्लीकडील उद्योगास पुण्याचें पाठबळ बंद पडलें; तेणेंकरून नजफ्खान व झबेताखान यांच्या स्पर्धेनें उत्पन्न झालेलीं कारस्थानें जोरांत येऊन त्यांत बादशहाचा पक्ष दुर्बळ पडत चालला. झबेताखानानें शीखांची मदत घेतली. परंतु बादशहाच्या फौजेनें पानिपत येथें झबेताखनाचा पराभव केला. या लढाईत बादशाही फौजेचें आधिपत्य समरूकडे होतें. त्यास सिर्धाना येथें बादशहानें जहागीर दिली, ( १७७७ ). सन १७७८ त बादशाही फौजेनें शीखांवर हल्ला केला. त्या फौजेचें आधिपत्य शहाजादा जवानबख्त याजकडे होतें. शहाजादा पराभव पावून परत आला आणि शीखांस उत्तरेकडील मुलूख लुटण्यास सवड मिळाली. ह्या युद्धांत शीखांकडे पुढें प्रसिद्धीस आलेला रणजितसिंह हा लढत होता. परंतु पुढें मीर्झा नजफ्खानानें शीखांचा बराच चांगला बंदोबस्त केला. सन १७७८ त समरू मरण पावला व सिर्धानाची जहागीर त्याच्या बायकोस मिळाली. ही बाई पुढें पुष्कळ प्रसिद्धीस आली. तिचा जन्म एका आरब गृहस्थापासून वेश्येच्या पोटीं झाला असून, ती बेगम समरू म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे. सन १७८२ ता. ६ एप्रिल रोजीं शहाआलमचा साह्यकर्ता मीर्झा नजफ्खान मरण पावला. त्यामुळें बादशहाची बाजू अगदींच खचली. पुढें अफ्रासियाब्खान म्हणून एक सरदार होता, तो बादशहाचा वजीर झाला. तोही फार दिवस टिकला नाहीं.

**७. महादजी शिंद्याची मदत.**—सन १७८३ त सालबाईचा तह कायम झाल्यावर महादजी बादशाहीचे कामास मोकळा झाला. ह्या वेळीं महादजीच्या नादीं बादशहानें लागूं नये, असें सांगण्याकरितां कलकत्त्याहून इंग्रजांचे वकील दिल्लीस आले. सन १७१५ त फर्रुख्सेयर बादशहास डॉ. हॅमिल्टननें बरा केल्यानंतर दिल्लीस इंग्रजांचे वकील आले असे हेच होत. ते वकील येऊन पोंचण्याच्या अगोदरच मीर्झा शफी वजीर होता त्याचा खून झाला, ( २३-९-१७८३ ). पुढें अफ्रासियाब्खान व महंमदबेग हमदानी हे दोन सरदार दिल्लींत प्रमुख झाले. शहाजादा जवानबख्त लखनौस जाऊन हेस्टिंग्स् यास भेटला. पण हेस्टिंग्स्नें महादजी शिंद्याकडे बोट दाखविण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. महादजी शिंदे त्वरेनें आग्र्यास आला. येथें त्यानें स. १७८४ चे नोव्हेंबरांत बादशहाची भेट घेतली. त्याच संधीस ता. २-११

१७८४ रोजीं अफ्रासियाब्खान मारला गेला, आणि महादजी शिंदे यास बादशहाने सर्व कारभार दिला. महादजीने वकील-इ-मुतलक म्हणजे सर्वाधिकारी, पदवी ही पेशव्याच्या नावाने घेतली, आणि स्वत आपण पेशव्याच्या वतीने दिल्लीस राज्याचा कारभार करूं लागला बादशहाचे परगणे त्याच्या ताब्यात आले, आणि आग्र्याचा किल्लाही त्यास मिळाला ता २१-१-१७८५ रोजीं झबेताखान मृत्यु पावला, आणि महादजी शिंदे प्रमुख होऊन मोगल सरदारही त्यास शरण आले स १७८४ त उत्तरहिंदुस्थानात मोठा दुष्काळ पडला, त्यास संवत् वर्ष १८४० वरून 'चाळिसा' असे म्हणतात.

झबेताखानाचा मुलगा गुलाम कादर हा बाप मरण पावताच वतनाचा मालक झाला, आणि त्याने आपणास 'नजब–उद्दौला हुशारजंग' अशी पदवी घेतली महादजी शिंदे प्रातात बंदोबस्त करीत होता यासाठीं स १७८५ त डि बॉयन् नावाचा फ्रेंच सरदार दरमहा दहा हजार रुपये पगार देऊन त्याने आपल्या नोकरीस ठेविला आणि त्याच्याकडून पाश्चात्य कवाईत शिकवून फौज तयार करविली हा डि बॉयन् फ्रान्स देशचा राहणारा असून अनेक सकटे भोगून हिंदुस्थानात आला होता. काहीं दिवस तो इंग्रजाच्या नोकरीस असून सन १७८४ त इंग्रजाच्या वकिलाबरोबर तो आग्र्यास आला तेथे शिंद्याची व त्याची ओळख झाली, आणि त्याने शिंद्याची नोकरी पत्करिली तो हुषार व शूर होता सन १७९७ पर्यंत डि बॉयनने ही नोकरी मोठ्या इभ्रतीनं करून सुमारे पन्नास लाख रुपयाचा ऐवज जमविला, आणि प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळे हिंदुस्थान सोडून फ्रान्स देशात सेव्हॉय्मध्ये आपल्या जन्मभूमीस जाऊन सुखवस्तु राहिला तेथे तो स १८३० त मरण पावला.

वर सागितलेल्या सरदाराशिवाय खंडेराव हरी, अंबाजी इंगळे, लखबादादा, जीवबादादा बक्षी, व राणेखान वगैरे पराक्रमी पुरुष महादजीनें आपल्या हाताखालीं तयार केले स्वत नवीन फौज त्याने तयार केली, म्हणून पूर्वीच्या लोकाकडे चालत आलेल्या तैनाती जहागिरी त्यास बंद कराव्या लागल्या तसेंच गोसावी बेहेड्याचा मुख्य हिंमतबहाद्दर याजकडे जहागीर चालत होती, तिचा त्याने हिशेब मागितला ह्या गोष्टी लोकास न आवडून लोक आतून महादजीचा द्वेष करूं लागले त्या वेळीं रजपुत राजेही महादजीवर उठले, त्यामुळे उभयतामध्ये घोर संग्राम झाले, त्याचें वर्णन मराठ्याचे हकीकतींत

येईल. ता. २८-७-१७८७ रोजीं लालसोट येथें तुंबळ लढाई होऊन महंमद बेग हमदानी मारला गेला, तथापि त्याचा भाऊ इस्मईल बेग यानें महादजीची फौज फितुर करून त्याजवर कठिण प्रसंग आणिला. पुढे इस्मईल बेग राजपुतांस जाऊन मिळाला.

८. **गुलाम कादराचीं दुष्ट कृत्यें.**—शहाआलम बादशहाची कारकिर्द म्हणजे वस्तुतः मराठ्यांचा इतिहास होय. अर्थात् त्याचें भरपूर विवेचन मराठी रियासतींत संगतवार आले असल्यानें या पुस्तकांत त्याची पुनरावृत्ति मुद्दाम टाळली आहे. महादजीची कुचंबणा झाल्यावर गुलाम कादर व इस्मईल बेग यांचें फावलें; आणि त्यांनी या प्रसंगीं जीं अनन्वित कृत्ये दिल्लींत केलीं, त्याच्या हकीकतींनीं शेंकडो ग्रंथ भरले आहेत. बादशहा जात्या भित्रा व नामर्द होता. त्याचे वय ७० जवळ होते. हा जीर्ण व निरुद्योगी बादशहा पदच्युत करून, त्याचे जागीं नवीन बादशहा बसवून, मिळेल तितकी लूट मिळवावी व फौज उभारावी, असा गुलाम-कादराचा बेत असावा. तो बादशहास सांगे, कीं मराठ्यांचे जाचांतून मी आपणास सोडविण्याची खटपट करीत आहें. ह्या हेतूनें शेंकडों क्रूर व दुष्ट पठाण लोक बरोबर घेऊन गुलाम-कादर दिल्लीस गेला. इस्मईल बेग अगोदरच तिकडे गेला होता. गुलामकादरानें व इस्मईल बेगानें राजवाड्यावर तोफांचा भडिमार केला, तेव्हां सहजच शहर त्यांच्या ताब्यांत आलें. वाड्यात जाऊन त्यांनीं बादशहाची भेट घेतली. बादशहानें गुलाम-कादरास कारभार दिला आणि त्यानेंही बादशहाचें संरक्षण करण्याची कुराणावर शपथ घेतली. पुढें त्यानें खर्चासाठीं बादशहाजवळ पैसे मागितले, व त्याजपाशीं पुष्कळ पैसे आहेत, ह्या समजुतीवर त्यानें पुढील अनर्थ केला.

तारीख २९ जुलै स. १७८८ रोजी गुलाम-कादर हा एकटाच कांहीं बदमाष व दांडगे पठाण बरोबर घेऊन बादशहाकडे गेला आणि खर्चासाठीं बादशहाजवळ रुपये मागूं लागला. आपणापाशीं पैसे नाहींत असें बादशहानें उत्तर दिलें. तेव्हा पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें तो बादशहाचे अंगावर चालून गेला; आणि रागाच्या आवेशांत त्यानें बादशहाला त्या प्राचीन व पूज्य तख्तावरून खालीं ओढून लत्ताप्रहार केला. पुढें बेदरबख्तास आणून तख्तावर बसविलें, तेव्हां सर्व दरबारांत एकच गोंधळ उडाला. नंतर त्या राक्षसानें त्या पदभ्रष्ट बादशहास व त्याच्या मुलास शस्त्रहीन करून, सर्व

चीजवस्त घेऊन तीन दिवसपर्यंत कारागृहात कोंडिले व अन्नपाणी न देण्याविषयी ताकीद केली नंतर बेदरबख्ताचे साह्याने त्याने सर्व जनानखाना व राजपुत्राचे महाल लुटून फस्त केले शहाआलम यास मोतीमहालात कोंडिले होते त्याच्या समक्ष त्याने शहाजाद्यास प्रखर उन्हात उभे करून बेदम मार दिला, आणि जनानखान्यातील दासींनाही मरेपर्यंत मारून आपल्या लोकाकडून त्याची अमर्यादा करविली पुढे द्रव्य कोठें तरी पुरलेले असून ते बादशहा आपणास दाखवीत नाहीं, असे म्हणून, त्याने बादशहास दिवाण-इ-खासात ओढून आणून चाबकान मारिले तेव्हा बादशहा काकुळतीस येऊन बोलला, "बाबारे, मजपाशीं द्रव्य मुळींच नाही व पुरलेलेंही नाही, आता मला छळं नको, एकदा माझी आतडीं तरी फाडून घे—पण या यातेनतून मला सोडीव " बादशहा बेहोष होऊन पडल्यावर गुलामाने जनानखान्यातल्या खाशा स्त्रियास आणून त्याचाही नानाप्रकारे छळ केला हे चालले असता कोंडून ठेविलेल्या माणसापैकीं लहान लहान कोमल मुले पाण्यावाचून व्याकूळ होऊन मरण पावलीं तेव्हा तेथेच त्यास गाडण्याचा त्या दुष्टानें हुकूम दिला पुढे मलकाजमानी व बेदरबख्त याचाही त्याने फार अपमान केला, आणि पैशासाठीं सर्व राजवाडा पोखरून टाकिला इस्मईलबेग शहराबाहेर होता, त्यास ह्या वाड्यातील बातमी कळत नव्हती गुलामाने सुमारे पाच लाख रुपये त्याजकडे पाठवून जास्त भरतीसाठीं शहर लुटावे म्हणून निरोप पाठविला. पुढें एक दिवस त्यानें सर्व राजपुत्रास आपणापुढे गाण्यास व नाचण्यास लाविले. शेवटी थकल्याचे मिष करून,शहाजादा अकबर याचे मांडीवर डोके ठेवून जवळच तरवार व सुरा ठेवून तो निजला पुढे जागा झाल्यावर त्या राजपुत्रांची निर्भर्त्सना करून गुलाम बोलला, "मी शस्त्र खालीं ठेवून तुमच्या समक्ष निजलों असता तुम्ही माझे शीर उडविले नाहीं, इतके नामर्द तुम्ही राज्य कसें कराल?" एकदा तो तख्तावर हुक्का ओढीत बसला व ठेवा कोठे आहे म्हणून बादशहास विचारल्यावर, त्याने माहीत नाहीं असे म्हणताच, गुलामाने तख्तावरून उडी टाकून बादशहास खाली पाडिले आणि त्याचे उरावर बसून 'ठेवा कोठे आहे तो दाखवितोस कीं डोळे काढूं?' म्हणून विचारिले. बादशहानें डोळ्यात अश्रु आणून विनविले की 'माझ्या डोळ्यानीं आता थोडेच सुख पाहवयाचे आहे. परंतु मला कुराण वाचण्यास त्याचा उपयोग

होतो, एवढ्यासाठी तरी ते कायम ठेव.' त्या दुष्टानें तिकडे दुर्लक्ष करून पेषकबजानें त्याचे दोनही डोळे फोडिले, (ता. १० ऑगस्ट). हे अघोर कृत्य पाहून बायकापोरांनीं हाहाःकार केला, आणि मोगलांच्या गतवैभवाचा दर्शक असा तो प्रसिद्ध दिवाणखाना स्त्रियांच्या आक्रोशानें गजबजून गेला. पुढें एक दिवस त्यानें जनानखान्यांतल्या तरुण व सुंदर स्त्रियांस आणून बेदम मारिलें, आणि ज्यांचें नखही परपुरुषांचे दृष्टीस पडलेलें नाहीं, त्यांस विवस्त्र करून आपल्या लोकांकडून त्यांची विटंबना करविली.

अशीं दुष्ट कृत्यें करण्यांत त्याचा कांहींच हेतु राहिला नव्हता. त्याची या वेळीं मनुष्यांत गणना नव्हती. तो केवळ पशु बनला होता. ह्या वेळीं त्याचा जात्यभिमान, धर्माभिमान व मराठ्याविषयीं द्वेष हीं सर्व नष्ट झालीं होतीं. हीं कृत्यें ऐकून सर्व शहरांत आकांत झाला. नादिरशहा, अहंमद-शहा, किंवा तयमूरलंग ह्यांनीं प्रजेस लुटिलें व जाळिलें, परंतु बादशाहीचा असा उपमर्द केला नाहीं. मराठे, रजपूत किंवा जाठ ह्या परधर्मी लोकांसही ज्या गादीबद्दल स्वाभाविकपणेंच पूज्यभाव वाटत होता, तिची अशी अवहे-लना स्वधर्मी वजिराकडून व्हावी, हा खरोखर कालचक्राचा महिमा समजा-वयाचा. मोगल बादशाही अपकर्षाच्या सीमेपलीकडे गेली, आणि बादशहा या शब्दात कांहीं अर्थ उरला नाहीं. ज्या मोगलांच्या कुलांत अकबर, शहा-जहान यांसारखे प्रतापी पुरुष झाले, त्या कुलाची अवहेलना ह्या वेळीं अशा प्रकारची झाली.

इस्मईलबेगास ह्या अघोर कृत्यांची खबर समजतांच त्यालाही तिटकारा आला, आणि त्यानें राणेखानाचे हाताखालील मराठ्यांची फौज घेऊन दिल्लींत प्रवेश केला. ह्या संधीस एके दिवशीं संध्याकाळींगुलाम कादरानें राजघराण्यां-तील माणसांची जळून राख व्हावी व आपणांस पळून जाण्यास सवड सांपडावी, म्हणून किल्ल्यांतील लाल बुरुजांत दारू भरून तिला बत्ती दिली, (ऑक्टोबर ता.१७). त्याबरोबर मोठा भयंकर आवाज होऊन सर्व शहर दणाणून गेलें आणि लोक भयग्रस्त झाले. ह्या संधीस तो एका चोरदारानें बाहेर पडून पळाला. राणाखानानें वाड्यांत प्रवेश केला, आणि आग शांत करून कारा-गृहांतील लोकांस मुक्त करून सर्वांच्या खाण्यापिण्याची व वस्त्रांची व्यवस्था करून, तो व अलीबहादर गुलाम-कादरचा पाठलाग करण्यास निघाले. गुलाम-

कादर मारत येथे जाऊन राहिला. मराठ्यानी मीरतच्या किल्ल्यास वेढा दिला एक दिवस रात्रीं तो किल्ल्यांतून पळाला व पापाचा पूर्ण घडा भरल्यामुळे एका शेतात घोड्यावरून पडला त्या शेताचा मालक एक कायस्थ असून त्याचे घर गुलामाने पूर्वी एकदा लुटले होते त्या ब्राह्मणाने गुलामास पकडून राणेखानाकडे पाठविले, (१८-१२-१७८८) त्याने गुलामास मथुरेस नेऊन महादजीचे स्वाधीन केलें महादजीने त्याचे हालहाल करून ता १-३-१७८९ रोजीं शिरच्छेद केला.

ह्या वेळींच मोगलबादशाहीचा खरा अंत झाला असे इंग्रज ग्रंथकार समजतात महादजीने वकील-इ-मुत्लक हे पद फिरून पेशव्यासाठीं घेऊन आपण पेशव्याच्या वतीने सर्व व्यवस्था केली महादजीस ' अलिजा बहादूर, ' वगैरे पदव्या या प्रसंगीं देऊन बादशहाने गोवधबंदीचे फर्मान काढिले पुढे इस्मईलबेगास पकडून महादजीने आग्र्याचे किल्ल्यात बंदोबस्ताने ठेविले, तेथेच तो स १७९९ त मरण पावला दिल्लींत स्वस्थता झाल्यावर महादजीने रजपुताची पुरी खोड मोडिली त्या उद्योगात डि बॉयन्‌ने चागला पराक्रम केल्यावरून महादजीने कवाइती कंपू आणखी वाढविले व त्याच्या खर्चासाठीं अंतर्वेदींत ४० लाखाचा मुलूख जहागीर दिला. तेव्हापासून डि बॉयन् अलीगड येथे राहूं लागला. या वेळी फ्रेंचांचे वजन पुष्कळ वाढले असून, हिंदुस्थानचे कित्येक राजेरजवाडे इंग्रजास सोडून फ्रेंचाच्या बाजूस गेले होते. महादजी स १७९२ त पुण्यास आला आणि तेथेच ता १२-२-१७९४ रोजी मरण पावला. तेणेकरून पुढील राजकारणास निराळे वळण लागले

९. **गोवधमनाईचें फर्मान** (४-९-१७८९)—गुलाम-कादराचे पारिपत्य करून महादजीने बादशहाची सुव्यवस्था लावून दिली, तेव्हा त्यानेही महादजीस किताब व मानमरातब देऊन गौरव केला. या प्रसंगीं मराठशाहीच्या आद्य कर्तव्याची महादजीस आठवण होती आणि नानाने त्यास पुण्याकडून वारंवार सूचना लिहिल्या होत्या कीं, हिंदूंची पवित्र स्थले आपल्या ताब्यात घेऊन धर्माचे संगोपन करावे गोवधासंबंधाने प्रत्यक्ष शिवाजीचा सुद्धा कटाक्ष होता. आणि हिंदुस्थानात गोवध मना असावा अशी हिंदूंची पुरातन भावना होती तदनुसार महादजीने बादशहाजवळ विनंति करून त्याजकडून गोवध मनाईचे फर्मान मिळवून ते सर्व प्रांतिक अंमलदारास जाहीर केले. त्याचा

मराठी तर्जुमा समग्रच खालीं देतों. आरंभीं प्रस्ताव व पुढें फर्मान असें त्याचें स्वरूप आहे.

' एकदां अकबर बादशहानें समस्त इस्लामी विद्वानांची सभा भरवून प्रश्न केला कीं, आपल्या सेवेशीं माझी एक प्रार्थना आहे. कृपा करून मला असें विदित करा कीं, हजरत पैगंबराच्या हादीमध्यें बैल अगर दुभती गाय यांच्यासंबंधानें काय आज्ञा दाखल आहेत ? त्यावरून मौलवी कुत्बुद्दीन पीरशहा आणि मौलवी साबीरबक्ष यांनीं हादीतील वचन काढून दाखविलें तें असें.—'चार इसम पापकर्मे म्हणून समजावे, एक पिंपळाचें किंवा बोरीचें हिरवें झाड कापणारा, दुसरा मनुष्य-विक्रय करणारा, तिसरा गाईचा वध करणारा, आणि चौथा व्यभिचार करणारा. हे चार इसम निःसंशय नरकास पोंचतात. ही गोष्ट कुराणांत सुद्धां स्पष्ट शब्दांनीं प्रमाण मानिलेली आहे. त्यासंबंधानें कुराणांत वचन असून त्यावर पैगंबर रसूलनें बनविलेले नियमही आहेत. यावरून गोवधाचे बाबतींत परमेश्वराची सर्वथा मनाई आहे, याविषयीं संशय नाहीं. ( या फतव्याचे खालीं मौलवींच्या सही व साक्षी आहेत. ) वरील वचनांचीच नक्कल बादशहा शहाआलम गाजीच्या राजचिन्हांकित फर्मानांत दाखल असून तें छ १३ जिल्हेज स. ३१*
( ४-९-१७८९ ) रोजीं प्रसिद्ध झालें, तें येणेंप्रमाणेः—

' समस्त राज्यप्रबन्धक, खिलाफतचे कार्यकर्ते, तसेच बादशहाच्या कृपेस पात्र असे अमीर व परगणानिहायचे शासक आणि प्रांतोप्रांतींचे कारभारी व जबाबदार अधिकारी या सर्वांस कळविण्यांत येतें कीं, बादशहाच्या कारभारांत व मालिकगिरींत स्वामींची आज्ञा म्हणून या मुबारिक फर्मानाचें पालन अवश्य करण्यांत यावें, आणि सर्वांनीं स्पष्ट ध्यानांत बाळगावें कीं, पशू सुद्धां विधात्याच्या सृष्टींतले जीव असून ते निरुपयोगी होत असें समजूं नये. त्यांतही विशेषतः बैल व गाय हे प्राणी अगणित लाभ देणारे आहेत. कारण मनुष्य व

* टीप—शहाआलमचा जूलूस सुरू छ २ जमादिलावाल स. ११७३ हिजरी म्ह. २२-१२-१७५९. वरील फर्मान शोभाराम स्मारक ग्रंथमालेतील ' भारतरक्षक' नांवाच्या पुस्तकांत डॉ. रामचंद्र गुप्ता यानीं मु० सेखा सं. पत्याला येथें प्रसिद्ध केलें आहे.

पशू या दोघांचंही जीवन धान्याच्या पैदाशीवर अवलंबून असून, गाय व बैल यांच्याशिवाय शेतीचे काम बिलकुल साध्य होणार नाही मेहनतीशिवाय खेती नाहीं. आणि मेहनतीस तर बैलाचे साह्य अवश्य पाहिजे यास्तव जनतेचा संसार व निर्वाह चालण्यास गाईची अत्यंत जरूर आहे, आणि गाईवरच मनुष्यांचे व पशूंचे जीवन अवलंबून आहे यास्तव आमचे प्रिय पुत्र महाराजाधिराज माधवराव सिंधिया बहादूर यांनीं आमचेकडे विनंति केली, त्यावरून आम्ही आपल्या उदार अंत करणानें व हर्षपूर्ण दृष्टीनें आमच्या समस्त राज्यभूमीमध्यें गोकुशाचा म्हणजे गोहत्येचा परिपाठ सर्वथैव मना करीत आहो या आमच्या फर्मानाचा अंमल इतउत्तर राज्यातील समस्त अधिकाऱ्यांनीं सावधगिरीनें प्रयत्नपूर्वक करून ही आज्ञा पाळीत जावी, कीं जेणेकरून कोणतेही नगर, कसबा, गाव यात गोहत्येचें नाव सुद्धा दिसूं नये इतक्याउपर जर कोणी इसम या आज्ञेच्या विरुद्ध वागून गोवधाच्या पापात लिप्त होईल, तर तो बादशहाच्या कोपास पात्र होऊन दंड पावेल

( नक्कल फर्मानशाही दरबाव मुमनियत गौकशी, जी महाराज सिंधियाचे दरबारात पितळेवर खोदून ठेवलेली आहे ) या फर्मानाचा अंमल समस्त मराठी संस्थानात अद्यापि होत आहे

गोवध व इतर बाबतींत हिंदूंना दुखवूं नये अशी प्रवृत्ति औरंगजेबाशिवाय इतर सर्व बादशहांची जागृत होती, ही गोष्ट वर ठिकठिकाणी व्यक्त झाली आहे अकबराचें धोरण पृ ९९ व १०० येथें नमूद आहे बाबराची आपल्या मुलास हिंदूंना खुष ठेवण्याची आज्ञा पृ २९ वर दिली आहे खुद्द हुमायूननें ही आज्ञा किती दक्षतेनें पाळली याचा पुरावा जौहरच्या आठवणींत आहे या जौहरचा उल्लेख पृ ५८ वर आला आहे हा हुमायूनचा आवडता नोकर सदैव त्याचेबरोबर असे त्यानें लिहून ठेविलेल्या त्या बादशहाच्या 'खाजगी आठवणी' इंग्रजींत भाषांतर करून स्टुअर्टनें छापल्या आहेत त्यात गोमांससेवनाविरुद्ध त्या बादशहाचा कसा कटाक्ष होता, यासंबंधानें त्यानें खालील मजकूर लिहिला आहे भाऊ कामरानकडून काबूल घेण्याकरिता हुमायून चालून गेला त्या वेळची ही गोष्ट आहे

८ बादशाहा जंगी फौज घेऊन काबूलवर येण्यास निघालेला पाहून कामरान

गर्भगळित झाला; आणि आपलीं सर्व माणसें घेऊन हिंदुस्थानाकडे वळला. कामरान काबुलांतून निघून जातांच तेथील अधिकारी सर्जाखान हुमायूनला भेटून व त्यास बरोबर घेऊन काबुलच्या किल्ल्यांत गेला. रात्र जाली होती तरी बादशहानें लगोलग किल्ल्यात जाऊन दरबारच्या जागेतच मुक्काम केला. दिवसभर प्रवास केल्यानें थकून त्यास फार भूक लागली होती. कामरानची सावत्र आई रुकिया बेगम तेथेंच नजीकच्या वाड्यात राहत होती, तिजकडे हुमायूननें मला व दुसरा एक नोकर वसील यास पाठवून विचारलें, 'कांहीं भोजन तयार असेल तर कृपा करून पाठवा.' आम्हीं जाऊन बेगम साहेबांस बादशहाचा मुजरा कळवून भोजन तयार असल्यास मागितलें. तिने गोमासाचा पाक तयार होता तो आमचेबरोबर पाठविला. वसीलनें जाऊन बादशहापुढें चादर अंथरिली आणि पाक पुढें ठेविला. बादशहानें त्यात चमचा घालतांच ओळखलें कीं हें गोमास असावें आणि लगेच हात आखडून म्हटलें, 'हा वेड्या कामराना! तूं असलें अन्न खाऊन राहत होतास काय? काय ही तुझी पवित्रता! तूं गोमास खाऊन जगतोस? तुला काय चार बकरे ठेवण्याची ऐपत नाहीं? आपल्या पूज्य पित्याचा ज्यास मान राखावयाचा आहे त्यानें हें गोमासान्न बिलकूल सेवन करूं नये. आपण त्याचे चार पुत्र, एवढ्या गोष्टींत सुद्धां वडिलांची इच्छा आपणा चौघास पूर्ण करता न यावी काय?' असे म्हणून तो पाक त्यानें दूर सारिला, आणि नुसतें पेलाभर शरबत पिऊन रात्र काढिली. दुसऱ्या दिवशीं त्यानीं भोजन केलें.' या गोष्टीवरून बाबर व हुमायून याचा गोमांसाबद्दल केवढा कटाक्ष होता हें दिसून येते. त्याचे पश्चात् अकबरानें तर सर्वच मास बहुधा वर्ज्य केलें होतें हे प्रसिद्ध आहे. या परंपरेस अनुसरूनच शहाआलमचें वरील फर्मान आहे.

**१०. दिल्लीचा पाडाव व घराण्याचा शेवट.**—महादजीच्या मृत्यूनंतर सन १८०३ पर्यंत बादशहाचे व्यवस्थेंत विशेष फेरफार झाला नाही. सन १८०३ सालीं इंग्रज व मराठे यांचें मोठें निकराचे युद्ध झालें. त्यात सेप्टेंबर ता. ११ रोजीं दिल्लीस लढाई होऊन लॉर्ड लेक यास जय मिळाला, आणि शिंद्याची फौज पराभव पावली. ता. १६ सेप्टेंबर रोजीं बादशहानें शहाजादा अकबर यास लॉर्ड लेक याजकडे सामोरा पाठवून, त्यास वाड्यां

आणविले रस्त्यांतील गर्दीतून मार्ग करीत लॉर्ड लेक वाड्यात आला तेव्हा बादशहा व इतर मंडळी यास आनंद झाला. पुढे बादशहा व इंग्रज याजमध्ये जो ठराव झाला, त्यास तह असे नाव दिलेले नाहीं, कारण इंग्रजांनी बादशहाचे राज्य काढून घेतल्यामुळे, तो त्यांचा ताबेदार झाला. दिल्ली शहर व आसपासचा अल्प मुलूख त्यांनी बादशहाकडे ठेविला. त्या मुलखाच्या उत्पन्नाशिवाय बादशहाच्या खर्चासाठी दरमहा ९० हजार रुपयांची नेमणूक इंग्रजांनी बांधून दिली, म्हणजे पेशव्यांनी आपणाकडे जो मान घेतला होता, तोच आता इंग्रजांनी घेतला.

येणेप्रमाणे प्रतापी मोंगल वंशाचे राज्य इंग्रजांचे ताब्यात गेले. ता. १८ नोव्हेंबर सन १८०६ रोजी दुर्दैवी शहाआलम मरण पावला. त्या वेळीं त्याचे वय ७८ वर्षांचे होते. संकटें सहन करण्याची त्याची शक्ति विलक्षण होती. प्रसंगी मनाचा निश्चय करून एकदम धाडस करण्याचा गुण त्याच्या अंगीं नव्हता. असे धाडस दाखविण्याचे प्रसंग त्याजला थोडे आले नाहींत, परंतु ते सर्व त्याच्या नामर्दपणामुळे फुकट गेले. त्याचे वजन कधीं कोणावर पडले नाहीं.

शहाआलमचा मुलगा अकबर याजला इंग्रज सरकाराकडून नेमणूक मिळत होती. तो बादशहा हे नाव धारण करून दिल्लीस राहत असे. तो ता. ३० सप्टेंबर १८३७ त मरण पावला, तेव्हा त्याचा भाऊ महमद बहादुरशहा याजकडे इंग्रज सरकाराने नेमणूक चालविली. इंग्रज सरकाराशीं त्याचे अनेक व्यवहार घडले, ते इंग्रजांच्या भागात देणे योग्य होईल. महंमद बहादुरशहा सन १८५७ सालच्या बंडात सामील झाला, म्हणून इंग्रजांनी दिल्ली-शहर काबीज केले, तेव्हा बादशहाच्या पुत्रास व नातवास ठार मारिले, आणि बहादुरशहास रंगून येथे हद्दपार केले. तो ता. ७ नोव्हेंबर सन १८६२ रोजी मरण पावला.

प्रस्तुत काळीं त्या मोंगल वंशाचा दिल्लीत मागमूस नाही. एवढा प्रचंड वंश मानवी इतिहासात नमूद असलेला क्वचित आढळेल. तयमूरलंगाच्या बापापासून म्हणजे सुमारे इ. स. १३०० पासून १८५० पावेतो वीस विख्यात झालेल्या पुरुषांचीं चित्रे उपलब्ध असून, त्यावरून शरीर बांधा, अवयवांची ठेवण,

पराक्रम, दीर्घायुष्य इत्यादि बाबतींत उपयुक्त सिद्धान्त काढतां येतात. बहुतेक पुरुष धिप्पाड, पराक्रमी, दीर्घायुषी व ऐश्वर्यवान् झाले, आणि त्यांनीं जितक्या राज्यांच्या उलाढाली केल्या, तितक्या कोणत्याही एका वंशानें जगाच्या इतिहासांत केलेल्या नाहींत. अशा या थोर वंशाचा इतिहास अभ्यासेच्छूंनीं काळजीपूर्वक पढण्यास सर्वथैव योग्य आहे.

## भाग २ रा समाप्त



# सूची

आरभीं कित्येक अपरिचित परंतु महत्त्वाच्या भगोलिक स्थलांची सूची देऊन त्यापुढे व्यक्तींची दिली आहे कित्येक सामान्य विषय संबद्ध व्यक्ती-खालीं व मोगल, हिंदु, अफगाण अशा नावाखालीं पाहवे

## भूगोलिक

## व्यक्तींची सूची


LIBR
HYDERA